अध्याय ०१ ते ०६



श्रीगुरु सारवरे महाराज सांप्रदायिक

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी




केसन महाराज सारवरे ब्र.भू. विनायक नारायण जोशी
(सारवरे महाराज)

श्रीगुरु साखरे महाराज सांप्रदायिक

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी



कैवल्याचा पुतळा । प्रगटला भूतळा ।
चैतन्याचा जिव्हाळा । ज्ञानोबा माझा ॥ १ ॥
साधकांचा मायबाप । दरुशनें हरें ताप ।
सर्वभूतीं सुखरूप । ज्ञानोबा माझा ॥ २ ॥
ज्ञानियांचा शिरोमणीं । वंद्य जो का पूज्यस्थानीं ।
चिंतकांचा चिंतामणी । ज्ञानोबा माझा ॥ ३ ॥
चालविली जडभिंती । हरली चांगयाची भ्रांती ।
मोक्षमार्गींचा सांगातीं । ज्ञानोबा माझा ॥ ४ ॥
रेड्यामुखीं वेद बोलविला । गर्व द्विजांचा हरविला ।
शांतीरूप प्रगटला । ज्ञानोबा माझा ॥ ५ ॥
ब्रह्मसाम्राज्यदीपिका । वर्णियेली गीतेची टीका ।
विठोबाचा प्राणसखा । ज्ञानोबा माझा ॥ ६ ॥
गुरुसेवेलागी जाण । शरण एका जनार्दन ।
त्रैलोक्याचें जीवन । ज्ञानोबा माझा ॥ ७ ॥

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय पहिला

॥ श्रीगणेशाय नमः ॥

ॐ[1] नमोजी आद्या[2] । वेदप्रतिपाद्या[3] । जय जय स्वसंवेद्या[4] । आत्मरूपा ॥ १ ॥
देवा तूंचि गणेशु । सकलार्थमतिप्रकाशु[5] । म्हणे निवृत्तिदासु । अवधारिजो[6] जी
॥ २ ॥ हें शब्दब्रह्म[7] अशेष[8] । तोचि मूर्ति सुवेष[9] । जेथ वर्णवपु[10] निर्दोष । मिरवत असे
॥ ३ ॥ स्मृति[11] तेचि अवयव । देखा आंगिक[12] भाव । तेथ लावण्याची ठेव[13] । अर्थशोभा
॥४॥ अष्टादश पुराणें । तींचि मणिभूषणें । पदपद्धति खेवणें[14] । प्रमेयरत्नांचीं[15] ॥५॥
पदबंध[16] नागर[17] । तेंचि रंगाथिलें[18] अंबर[19] । जेथ साहित्य[20] वाणें[21] सपूर[22] । उजाळाचें[23] ॥ ६ ॥
देखा काव्यनाटका । जे निर्धारितां[24] सकौतुका । त्याचि रुणझुणती क्षुद्रघंटिका[25] ।
अर्थध्वनि ॥ ७ ॥ नाना प्रमेयांची परी[26] । निपुणपणें[27] पाहतां कुसरी[28] । दिसती उचितें[29]
पदें माझारीं । रत्नें भलीं ॥ ८ ॥ तेथ व्यासादिकांच्या मतीं । तेचि मेखळा[30]
मिरवती । चोखाळपणें[31] झळकती । पल्लवसडका[32] ॥ ९ ॥ देखा षड्दर्शनें[33] म्हणिपती[34] ।
तेचि भुजांची आकृति । म्हणौनि विसंवादें[35] धरिती । आयुधें हातीं ॥ १० ॥ तरी
तर्कु[36] तोचि फरशु । नीतिभेदु[37] अंकुशु । वेदान्तु तो महारसु[38] । मोदकु मिरवे[39] ॥११॥
एके हातीं दंतु । जो स्वभावता खंडितु[40] । तो बौद्धमतसंकेतु । वार्तिकांचा[41] ॥ १२ ॥

---

१ उत्पत्तिविनाशरहित निर्गुण ब्रह्म. २ सर्वांचा आदि. ३ उपनिषदांनीं वर्णिलेला. ४ स्वतःस स्वतःच जाणणाऱ्या. ५ सकल जगाला व बुद्धीला ज्ञानाचा प्रकाश देणारा. ६ श्रवण करा. ७ वेद. ८ संपूर्ण. ९ सुशोभित. १० अकारादिक वर्णरूप शरीर. ११ मन्वादि स्मृति. १२ शरीराचे. १३ आंगलोट; ठेवण. १४ कोंदणें. १५ तत्त्वार्थांची. १६ पद-लालित्य. १७ उत्तम. १८ रंगविलेलें. १९ वस्त्र. २० अलंकारशास्त्र. २१ प्रकार. २२ बारीक. २३ प्रकाशमान. २४ योजना केली असतां. २५ लहान लहान घंटा-घागऱ्या. २६ सिद्धांताचे प्रकार. २७ चौकसपणानें. २८ कुशलतेनें. २९ योग्य. ३० कमरेचा शेला. ३१ स्वच्छपणानें. ३२ शेल्याचे खालीं सोडलेल्या पदरांचे अग्रभाग. ३३ पातंजल, सांख्य, वैशेषिक, न्याय, पूर्व मीमांसा आणि वेदांत हीं सहा दर्शनें. ३४ म्हटलीं जातात. ३५ मतांतरें. ३६ तर्कशास्त्र. ३७ न्यायशास्त्र. ३८ रसाळ. ३९ शोभतो. ४० तुटलेला. ४१ व्याससूत्रांवरील भाष्याचें व्याख्यान.

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय पहिला

**॥ श्रीगणेशाय नमः ॥**

ॐ हे पद मंगलवाचक आहे. हे ओंकार स्वरूप असणाऱ्या, जगताचे आद्यकारण असणाऱ्या आणि वेदाचा कर्ता किंवा वेदैकगम्य असणाऱ्या देवा ! हे निर्गुण ब्रह्म ! तुला माझा नमस्कार असो. तसेच तूं तत्त्वतः स्वयंप्रकाश असून [ सर्वव्यापी अर्थात् ] आत्मरूपानें [ त्वं पद लक्ष्यार्शी अभिन्न ] असणाऱ्या देवा ! तुझा जयजयकार असो १. श्रीनिवृत्तिनाथांचे शिष्य ज्ञानदेव म्हणतात–देवा ! तूं [ तात्त्विक आश्रयविषयभावरहित स्वरूपभूत चित्स्वरूप आहेस; तरीपण कल्पित अशा ] संपूर्ण विषय व मति [ म्ह. वृत्तिज्ञान यांचा सामान्य ] प्रकाशक जो गणपति, तो तूंच आहेस; [ कसा म्हणाल तर ] ऐका महाराज ! २. हा संपूर्ण वेद हीच त्या गणपतीची उत्तम सजविलेली मूर्ति आहे कीं, जिचें निर्दोष [ स्वर व व्यंजनें इत्यादि ] वर्णरूपी शरीर [ अंगकांति, सौंदर्य ] शोभत आहे ३. त्या शरीराची जी ठेवण आहे, अंगलोट आहे, ती अशी पहा कीं, [ मन्वादिकांच्या ] स्मृति हेंच त्याचे अवयव असून त्या स्मृतींतील अर्थ–सौंदर्य म्हणजे जणुं लावण्याची खाणच आहे ४. अठरा पुराणें हींच [ त्याच्या अंगावरील ] 'रत्नखचित अलंकार' होत. त्यांत सांगितलेले 'सिद्धान्त' हीच कोणी रत्नें असून त्यांतील 'छंदोबद्ध पदयोजना' हींच त्या सिद्धान्तरत्नांची 'कोंदणें' होत ५. 'उत्तम-पदलालित्य' हेंच [ त्या गणेशाच्या अंगावरील ] 'रंगविलेलें' वस्त्र होये कीं,ज्या शब्दरचनेंतील 'अलंकार' हेंच त्या वस्त्राचें भरपूर लांब-रुंद लकलकीत तलम पोत होय ६. पहा ! काव्यें व नाटकें याविषयीं कौतुकानें विचार केला असतां [ त्या गणेशाच्या करगोठ्यांतील ] 'लहान लहान घागऱ्या' असून त्या काव्यनाटकांतील 'अर्थ' हा जणुं त्या घागऱ्यांचा 'मंजुळ आवाजच' रुणझुणत आहे ७. त्यांत प्रतिपादिलेल्या 'तत्वांचे अनेक प्रकार' मार्मिक विचारपूर्वक पाहिलें असतां त्यांतील 'कुशलता' आढळते. आणि त्यांतहि कांहीं–' यथार्थ अर्थ वाहकपदें' हीं जणुं अप्रतिम 'रत्नें'च होत, असें दिसून येते ८. त्यांत व्यासादिकांच्या बुद्धि हीच कोणी [ त्या गणपतीच्या कंबरेस बांधलेली ] मेखळा शोभत आहे कीं ज्या मेखळेच्या [ शेल्याच्या ] [ज्या बुद्धीच्या निर्दोष; सरळवृत्ति या जणुं] लोंबत्या – पदराच्या दशा असून त्या निर्मळपणानें झळकत आहेत ९. असें पहा कीं, ज्यास सहा शास्त्रें [ अर्थात् वेदप्रामाण्य मानणारी आस्तिक शास्त्रें ] असें म्हणतात, तीं सहा शास्त्रें गणपतीचे जणुं सहा हातच आहेत. आणि त्या शास्त्रांतील [ पदार्थ निर्णयाचें बाबतींत किंवा तत्व-विचाराचें बाबतींत ] एकमेकांत 'ऐकमत्य' म्हणजे मेळ नसणारीं मतें, हीं त्या सहा हातांत धारण केलेली जणुं निरनिराळी सहा शस्त्रेंच होत १०. ती अशीं कीं [ कणादाचे वैशेषिक शास्त्ररूपी हातामध्यें ] 'तर्क' हा जणुं 'परशु' होय. [ गौतमाचे न्याय-शास्त्ररूपी हातामध्यें षोडश पदार्थात्मक ] 'तत्त्वभेद' हा जणुं 'अंकुश' च होय. आणि 'भगवान् व्यासांचे 'वेदांत' सूत्ररूपी [ हातामध्यें ब्रह्मानंदात्मक ] महारसानें भरलेला [ ब्रह्मात्मैक्यज्ञानरूपी ] 'मोदक' शोभत आहे ११. [ पतंजलीचे योगशास्त्ररूपी] एका हातामध्यें 'दांत' धारण केला आहे, कीं जो मूळचाच मोडका आहे; तो दांत म्हणजे [ वार्तिककारांच्या व्याख्यानानें ] बौद्धाचें शून्य मत-स्वभावतः खंडित असल्याचा जणुं संकेतच आहे. [ कारण पतंजली हे एक ईशतत्त्व अधिक मानीत असल्यानें ते 'सेश्वरसांख्य' होत. या त्यांच्या एका वैशिष्ट्यावरूनच बौद्धांचा शून्यवाद स्वभावतः खंडित असल्याचे सूचित

मग सहजें सत्कारवादु[1]। तो पद्मकरु[2] वरदु । धर्मप्रतिष्ठा[3] तो सिद्धु। अभयहस्तु[4] ॥ १३ ॥ देखा विवेकवंतु[5] सुविमळु[6]। तोचि शुंडादंडु सरळु । जेथ परमानंदु केवळु। महासुखाचा ॥ १४ ॥ तरी संवादु तोचि दशनु[7]। जो समता शुभ्रवर्णु। देवो उन्मेषसूक्ष्मेक्षणु[8] । विघ्नराजु ॥ १५ ॥ मज अवगमलिया[9] दोनी । मीमांसा[10] श्रवणस्थानीं । बोधमदामृत[11] मुनी । अली[12] सेविती ॥ १६ ॥ प्रमेयप्रवाल[13] सुप्रभ[14]। द्वैताद्वैत तेचि निकुंभ[15]। सरिसेपणें एकवटत इभ[16]- । मस्तकावरी ॥ १७ ॥ उपरि दशोपनिषदें । जियें उदारें ज्ञानमकरंदें[17]। तियें कुसुमें मुगुटीं सुगंधें। शोभती भलीं ॥ १८ ॥ अकार चरणयुगल[18]। उकार उदर विशाल। मकार महामंडल। मस्तकाकारें ॥१९॥ हे तीन्ही एकवटले । तेथ शब्दब्रह्म[19] कवळलें[20]। तें मियां श्रीगुरुकृपा नमिलें। आदिबीज[21] ॥ २० ॥ आतां अभिनवे[22] वाग्विलासिनी[23]। जे चातुर्यार्थकलाकामिनी[24]। ते शारदा विश्वमोहिनी । नमिली मियां ॥ २१ ॥ मज हृदयीं सद्‌गुरु। जेणें तारिलों हा संसारपूरु। म्हणौनि विशेषें[25] अत्यादरु। विवेकावरी ॥ २२ ॥ जैसें डोळ्यां अंजन भेटे। ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे। मग वास[26] पाहिजे तेथ। प्रगटे महानिधी[27] ॥ २३ ॥ कां चिंतामणी[28] जालियां हातीं। सदा विजयवृत्ति मनोरथीं। तैसा मी पूर्णकामें[29] श्रीनिवृत्ति। ज्ञानदेवो म्हणे ॥ २४ ॥ म्हणोनि जाणतेनें गुरु भजिजे। तेणें कृतकार्य होईजे। जैसें मुळसिंचनें[30] सहजें। शाखापल्लव संतोषती ॥ २५ ॥ कां तीर्थें जियें त्रिभुवनीं । तियें घडती समुद्रावगाहनीं[31] । ना तरी अमृतरसास्वादनीं । रस सकळ ॥ २६ ॥ तैसा पुढतपुढती[32] तोचि। मियां अभिवंदिला[33]

---

१ सरळ विचार. २ कमलाप्रमाणें हात. ३ धर्माची स्थापना. ४ भयरहित. ५ सारासारविचारयुक्त. ६ अति निर्मळ. ७ दांत. ८ ज्ञानरूप, सूक्ष्म दृष्टीचा. ९ वाटल्या. १० धर्मब्रह्म-मीमांसा. ११ ज्ञानामृतरूपमद. १२ भ्रमर. १३ तत्त्वार्थरूप पोंवळें. १४ पाणीदार. १५ गंडस्थळ. १६ हत्ती. १७ उत्तम ज्ञानरूपी पुष्पांचा मद. १८ दोन्ही पाय. १९ वेद. २० कवटाळिलें. २१ ॐकाररूपी ब्रह्म. २२ अपूर्व. २३ सरस्वती. २४ चौदा विद्या व चौसष्ट कला यांत प्रवीण. २५ अधिक प्रीति जडणें २६ वाट, मार्ग. २७ मोठा ठेवा. २८ चिंतिलेलें प्राप्त करून देणारी वस्तुविशेष. २९ तृप्त. ३० मुळाला पाणी घालणें, शिंपडणें. ३१ समुद्रस्नानें. ३२ वारंवार. ३३ नमिला.

करण्यासाठींच जणुं एका हातांत खंडित दांत धारण केला आहे ] १२. :मग [ शून्यवाद स्वभावतःच खंडित असल्याचे ठरल्यावर ] सहजच [ कपिलांच्या सांख्य शास्त्रांतील ] ‘ सत्कार वाद ’ हा जणुं वर देणारा कमला-सारखा हात होय. धर्माची स्थापना व सिद्धि करणारा [ जैमिनीकृत धर्मसूत्रांतील वेदवाक्यार्थ विचारपूर्वक सिद्ध केलेला धर्मनिर्णय ] हा जणुं अभय देणारा एक हात होय १३. पहा कीं, ज्या ठिकाणीं केवळ [ दुःखसंबंधरहित किंवा उपाधिरहित ] महान् ब्रह्मसुखाचा नित्यनिर-तिशयानंद असून सरळ, अति निर्मळ [ आणि असज्जड-दुःखात्मक प्रपंच-असार असून सच्चित्सुखात्मक ब्रह्म-सारभूत आहे. असा ] सारासार–विचार हीच कोणी एक [ त्या गणपतीची ] लांब सोंड होय १४. तसाच संवाद [ निरनिराळ्या मतांमतांतील विरोध परिहारपूर्वक तत्त्वनिर्णयास उपकारक असा उत्तमवाद ] हाच कोणी एक दांत असून त्यांतील निःपक्षपातीपणा हा त्या दांवाचा पांढरा रंग [ दंतकांती ] आहे. ज्ञानदृष्टि हेच ज्याचे सूक्ष्म पदार्थ निरीक्षणक्षम असें बारीक नेत्र आहेत, असा हा विघ्नराज [ भक्तांच्या विघ्नांचा नाश करण्यास पूर्ण समर्थ ] देव आहे १५. पूर्वमीमांसा आणि उत्तर मीमांसा ह्या दोन्ही मला [ त्या गणपतीच्या ] दोन्ही कानांच्या ठिकाणीं भासतात आणि ज्ञानामृत हाच कोणी [ गंडस्थलांतून निघणारा ] मद असून मुनिरूपी भ्रमर हे त्याचे सेवन करितात १६. [ उपर्युक्त श्रुतिस्मृतींत प्रतिपादिलेली प्रमेयें म्हणजे सिद्धान्त हीं जणुं त्याच्या अंगावरील ] सतेज पोवळींच होत. आणि द्वैत व अद्वैत [ सिद्धान्त किंवा मतें ] हीं जणुं दोन गंडस्थलेंच होत कीं जी त्या गजाननाच्या मस्तकावर सारख्या प्रमाणानें एकत्र आली आहेत. [ कारण श्रुतिस्मृतींत सांगितलेल्या द्वैत व अद्वैत सिद्धांताचा वेदतात्पर्य–विषयीभूत स्वयंप्रकाश अखंड चेतन तत्त्वामध्यें–समन्वय आहे याचींच ती तुल्यबलें-करून एकत्र राहणारी द्वैताद्वैतरूप गंडस्थळें द्योतक होत ] १७. [ तसेंच ईशावास्यादि ] दशोपनिषदें कीं जीं ज्ञान-रूपी–मकरंदानें परिपूर्ण [ व तो देण्याचे बाबतींत ] उदार असून तीच जणुं सुगंधी फुलें आहेत व तीं त्या गंड-स्थलावर असलेल्या मुकुटाच्या ठिकाणीं चांगलीच शोभत आहेत १८. [ ओंकारांतील पहिली ] ‘ अ ’कार मात्रा [ म्हणजे जणुं त्या गणपतीचे ] दोन पायच होत. [ ओंकारांतील दुसरी ] ‘ उ ’कार मात्रा [ म्हणजे जणुं त्याचे ] मोठे पोटच होय. [ आणि ओंकारांतील तिसरी ] ‘ म ’कार मात्रा [ म्हणजे सर्व–अवयवांत श्रेष्ठ किंवा भव्यमंडल किंवा ] मोठा वाटोळा असा जणुं मस्तकाचाच एक आकार होय १९. [ ‘अ’कार, ‘ उ ’कार, आणि ‘ म ’ कार ] ह्या तिन्ही–मात्रा एकत्र झाल्या म्हणजे [अशेष शब्दब्रह्मरूपी गणेशाचें ॐकार स्वरूप प्रगट होते.] त्यांत संपूर्ण वेदाचाच समावेश होतो. [ कारण, ओंकार हा तत्त्वतः संपूर्ण वेदार्थाचें मुख्य तात्पर्य विषयीभूत जे स्वयंप्रकाश ब्रह्म तद्रूपच आहे. ] अशा त्या मूळबीजभूत [ जगदाद्यकारणात्मक ओंकारस्वरूप ] श्रीगणेशास मी श्रीगुरु निवृत्तिनाथांच्या कृपेनें नमस्कार करितों २०. आतां अपूर्व अशा वाणीचे ठिकाणीं विलास करणारी, चातुर्य, अर्थ व कला यांची स्वामिनी आणि विश्वाला मोहित करणारी अशी जी श्रीसरस्वती तिला मी नमस्कार करितों २१. आतां माझ्या हृदयांत वास करणारे जे सद्गुरु, ज्यांच्या कृपेनें संसारमहापुरांतून मी पार पडलों; आणि म्हणून आत्मविचारावर माझी विशेष प्रीति जडली २२. ज्याप्रमाणें ( पायाळूच्या ) डोळ्यांत अंजन घातले म्हणजे त्यावेळीं त्याच्या दृष्टीस विशेष सामर्थ्य येते; त्यानंतर अदृश्य धनस्थानाचा शोध घेतला असतां त्यास भूमिगत असलेला–द्रव्याचा महान् ठेवा स्पष्ट दिसूं लागतो २३. अथवा चिंतामणि हस्तगत झाल्यानंतर ज्याप्रमाणें मनांत इच्छिलेलें सर्व हेतु नेहमी पूर्ण होतात; त्याप्रमाणें श्रीगुरु निवृत्तिनाथांच्या कृपेनें माझे सर्व मनोरथ परिपूर्ण झाले आहेत, असे ज्ञानदेव म्हणतात २४. म्हणून जाणत्यांनीं [ ज्यास बंध–मोक्ष ज्ञानपूर्वक उपर्युक्त–श्रीगुरु सामर्थ्याचें ज्ञान आहे अशा मुमुक्षूंनीं ] श्रीगुरूंची सेवा–करावी व त्या सेवेच्याद्वारां [ मानवी जीवनाची इतिकर्तव्यतारूप–असणाऱ्या ] कृतकृत्यतेस [ब्रह्मस्थितीस] प्राप्त व्हावें. कसे म्हणाल तर–ज्याप्रमाणें झाडाच्या मुळाशीं पाणी घातलें म्हणजे–फांद्या व पानें आपोआप टवटवीत होतात २५. किंवा त्रिभुवनांत जितकीं तीर्थें आहेत तितक्या सर्व तीर्थांत स्नान केल्याचे पुण्य एका समुद्रांत स्नान

श्रीगुरुचि । जो अभिलषित मनोरुचि । पुरविता तो ॥ २७ ॥ आतां अवधारा कथा गहन । जे सकळां कौतुकां जन्मस्थान । कीं अभिनव उद्यान । विवेकतरूचें ॥२८॥ ना तरी सर्व सुखाचि आदि । जे प्रमेयमहानिधि । नाना नवरससुधाब्धि । परिपूर्ण हे ॥ २९ ॥ कीं परमधाम प्रकट । सर्व विद्यांचें मूळपीठ । शास्त्रजातां वसौटें । अशेषांचें ॥ ३० ॥ ना तरी सकळ धर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार । लावण्यरत्नभांडार । शारदेचें ॥ ३१ ॥ नाना कथारूपें भारती । प्रकटली असे त्रिजगतीं । आविष्करोनि महामतीं । व्यासाचिये ॥ ३२ ॥ म्हणौनि हा काव्यांरावो । ग्रंथ गुरुवंतीचा ठावो । एथूनि रसां झाला आवो । रसाळपणाचा ॥३३॥ तेवींचि आइका आणिक एक । एथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक । आणि महाबोधीं कोंवळीक । दुणावली ॥ ३४ ॥ एथ चातुर्य शहाणें झालें । प्रमेयें रुचीस आलें । आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें एथ ॥३५॥ माधुर्यीं मधुरता । शृंगारीं सुरेखता । रूढपण उचितां । दिसे भलें ॥३६॥ एथ कळाविद्पण कळा । पुण्यासि प्रतापु आगळा । म्हणौनि जनमेजयाचे अवलीळा । दोष हरले ॥ ३७ ॥ आणि पाहतां नावेक । रंगीं सुरंगतेची आगळीक । गुणां सगुणपणाचें बिक । बहुवस एथ ॥ ३८ ॥ भानुचोनि तेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळिलें । तैसें व्यासमति कवळिलें । मिरवे विश्व ॥ ३९ ॥ कां सुक्षेत्रीं बीज घातलें । तें आपुलियापरी विस्तारलें । तैसें भारतीं सुरवाडलें । अर्थजात ॥ ४० ॥ ना तरी नगरांतरीं वसिजे । तरी नागराचि होईजे । तैसें व्यासोक्तितेजें । धवळत सकळ ॥४१॥ कीं प्रथमवयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी प्रगटे जैसी आगळी । अंगनाअंगीं ॥ ४२ ॥ ना तरी उद्यानीं माधवी घडे । तेथ वनशोभेची खाणी उघडे । आदिलापासौनि अपाडें । जियापरी ॥४३॥ नानाघनीभूत सुवर्ण । जैसें न्याहाळितां साधारण । मग अलंकारीं बरवेपण । निवाडु दावी ॥ ४४ ॥ तैसें व्यासोक्ति अळंकारिलें । आवडे तें बरवेपण पातलें । तें जाणोनि काय आश्रयिलें । इतिहासीं ॥ ४५ ॥ नाना पुरतिये प्रतिष्ठेलागीं । सानीव धरूनि आंगीं । पुराणें आख्यानरूपें जगीं । भारता आलीं ॥ ४६ ॥ म्हणौनि महाभारतीं नाहीं । तें नोहेचि लोकीं तिहीं । येणें कारणें म्हणिपे पाहीं । व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥ ४७ ॥ ऐसी जगीं सुरस कथा । जें जन्मभूमि परमार्था । मुनि सांगे नृपनाथा । जनमेजया

केल्यानें मिळतें अथवा अमृतरसाचें सेवन केलें असतां सर्व रस सेवन केल्याप्रमाणें होतें २६. वरील दृष्टान्ताप्रमाणें इच्छिलेल्या मनाच्या आवडी पूर्ण करण्याचें सामर्थ्य एक-मेव श्रीगुरूंच्याच ठिकाणीं असल्यामुळें मी त्यांनाच वारं-वार आदरपूर्वक वंदन केले आहे २७. यानंतर सखोल विचारपूर्ण अशी [ महाभारताची ] कथा ऐका कीं, जी आश्चर्याची जन्मभूमीच आहे किंवा विवेकरूप वृक्षांचा अपूर्व बगीचाच आहे २८. किंवा जी कथा सर्व सुखाचें मूळ कारण व सर्व सिद्धांतांचा महान् ठेवा आहे. अथवा शान्त–शृंगारादि नवरसांनीं पूर्ण भरलेला असा जणूं अमृत-सिंधूच आहे २९. किंवा मोक्षाचे उघड उघड स्थानच आहे अथवा सर्व विद्यांचें आदिस्थान, किंबहुना ती [ कथा ] सर्व शास्त्रांचा सर्वतोपरि आधार आहे ३०. ही कथा सर्व धर्मांचें माहेरघर, सज्जनांचा जिव्हाळा अथवा सरस्वतीच्या लावण्यरूपी रत्नांचा ठेवाच आहे ३१. किंवा ही कथा म्हणजे श्रीव्यासांच्या महामतींत प्रवेश करून जणुं सरस्वतीच कथारूपानें या त्रिजगतांत प्रगट झाली आहे ३२. म्हणून हा ग्रंथ सर्व काव्यांचा राजा असून सर्व ग्रंथांच्या थोरवीचें ठिकाण आहे व येथूनच श्रृंगारादिक नवरसांना रसाळपणाचा विशेष डौल आला आहे ३३. तसेंच आणखी एक गोष्ट ऐका कीं, या कथेपासूनच शब्दरूपी लक्ष्मीस सच्छास्त्रीयपणा आला आहे आणि ब्रह्मात्मैक्यबोधाच्या ठिकाणी सुलभतारूप कोमलता–दुप्पटीनें वाढली ३४. या कथेपासूनच चातुर्य शहाणें झालें, तत्त्वार्थाला जास्त गोडी आली आणि या कथेपासूनच सुखाच्या सौभाग्यास पुष्टि आली ३५. माधुर्याला मधुर-पणा, श्रृंगाराला सुरेखपणा व योग्य वस्तूस श्रेष्ठपणा येऊन त्या सर्व उत्तम रीतीनें शोभूं लागल्या ३६. या कथे-पासूनच कलांना कौशल्य प्राप्त झालें व पुण्याचे लोकोत्तर वैभव वाढले. म्हणूनच [ अठरा दिवसांत भारताचीं अठरा पर्वें ऐकल्यामुळें ] जनमेजयाचे ब्रह्महत्येचे दोष सहजच नाहींसे झाले ३७. आणि क्षणभर विचारपूर्वक पाहूं लागले असतां येथें रंगाच्या ठिकाणीं विशेष सुरेखपणा आला व गुणाला चांगुलपणाचें विशेष तेज लाभले आहे ३८. ज्याप्रमाणें सूर्याच्या प्रकाशानें धवळून निघालेले हे–त्रैलोक्य प्रकाशित झाल्याचें दिसते त्याप्रमाणें व्यासांच्या विशाल बुद्धीनें [ महाभारतरूपी कथेच्या द्वारां ] व्यापिलेले अखिल विश्व प्रकाशयुक्त [ ज्ञानसंपन्न ] होऊन शोभत आहे ३९. किंवा चांगल्या शेतांत बी पेरले असतां त्याचा जसा सहजच पूर्णतया विस्तार होतो तसेंच या महा-भारतांत [ औपनिषदिक बीजभूत, वेदप्रतिपादित अशा ] सर्व विषयांचा विस्तार शोभिवंत झाला आहे ४०. अथवा खेडवळ मनुष्य नगरांत राहिल्यावर ज्याप्रमाणें शहाणा होतो, त्याप्रमाणें व्यासांच्या वाणीच्या तेजामुळें सर्व जग स्वच्छ ज्ञानमय झालें ४१. तसेंच, तारुण्याच्या प्रथमदशेंत सौंदर्याची शोभा स्त्रियांच्या अंगीं जशी विशेष अभिव्यक्त झाल्याची दृष्टीस पडतें ४२. अथवा बागेंत वसंतऋतूनें प्रवेश केला असतां तेथील सर्व लहानमोठ्या वृक्षांचे ठिकाणीं पहिल्यापेक्षां अतिशय चांगल्या रूपानें सौंदर्याची खाणीच प्रगट होते ४३. अथवा सोन्याच्या लगडी पाहिल्या असतां त्या दिसण्यांत साधारण दिसल्या तरी त्याचेच दागिने बनविले म्हणजे तेच सोनें आपले सौंदर्य कांहीं निराळ्या रूपानेच दाखविते ४४. व्यासांनीं अलंकृत केलेल्या वाटेल त्या कथेला पवित्रपणा येतो. तें जाणूनच कीं काय इतिहासांनीं आपण होऊनच त्या कथेचा आश्रय केला ४५. किंवा जगांत पूर्ण प्रतिष्ठा प्राप्त होईल म्हणून स्वतःच्या अंगीं नम्रता धरून सर्व पुराणें आख्यानरूपानें महाभारतांत आलीं ४६. म्हणून महाभारतांत जें नाहीं ते त्रैलोक्यांतहि नाहीं; याच कारणा-स्तव संपूर्ण त्रैलोक्यास 'व्यासोच्छिष्ट' असें म्हटले जाते ४७. अशी ही जगांत सुरस म्हणून प्रसिद्ध असलेलीं व ब्रह्मात्मैक्यज्ञानास जन्म देणारी कीं, जी महाभारतरूपी कथा श्रीवैशंपायन मुनींनी राजश्रेष्ठ जनमेजयास सांगि-तली ४८. जी कथा अजोड, चांगली, परमपावन उपमा-

१ इच्छित. २ श्रवण करा. ३ सखोल, गंभीर. ४ अपूर्व. ५ बाग. ६ महासिद्धांताचा ठेवा. ७ अथवा. ८ श्रृंगारादि नवरसरूपी अमृताचा समुद्र. ९ परब्रह्मवस्तु. १० उघड. ११ सर्व शास्त्रांना. १२ आश्रय. १३ सर्वांचे. १४ हृदय. १५ सरस्वती. १६ प्रवेश करून, प्रगट होऊन. १७ राजा. १८ थोरपणाचा. १९ आकार. २० शब्दशोभा. २१ उत्तम, शास्त्रयुक्त. २२ आत्मबोधांत. २३ कोमलता. २४ तत्त्वार्थ. २५ पोसलें.

॥ ४८ ॥ जें अद्वितीय उत्तम । पवित्रैक निरुपम । परम मंगलधामें । अवधारिजो ॥ ४९ ॥ आतां भारतकमळपरागु । गीताख्यु प्रसंगु । जो संवादला श्रीरंगु । अर्जुनेंसीं ॥ ५० ॥ ना तरी शब्दब्रह्माब्धि । मथियला व्यासबुद्धि । निवडिलें निरवधि । नवनीत हें ॥ ५१ ॥ मग ज्ञानाग्निसंपर्कें । कडसिलेंनि विवेकें । पद आलें परिपाकें । आमोदासी ॥ ५२ ॥ जें अपेक्षिजे विरक्तीं । सदा अनुभविजे संतीं । सोहंभावें पारंगतीं । रमिजे जेथ ॥ ५३ ॥ जें आकर्णिजे भक्तीं । जें आदिवंद्य त्रिजगतीं । तें भीष्मपर्वीं संगती । म्हणितली कथा ॥ ५४ ॥ जें भगवद्गीता म्हणिजे । जें ब्रह्मेशांनीं प्रशंसिजे । जें सनकादिकीं सेविजे । आदरेंसीं ॥ ५५ ॥ जैसें शारदीचिये चंद्रकळे । माजि अमृतकण कोंवळे । ते वेंचिती मनें मवाळे । चकोरतलगें ॥५६॥ तियापरी श्रोतां । अनुभवावी हे कथा । अतिहळुवारपणें चित्ता । आणूनियां ॥ ५७ ॥ हें शब्देंवीण संवादिजे । इंद्रियां नेणतां भोगिजे । बोलाआधि झोंबिजे । प्रमेयासी ॥ ५८ ॥ जैसे भ्रमर परागु नेती । परी कमळदळें नेणती । तैसी परी आहे सेविती । ग्रंथीं इये ॥५९॥ कां आपुला ठावो न सांडितां । आलिंगिजे चंद्रु प्रकटतां । हा अनुरागु भोगितां । कुमुदिनी जाणे ॥ ६० ॥ ऐसेनि गंभीरपणें । स्थिरावलोनि अंतःकरणें । आथिला तोचि जाणें । मानूं इये ॥ ६१ ॥ अहो अर्जुनाचिये पांती । जे परिसणया योग्य होती । तिहीं कृपा करूनि संतीं । अवधान द्यावें ॥ ६२ ॥ हें सलगी म्यां म्हणितलें । चरणां लागोनि विनविलें । प्रभू सखोल हृदय आपुलें । म्हणौनियां ॥ ६३ ॥ जैसा स्वभावो मायबापांचा । अपत्य बोले जरी बोबडी वाचा । तरी अधिकचि तयाचा । संतोष आथी ॥ ६४ ॥ तैसा तुम्हीं मी अंगिकारिला । सज्जनीं आपुला म्हणितला । तरी उणें सहजें उपसाहला । प्रार्थूं कायी ॥ ६५ ॥ परी अपराधु तो आणिक आहे । जे मी गीतार्थु कवळूं पाहें । तें अवधारा विनवूं लाहें । म्हणौनियां ॥ ६६ ॥ हें अनावर न विचारितां । वायांचि धिंवसा उपनला चित्ता । येऱ्हवीं भानुतेजीं काय खद्योता । शोभा आथी ॥ ६७ ॥ कीं टिटिभू चांचुवरी । माप सूये सागरीं । मी नेणतु त्यापरी । प्रवर्ते येथ ॥ ६८ ॥ आइका आकाश गिंवसावें । तरी आणीक त्याहूनि थोर होआवें । म्हणौनि अपाडू हें आघवें । निर्धारितां ॥ ६९ ॥ या गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी ।

रहित आणि सर्वोत्कृष्ट कल्याणाचें स्थान आहे, ती ऐका. ४९. आतां भारत हेंच कोणी कमल व भगवंतांनीं स्वतः अर्जुनास सांगितलेला जो गीताविषय हाच त्यांतील पुष्पपराग होय ५०. अथवा अशी कल्पना करतां येईल कीं, व्यासांनीं वेदरूप समुद्र बुद्धिरूप रवीनें घुसळून त्यांतून शेवटीं हें महाभारतरूपी अनुपमेय लोणी निवडून काढिलें ५१. नंतर त्यास ज्ञानरूपी अग्नीची आंच देऊन विचाररूप कढ आल्यावर गीता हे पद्यरूपी जणु काय साजुक तूप झालें ५२. ज्या गीतेची वैराग्यवान नेहमीं इच्छा करितात, तिचा संत नेहमीं अनुभव घेतात आणि ब्रह्मात्मैक्यभावाने निष्णात झालेले ब्रह्मनिष्ठ जिचे ठिकाणीं रममाण होतात ५३. जी कथा भक्तांनीं ऐकण्याला योग्य व त्रैलोक्यांत परमपूज्य असून जी भीष्मपर्वांत सांगितली आहे ५४. आणि लोकांत जिला 'भगवद्गीता' असें म्हणतात. ब्रह्मा व शंकर हे जिची स्तुति करितात व सनकादिक अति आदराने जिचें सेवन करितात ५५. ज्याप्रमाणें शरदृतूंतील पौर्णिमेच्या चांदण्याचे अति सूक्ष्म अमृतकण चकोर पक्षांचीं पिलें हळुवार मनाने [कुशलतेनें] प्राशन करितात ५६. त्याचप्रमाणें श्रोत्यांनीं चित्तास मल-विक्षेपरहित [ पाप व चंचलतारहित ] करून अति कुशाग्रबुद्धीनें या भगवद्गीतेचा अनुभव घ्यावा. [ कारण गीतेंतील परमतत्त्व शब्दातीत असल्यामुळें समजण्यास कठीण आहे ] ५७. या गीतेचें शब्दोच्चारावांचून मनन करावें, इंद्रियांना न कळत अनुभव घ्यावा आणि तिच्याविषयीं बोलूं लागण्याबरोबर तिच्या प्रतिपाद्य विषयापर्यंत जाऊन पोंचावें ५८. जसें भ्रमर कमल पुष्पांतील मकरंदरेणू सेवन करतात; पण कमलदलांना त्याचे अजिबात ज्ञान नसते तशीच या ग्रंथश्रवणाची पद्धति [ समन्वयपूर्वक शब्दपरिचय-अर्थपरिचयद्वारां साक्षात्कारात्मक अर्थरूपतासंपादन करावयाची ] आहे ५९. किंवा, चंद्रप्रकाश प्रगट होण्याबरोबर चंद्रविकासी कमलिनी उमलून आपली जागा न सोडतां ज्याप्रमाणें चंद्राला प्रीतीनें आलिंगन देण्याचें प्रेमसौख्य तिचे तीच जाणते ६० अशा शमदमादि साधनसंपत्तीनें युक्त होऊन जो शुद्ध व स्थिर झालेल्या अंतःकरणानें संपन्न असेल तोच या गीतेच्या प्रतिपाद्य विषयाचे रहस्य जाणूं शकतो, असें आम्ही समजतों ६१. अहो ! अर्जुनासारखा ज्यांचा श्रवण करण्याचा योग्य अधिकार असेल त्या संतांनीं कृपा करून माझ्या व्याख्यानाकडे लक्ष द्यावे ६२. प्रभो, आपलें हृदय फार गंभीर आहे, म्हणून माझी आपल्या चरणापाशीं ही लडिवाळपणाची विनंति आहे, उन्मत्तपणा नव्हे ६३. ज्याप्रमाणें आपलें लहान मूल जरी बोबडें बोललें तरी त्याचा अधिकच संतोष वाटावा; असा आईबापांचा स्वभावच असतो ६४. त्याप्रमाणें माझा तुम्हीं सज्जनांनीं अंगिकार केला असून, ज्याअर्थी मला आपला म्हटला आहे, त्याअर्थी माझें जें कांहीं उणें असेल तें तुम्हीं सहज सहन कराल ! त्याबद्दल मला आपली प्रार्थना केली पाहिजे काय ? तर नाहीं ! ६५. परंतु जो अपराध म्हणून माझ्या हातून घडत आहे, तो निराळाच आहे. तो हा कीं, गीतेचा अर्थ मी स्पष्ट करूं पाहत आहें, म्हणून इकडे लक्ष द्या, अशी आपल्यासारख्यांना विनंति करीत आहे ६६. हें गीतार्थ सांगण्याचें काम मला न पेलणारे आहे. याचा विचार मनांत न करतां, तो स्पष्ट करण्याविषयीं माझ्या चित्तांत व्यर्थ धैर्य उत्पन्न झालें आहे. बाकी सूर्याच्या तेजापुढें काजव्याच्या तेजाची काय शोभा आहे ? ६७. किंवा [ आपलीं पिलें समुद्राने वाहून नेलीं म्हणून त्याचा सूड उगविण्याकरितां ] ज्याप्रमाणें समुद्र कोरडा करण्यासाठीं टिटवीनें आपल्या चोचीनें पाणी उपसण्याचा प्रयत्न केला, त्याप्रमाणें माझा अधिकार न जाणतां मी गीतेसारख्या ग्रंथाचा अर्थ करण्यास प्रवृत्त झालों आहें ६८. असें पाहा, आकाशास कवटाळावयाचे असल्यास ज्याप्रमाणें त्याहून मोठें झालें पाहिजे, त्याप्रमाणें वास्तविक विचारदृष्ट्या पाहतां गीतेचें व्याख्यान करण्यास माझ्यापेक्षां अधिक योग्य पुरुष पाहिजे होता; कारण हें सर्व कृत्य माझ्या शक्तीच्या बाहेर आहे ६९. कारण या गीतार्थाची

१ उपमारहित. २ कल्याणाचें स्थान. ३ भारतरूपी कमळांतील रेणु. ४ वेदरूप समुद्र. ५ काढलें. ६ अपार. ७ गीतारूप. ८ कढविलें. ९ स्वरूप. १० पक्वतेनें. ११ सुवासाला. १२ तत्त्वार्थाला पावलेले. १३ ऐकिली जाते. १४ ब्रह्मा व शंकर यांनीं. १५ शरदृतूंतील. १६ पौर्णिमेच्या चंद्राच्या तेजामध्यें. १७ प्राशन करितात. १८ कोवळ्या. १९ चकोर पक्ष्यांचीं पिलें. २० मऊपणा. २१ गीता. २२ बोलावें. २३ झटावें. २४ पुष्परेणु.

जेथ भवानी प्रश्नु करी । चमत्कारौनि ॥ ७० ॥ तेथ हरु म्हणे नेणिजे । देवी जैसें कां स्वरूप तुझें । तैसें हें नित्य नूतन देखिजे । गीतातत्त्व ॥ ७१ ॥ हा वेदार्थ सागरु । जया निद्रिताचा घोरुं[1] । तो स्वयें सर्वेश्वरु । प्रत्यक्ष अनुवादला[2] ॥७२॥ ऐसें जें अगाध[3] । जेथ वेडावती वेद । तेथ अल्प मी मतिमंद । काइ होये ॥ ७३ ॥ हें अपार कैसेनि कवळावें । महातेज कवणें धवळावें[4] । गगन मुठीं सुवावें[5] । मशकें केवीं ? ॥ ७४ ॥ परी एथ असे एकु आधारु । तेणेंचि बोले मी सधरु । जे सानुकूळ श्रीगुरु । ज्ञानदेवो म्हणे ॥ ७५ ॥ येऱ्हवीं तरी मी मूर्खु । जरी जाहला अविवेकु । तऱ्ही संतकृपादीपकु । सोज्वळु असे ॥ ७६ ॥ लोहाचें कनक होये । हें सामर्थ्य परिसींच आहे । कीं मृतही जीवित लाहे । अमृतसिद्धि ॥ ७७ ॥ जरी प्रकटे सिद्धसरस्वती । तरी मुकयाहि आथी भारती[10] । एथ वस्तुसामर्थ्यशक्ति[11] । नवल कायी ॥ ७८ ॥ जयातें कामधेनु माये । तयासी अप्राप्य[12] कांहीं आहे । म्हणौनि मी प्रवर्तों[13] लाहें । ग्रंथीं इये ॥ ७९ ॥ तरी न्यून ते पुरतें । अधिक तें सरतें[14] । करूनि घेयावें हें तुमतें[15] । विनवितु असे ॥ ८० ॥ आतां देईजो अवधान[16] । तुम्हीं बोलविल्या मी बोलेन । जैसे चेष्टे[17] सूत्राधीन[18] । दारुयंत्र[19] ॥ ८१ ॥ तैसा मी अनुग्रहीतु । साधूंचा निरूपितु[20] । ते आपुलियापरी अलंकारितु । भलतयापरी ॥ ८२ ॥ तंव श्रीगुरु म्हणती राहीं । हे तुज बोलावें नलगे कांहीं । आतां ग्रंथा चित्त देईं । झडकरी वेगां ॥ ८३ ॥ या बोला निवृत्तिदासु । पावूनि परम उल्हासु । म्हणे परियसा मना अवकाशु[21] । देऊनियां ॥ ८४ ॥

धृतराष्ट्र उवाचः—

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः । मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥**

तरी पुत्रस्नेहें मोहितु । धृतराष्ट्र असे पुसतु । म्हणे संजया सांगे मातु । कुरुक्षेत्रींची ॥ ८५ ॥ जें धर्मालय[22] म्हणिजे । तेथ पांडव आणि माझे । गेले असती व्याजें[23] । झुंझाचेनि[24] ॥ ८६ ॥ तरी तेचि येतुला[25] अवसरीं । काय किजत असे येरयेरीं[26] । ते झडकरी कथन करीं । मजप्रती ॥ ८७ ॥

---

१ घोरणें. २ बोलला. ३ खोल. ४ उजळावें. ५ धरावें. ६ चिलटानें. ७ आधारानें. ८ लखलखित | ९ पावतों. १० वाणी. ११ वस्तुमहिमा. १२ दुर्लभ. १३ इच्छितो. १४ योग्य करून घ्या, सोडून द्या.

थोरवी एवढी आहे कीं, स्वतः शंकर त्याची चर्चा करीत असतां पार्वतीला चमत्कार वाटून तिनें शंकराला प्रश्न केला ७०. त्यावर शंकर म्हणाले, हे पार्वती! तुझें स्वरूप नित्य नूतन असल्यामुळें जसा त्या स्वरूपाचा पार लागत नाहीं, त्याप्रमाणें गीतातत्त्व नित्य पहावें तेव्हां नवीनच आहे, असें वाटतें. म्हणून तेंहि जाणण्यास कठीणच आहे ७१. वेदार्थरूपी समुद्र हा [ ब्रह्मस्थितिरूप ] निद्रेंत असलेल्या सर्वव्यापक परमेश्वराचें घोरणें आहे. त्या सर्वेश्वर श्रीकृष्णानें प्रत्यक्ष स्वमुखानें [ जागृतींत ] हे गीताशास्त्र अर्जुनास सांगितलें [ जसें झोंपेंतील घोरणें अबुद्धिपुरःसर अनायासानें घडतें, तसेंच सर्वज्ञ परमेश्वर सर्गारंभीं नवीन वेद उत्पन्न करीत नसून पूर्वसिद्ध, सर्वज्ञतुल्य ऋग्वेदादि शास्त्रांचे सहज अनायासाने फक्त प्रकाशन करतो, असें "निद्रिताचा घोरु" या पदानें सूचित करून वेदाचे अपौरुषेयत्व ध्वनित केले आहे ] ७२. असें हें गीताशास्त्र गहन असून याच्या ठिकाणीं वेदांची देखील मति कुंठित होऊन गेली. तेव्हां अशा ठिकाणीं अल्पज्ञ व मतिमंद असा जो मी, त्या माझी काय कथा? ७३. हें अपार गीतातत्त्व कोणत्या उपायानें समजून घ्यावें!-सूर्याच्या तेजाला कोणी उजाळा द्यावा! चिलटानें आपल्या मुठींत आकाश कसें धरावें? ७४. असें असतां गीतार्थ सांगण्यास तुम्ही कां प्रवृत्त होतां, असें कोणी म्हटल्यास ज्ञानदेव म्हणतात, ज्याअर्थीं श्रीगुरु मला अनुकूल आहेत, त्याअर्थीं एवढें महत्कृत्य करण्याला त्यांचाच एक आधार आहे व याचमुळें मला गीतार्थ करण्यास धीर आला आहे ७५. सहज पाहिलें असतां जरी मी अज्ञानी व विवेकहीन असलों तरीहि संत कृपारूपी दीप सोज्वळ सदा-तेवता आहे. त्याच्या साह्यानें मी गीतार्थ करण्यास प्रवृत्त झालों ७६. लोखंडाचें सोनें होतें खरें, पण तें सामर्थ्य केवळ परिसाचेंच अंगीं आहे, किंवा मेलेल्यासहि जीवित लाभतें; पण हें सामर्थ्यहि अमृतांतच आहे ७७. जर सिद्धसरस्वती म्हणजे अनादिसिद्ध अशी वाग्देवताच खरोखर प्रगट झाली, म्ह. एखाद्यावर अनुग्रहार्थ प्रसन्न झाली [ मग तो मुका असला तरीहि ] त्या मुक्याला भारती म्हणजे सौष्ठवपूर्ण, यथार्थ-अर्थवाहक शब्दाविष्कारक्षम अशी वाचा फुटते. ही केवळ 'वस्तुसामर्थ्यशक्ति 'च म्हणजे त्या वस्तुशीं संबंधित होणाऱ्या व्यक्तीच्या पात्रापात्र-विचार-निरपेक्षतेनें कार्यकारी होणारी [ स्वकार्यक्षम अशी ] अंगभूत असलेली सामर्थ्यरूपशक्तिच आहे. त्यांत नवल ते काय? ७८. अहो! कामधेनूच ज्याची आई, त्याला दुर्लभ असें काय आहे? -म्हणून मी हा ग्रंथ करण्यास प्रवृत्त झालों ७९. तरी यांत कमी असेल तें पुरें करून घेऊन अधिक असेल तें सोडून देऊन मान्य करून घ्यावें अशी माझी आपणा संतांस विनंति आहे ८०. अहो! महाराज, आतां आपण इकडे लक्ष द्यावें; कारण जर आपण बोलवाल तरच मी बोलणार -ज्याप्रमाणें कळसूत्री लाकडाची बाहुली दोऱ्याचे आधारानें नाचते ८१; त्याप्रमाणें मी आपला अनुग्रहित शिष्य आहे व साधूंचा आज्ञाधारक आहे. त्यामुळें आपल्या इच्छेस येईल त्याप्रमाणें मला सुशोभित करा [ माझ्या वाणीला अलंकारित करून मजकडून गीतार्थ बोलवा ] ८२. तेव्हां श्रीगुरु म्हणतात, पुरे! हें तूं आम्हांला सांगावेस असें नाहीं; आतां गीतार्थ सांगण्याकडे लवकर लक्ष दे ८३. अशी श्रीगुरूंची आज्ञा झालेली पाहून श्रीनिवृत्तिदास ज्ञानदेव मनांत अति संतुष्ट होऊन म्हणतात कीं, मी बोलतों, तें आतां स्वस्थ मनानें ऐका ८४.

**अन्वयार्थ—संजय**- 'अरे संजया! **-धर्मक्षेत्रेकुरुक्षेत्रे**-धर्मोत्पत्तीचें स्थान-धर्म उत्पन्न होण्याची जागा अशा कुरुक्षेत्रांत **समवेताः युयुत्सवः मामकाः च एव पाण्डवाः**- जमलेले युद्धाची इच्छा करणारे माझे पुत्र आणि पंडूचे पुत्र-**किं अकुर्वत**-काय करते झाले?' १.

तरी पुत्राच्या ममतेनें मोहित झालेला धृतराष्ट्र संजयास विचारतो, "हे संजया! कुरुक्षेत्राची काय हकीकत आहे, ती मला सांग. असे तो म्हणाला ८५. ज्या कुरुक्षेत्राला धर्माचे ठिकाण असें म्हणतात, तेथें दुर्योधनादि माझे व धर्मादि पंडूचे पुत्र युद्ध करण्याच्या निमित्तानें गेले आहेत, ८६. तर ते परस्परांत एवढा वेळपर्यंत काय करीत आहेत, तें मला लवकर सांग" ८७.

---

१५ तुम्हांला. १६ लक्ष. १७ नाचे. १८ सुताच्या स्वाधीन. १९ कळसूत्री बाहुली. २० आज्ञाधारक.

२१ स्वस्थपणा. २२ धर्माचें घर. २३ निमित्तानें. २४ युद्धाच्या. २५ इतक्या. २६ परस्परांशीं.

संजय उवाचः—

दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा । आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥

तिये वेळीं तो संजय बोले । म्हणे पांडवसैन्य उचललें । जैसें महाप्रळयीं पसरलें । कृतांतमुखें ॥ ८८ ॥ तैसें तें घनदाट । उठावलें एकवाट । जैसें उसळलें काळकूट । धरी कवण ॥ ८९ ॥ नातरी वडवानलु सादुकला । प्रळयवातें पोखला । सागरु शोषूनि उधवला । अंबरासी ॥ ९० ॥ तैसें दळ दुर्धर । नानाव्यूहीं परिकर । अवगमलें भयासुर । तिये काळीं ॥ ९१ ॥ तें देखोनियां दुर्योधनें । अव्हेरिलें कवणें मानें । जैसे न गणिजे पंचाननें । गजघटांतें ॥ ९२ ॥

राजोवाचः—

पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् । व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥

मग द्रोणापासीं आला । तयांतें म्हणे हा देखिला । कैसा दळभारु उचलला । पांडवांचा ॥ ९३ ॥ गिरिदुर्ग जैसे चालते । तैसे विविध व्यूह संभवते । रचिले आंथी बुद्धिमंतें । द्रुपदकुमरें ॥ ९४ ॥ जो का तुम्हीं शिक्षापिलां । विद्या देऊनि कुरुठा केला । तेणें हा सैन्यसिंधु पोखरिला । देख देख ॥ ९५ ॥

अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि । युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥

आणिकही असाधारण । जे शस्त्रास्त्रीं प्रवीण । क्षात्रधर्मीं निपुण । वीर आहाती ॥ ९६ ॥ जे बळें प्रौढी पौरुषें । भीमार्जुनांसारिखे । ते सांगेन कौतुकें । प्रसंगेंची ॥९७॥ एथ युयुधानु सुभटु । आला असे विराटु । महारथी श्रेष्ठु । द्रुपद वीरु ॥९८॥

धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् । पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥

युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान् । सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥

चेकितान धृष्टकेतु । काशिराज वीर विक्रांतु । उत्तमौजा नृपनाथु । शैब्य देख ॥ ९९ ॥ हा कुंतिभोज पाहें । एथ युधामन्यु आला आहे । आणि पुरुजितादि राय हे । सकळ देख ॥ १०० ॥ हा सुभद्राहृदयनंदनु । जो अपरु नेवार्जुनु । तो अभिनन्यु म्हणे दुर्योधनु । देखें द्रोणा ॥ १ ॥ आणीकही द्रौपदीकुमर । हे सकळही महारथी वीर । मिती नेणिजे परी अपार । मीनले असती ॥ २ ॥

**अन्वयार्थ**—**तु**–पण–**तदा**–त्या वेळीं–**राजा दुर्योधनः**–राजा दुर्योधन–**पांडवानीकं व्यूढं दृष्ट्वा**–पांडवांचें सैन्य व्यूहरचना करून उभें आहे असें पाहून–**आचार्यम् उपसंगम्य**–द्रोणाचार्यांपाशीं जाऊन–**(इदं)**–**वचनं**–असें वचन–**अब्रवीत्**–बोलला. २

तेव्हां संजय सांगतो कीं "ज्याप्रमाणें महाप्रलयाचे वेळीं काळाचें तोंड पसरलेलें असतें, त्याप्रमाणें पांडवांचें सैन्य उठाव घेऊन खवळले आहे असे तो म्हणाला ८८. सर्व पांडवसैन्य एकवटून एका रोखानें सज्ज झालें, तेव्हां त्याला कोण आवरणार ? ज्याप्रमाणें काळकूट विष उसळलें असतां त्याचें शमन कोणाच्यानें करवेल ? ८९. किंवा वडवानल पेटून तो प्रलयवातानें प्रदीप्त झाल्यावर ज्याप्रमाणें समुद्रांतील पाण्याचें शोषण करून आकाशापर्यंत भडकतो ९०. त्याप्रमाणें पांडवांचें भयंकर सैन्य नानाप्रकारच्या व्यूहरचनेनें सज्ज झालेले असल्यामुळें त्या वेळेस अति भेसूर असें दिसलें ९१. ते पांडवांचें सैन्य पाहून दुर्योधनानें त्याचा बेपर्वाईनें तिरस्कार केला. तो कोणत्या प्रकारें म्हणाल तर जसा हत्तींच्या कळपास पाहून त्यांना सिंह कापदार्थ मानतो (तसा) ९२.

**अन्वयार्थ**—**आचार्य**–अहो द्रोणाचार्य!–**तव**–तुमच्या–**धीमता शिष्येण**–बुद्धिमान् शिष्यानें–**द्रुपदपुत्रेण**–द्रुपदाच्या पुत्रानें–धृष्टद्युम्नानें–**व्यूढाम् एतां पाण्डुपुत्राणां महतीं चमूम्**–रचलेल्या व्यूहाच्या आकारानें उभ्या केलेल्या या पांडवांच्या मोठ्या सेनेस–**पश्य**–पहा. ३

मग द्रोणाचार्यांजवळ जाऊन त्यांस म्हणाला कीं, पांडवांचें हें सैन्य कसें उसळलें आहे, पाहिलें ना ! ९३. बुद्धिमान् असा जो द्रुपदपुत्र धृष्टद्युम्न, त्यानें या सैन्याची अशी चमत्कारिक रचना केली आहे कीं, तें चालत्या डोंगरी किल्ल्याप्रमाणेंच दिसत आहेत ९४. ज्या धृष्टद्युम्नाला तुम्ही पढवून विद्येचा आगर केले, त्याने हा सेनासिंह चहूंकडे पसरविला आहे, तो पाहा तर खरा ! ९५.

**अन्वयार्थ**—**अत्र**—या सैन्यांत–**शूराः**–शूर,–**महेष्वासाः**–ज्यांचीं इष्वास म्ह० धनुष्यें मोठमोठीं आहेत असे, –**युधि भीमार्जुनसमाः**–युद्धांत भीम-अर्जुन यांच्या तोडीचे, [ असे लोक आहेत, त्यांतील कित्येकांचीं नांवेंहि दुर्योधन, सांगतो. ] **युयुधानः**–सात्यकि–**च**–**विराटः**–व विराट राजा–**च महारथः द्रुपदः**–व महारथी द्रुपद ४.

याशिवाय आणखी शस्त्रास्त्रांत प्रवीण व क्षात्रधर्मांत निपुण असे असामान्य महान् योद्धे आहेत ९६. जे बलानें, योग्यतेने व पुरुषार्थानें भीमार्जुनासारखे आहेत, त्याचे सहज प्रसंगानुसार वर्णन करितों ९७. या ठिकाणीं महायोद्धा सात्यकी राजा, विराट राजा आणि श्रेष्ठ महारथी द्रुपद राजा हे आले आहेत ९८.

**अन्वयार्थ**—**धृष्टकेतुः चेकितानः च वीर्यवान् काशिराजः**–धृष्टकेतु, चेकितान व वीर्यवान्–पराक्रमी काशिराजा–**पुरुजित् च कुंतिभोजः च नरपुंगवः शैब्यः**–पुरुजित् व कुंतिभोज व नरश्रेष्ठ शैब्य; ५. **च विक्रान्तः युधामन्युः** –व पराक्रमी युधामन्यु–**वीर्यवान् उत्तमौजाः**–व वीर्यवान् उत्तमौजा–**सौभद्रः** –सुभद्रेचा पुत्र अभिमन्यु–**च द्रौपदेयाः** –आणि द्रौपदीचे पांचहि पांडवांपासून झालेले पांच पुत्र–**सर्वे एव महारथाः** –हे सर्वच महारथी आहेत ६.

"चेकितान, धृष्टकेतु, पराक्रमी असा काशिराजा, नृपश्रेष्ठ उत्तमौजा व शैब्य राजा यांकडे पाहा ९९. हा कुंतिभोज पाहा, तसाच येथें हा युधामन्यु आलेला आहे आणि पुरुजित् आदिकरून सर्व राजे आले आहेत ते पाहा" १००. दुर्योधन द्रोणाचार्यांस म्हणतो :– "अहो महाराज ! हा पाहा, सुभद्रेच्या अंतःकरणाला आल्हाद देणारा तिचा मुलगा प्रतिअर्जुन असा अभिमन्यु १. तसेच आणखी हे द्रौपदीचे मुलगे व सर्व महारथी कीं ज्यांची गणती करितां येत नाहीं असे अपरिमित वीर या ठिकाणीं जमले आहेत २.

१ खवळलें. २ काळाचें तोंड. ३ एकदम. ४ भडकला. ५ पोसलेला. ६ उसळला. ७ आकाशापर्यंत. ८ नाना प्रकारच्या सैन्यरचनेनें. ९ तयार. १० भासले. ११ तिरस्कारिलें. १२ सिंहानें. १३ हत्तींच्या कळपाला. १४ सेनासमूह. १५ डोंगरी किल्ले. १६ सैन्यरचना. १७ सभोंवार. १८ आहेत. १९ धृष्टद्युम्नानें. २० पढविला. २१ घर. २२ पसरिला. २३ महान्. २४ प्रौढीनें. २५ पुरुषार्थानें. २६ महायोद्धा. २७ पराक्रमी. २८ प्रति अर्जुनच. २९ गणती. ३० एकत्र झाले.

अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम । नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥
भवान् भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः । अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥

आतां आमुच्या दळीं नायक । जे रूढवीर[1] सैनिक । ते प्रसंगें आइक । सांगिजेती[2] ॥ ३ ॥ उद्देशें[3] एक दोनी । जायिजंती[4] बोलोनी । तुम्ही आदिकरूनी । मुख्य जे जें ॥ ४ ॥ हा भीष्म गंगानंदनु । जो प्रतापतेजस्वी भानु । रिपु[5]गजपंचाननु । कर्णवीरु ॥ ५ ॥ या एकेकाचेनि मनोव्यापारें[6] । हें विश्व होय संहरे । हा कृपाचार्यु न पुरे । एकलाचि ॥ ६ ॥ एथ विकर्ण वीरु आहे । हा अश्वत्थामा पैल पाहें । याचा आडदरु[7] सदां वाहे । कृतांतु मनीं ॥ ७ ॥ समितिंजयो सौमदत्ती ।

अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः । नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥

ऐसे आणीकही बहुत आहाती । जयांचिया बळा मिती । धाता[8]ही नेणें ॥ ८ ॥ जे शस्त्रविद्यापारंगत[9] । मंत्रावतार मूर्त[10] । हो कां जें अस्त्रजात[11] । एथूनि रूढ[12] ॥ ९ ॥ हे अप्रतिमल्ल[13] जगीं । पुरता प्रतापु अंगीं । परी सर्व प्राणें मजचिलागीं । ओंरायिले[14] असती ॥ ११० ॥ पतिव्रतेचें हृदय जैसें । पतिवांचूनि न स्पर्शे । मी सर्वस्व या तैसें । सुभटांसी[15] ॥ ११ ॥ आमुचिया काजांचेनि[16] पाडें[17] । देखती आपुलें जीवित थोकडें[18] । ऐसे निरवधि[19] चोखडें[20] । स्वामिभक्त ॥ १२ ॥ झुंजती कुळकणी[21] जाणती । कळे[22] कीर्तीसी जिती[23] । हे बहु असो क्षात्रनीति[24] । एथोनियां ॥ १३ ॥ ऐसे सर्वांपरि पुरते[25] । वीर दळीं आमुते[26] । आतां काय गणूं यांतें । अपार हे ॥ १४ ॥

अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् । पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥

वरी क्षत्रियांमाजी श्रेष्ठु । जो जगजेठी[27] जगीं सुभटु[28] । तया दळवैपणाचा[29] पाटु[30] । भीष्मासि पैं ॥ १५ ॥ आतां याचेनि बळें गवसलें[31] । हे[32] दुर्ग[33] जैसे पन्नासिलें[34] । येणें पाडें[35] थेकुलें[36] । लोकत्रय ॥ १६ ॥ आधींच समुद्र पाहीं । तेथ दुवाडपण[37] कवणा नाहीं । मग वडवानळु तैसे याही । विरंजा[38] जैसा ॥ १७ ॥

---

१ योद्धे. २ सांगतों. ३ माहितीकरितां. ४ जातो. ५ शत्रु-रूपी हत्तीचा नाशक, सिंह. ६ संकल्पमात्रानें. ७ धाक. ८ ब्रह्मा. ९ शस्त्रविद्येंत निपुण. १० साक्षात्. ११ समग्र अस्त्रें. १२ प्रचलित. १३ बिनजोड. १४ अनुसरलें. १५ योध्यांना.

**अन्वयार्थ**–तु-पण-**अस्माकं**-आम्हांमध्यें-**ये विशिष्टाः** - जे श्रेष्ठ आहेत–**च**--**व**[ **ये**--जे ] **मम सैन्यस्य नायकाः** – माझ्या सैन्याचे नेते आहेत–**तान्**–त्यांना–**निबोध**–तूं ऐक–**द्विजोत्तम**–अहो श्रेष्ठ द्विज! **ते संज्ञार्थं**–तुम्हांला कळण्यासाठीं–आपल्याकडे कसे कसे श्रेष्ठ लोक आहेत हें आपल्या ध्यानांत यावें म्हणून–**तान्**–त्यांचीं [ **कांहीं** ] नांवें–**ब्रवीमि**–मी सांगतों ७. **भवान्**–आपण स्वतः [आम्हां सर्वांचे गुरु]**च भीष्मः**--व भीष्म [ कौरव-पांडवांचे पितामह ] **च कर्णः**--व [ माझा मित्र ] कर्ण–**च समितिंजयः कृपः**--आणि युद्धास जिंकणारा–विजयी कृपाचार्य [ आमचे प्राचीन गुरु व तुमचे श्यालक ],–**अश्वत्थामा**– तुमचा पुत्र अश्वत्थामा–**च विकर्णः**–व माझा भाऊ विकर्ण,– **तथा एव च सौमदत्तिः**–व तसाच सौमदत्ति–भूरिश्रवा. ८

आतां आमच्या सैन्यांत प्रमुख असे महावीर कोण-कोण आहेत ते सांगतों ऐका ३. प्रथम खुद्द आपण नंतर इतर वीर जे आहेत, त्यांपैकीं कांहीं मुख्यमुख्यांची एकदोन नांवें दिग्दर्शनार्थ सांगतों ४. शौर्यानें व बलानें केवळ प्रतिसूर्यच असा हा गंगापुत्र भीष्म, शत्रुरूपी हत्तीला केवळ सिंहासारखा भासणारा असा हा पराक्रमी वीर कर्ण ५. यांतील एकेकाच्या केवळ संकल्पानें ह्या विश्वाचा संहार होईल. फार काय, हे एकटे कृपाचार्य देखील या कृत्याला पुरे नाहींत का? ६. हा या ठिकाणीं विकर्ण वीर आहे, तसाच तो पलिकडे अश्वत्थामा पाहा, याची धास्ति प्रत्यक्ष यमहि मनांत नेहमी बाळगतो! ७. युद्धामध्यें सदैव विजयी असणारा हा सौमदत्ति [ भूरिश्रवा ].

**अन्वयार्थ**—**च अन्ये**–आणि तसेच दुसरे–**बहवः शूराः**–पुष्कळ शूर–**मदर्थे त्यक्तजीविताः**–माझ्यासाठीं त्यांनीं आपलें जीवित सोडण्याचा–मरण्याचा निश्चय केला आहे असें;–**नानाशस्त्रप्रहरणाः**–अनेक प्रकारचीं शस्त्रें हींच ज्यांचीं शत्रूवर प्रहार करण्याचीं साधनें आहेत असे व–**सर्वे युद्ध-विशारदाः**–ते सर्व युद्धामध्यें कुशल असे आहेत. ९

त्याचप्रमाणें ज्यांच्या शौर्याचा अंत प्रत्यक्ष ब्रह्मदेवालाहि लागत नाहीं, असे आणखी कितीतरी वीर आहेत ८. कीं जे शस्त्रविद्येंत निपुण असून, अस्त्रांच्या विद्येचें तर साक्षात् अवतारच आहेत. फार कशाला, यांच्यापासूनच संपूर्ण अस्त्रविद्या जगांत प्रसिद्धीस आली! ९. हे अति बलवान् असून जगांत यांच्या तोडीचें दुसरे योद्धे नाहीत, यांच्या अंगीं पुरते सामर्थ्य असले तरीपण ते जीवाभावानें मलाच अनुसरले आहेत १०. ज्याप्रमाणें पतिव्रतेचे मन पतीवांचून इतरांस स्पर्शहि करीत नाहीं, केवळ पतीच्याच ठिकाणीं असतें, त्याप्रमाणें या वीरांना मीच जीव कीं प्राण आहे ११. हे स्वामिभक्तिविषयीं इतकें निःसीम आहेत कीं, आमच्या कामापुढें ते आपले प्राणही तुच्छ समजतात. म्हणून ते पराकाष्ठेचे उत्तम स्वामिभक्त आहेत १२.हे युद्धकलेमध्यें निष्णात असून युद्धकुशलतेने कीर्तीस जिंकणारे आहेत. फार काय सांगावें! क्षत्रियांचा धर्म यांच्यापासूनच प्रसिद्धीस आला आहे हो!१३. याप्रमाणें आमच्या सैन्यांत सर्वतोपरी पराक्रमी असे अपार वीर आहेत, त्यांची किती म्हणून गणती करावी! १४.

**अन्वयार्थ**—**तत्**–अशा प्रकारचें–**अस्माकं**–आमचें– **भीष्माभिरक्षितं बलं**–भीष्मांनीं ज्याचें सर्व प्रकारें रक्षण केलें आहे, असें सैन्य–**अपर्याप्तं**–अपरिमित फार मोठें आहे,–**तु** परंतु–**एतेषां**–या पांडवांचें–**भीमाभिरक्षितं**– भीमानें ज्याचें सर्वतः रक्षण केलें आहे असें–**इदं बलं**– हें सैन्य–**पर्याप्तं**–परिमित–थोडें आहे. १०

तशांत; सर्व क्षत्रियांमध्यें श्रेष्ठ आणि जगांतील सर्व योद्ध्यांमध्यें प्रतापी ज्येष्ठ असे जे भीष्माचार्य, त्यांच्याकडे या सर्व सैन्याचे आधिपत्याचें अधिकार दिलेलें आहेत १५. आतां त्यांनीं हें सर्व सैन्य आवरून अशा बेतानें रचिलें आहे कीं, जणुं काय हे किल्लेच बांधिले आहेत. त्यांच्या शौर्यापुढें त्रिभुवनदेखील तुच्छ आहे १६. असें पहा कीं; आधीच समुद्र हा कोणास दुस्तर नाहीं? तर सर्वतोपरि दुस्तर आहे तशांत त्यास वडवानळाचें साह्य व्हावें १७.

१६ कार्याच्या. १७ योग्यतेनें. १८ उणें, कमी. १९ निस्सीम. २० उत्तम. २१ चातुर्य. २२ कुशलतेनें. २३ जिंकितात. २४ क्षत्रियांचा धर्म. २५ पराक्रमी. २६ आमच्या बाजूला. २७ मोठा योद्धा. २८ चांगला योद्धा.

२९ सेनापतीपणाचा. ३० अधिकार. ३१ आश्रित झाले. ३२ सेनाचक्र. ३३ किल्ल्याप्रमाणें. ३४ रचिलें. ३५ योग्यतेनें, तुलनेनें. ३६ थोडें. ३७ दुस्तरता. ३८ साहाय्यकर्ता.

ना तरीं प्रळयवह्नी महावातु । या दोघां जैसा सांधांतु । तैसा हा गंगासुतु । सेनापति ॥ १८ ॥ आतां येणेंसि कवण भिडे[3] । हें पांडवसैन्य कीर थोकडें । परि वरचिलेनि पाडें । दिसत असे ॥ १९ ॥ वरी भीमसेनु बेथुं । तो जाहला असे सेनानाथु । ऐसें बोलोनियां मातु । सांडिली तेणें ॥ १२० ॥

अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः । भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि ॥ ११ ॥

मग पुनरपि काय बोले । सकळ सैनिकांतें म्हणितलें । आतां दळभार आपुलाले । सैरसे करा ॥ २१ ॥ जया जिया अक्षौहिणी । तेणें तिया आरणी । वरगण कवणकवणी । महारथीया ॥ २२ ॥ तेणें तिया आवरिजे । भीष्मातळीं राहिजे । द्रोणातें म्हणे पाहिजे । तुम्ही सकळ ॥ २३ ॥ हाचि एकु रक्षावा । मी तैसा हा देखावा । येणें दळभारु आघवा । साचु आमुचा ॥ २४ ॥

संजय उवाचः—

तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः । सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥

या राजयाचिया बोला । सेनापति संतोषला । मग तेणें केला । सिंहनादु ॥ २५ ॥ तो गाजत असे अद्‌भुतु । दोन्ही सैन्याआंतु । प्रतिध्वनि न समातु । उपजत असे ॥ २६ ॥ तयाचि तुलगासवें । वीरवृत्तीचेनि थावें । दिव्य शंख भीष्मदेवें । आस्फुरिला ॥ २७ ॥ ते दोन्ही नाद मीनले । तेथ त्रैलोक्य बधिरीभूत जाहलें । जैसें आकाश कां पडिलें । तुटोनिया ॥ २८ ॥ घडघडीत अंबर । उचंबळत सागर । क्षोभलें चराचर । कांपत असे ॥ २९ ॥ तेणें महाघोषगजरें । दुमदुमिताती गिरिकंदरें । तव दळामाजीं रणतुरें । आस्फुरिलीं ॥ १३० ॥

ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः । सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥

उदंड सैंघ वाजतें । भयानकें खाखातें । महाप्रळयो जेथें । धाकडांसी ॥ ३१ ॥ भेरी निशाण मांदळ । शंख काहळ भोंगळ । आणि भयासुर रणकोल्हाळ । सुभटांचे ॥ ३२ ॥ आवेशें भुजा त्राहाटिती । विसणेले हांका देती । जेथ महामद भद्रजाती । आवरती ना ॥ ३३ ॥ तेथ भेडांची कवण मातु । कांचया केर फिटतु । जेणें दचकला कृतांतु । आंग नेघे ॥ ३४ ॥ एकां उभयाचि प्राण गेले । चांगांचे दांत बैसले । बिरुदाचे दादुले । हिंवताती ॥ ३५ ॥ ऐसा अद्‌भुत तूरबंबाळु । ऐकोनि ब्रह्मा व्याकुळु । देव म्हणती प्रळयकाळु । वोढवला आजी ॥ ३६ ॥

किंवा प्रलयकालच्या अग्नीला महावाताचें साहाय्य मिळून त्या उभयतांचा जसा संयोग व्हावा, तसें या आमच्या अफाट सैन्यास भीष्म हे सेनापति मिळाले आहेत १८. तेव्हां आमच्या सैन्याबरोबर कोण युद्ध करील ( कोण टिकेल ? ) पांडवांचें सैन्य पहावें तर ते अगदींच थोडें आहे; परंतु त्याची वरपंग रचना मात्र मोठी दिसते १९. शिवाय त्यांचें सेनापतित्व दांडग्या भीमसेनानें स्वीकारलें आहे. इतकें सांगून दुर्योधन ती गोष्ट बोलण्याची सोडून देऊन स्तब्ध राहिला १२०.

**अन्वयार्थ—भवन्तः सर्व एव हि**–आपण सर्वेही–**सर्वेषु अयनेषु**–आपापल्या नियतस्थानांत–**यथाभागम्**–आपला भाग न सोडतां–**अवस्थिताः**–राहून, स्थित होऊन–**भीष्मम् एव**–केवळ भीष्माचेंच–**अभिरक्षन्तु**–सर्व बाजूंनीं रक्षण करा ११.

मग पुन्हा सर्व सेनापतींस म्हणाला "अहो, आतां आपापलें सैन्य समुदाय सज्ज करा २१. ज्यांच्या ताब्यांत सैन्याच्या ज्या अक्षौहिणी आहेत. त्यांतील श्रेष्ठ महारथ्यांनीं आपापल्या अक्षौहिणी वाटून घेऊन युद्धस्थानीं जाऊन उभें राहावें २२. आणि त्यांनीं त्या त्या अक्षौहिणी संभाळाव्यात व भीष्मांच्या आज्ञेंत वागावें." नंतर तो द्रोणाचार्यांस म्हणाला, "तुम्ही सर्व सैन्यावर देखरेख ठेवावी २३. आणि भीष्मास मजप्रमाणेंच समजून त्यांचेंच संरक्षण करावें; कारण, आमच्या सर्व सैन्याची भिस्त सर्वतोपरि त्यांच्यावरच आहे २४.

**अन्वयार्थ—तस्य**–त्या दुर्योधनाचा–**हर्षं**-हर्ष-**संजनयन् प्रतापवान् कुरुवृद्धः पितामहः**–उत्पन्न करणारे प्रतापी कुरुवंशांतील वृद्ध पितामह भीष्म–**उच्चैः सिंहनादं विनद्य**–मोठ्या जोरानें आरोळी ठोकून–सिंहाच्या गर्जनेसारखी मोठी गर्जना करून–**शंखं**–शंखाला–**दध्मौ**–वाजविता झाला १२.

राजा दुर्योधनाचें हें भाषण ऐकून सेनापति भीष्मांस फार आनंद झाला आणि त्यांनीं सिंहासारखी गर्जना केली २५. तो गर्जनानाद दोनहि सैन्यांत इतक्या विलक्षण तऱ्हेने दुमदुमून गेला कीं, त्याचा प्रतिध्वनि आकाशांत देखील मावेना २६. तो प्रतिध्वनि होत आहे तों त्याबरोबरच वीरवृत्तीच्या बळानें भीष्मांनीं आपला दिव्य शंख वाजविला २७. ते दोन्ही प्रचंड ध्वनि एकत्र झाले, तेव्हां त्रैलोक्याच्या कानठळ्या बसल्या. त्या वेळीं आकाशच कोसळून पडत आहे कीं काय असा भास झाला! २८. त्या वेळीं आकाश गडगडूं लागलें. समुद्र उसळूं लागला, हें स्थावरजंगम विश्व घाबरून जाऊन थरथर कापूं लागले; २९. आणि त्या महानादाच्या घोषानें पर्वतांच्या गुहांमधून देखील प्रतिध्वनि दुमदुमुन उठले; असे चालले असतां त्या सैन्यांमध्यें रणवाद्यें वाजूं लागलीं १३०.

**अन्वयार्थ—ततः**–भीष्मांनीं शंख वाजवितांच–**शंखाः**-शंख,–**च–भेर्यः**–व नगारे,–**च पणवानकगोमुखाः**–व ढोल, खंजिऱ्या, मृदंग–**सहसा एव**–एकाएकींच–**अभ्यहन्यन्त** वाजविले गेले–**स शब्दः**–तो शब्द–**तुमुलः**–फार मोठा–**अभवत्**–झाला १३.

त्या नानाप्रकारच्या रणवाद्यांचा ध्वनि इतका कर्कश आणि भयंकर होता कीं, मोठ्या धैर्यवानांना देखील तो महाप्रलयच आहे असें वाटले! ३१. नौबद, डंके, मांदळ, ढोल [ एक प्रकारचें रणवाद्य ] शंख, मोठ्या झांजा व तुतारी इत्यादि अनेक रणवाद्यांचा गजर आणि वीरांच्या मोठमोठ्या रणगर्जना सुरू झाल्या ३२. कोणी आवेशानें दंड ठोकूं लागले, कोणी चवताळून मोठमोठ्यानें हांका मारूं लागले आणि मदोन्मत्त हत्ती बेफाम होऊन आवरतनासे झाले ३३. त्या ठिकाणीं भित्र्यांची काय कथा? जे कचरले ते कच्चे लोक तर कस्पटाप्रमाणें उडूनच गेले; ज्यामुळे यमास सुद्धा दहशत बसून त्याचे शरीरहि आवरेनासे झाले! ३४. कित्येकांचे उभ्या उभ्याच जीव गेले; जे धैर्यवान् होते, त्यांची दातखिळी बसली आणि जे नामांकित योद्धे होते त्यांच्या अंगास कापरें सुटलें! ३५. अशा प्रकारचा तो भयंकर वाद्यध्वनि ऐकून ब्रह्मदेव देखील व्याकुळ झाला आणि इंद्रादि देव तर 'आज हा प्रलयकालच ओढवला कीं काय?' असें म्हणूं लागले ३६.

१ संयोग. २ भीष्म. ३ झगडे. ४ निश्चयेंकरून, खरोखर. ५ थोडें. ६ वर निर्दिष्ट केलेल्या आमच्या सैन्याच्या तुलनेनें. ७ दांडगा. ८ गोष्ट. ९ टाकिली. १० एकत्र, सज्ज. ११ एका अक्षौहिणींत २१८७० रथ, २१८७० हत्ती, ६५६१० घोडे व १०९३५० पायदळ इतके सैन्य.

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ । माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥
पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः । पौण्ड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥
अनंतविजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः । नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥

ऐसी स्वर्गीं मातु । देखोनि तो आकांतु । तंव पांडवदळाआंतु । वर्तलें कायी ॥ ३७ ॥ हो कां निजसार विजयाचें । कीं तें भांडार महातेजाचें । जेथ गरुडाचिये जावेळियेचे । कांतले चाऱ्ही ॥ ३८ ॥ कीं पाखांचा मेरु जैसा । रहंवरु मिरवतसे तैसा । तेजें कोंदाटलिया दिशा । जयाचेनि ॥ ३९ ॥ जेथ अश्ववाहकु आपण । वैकुंठींचा राणा जाण । तया रथाचे गुण । काय वर्णूं ॥१४०॥ ध्वजस्तंभावरी वानरु । तो मूर्तिमंत शंकरु । सारथी शार्ङ्गधरु । अर्जुनेसीं ॥४१॥ देखा नवल तया प्रभूचें । अद्‌भुत प्रेम भक्ताचें । जें सारथ्यपण पार्थाचें । करितु असे ॥ ४२ ॥ पाइकु पाठीसीं घातला । आपण पुढां राहिला । तेणें पाञ्चजन्यु आस्फुरिला । अवलीळाचि ॥४३॥ परी तो महाघोषु थोरु । गर्जतु असे गंहिरु । जैसा उदेला लोपी दिनकरु । नक्षत्रांतें ॥४४॥ तैसें तुरबंबाळु भंवते । कौरवदळीं गाजत होते । ते हारपोनि नेणों केउते । गेले तेथ ॥ ४५ ॥ तैसाचि देखे येरे । निनादें अति गहिरे । देवदत्त धनुर्धरें । आस्फुरिला ॥ ४६ ॥ ते दोन्ही शब्द अचाट । मिनले एकवट । तेथ ब्रह्मकटाह शतकूट । हों पाहत असे ॥४७॥ तंव भीमसेनु विसणैला । जैसा महाकाळु खवळला । तेणें पौण्ड्रू आस्फुरिला । महाशंखु ॥४८॥ तो महाप्रलयजलधरु । जैसा घडघडिला गंहिरु । तंव अनंतविजयो युधिष्ठिरु । आस्फुरित असे ॥ ४९ ॥ नकुळें सुघोषु । सहदेवें मणिपुष्पकु । जेणें नादें अंतकुं । गजबंजला ठाके ॥ १५० ॥

काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः । धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥
द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते । सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक् पृथक् ॥ १८ ॥
स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् । नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥

तेथ भूपति होते अनेक । द्रुपद द्रौपदेयादिक । हा काशीपति देख । महाबाहु ॥५१॥ तेथ अर्जुनाचा सुतु । सात्यकि अपराजितु । धृष्टद्युम्नु नृपनाथु । शिखंडी हन ॥ ५२ ॥ विराटादि नृपवर । जे सैनिक मुख्य वीर । तिहीं नानाशंख निरंतर । आस्फुरिले ॥ ५३ ॥ तेणें महाघोषनिर्घातें । शेष कूर्म अवचितें । गजबजोनि भूभारातें । सांडूं पाहती ॥ ५४ ॥ तेथ तिन्ही लोक डळमळित । मेरु मांदार

**अन्वयार्थ—ततः**–त्यानंतर–**श्वेतैः हयैः युक्ते**–पांढऱ्या घोड्यांनीं युक्त असलेल्या–**महति स्यंदने**–मोठ्या रथावर–**स्थितौ**–बसलेले–**माधवः च एव पांडवः**–श्रीकृष्ण व अर्जुन–**दिव्यौ शंखौ**–दिव्य, देवलोकांतील शंख–**प्रदध्मतुः**–मोठ्यानें वाजविते झाले १४. **हृषीकेशः**–श्रीकृष्ण–**पांचजन्यं**–पांचजन्य नांवाच्या शंखास–**धनंजयः देवदत्तं**–अर्जुन देवदत्त नांवाच्या शंखास–**भीमकर्मा वृकोदरः**–ज्याचीं कर्मे भयंकर आहेत असा भीम–**पौण्ड्रं महाशंखं**–पौंड्र नांवाच्या मोठ्या शंखास–**दध्मौ**–वाजविता झाला १५. **कुंतीपुत्रः राजा युधिष्ठिरः**–कुंतीचा पुत्र राजा युधिष्ठिर–**अनन्तविजयं**–अनन्तविजय या नांवाच्या शंखाला वाजवूं लागला–**नकुलः**–नकुल–**च**–व–**सहदेवः**–सहदेव [हे दोघे माद्रीचे पुत्र] **सुघोष-मणिपुष्पकौ**–सुघोष व मणिपुष्पक या नांवाचे शंख क्रमानें वाजविते झाले १६.

याप्रमाणें स्वर्गलोकांत दाणादाण उडून गेली असतां, इकडे पांडवसैन्यांत काय झालें पहा ३७. जो रथ विजयाचें प्रत्यक्ष माहेरघर असून महातेजाचें केवळ भांडारच व ज्यास गरुडाप्रमाणें वेगवान असे चार घोडे जुंपलेलें होते ३८. पंख असलेल्या मेरुपर्वताप्रमाणें दिसणारा असा तो श्रेष्ठ रथ तेथें शोभला. त्याच्या तेजानें दाही दिशा भरून गेल्या ३९. ज्या रथावर प्रत्यक्ष वैकुंठाधिपति श्रीकृष्ण सारथी होते, त्या रथाचे गुण कोठवर वर्णन करावे ! १४०. साक्षात् शंकराचा अवतार जो मारुती, तो त्याच्या ध्वजस्तंभावर असून शार्ङ्गधनुष्य धारण करणारे भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाचे सारथी होते ४१. पाहा, काय त्या प्रभूचें केवढें आश्चर्य आहे ! त्याचें भक्तांवर अत्यंत विलक्षण प्रेम असल्यामुळें तो अर्जुनाचें सारथ्यहि करूं लागला ४२. त्यानें आपल्या सेवकाला पाठीशीं घालून आपण स्वतः पुढें झालेल्या भगवान् श्रीकृष्णांनीं आपला पांचजन्य नांवाचा शंख सहज लीलेनें वाजविला ४३. पण तो अतिमहान्ध्वनि गंभीरतेनें गाजत होता. ज्याप्रमाणें उदयास आलेला सूर्य सर्व नक्षत्रांस आपल्या तेजानें लोपवून टाकतो ४४. त्याचप्रमाणें कौरवांच्या सैन्यांत सभोवती वाद्यध्वनि दुमदुमत होता तो [त्या शंखनादानें] कोणीकडे लोप पावला त्याचा पत्ताहि लागेना ४५. तसेंच पहा कीं त्या अर्जुनानेंहि आपला देवदत्त नांवाचा अति गंभीर नादाचा शंख आवेशानें वाजविला ४६. त्या वेळीं त्या दोन्ही शंखांचा अद्‌भुत ध्वनि एकत्र झाल्यामुळें ब्रह्मांडाचे शतशः तुकडे होतात कीं काय असें वाटूं लागलें ! ४७. इतक्यांत भीमसेनालाहि आवेश आला, आणि महाकाळाप्रमाणें खवळून त्यानें आपला पौण्ड्र नांवाचा महाशंख वाजविला ४८. त्या शंखाचा अतिगंभीर ध्वनि महाप्रलयकालच्या मेघगर्जनेप्रमाणें होत आहे, तोंच धर्मराजानें अनंतविजय नामक शंख वाजविला ४९. नकुलानें सुघोष नांवाचा आणि सहदेवानें मणिपुष्पक नांवाचा शंख वाजविला. त्या नादानें प्रत्यक्ष यमाचेंहि धाबें दणाणून गेलें १५०.

**अन्वयार्थ—हे पृथिवीपते**–अहो धृतराष्ट्रमहाराज !–**च परमेष्वासः काश्यः**–आणि ज्याचें इष्वास–धनुष्य मोठें आहे असा महाधनुर्धर काशिराजा–**च महारथः शिखंडी**–व महारथी शिखंडी,–**धृष्टद्युम्नः च विराटः**–धृष्टद्युम्न व विराट–**च अपराजितः सात्यकिः**–व पराभव न पावणारा सात्यकि–**द्रुपद–च द्रौपदेयाः**–द्रुपद आणि द्रौपदीचे पांच पुत्र–**च महाबाहुः सौभद्रः**–व ज्याचे बाहू मोठे–पराक्रमी आहेत असा सुभद्रापुत्र–अभिमन्यु–**सर्वशः**–या सर्वांनीं–**पृथक् पृथक्**–निरनिराळे–**शंखान् दध्मुः**–शंख वाजविले १७–१८.–**नभः**–अंतरिक्ष–**च**–व **पृथिवीं**–पृथ्वी, यांना–**व्यनुनादयन्**–भरून सोडणारा, [त्यांना दुमदुमून टाकणारा] **सः तुमुलः घोषः**–तो भयंकर नाद–**धार्तराष्ट्राणां**–धृतराष्ट्रपुत्रांचीं–कौरवांचीं **हृदयानि**–हृदयें–**व्यदारयत्**–फाडून टाकता झाला १९.

या युद्धभूमीवर द्रुपदराजा, द्रौपदीचें पुत्र इत्यादि अनेक राजे जमले होतें; हा महावीर काशीराजाहि पहा ५१. त्याचप्रमाणें अर्जुनाचा मुलगा अभिमन्यु, अजिंक्य असा सात्यकि, नृपश्रेष्ठ धृष्टद्युम्न आणि शिखंडी ५२. त्याचप्रमाणें विराट व इतर जे जे सेनानायक होतें, तेहि आपापले निरनिराळ्या तऱ्हेचे शंख एकसारखे वाजवूं लागले ५३. त्या शंखांच्या महाध्वनीच्या आघातानें शेष व कूर्म हे एकदम

---

१ माहेरघर. २ बरोबरीचे. ३ जोडले. ४ गंभीर. ५ वाद्यगजर. ६ ब्रह्मांड. ७ शेंकडों तुकडे. ८ आवेश आलेला. ९ प्रळयकाळींचा मेघ. १० यम. ११ घाबरून गेला. १२ अभिमन्यु. १३ भयंकर आवाजाच्या धक्क्याने.

आंदोळितें। समुद्रजळ उसळत। कैलासवेरी ॥ ५५ ॥ पृथ्वीतळ उलथों पहात। आकाश असे आसुडत। तेथ सडा होत। नक्षत्रांचा ॥ ५६ ॥ सृष्टि गेली रे गेली। देवां मोकळवादी जाहली। ऐशी एक टाळी पिटली। सत्यलोकीं ॥ ५७ ॥ दिहाँचि दिन थोकला। जैसा प्रलयकाळ मांडला। तैसा हाहाकारु जाहला। तिन्हीं लोकीं ॥५८॥ तें देखोनि आदिपुरुषु विस्मितु। म्हणे झणें होय पां अंतु। मग लोपिला अद्भुतु। संभ्रमु तो ॥ ५९ ॥ म्हणौनि विश्व सांवरलें। एऱ्हवीं युगान्त होतें वोडवलें। जैं महाशंख आस्फुरिले। कृष्णादिकीं ॥ १६० ॥ तो घोष तरी उपसंहरला। परि पडिसाद होता राहिला। तेणें दळभार विध्वंसिला। कौरवांचा ॥ ६१ ॥ जैसा गजघटाआंतु। सिंह लीला विदारितु। तैसा हृदयातें भेदितु। कौरवांचिया ॥ ६२ ॥ तो गाजत जंव आइकती। तंव उभेचि हिये घालिती। एकमेकांतें म्हणती। सावध रे सावध ॥ ६३ ॥

अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः। प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ २० ॥

तेथ बळें प्रौढीपुरतें। महारथी वीर होते। तिहीं पुनरपि दळातें। आवरिलें ॥ ६४ ॥ मग सरिसेपणें उठावले। दुणवटोनि उचलले। तया दंडीं क्षोभलें। लोकत्रय ॥ ६५ ॥ तेथ बाणवरी धनुर्धर। वर्षताती निरंतर। जैसे प्रळयांत जलधर। अनिवार कां ॥ ६६ ॥ ते देखलिया अर्जुनें। संतोष घेऊनि मनें। मग संभ्रमें दिठी सेने। घालीतसे ॥ ६७ ॥ तंव संग्रामीं सज्ज जाहले। सकळ कौरव देखिले। तंव लीलाधनुष्य उचालिलें। पंडुकुमरें ॥ ६८ ॥

हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते। अर्जुन उवाच-सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥
यावदेतान्निरीक्षेऽहं योध्दुकामानवस्थितान्। कैर्मया सह योद्धव्यमस्मिन् रणसमुद्यमे ॥ २२ ॥
योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः। धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥

ते वेळीं अर्जुन म्हणतसे देवा। आतां झडकरी रथु पेलावा। नेऊनि मध्यें घालावा। दोहीं दळां ॥ ६९ ॥ जंव मी नीवेक। हे सकळ वीर सैनिक। न्याहाळीन अशेख। झुंजते जे ॥ १७० ॥ येथ आले असती आघवे। परी कवणेंसीं म्यां झुंजावें। हे रणीं लागे पहावें। म्हणौनियां ॥ ७१ ॥ बहुतकरूनि कौरव। हे आतुर दुःस्वभाव। वांटिवेवीण हांव। बांधिती झुंजीं ॥ ७२ ॥ झुंजाची आवडी धरिती। परी संग्रामीं धीर नव्हती। हें सांगोनि रायाप्रती। काय संजयो म्हणे ॥ ७३ ॥

दचकले आणि पृथ्वीचा भार टाकून देण्याच्या बेतात आले ५४. त्या योगानें त्रैलोक्य डळमळूं लागले. मेरु व मांदार हें पर्वत हालूं लागले. समुद्राचें पाणी कैलासापर्यंत उसळलें ५५. पृथ्वी पालथी होते कीं काय, आकाश कोसळून पडतें कीं काय, असें वाटूं लागले आणि नक्षत्रांचा सडा होतो कीं काय असें वाटूं लागले! ५६. सत्यलोकीं तर, सृष्टि बुडाली रे बुडाली!! आतां देव निराधार झाले, अशी एकच हाकाटी झाली. ५७.सूर्य दिवसाच थांबला आणि प्रळयकाळचे वेळेप्रमाणें तीन्ही लोकांत हाहाकार उडून गेला ५८. तें पाहून भगवान् श्रीकृष्ण फार विस्मित झाले, आणि कदाचित् सृष्टीचा अंतहि होईल असें जाणून त्यांनीं तो अद्भुत आवेशयुक्त शंखनादानें झालेला गोंधळ बंद केला ५९. म्हणून हें जग वांचलें, नाहींतर कृष्णादिकांनीं जेव्हां शंख वाजविले, तेव्हांच जगाचा अंत होण्याची वेळ आली होती १६०. तो शंखनाद तर बंद झाला, तथापि त्याचा जो प्रतिध्वनि घुमत होता, त्यानेच कौरवसैन्याची दाणादाण उडाली ६१. ज्याप्रमाणें सिंह सहज लीलेने जसें हत्तींच्या समुदायाची पांगापांग करितो, त्याप्रमाणें त्या प्रतिध्वनीनेच कौरवांचीं हृदयें विदीर्ण केलीं ६२. जेव्हां तो घुमत असलेला प्रतिध्वनि ऐकला तेव्हां उभ्या उभ्याच सर्वांनी धैर्य सोडलें आणि एकमेकांस 'सावध रे सावध' असें म्हणूं लागले ६३.

**अन्वयार्थ**—**अथ**—नंतर—**महीपते**—अहो महाराज! **कपिध्वजः**—ज्याच्या ध्वजावर वानराचें चिन्ह आहे असा—**पांडवः**—पंडूचा पुत्र अर्जुन—**धार्तराष्ट्रान् व्यवस्थितान् दृष्ट्वा**—धृतराष्ट्रपुत्र—दुर्योधनादिक युद्ध करण्यासाठीं सज्ज होऊन उभे आहेत असें पाहून [ **च**-आणि ] **शस्त्रसंपाते प्रवृत्ते** [ **सति** ]—शस्त्रें चालू होण्याचा प्रसंग प्राप्त झाला असतां—**धनुः उद्यम्य**—आपलें गांडीव धनुष्य वर उचलून— २०.

त्या ठिकाणीं, बलानें व पुरुषार्थानें युक्त असे जे महारथी होते, त्यांनी सैन्याला पुनः धीर देऊन सांवरिलें ६४. मग ते मोठ्या तयारीने पुढें सरसावले व त्यांनीं दुप्पट आवेशानें चाल केली. तेव्हां त्या आवेशयुक्त सैन्याच्या योगाने त्रिभुवन अगदीं त्रस्त होऊन गेलें ६५. ज्याप्रमाणें प्रलयकालचे दुर्धर मेघ एकसारखी वृष्टि करितात, त्याप्रमाणें तेथें धनुर्धारि वीरांनी तीक्ष्ण बाणांची इतकी वृष्टि केली कीं ६६. तें पाहून अर्जुनाच्या मनाला फार संतोष झाला व त्यानें मोठ्या आवेशानें सैन्यावर दृष्टि फेकली ६७. तेव्हां सर्व कौरव युद्धास सिद्ध झालेले पाहून अर्जुनानें सहज लीलेनें धनुष्य उचलिलें ६८.

**अन्वयार्थ**—**तदा**—त्यावेळीं—**हृषीकेशं**—श्रीकृष्णाला—**इदं वाक्य**—हें वाक्य—**आह**—बोलला. **अच्युत**—[ हे निर्विकार श्रीकृष्णा! ] **यावत्**—जोंवर—**अहं**—मी—**योद्धुकामान् अवस्थितान् एतान्**—युद्धाची इच्छा असलेल्या व सन्मुख उभे राहिलेल्या यांस—**निरीक्षे**—पाहीन—**तावत्**—तोंवर—**मे रथं**—माझा रथ—**उभयोः सेनयोः मध्ये**—दोन्ही सैन्याच्या मध्यभागीं—**स्थापय**—उभा कर.—**अस्मिन् रणसमुद्यमे**—या रणाच्या उद्योगांत—या युद्धांत—**मया**—मी—**कैः सह**—कोणाबरोबर **योद्धव्यं**—युद्ध करावें. मला कोणाशीं लढावयाचें आहे, हें पाहण्याची प्रबल इच्छा झाली आहे. २१-२२. **दुर्बुद्धेः धार्तराष्ट्रस्य**—ज्याची बुद्धी अधर्मनिष्ठ आहे, त्यामुळें ज्याला आपलें हित कळत नाहीं अशा दुष्ट दुर्योधनाचें—**युद्धे**—युद्धांत—[युद्ध करून ]-**प्रियचिकीर्षवः**—प्रिय करण्याची इच्छा करणारे—**ये एते**—जे हे—**अत्र**—येथें **समागताः** आलेले आहेत. **तान् योत्स्यमानान्** त्या युद्ध करणाऱ्या सर्वांस—**अहं**—मी—**अवेक्षे**—पाहतों २३.

त्या वेळीं अर्जुन देवास म्हणाला, "आतां देवा, आपला रथ लौकर हाकलावा आणि दोन्ही सैन्यांच्या मध्यें नेऊन उभा करा ६९. म्हणजे येथें युद्ध करण्याकरितां आलेल्या सर्व वीरांस मी क्षणभर न्याहाळून पाहीन १७०. कारण येथें जरी सर्व वीर जमले आहेत तरी समरांगणीं मला कोणाशीं युद्ध करावयाचें आहे, तें पाहिलें पाहिजे ७१. हें बहुतेक उतावळे व दुष्टबुद्धि कौरव अंगांत पराक्रम नसतां युद्धाची हाव धरतात ७२. यांना युद्धाची हौस आहे खरी, परंतु यांच्यानें रणभूमीवर धैर्य धरवत नाहीं." इतकें धृतराष्ट्र राजाला सांगून संजय पुढें काय म्हणाला:—७३.

१ झोके घेतात. २ तुटून पडते. ३ निराधार. ४ दिवसासच. ५ आवेश. ६ नाहींसा झाला. ७ धैर्य. ८ दहाहजारांशीं एकटा युद्ध करणारा. ९ सैन्याच्या योगाने. १० सिद्ध तयार. ११ न्यावा. १२ क्षणभर. १३ योद्धे.

संजय उवाचः—

एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत । सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥
भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् । उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥
तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितृनथ पितामहान् । आचार्यान्मातुलान्भ्रातृन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥ २६ ॥
श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि । तान्समीक्ष्य स कौन्तेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥ २७ ॥
कृपया परयाऽऽविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ॥

आइका अर्जुन इतुकें बोलिला । तंव श्रीकृष्णें रथु पेलिला । दोही सैन्यांमाजीं केला । उभा तेणें ॥ ७४ ॥ जेथ भीष्मद्रोणादिक । जवळिकेचि सन्मुख । पृथिवीपति आणिक । बहुत आहाती ॥ ७५ ॥ तेथ स्थिर करूनियां रथु । अर्जुन असे पाहातु । तो दळभार समस्तु । संभ्रमेंसीं ॥७६॥ मग देवा म्हणे देख देख । हे गोत्रगुरु अशेख । तंव कृष्णमनीं नावेक । विस्मो जाहला ॥ ७७ ॥ तो आपणयां आपण म्हणे । एथ कायी कवण जाणे । हें मनीं धरलें येणें । परि कांहीं आश्चर्य असे ॥ ७८ ॥ ऐसी पुढील से घेतु । तो सहजें जाणें हृदयस्थु । परि उगा असे निवांतु । तिये वेळीं ॥७९॥ तंव तेथ पार्थु सकळ । पितृ पितामह केवळ । गुरु बंधु मातुळ । देखता जाहला ॥ १८० ॥ इष्ट मित्र आपुले । कुमरजन देखिले । हे सकळ असती आले । तयांमाजी ॥ ८१ ॥ सुहृज्जन सासरे । आणीकही सखे सोइरे । कुमर पौत्र धनुर्धरें । देखिले तेथ ॥८२॥ जयां उपकार होते केले । कीं आपदीं जे रक्षिले । हे असो वडील धाकुले । आदिकरूनि ॥ ८३ ॥ ऐसें गोत्रचि दोहीं दळीं । उदितं जालें असे कळीं । हें अर्जुनें तिये वेळीं । अवलोकिलें ॥ ८४ ॥ तेथ मनीं गजबज जाहली । आणि आपैसी कृपा आली । तेणें अपमानें निघाली । वीरवृत्ति ॥ ८५ ॥ जिया उत्तम कुळींचिया होती । आणि गुणलावण्य आथी । तिया आणिकीतें न साहती । सुतेजपणें ॥८६॥ नविये आवडीचेनि भरें । कामुक निजवनिता विसरे । मग पाडेंवीण अनुसरे । भ्रमला जैसा ॥ ८७ ॥ कीं तपोबळें ऋद्धी । पातलिया भ्रंशे बुद्धी । मग तया विरक्तता सिद्धी । आठवेना ॥८८॥ तैसें अर्जुना तेथ जाहलें । असतें पुरुषत्व गेलें । जे अंतः-करण दिधलें । कारुण्यासी ॥ ८९ ॥ देखा मंत्रज्ञु बरळु जाय । मग तेथ कां जैसा संचारु होय । तैसा तो धनुर्धर महामोहें । आकळिला ॥ १९० ॥ म्हणौनि असतां धीरु गेला । हृदया द्रावो आला । जैसा चंद्रकळीं शिवतला । सोमकांतु ॥ ९१ ॥ तयापरी पार्थु । अतिस्नेहें मोहितु । मग सखेद असे बोलतु । श्रीअच्युतेसीं ॥९२॥

**अन्वयार्थ—हे भारत**—हे महाराज धृतराष्ट्र!—**गुडाकेशेन**—अर्जुनाकडून—**एवं उक्तः हृषीकेशः**—असें बोलला गेलेला श्रीकृष्ण—**उभयोः सेनयोः मध्ये**—दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं—**भीष्मद्रोणप्रमुखतः**—भीष्म आणि द्रोण यांच्या समोर—**च सर्वेषां महीक्षितां** [ प्रमुखतः ] व इतर सर्व राजांच्या समोर—**रथोत्तमं**—उत्तम रथ—**स्थापयित्वा**—उभा करून—हे **पार्थ**—अर्जुना!—**एतान् समवेतान् कुरून्**—या जमलेल्या सर्व कौरवांना—**पश्य**—पहा—**इति**—असें—**उवाच**—बोलला २४-२५. **तत्र**—याप्रमाणें श्रीकृष्णानें सांगितलें असतां—**पार्थः**—अर्जुन—**उभयोः अपि सेनयोः**—दोन्ही सैन्यांमध्यें—**स्थितान्**—असलेल्या—**पितॄन्**—भूरिश्रवा प्रभृति चुलत्यांस—**अथ पितामहान्**—व भीष्मादि पितामहांस,—**आचार्यान्**—द्रोणाचार्यादि आचार्यांस—**मातुलान्**—शल्यादि मामांस—**भ्रातॄन्**—भीम,दुर्योधनादि भावांस—**पुत्रान्**—अभिमन्यु, लक्ष्मणादि पुत्रांना—**पौत्रान्**—नातवांस २६. **तथा**—त्याचप्रमाणें—**सखीन्**—अश्वत्थामाप्रभृति मित्रांस-**श्वशुरान्**—द्रुपदादि सासऱ्यांस—**च सुहृदः**—आणि कृतवर्मा, भगदत्त व इतर निरपेक्ष उपकार करणारे स्नेही यांस—**अपश्यत्** पाहाता झाला.—**तान् सर्वान् अवस्थितान् बन्धून्**—त्या सर्व सन्मुख उभ्या असलेल्या बंधूंस—आप्तांस—**समीक्ष्य**—पाहून २७—**परया कृपया आविष्टः**—परम कृपेनें प्रवेश केलेला—ज्याच्या चित्तांत परम कृपा आपोआप उत्पन्न झाली आहे असा—**सः कौंतेयः**—तो कुंतीचा पुत्र अर्जुन—**विषीदन्**—विषाद—खेद करीत होत्साता—**इदं**—हें—असें—**अब्रवीत्**—बोलला.

राजा ऐक. अर्जुनाचें भाषण श्रवण करितांच श्रीकृष्णांनीं रथ हाकला व दोन्ही सैन्यांमध्यें नेऊन उभा केला ७४. ज्या ठिकाणीं भीष्मद्रोणादिक आप्तसंबंधी व अनेक राजे समोर उभे आहेत ७५. त्या ठिकाणीं रथ उभा करून अर्जुन त्या साऱ्या सेनेकडे मोठ्या उत्सुकतेनें पाहूं लागला ७६. मग म्हणाला, "देवा! पहा पहा, हे तर सर्व आमचे आप्तवर्ग व गुरु आहेत!" हें ऐकून श्रीकृष्णास मनांत क्षणभर आश्चर्यच वाटलें ७७. ते आपल्या मनांत म्हणतात, अर्जुनानें मनांत हे काय धरले कोण जाणे!! परंतु ज्याअर्थी तो असें म्हणत आहे, त्याअर्थी कांहीं तरी चमत्कारिक प्रकार झाला असावा ७८. पण भगवान् दुसऱ्याचें मनोगत सहज जाणणारे असल्यामुळें त्यांनीं पुढील भविष्य ताडलें; परंतु त्या वेळेस कांहींच न बोलता ते स्तब्ध राहिले ७९. तेव्हां अर्जुनानें आपले सर्व वडील, आजे, गुरु, बंधु व मामा असें पाहिले १८०. आपले इष्टमित्र व मुलगे हे सर्व त्या ठिकाणीं आलेले पाहिले ८१. तसेंच त्यानें आपले जिवलग मित्र, सासरे, आप्तवर्ग व नातू हेहि त्या ठिकाणीं अवलोकन केले ८२. ज्यांच्यावर आपण उपकार केले होते व ज्यांचे संकटसमयीं रक्षण केलें होतें ते लहानमोठे सर्व आलेले पाहिले ८३. तात्पर्य आपले गोत्रजच दोनहि सैन्यांमध्यें युद्धाला सज्ज झाले आहेत, असें अर्जुनानें त्या वेळीं पाहिलें ८४. त्याचे मन बावरून जाऊन म्हणजे त्याच्या मनांत गोत्रजांविषयीं सहज करुणा उत्पन्न झाली, त्यामुळें वीरवृत्तीचा अपमान होऊन ती अर्जुनास सोडून निघाली ८५. ज्या स्त्रिया उत्तम कुळांतल्या असून गुणी व लावण्यवती असतात, त्यांना आपल्या मानीपणामुळें दुसऱ्या स्त्रियांचें आपले घरांत वर्चस्व सहन होत नाहीं ८६. ज्याप्रमाणें नवीन स्त्रीच्या आवडीचे भरांत, विषयी पुरुष आपल्या स्त्रीस विसरून भ्रम झालेल्या मनुष्याप्रमाणें योग्यतेवांचून तिच्या नादीं लागतो ८७. किंवा तपश्चर्येच्या बलामुळें ऋद्धि-ऐहिक-ऐश्वर्य प्राप्त झाले असतां वैराग्यवानाचीहि बुद्धि भ्रम पावते व मग त्यास वैराग्य सिद्धि आठवत नाहीं ८८. तशीच त्यावेळीं अर्जुनाची स्थिति झाली. त्याची असलेली वीरवृत्ति निघून गेली. कारण त्यानें आपले अन्तःकरण करुणेस दिले ८९. असें पहा कीं,—मांत्रिक, मंत्रोच्चार करण्यांत चुकला म्हणजे त्यालाच भूतबाधा होते, त्याप्रमाणें अर्जुनाला मोठ्या मोहानें ग्रासलें १९०. त्यामुळें त्याचें स्वाभाविक धैर्य नष्ट झालें. त्याच्या हृदयांत दयेचा पाझर फुटला! ज्याप्रमाणें चंद्रकिरणांचा स्पर्श होण्याबरोबर चंद्रकांतमण्यास पाझर फुटतो ९१. त्याप्रमाणें अर्जुन अतिस्नेहानें मोहित झाला व मग खेदयुक्त अंतःकरणानें श्रीकृष्णाशीं बोलूं लागला ९२.

१ आपल्या अंगच्या उत्तम तेजानें. २ योग्यतेवांचून ३ तपश्चर्येच्या सामर्थ्यानें. ४ संपत्ति, ऐश्वर्य. ५ प्राप्त झाली असतां. ६ भ्रष्ट होते. ७ वैराग्य. ८ मंत्रोच्चारांत चुकतो. ९ भ्रम, भूतबाधा. १० चंद्राच्या किरणांनीं. ११ स्पर्शिला.

अर्जुन उवाच :—

दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥
सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति । वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥
गांडीवं स्रंसते हस्तात् त्वक्चैव परिदह्यते । न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥

तो म्हणे अवधारी देवा । म्यां पाहिला हा मेळावा । तंव गोत्रवर्गु आघवा । देखिला एथ ॥ ९३ ॥ हे संग्रामीं उदित । जहाले असती कीर समस्त । पण आपणपेयां उचित । केवीं होय ॥ ९४ ॥ येणें नांवेंचि नेणों कायी । मज आपणपें सर्वथा नाहीं । मन बुद्धि ठायीं । स्थिर नोहे ॥ ९५ ॥ देखे देह कांपत । तोंड असे कोरडें होत । विकळता उपजत । गात्रांसीही ॥ ९६ ॥ सर्वांगा कांटाळा आला । अति संतापु उपनला । तेथ बेंबळ हातु गेला । गांडिवाचा ॥ ९७ ॥ तें न धरतचि निष्टलें । परि नेणेंचि हातोनि पडिलें । ऐसें हृदय असे व्यापिलें । मोहें येणें ॥ ९८ ॥ जें वज्रापासोनि कठिण ॥ दुर्धर अतिदारुण । तयाहून असाधारण । हें स्नेह नवल ॥ ९९ ॥ जेणें संग्रामीं हरु जिंतिला । निवातकवचांचा ठावो फेडिला । तो अर्जुन मोहें कवळिला । क्षणामाजीं ॥ २०० ॥ जैसा भ्रमर भेदी कोडें । भलतैसें काष्ठ कोरडें । परि कळिकेमाजी सांपडे । कोंवळिये ॥ १ ॥ तेथ उत्तीर्ण होईल प्राणें । परि तें कमळदळ चिरूं नेणें । तैसें कठिण कोवळेपणें । स्नेह देखा ॥ २ ॥ हे आदिपुरुषाची माया । ब्रह्मेयांही नयेचि आयां । म्हणौनि भुलविला ऐकें रायां । संजयो म्हणे ॥ ३ ॥ अवधारी मग तो अर्जुनु । देखोनि सकळ स्वजनु । विसरला अभिमानु । संग्रामींचा ॥ ४ ॥ कैसी नेणों सदयतां । उपनली तेथें चित्ता । मग म्हणे कृष्णा आतां । नसिजे एथ ॥ ५ ॥ माझें अतिशय मन व्याकुळ । होतसे वाचा बरळ । जे वधावे हे सकळ । येणें नांवें ॥ ६ ॥

निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव । न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥

या कौरवां जरी वधावें । तरी युधिष्ठिरादिकां कां न वधावें । हे येरयेर आघवे । गोत्रज आमुचे ॥ ७ ॥ म्हणोनि जळो हें झुंज । प्रत्यया न ये मज । एणें काय काज । महापापें ॥ ८ ॥ देवा बहुतापरी पाहतां । एथ वोखटें होईल झुंजतां । वर कांहीं चुकवितां । लाभु आथी ॥ ९ ॥

**अन्वयार्थ**—**कृष्ण**—हे कृष्णा ! **युयुत्सुं**—युद्धाची इच्छा करणाऱ्या व—**समुपस्थितं**—रणभूमींत प्राप्त झालेल्या—**इमं स्वजनं**—या बंधुवर्गास—**दृष्ट्वा**—पाहून—**मम गात्राणि**—माझीं गात्रें—अवयव—**सीदन्ति**—व्यथा पावतात—**च मुखं**—व तोंड—**परिशुष्यति**—सर्व बाजूनीं कोरडें पडतें—**मे शरीरे**—माझ्या शरीरांत—**वेपथुः**—कंप [ सुटतो ]—**च**—आणि—**रोमहर्षः**—अंगावर रोमांच—**जायते**—उभा राहतो २८-२९. **हस्तात्**—माझ्या हातांतून — **गाण्डीवं** — गांडीव धनुष्य—**स्रंसते**—गळतें—**च**—आणि—**त्वक्**—त्वचा—**परिदह्यते**—सभोंवार जाळली जाते—सर्व शरीरांत दाह उत्पन्न झाला आहे.—**अहं**—मी—**अवस्थातुं**—स्थिर उभा राहण्यास—**न शक्नोमि**—समर्थ नाहीं—**मे मनः**—माझें मन—**भ्रमति इव**—जणुं काय भ्रमण करीत आहे ३०.

अर्जुन म्हणाला, देवा ! हें पहा कीं, मी हा सर्व सैन्य-समुदाय पाहिला, तों येथें सर्व माझे गोत्रजच माझ्या दृष्टीस पडले १९३. हे सर्व युद्ध करण्याकरितां तयार झाले आहेत खरे; परंतु त्यांच्याबरोबर युद्ध करणें आपल्यास कसें बरें योग्य होईल ? ९४. यांच्याशीं युद्ध करण्याची गोष्ट काढतांच मला कांहीं सुचेनासें झालें आणि मन व बुद्धि हीं देखील आपल्या जागीं स्थिर रहात नाहींत ९५. इकडे पाहा, माझ्या सर्व अंगास कापरे सुटले आहे, तोंडास कोरड पडली आहे व इंद्रियेंहि शिथिल झालीं आहेत ९६. सर्वांगावर कांटा आला आहे, मनाचा अगदी आग, भडका झाला आहे व गांडीव धनुष्य धरण्याचा हातहि ढिला पडला ९७. त्यामुळें तें धनुष्य धरलें न जातां निसटलें; पण माझ्या हातून केव्हां गळून पडलें हें देखील मला समजलें नाहीं, इतकें माझें अंतःकरण या आप्तवर्गांच्या मोहानें व्यापिलें आहे ! ९८. अहो ! जें माझें अंतःकरण वज्रापेक्षांहि कठिण असून कोणत्याही प्रतिकूल अवस्थेस दाद न देणारें व अति निष्ठुर आहे, परंतु तेच आज आप्तवर्गांविषयीं इतकें मोहित व्हावें हें मोठे आश्चर्य आहे ९९. अहो ! ज्या अर्जुनानें युद्धांत शंकरासहि जिंकिलें व निवातकवच राक्षसांचा मागमूस नाहींसा केला, तोच अर्जुन मोहानें आतां एका क्षणांत व्याप्त झाला. काय आश्चर्य हे ! २००. पहा जसा भ्रमर कोणत्याहि वाळलेल्या कठिण लांकडास सहज पोखरतो; परंतु तोच भ्रमर कोवळ्या कमळाच्या कळीमध्यें ती मिटल्यावर अडकून पडतो १. तेथें तो आपल्या प्राणास मुकेल; पण त्या कमळाच्या पाकळ्यांना भोंक पाडण्याचें मनांतहि आणीत नाहीं; त्याप्रमाणेंच आप्तवर्गांचा मोह कोमल असला तरी तोडण्यास कठीण आहे २. संजय म्हणतोः—राजा धृतराष्ट्रा ऐक. हा मोह म्हणजे परमेश्वराची माया आहे ही ब्रह्मदेवालाहि आवरत नाहीं; म्हणून अर्जुनास तिनें व्याकूळ केलें, यांत आश्चर्य काय ? ३. असो, राजा ऐक. असे आपले सर्व आप्तवर्ग पाहून अर्जुनाचा युद्धाविषयींचा सर्व अभिमान पार मावळून गेला ४. त्या ठिकाणीं त्याचे मनांत करुणा कशी उद्भवली, कोण जाणे !! त्या करुणेच्या भरांतच तो श्रीकृष्णास म्हणूं लागला "देवा मला वाटतें, आपण येथें राहूंच नये ५. या सर्वांस मारावयाचें ही गोष्ट मनांत आल्याबरोबर माझें मन अति व्याकुळ होऊन बोबडी वळल्यामुळें तोंडांतून शब्द उमटेनासा झाला आहे ६.

**अन्वयार्थ**—**केशव**—हे केशवा !—**विपरीतानि निमित्तानि**—अशुभ निमित्तें, अरिष्टसूचक चिन्हें—**पश्यामि**—मी पहात आहें;—**च**—आणि—**आहवे**—लढाईंत—**स्वजनं**—स्वजनांना—**हत्वा**—मारून—**श्रेयः**—परम हित—**न अनुपश्यामि**—मी मागून पहात नाहीं—स्वजनांना मारल्यावर परिणामीं हित होईल असें मला वाटत नाहीं ३१.

या कौरवांना जर मारावयाचें, तर मग धर्मराजादिकांना कां मारूं नये ? कारण, हे दोनहि माझे गोत्रजच आहेत, आम्ही परस्परांचे नातलगच आहोंत ७. म्हणून देवा, आग लागो या युद्धाला ! मला कांहीं तें पसंत नाहीं. या महापातकावांचून आमचें काय खोळंबलें आहे ? ८. देवा ! पुष्कळ दृष्टीनें विचार करून पाहिलें तरी युद्ध केल्यास त्याचा परिणाम वाईटच होईल, आतां तें जर टाळलें तर मात्र कांहीं कल्याण होईल ९.

१ व्याकुलपणा. २ कांटा. ३ ढिला. ४ गांडीव नांवाच्या धनुष्याचा. ५ फार भयंकर. ६ कळींत. ७ प्राणाला मुकेल. ८ ममता. ९ ब्रह्मदेवालाही. १० आटोक्यांत, स्वाधीन. ११ धृतराष्ट्र. १२ आप्त. १३ दयाळूपणा. १४ उपजली. १५ राहूं नये. १६ बोबडी. १७ यांना वधावे. या शब्दाने. १८ धर्मादिकांना. १९ एकमेक.

न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च । किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३२ ॥

येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च । त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३३ ॥

आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः । मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥ ३४ ॥

तया विजयवृत्ती कांहीं । मज सर्वथा काज नाहीं । एथ राज्य तरी कायी । हे पाहुनियां ॥ २१० ॥ या सकळांतें वधावें । मग जे भोग भोगावे । ते जळोत आघवे । पार्थु म्हणे ॥ ११ ॥ तेणें सुखेंविण होईल । तें भलतैसें साहिजेल । वरी जीवितही वेंचिजेल । याचिलागीं ॥ १२ ॥ परी यांसी घातु कीजे । मग आपण राज्यसुख भोगिजे । हें स्वप्नींही मन माझें । करूं न शके ॥ १३ ॥ तरी आम्हीं कां जन्मावें । कवणालागीं जियावें । जरी वडिलां यां चिंतावें । विरुद्ध मनें ॥ १४ ॥ पुत्रातें इच्छी कुळ । तयाचें कायि हेंचि फळ । जे निर्दळिजे केवळ । गोत्र आपुलें ॥ १५ ॥ हें मनींचि केविं धरिजे । आपण वज्राचेया होईजे । वरी घडे तरी कीजे । भलें इयां ॥ १६ ॥ आम्हीं जें जें जोडावें । तें समस्तीं इहीं भोगावें । हें जीवितही उपकारावें । काजीं यांच्या ॥१७॥ आम्ही दिगंतींचे भूपाळ । विभांडूनि सकळ । मग संतोषविजे कुळ । आपुलें जें ॥१८॥ तेचि हे समस्त । परी कैसें कर्म विपरीत ! । जे जाहले असती उद्यंत । झुंजावया ॥१९॥ अंतौरियां कुमरें । सांडोनियां भांडारें । शस्त्राग्रीं जिव्हारें । आरोपुनी ॥२२० । ऐसियांतें कैसेनि मारूं ? । कवणावरी शस्त्र धरूं ? । निजहृदया करूं । घातु केवीं ? ॥२१॥ हें नेणसी तूं कवण । परी पैल भीष्म द्रोण । जयांचे उपकार असाधारण । आम्हां बहुत ॥२२॥ एथ शालक सासरे मातुळ । आणि बंधु कीं हे सकळ । पुत्र नातू केवळ । इष्टही असती ॥ २३ ॥ अवधारी अति जवळिकेचे । हे सकळही सोयरे आमुचे । म्हणौनि दोष आथी वाचे । बोलितांचि ॥ २४ ॥

एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन । अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥

हे वैरी भलतें करितु । आतांचि येथें मारितु । परि आपण मनें घातु । न चिंतावा ॥ २५ ॥ त्रैलोक्यींचें अनकाळित । जरी राज्य होईल प्राप्त । तरी हें अनुचित । नाचरें मी ॥ २६ ॥ जरी आजि एथ ऐसें कीजे । तरी कवणाच्या मनीं उरिजे[१३] ? । सांगे मुख केवीं पाहिजे । तुझें कृष्णा ? ॥ २७ ॥

**अन्वयार्थ—कृष्ण**—हे कृष्णा ! –[ अहं–मी– ] **विजयं**–विजय–**न काङ्क्षे**–इच्छीत नाहीं;–**राज्यं च–न** [ **काङ्क्षे** ] राज्यहि मी इच्छीत नाहीं–**सुखानि च**–[ **न काङ्क्षे** ] व सुखेंहि इच्छीत नाहीं–**गोविंद**–हे गोविंदा !–**नः राज्येन किं**–आम्हांला राज्याला काय करावयाचें आहे ? आमचें राज्यानें काय होणार ? **भोगैः किं**–भोगांनीं काय होणार ? [ भोगांचा तरी आम्हांला काय उपयोग ? ] **जीवितेन वा कीं**–अथवा जीविताला घेऊन तरी काय करावयाचें आहे ? ३२–**येषाम् अर्थे**–ज्याच्या-साठीं–**नः**–आम्हांला-**राज्यं**-राज्य–**काङ्क्षितं**–इष्ट आहे; **भोगाः** [ **काङ्क्षिताः** ]–भोग इष्ट आहेत–**च सुखानि** [ **काङ्क्षितानि** ]–आणि सुखें इष्ट आहेत–**ते इमे**–ते हे आमचे–**आचार्याः पितरः पुत्राः च तथैव पितामहाः मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः तथा संबन्धिनः**–आचार्य, चुलते, पुत्र, तसेंच आजे, मामा, सासरे, नातू, मेव्हणे, तसेच संबंधी–**प्राणान्**–प्राण म्ह०–प्राणांची आशा–**च धनानि**–व धन म्ह०–धनाची आशा यांस–**त्यक्त्वा**–सोडून–**युद्धे**–युद्धाकरितां **अवस्थिताः** – येथें उभे राहिले आहेत ३३–३४.

हे पाहून मला असें वाटतें कीं, तो जय मिळविण्याची मला मुळींच गरज नाहीं व असलें राज्य मिळवून तरी काय करावयाचें आहे ?" २१०. अर्जुन म्हणाला, "या सर्वांचा वध करून जे भोग भोगावयाचे त्या सर्वांस आग लागो ! ११. या असल्या सुखाशिवाय वाटतील तीं दुःखें आम्हीं सोसूं, व त्यांच्याकरितां आम्ही आपलें प्राण देखील खर्ची घालूं १२. परंतु यांचा घात करून आपण राज्य-सुख भोगावें ही गोष्ट कधीं स्वप्नांतहि माझ्या मनांत येणार नाहीं १३. जर आम्हीं आमच्या या वडिलांचें मनानें अहित चिंतलें तर मग आम्हीं जन्मास तरी याव-याचें कशाकरितां व जगावयाचें तरी कोणासाठीं ? १४. कुळांत पुत्रप्राप्तीची इच्छा करितात, त्याचें हेंच कां फळ ? कीं पुत्रानें आपल्या गोत्रजांचा संहार करावा ? १५. आपलें मन त्यांजविषयीं वज्राप्रमाणें कठोर करण्याचें मनांत तरी कसें आणावें ? त्यांना आपल्या हातून सुख होईल तेंच करणें चांगलें १६. आम्ही जें जें मिळवावें, त्या सर्वांचा त्यांनीं उपभोग घ्यावा; इतकेंच नव्हे, तर त्यांच्याहिताकारितां आम्हीं आपलें जीवितहि अर्पण करावें १७. आम्हीं देशोदेशींचे सर्व राजे युद्धांत जिंकावे व त्यायोगें आपल्या कुळास संतोषित करावें १८. पण कर्माची गति किती विचित्र आहे पहा कीं, तेच हे आमचे सर्व गोत्रज आम्हांबरोबर युद्ध करण्यास उद्युक्त झाले आहेत. याला काय म्हणावें ! १९. अहो ! त्यांनीं आपल्या बायका, मुलें व धन ह्या सर्वांवर पाणी सोडून तरवारीच्या धारेवर आपले जीव ठेवून आले आहेत २२०. तरी अशांना मी कसें मारावें ! कोणावर शस्त्र धरावें ! आणि मी [ त्यांचा म्हणजे आपल्याच हृदयांचा जिवलगांचा ] घात तरी कसा करावा ! २१. देवा ! हें कोण आहेत हें तुला माहीत नाहीं का ? ते पाहा–पलिकडे भीष्म व द्रोण आहेत. त्यांचे आमच्यावर असंख्य व असा-धारण उपकार झाले आहेत २२. या ठिकाणीं मेहुणे, सासरे, मामा आणि बंधु, तसेंच हे सर्व पुत्र, नातू व आप्तहि आहेत २३. हें पहा ! हे सर्व आमचे फार जवळचे नातेवाईक आहेत. तेव्हां यांना मारण्याची गोष्ट नुसती तोंडानें बोलली तरी देखील पापच आहे २४.

**अन्वयार्थ—हे मधुसूदन**—हे मधुसूदना !–**त्रैलोक्य-राज्यस्य हेतोः अपि**–त्रैलोक्याच्या राज्यासाठींहि–**घ्नतः अपि एतान्**–मला मारणाऱ्याहि–मजवर शस्त्रांचे प्रहार करणाऱ्याहि या दुर्योधनादिकांस–**अहं**–मी–**हन्तुं न इच्छामि**–मारण्याची इच्छा करीत नाहीं–**महीकृते किं नु**–तेव्हां मी नुसत्या पृथ्वीच्या राज्यासाठीं त्यांचा प्राण कसा घेईन ? ३५ कारण–

उलटपक्षीं हे वाटेल तें करोत, किंवा आम्हांला आतांच येथें मारोत, तथापि आपण त्यांचा घात करण्याचें मनांतहि आणूं नये हेंच बरें ! २५. अहो ! त्रिभुवनाचें निष्कंटक राज्य जरी प्राप्त झालें, तरी सुद्धां हें अनुचित असें कर्म मी करणार नाहीं २६. कृष्णा ! आज जर या ठिकाणीं आम्हीं आप्तांच्या वधासारखें हें असलें घोर कृत्य केलें, तर कोणाच्या मनांत आमच्याविषयीं आदर राहील बरें ! आणि तूंच सांग कीं, मग तुझें मुख तरी आमच्या दृष्टीस कसें पडेल ? २७.

१ वज्रासारखें कठोर. २ उपयोगी लागावें. ३ दुरदूरच्या देशाचे. ४ जिंकून. ५ सिद्ध, तयार. ६ अंतःपुरांतील स्त्रिया. ७ मुलें. ८ खजिने. ९ अंतःकरणें, आपले जीव. १० ठेवून. ११ उलटपक्षीं. १२ निष्कंटक. १३ उरावें.

निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन । पापमेवाऽऽश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥

जरी वधु करोनि गोत्रजांचा । तरी वसौटा होऊनि दोषांचा । मज जोडिलासि तुं हार्तीचा । दूरी होसी ॥ २८ ॥ कुळेहरणीं पातकें । तिये आंगीं जडती अशेखें । तये वेळीं तुं कवणें कें । देखावासी ? ॥२९॥ जैसा उद्यानामाजीं अनळु । संचारला देखोनि प्रबळु । मग क्षणभरी कोकिळु । स्थिरु नोहे ॥२३०॥ का सकर्दम सरोवरु । अवलोकूनि चकोरु । न सेवितु अव्हेरु । करूनि निघे ॥ ३१ ॥ तयापरी तुं देवा । मज झकवूं न येसीं मावां । जरी पुण्याचा वोलावा । नाशिजैल ॥ ३२ ॥

तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् । स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥

म्हणोनि मी हें न करीं । इये संग्रामीं शस्त्र न धरीं । हें किडाळ बहुतीं परी । दिसतसे ॥ ३३ ॥ तुजसीं अंतराय होईल । मग सांगे आमुचें काय उरेल ? । तेणें दुःखें हियें फुटेल । तुजवीण कृष्णा ॥ ३४ ॥ म्हणौनि कौरव हे वधिजती । मग आम्ही भोग भोगिजती । हे असो मात अघडती । अर्जुन म्हणे ॥ ३५ ॥

यद्यप्येते न पश्यंति लोभोपहतचेतसः । कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥
कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् । कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥

हे अभिमानमदें भुललें । जरी पां संग्रामा आले । तऱ्ही आम्हीं हित आपुलें । जाणावें लागे ॥३६॥ हें ऐसें कैसें करावें ? । जे आपुले आपण मारावे ? । जाणत जाणतांचि सेवावें । काळकूट ? ॥ ३७ ॥ हां जी मार्गी चालतां । पुढां सिंहु जाहला आवचिता । तो तंव चुकवितां । लाभु आथी ॥ ३८ ॥ असता प्रकाशु सांडावा । मग अंधकूप आश्रावा । तरी तेथ कवणु देवा । लाभु सांगे ? ॥ ३९ ॥ कां समोर अग्नि देखोनी । जरी न वंचिजे वोसंडोनी । तरी क्षणा एका कवळूनी । जाळूं सके ॥ २४० ॥ तैसे दोष हे मूर्त । अंगी वाजों असती पहात । हें जाणतांही केवीं एथ । प्रवर्तावें ? ॥ ४१ ॥ ऐसें पार्थु तिये अवसरीं । म्हणे देवा अवधारीं । या कल्मषाची थोरी । सांगेन तुज ॥ ४२ ॥

कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः । धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥

जैसें काष्ठें काष्ठ मथिजे । तेथ वन्हि एक उपजे । तेणें काष्ठजात जाळिजे । प्रज्वळलेनि ॥ ४३ ॥ तैसा गोत्रींचीं परस्परें । जरी वधु घडे मत्सरें ।

**अन्वयार्थ—हे जनार्दन**–हे वासुदेवा !–**धार्तराष्ट्रान्** धृतराष्ट्राच्या पुत्रांना–**निहत्य**–मारून–**नः** – आमची – **का प्रीतिः स्यात्**–कोणती प्रीति होणार ? [ काय प्रिय होणार ? ]–**एतान् आततायिनः**–या पाप्यांना–**हत्वा**–मारून–**अस्मान्**–आम्हांला–**पाप**–**एवम्**–पापच–**आश्रयेत्**–लागेल ३६.

कारण जर मी गोत्रजांचा वध केला, तर मी दोषांचें वसतिस्थान होईन. अनायासानें प्राप्त झालेला तू मात्र माझ्या हातचा निसटून जाशील २८. कारण, कुलघातानें घडणारी सर्व पातकें जेव्हां आंगीं जडतील तेव्हां तुला कोणी व कोठे पहावें ! आणि तूं सांपडणार तरी कसा ? २९. अहो ज्याप्रमाणें बागेंत अग्नीचा मोठा भडका झाला असतां कोकिळ पक्षी एक क्षणभरहि तेथें रहात नाहीं; २३०. किंवा एखादें सरोवर चिखलानें भरलें आहे, असें पाहून चकोर पक्षी तेथें रहात नाहीं, उलट त्याचा तिरस्कार करून निघून जातो ३१. त्याप्रमाणें हे देवा ! जर माझ्या जवळचा पुण्याचा ओलावा या युद्धामुळें नाहीसा झाला तर तूं आपल्या मायेनें मला ठकवून माझेकडे येणार नाहींस ३२.

**अन्वयार्थ—तस्मात्**–म्हणून–**वयं**–आम्ही–पांडव–**स्वबांधवान् धार्तराष्ट्रान्**–आपलें बांधव जे धृतराष्ट्राचे पुत्र त्यांस–**हन्तुं**–मारण्यास–**न अर्हाः**–योग्य नाहीं. [त्यांना मारणें आम्हांला उचित नाहीं]–**हि**–कारण–हे–**माधव**–हे माधवा !–**स्वजनं हत्वा**–स्वजनांना मारून–**सुखिनः**–आम्हीं सुखी–**कथं**–कसें–**स्याम**–होऊं ? ३७.

म्हणून ही गोष्ट मी कधींहि करणार नाहीं व या समरांगणांत हातांत शस्त्रहि धरणार नाहीं; कारण हें कृत्य अनेक प्रकारें निंद्य आहे, असें मला वाटतें ! ३३. कृष्णा ! तुझ्याशीं आमचा वियोग होईल, मग जगांत आमचें महत्त्व ते काय राहणार ? शिवाय तुझ्यावांचून आम्हांला जें दुःख होईल त्यानें आमचें हृदयविदीर्णच होऊन जाईल ३४. म्हणून देवा, कौरवांचा वध करावा आणि मग आम्हीं राज्याचा उपभोग घ्यावा. ही गोष्ट माझे हातून कधींहि घडणार नाहीं असें अर्जुन म्हणाला ३५.

**अन्वयार्थ—यद्यपि**–जरी–**लोभोपहतचेतसः एते**–ज्यांचें चित्त लोभानें विवेकशून्य झाले आहे असें हें दुर्योधनादिक–**कुलक्षयकृतं दोषं**–कुलाचा क्षय केल्यामुळें होणारा दोष–**च मित्रद्रोहे पातकं**–व मित्राचा द्रोह केल्यामुळें लागणारें पाप यांस–**न पश्यन्ति**–जाणत नसले–त्यांची त्याकडे दृष्टि जात–नसली–**तथापि**–तरी–**जनार्दन**–हे जनार्दना !–**कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिः अस्माभिः**–कुलक्षयामुळें होणाऱ्या दोषाला–कुलक्षयामुळें होणाऱ्या परिणामाला पहाणाऱ्या–जाणणाऱ्या आम्हीं–**अस्मात् पापात् निर्वतितुं**–या पापापासून निवृत्त होण्यास–**कथं न ज्ञेयं**–कसें न जाणावें ३८-३९.

"हे कौरव अभिमानानें उन्मत्त होऊन जरी युद्ध करण्यास आले आहेत तरी आम्ही आपलें हित कशांत आहे, हे पाहिलें पाहिजे ३६. आपले आप्त आपणच मारावे अशी गोष्ट कशी करावी ? असें पहा कीं, जाणून बुजून काळकूट विष कसें घ्यावें ? ३७. अहो, वाट चालत असतांना जर अकस्मात् आपल्या समोर सिंह आडवा आला, तर त्याला चुकविण्यांतच लाभ आहे ३८. असलेला प्रकाश सोडावा आणि मुद्दाम अंधारकोठडींत जाऊन बसावें यांत कोणता लाभ आहे, तें देवा ! सांग बरें ! ३९. किंवा समोर अग्नि पेटला आहे असें पाहून जर आपण त्यास सोडून दूर न झालों, तर एका क्षणांत तो आपल्यास सभोंवार वेढून जाळून टाकीलच २४०. त्याप्रमाणें हे स्वजन वधाचें दोष आम्हांला प्रत्यक्ष लागूं पहात आहेत, असें कळल्यावरहि आम्हीं स्वजनवधास कसें प्रवृत्त व्हावें ? ४१. त्यावेळीं इतकें बोलून अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला, "देवा ! हें पातक केवढें मोठें भयंकर आहे, तें मी तुला सांगतों ऐक. ४२.

**अन्वयार्थ—कुलक्षये**–कुलाचा क्षय झाला असतां–**सनातनाः कुलधर्माः**–वंशपरंपरेनें चालत आलेले कुलधर्म–**प्रणश्यन्ति**–सर्वथा नाश पावतात–**धर्मे नष्टे**–धर्म नाश पावला असतां–**अधर्मः**–अधर्म–**कृत्स्नम् उत कुलं**–सर्वहि कुलाला–**अभिभवति**–व्यापतो ४०.

—ज्याप्रमाणें लांकडावर लांकूड घांसलें असतां त्यापासून अग्नि उत्पन्न होतो आणि त्याचा भडका झाला

१ आश्रयस्थान. २ कुलाच्या घातानें. ३ चिखलानें. ४ ठकवू. ५ मायेनें. ६ वियोग. ७ हृदय. ८ अंधारयुक्त खोल विहीर. ९ न जावें. १० बाजूस टाकून. ११ लागू, चिकटू. १२ घांसावें.

तरी तेणें महादोषें घोरें । कुळचि नाशे ॥ ४४ ॥ म्हणौनि येणें पापें । वंशजधर्मु लोपे । मग अधर्मुचि आरोपे । कुळामाजीं ॥ ४५ ॥

अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः । स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥

एथ सारासार विचारावें । कवणें काय आचारावें । आणि विधिनिषेध आघवे । पारुषती ॥ ४६ ॥ असता दीपु दवाडिजे । मग अंधकारीं राहाटिजे । तरी उजूचि कां अडळिजे । जयापरी ॥ ४७ ॥ तैसा कुळीं कुळक्षयो होय । तये वेळीं तो आद्यधर्मु जाय । मग आन कांहीं आहे । पापावांचुनी ? ॥ ४८ ॥ जैं यमनियम ठाकती । तेथ इंद्रिये सैरा राहाटती । म्हणौनि व्यभिचार घडती । कुळस्त्रियांसी ॥ ४९ ॥ उत्तम अधमीं संचरती । ऐसे वर्णावर्ण मिसळती । तेथ समूळ उपडती । जातिधर्म ॥ २५० ॥ जैसी चोहटाचिये बळी । पाविजे सैरा काउळीं । तैसीं महापापें कुळीं । संचरती ॥ ५१ ॥

संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च । पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२ ॥

मग कुळा तया अशेखा । आणि कुळघातकां । येरयेरां नरका । जाणें आथी ॥ ५२ ॥ देखें वंशवृद्धि समस्त । यापरी होय पतित । मग वोवांडिती स्वर्गस्थ । पूर्वपुरुष ॥ ५३ ॥ जेथ नित्यादि क्रिया ठाके । आणि नैमित्तिक क्रिया पारुखे । तेथ कवणा तिळोदकें । कवण अर्पी ? ॥ ५४ ॥ तरी पितर काय करिती ? । कैसेनि स्वर्गीं वसती ? । म्हणौनि तेही येती । कुळापासीं ॥५५॥ जैसा नखाग्रीं व्याळु लागे । तो शिखांत व्यापी वेगें । तेवीं आब्रह्म कुळ अवघें । आप्लविजे ॥ ५६ ॥

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः । उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥

उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन । नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥

अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् । यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥

देवा अवधारी आणीक एक । एथ घडे महापातक । जे संगदोषें हा लौकिक । भ्रंशु पावे ॥ ५७ ॥ जैसा घरीं आपुला । वानिवसें अग्नि लागला । तो आणिकांहीं प्रज्वाळिला । जाळूनि घाली ॥ ५८ ॥ तैसिया तया कुळसंगती । जे जे लोक वर्तती । तेही बाधा पावती । निमित्तें येणें ॥ ५९ ॥ तैसें नाना दोषें सकळ ।

म्हणजे सर्व लांकडें जळून जातात ४३. त्याप्रमाणें कुळांतील लोकांनीं मत्सरानें एकमेकांचा जर वध केला तर त्या भयंकर महादोषानें सर्व कुळाचा क्षय होतो ४४. म्हणून या कुलक्षयाच्या पापापासून कुलधर्माचा लोप होतो आणि मग त्या कुळांत अधर्माचाच प्रवेश होतो ४५.

**अन्वयार्थ**—**हे कृष्ण**—हे कृष्णा! **अधर्माभिभवात्**—अधर्म सर्व कुळांत पसरल्यामुळें—**कुलस्त्रियः**—कुलीन स्त्रिया—**प्रदुष्यन्ति**—अतिशय दूषित होतात.—दूराचारिणी होतात—**हे वार्ष्णेय**—हे वृष्णिकुलोत्पन्ना!—**स्त्रिषु दुष्टासु**—साध्वी स्त्रिया दूषित झाल्या असतां—**वर्णसंकरः**—ब्राह्मणादि वर्णांचा परस्पर संकर—**जायते**—होतो ४१.

असें झाल्यावर मग सारासार विचार, कोणी कोणते आचरण करावें, कर्तव्याकर्तव्य वगैरे गोष्टी नष्ट होतात ४६.असलेला दिवा मालवून अंधारांत फिरूं लागलें म्हणजे ज्याप्रमाणें सहजच मनुष्य सरळ वाटेंतहि ठेंचाळतो ४७. त्याप्रमाणें कुलाचा-कुलक्षय होतो त्या वेळीं सनातन कुलधर्म नाहींसा होतो; मग त्या कुळांत पापावांचून दुसरें काय राहणार? ४८. त्या वेळीं मन व इंद्रियें यांचें नियमन होत नाहीं, इंद्रियें स्वैर वर्तन करूं लागतात, आणि त्यामुळें कुलस्त्रियांच्या हातून पापाचरण घडतें ४९. उत्तम वर्णांतील स्त्रिया अधम वर्णांतील पुरुषाशीं रममाण होतात. असा वर्णावर्णांचा परस्पर संकर झाला म्हणजे सर्व ज्ञातिधर्म आपोआप नाहीसे होतात २५०. जसे चव्हाट्यावर ठेवलेल्या बळीवर कावळें चोहोंकडून झडप घालतात, त्याप्रमाणें अशा श्रेष्ठ कुलामध्यें महापातकें सहजच संचार करतात ५१.

**अन्वयार्थ**—[**च**] **संकरः**— [आणि] वर्णसंकर—**कुलघ्नानां च कुलस्य**—कुळाचा घात करणारे लोक व तें कुल या दोघांच्याहि—**नरकाय एव**—नरकालाच कारण होतो—**हि**—कारण—**एषां**—या कुलघ्नांचे व कुळांचे—**पितरः**—पितर—**लुप्तपिंडोदकक्रियाः सन्तः**—ज्यांची पिंडक्रिया व उदकक्रिया लुप्त झाली आहे असे होत्साते म्ह० श्राद्ध व तर्पण करणारे पुत्रादिकच नाहींसे झाल्यामुळें ज्यांचीं श्राद्धें व तर्पण नाहीं, असें ते पितर—**पतन्ति**—नरकांत पडतात ४२.

मग त्या संपूर्ण कुळांस आणि त्या कुळांचा नाश करणारे अशा दोघांसहि नरकास जाणे भाग पडते ५२. मग हें पहा! याप्रमाणें सर्व वंशाची वृद्धि पतित झाल्यामुळे त्यांतील स्वर्गस्थ पूर्वज आपोआपच पतन पावतात ५३. ज्या कुळांत नित्य व नैमित्तिक कर्में घडत नाहींत, त्या ठिकाणीं पितरांना तिलोदक कोण अर्पण करणार? ५४. अशी स्थिति झाल्यावर त्या पितरांनीं काय करावें? व स्वर्गांत कसें रहावें? म्हणून तेहि आपल्या कुळापाशीं येतात ५५. ज्याप्रमाणें पायाच्या बोटाला साप चावला असतां त्याचें विष मस्तकापर्यंत सर्वांग सत्वर व्यापतें त्याप्रमाणें आप्तवर्गाचा वध करण्यापासून उत्पन्न होणारें पाप सत्य लोकांपर्यंत गेलेल्या सर्व पूर्वजांना पतित करतें ५६.

**अन्वयार्थ**—**कुलघ्नानां**—कुळांचा घात करणाऱ्या दुष्टांच्या—**एतैः वर्णसंकरकारकैः दोषैः**—या वर्णसंकर करविणाऱ्या दोषांनीं—**शाश्वताः**—परंपराप्राप्त—**जातिधर्माः**—क्षत्रियत्वादिकामुळें प्राप्त होणारे धर्म—**च कुलधर्माः**—व कुलधर्म—**उत्साद्यन्ते**—विनाश पावतात ४३.

**अन्वयार्थ**—**जनार्दन**—हे कृष्णा!—**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां**—ज्यांचे कुलधर्म नाश पावले आहेत, अशा मनुष्यांचा—**नरके**—नरकांत—**नियतं**—निश्चयानें—**वासः**—वास-**भवति**—होतो,—असें—**अनुशुश्रुम**—महर्षींच्या वचनांवरून—आचार्यांच्या तोंडून ऐकिलें आहे ४४.—**अहो**—काय चमत्कार आहे!—**बत**—अरेरे—**वयं**—आम्ही—**यत्**—जे **राज्यसुखलोभेन**—राज्यसुखाच्या लोभानें—**स्वजनं**—स्वजनांना—**हन्तुं**-मारण्यास—**उद्यताः**—तयार झालों—[**तत् एतत्**—तें—हें—] **महत्पापं**—मोठें पाप—**कर्तुं**—करण्यास—**व्यवसिताः**—सज्ज झालों आहों ४५.

देवा ऐका, या ठिकाणीं आणखी एक महापातक घडतें, तें कोणतें म्हणाल तर या स्वजनवधाच्या पातकापासून संसर्ग दोषानें लोकाचार नाहींसें होतात ५७. ज्याप्रमाणें आपल्या घराला एकाएकी दुर्दैवानें अग्नि लागला तर तो भडकलेला अग्नि शेजारचीं दुसरींहि घरें जाळून टाकितो ५८. त्याप्रमाणें त्या कुळाशीं संबंध ठेवून जे जे लोक वागतात, तेहि या निमित्तानें दूषित होतात ५९. अर्जुन

१ दूषित. २ पडतात. ३ पितरांना देण्याचें उदक. ४ बुडवावें. ५ दैववशात्, सहज.

अर्जुन म्हणे तें कुळ । मग महाघोर केवळ । निरयं भोगी ॥२६०॥ पडिलिया तिये ठायीं । मग कल्पांतींही उकलु नाहीं । येसणें पतन कुळक्षयीं । अर्जुन म्हणे ॥६१॥ देवा हें विविध कानीं ऐकिजे । परी अझुनिवरी त्रासु नुपजे । हृदय वज्राचें हें काय कीजे । अवधारीं पां ॥ ६२ ॥ अपेक्षिजे राज्यसुख । जयालागीं तें तंव क्षणिक । ऐसे जाणतांही दोख । अव्हेरू ना ? ॥ ६३ ॥ जे हे वडिल सकळ आपुले । वधावया दिठी सूदले । सांग पां काय थेंकुलें । घडलें आम्हां ? ॥ ६४ ॥

यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः । धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥

आतां यावरी जें जियावें । तयापासूनि हें बरवें । जे शस्त्र सांडूनि साहावे । बाण यांचे ॥ ६५ ॥ तयावरी होय जितुकें । तें मरणही वरी निकें । परी येणें कल्मषें । चाँड नाहीं ॥ ६६ ॥ ऐसें देखून सकळ । अर्जुनें आपुलें कुळ । मग म्हणे राज्य तें केवळ । निरयंभोगु ॥ ६७ ॥

संजय उवाचः—

एवमुक्त्वाऽर्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् । विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥ ४७ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

ऐसे तिये अवसरी । अर्जुन बोलिला समरीं । संजयो म्हणे अवधारीं । धृतराष्ट्रातें ॥ ६८ ॥ मग अत्यंत उद्वेगला । न धरत गहिंवरु आला । तेथ उडी घातली खालां । रथौनियां ॥ ६९ ॥ जैसा राजकुमरु पदच्युतु । सर्वथा होय उपहतु । कां रवि राहुग्रस्तु । प्रभाहीनु ॥ २७० ॥ नातरी महां-सिद्धिसंभ्रमें । जिंतिला तापसु भ्रमें । मग आकळूनि कामें । दीनु कीजे ॥ ७१ ॥ तैसा तो धनुर्धरु । अत्यंत दुःखें जर्जरु । दिसे जेथ रहंवरु । त्याजिला तेणें ॥ ७२ ॥ मग धनुष्य बाण सांडिले । न धरत अश्रुपात आले । ऐसें ऐक राया वर्तलें । संजयो म्हणे ॥ ७३ ॥ आतां यापरी तो वैकुंठनाथु । देखोनि सखेद पार्थु । कवणेपरी परमार्थु । निरूपील ॥ ७४ ॥ ते सविस्तर पुढारी कथा । अति सकौतुक ऐकतां । ज्ञानदेव म्हणे आतां । निवृत्तिदासु ॥ २७५ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥ श्लोक ४७–ओंव्या २७५.

★

म्हणतोः—देवा, त्याप्रमाणेंच त्या कुलांत नाना प्रकारचे दोष घडून आले म्हणजे मग तें कुल महाभयंकर नरकवास भोगतें २६०. अर्जुन आणखी म्हणतो, त्या नरकांत पडल्यावर मग कल्पांतींहि तेथून त्यांची सुटका होत नाहीं, इतका या कुलक्षयापासून अधःपात होतो ६१. देवा, हे सर्व आम्हीं शास्त्रांत ऐकून सुद्धां मनांत अजून या पापाला भिऊं नये कां? उलट तें करण्यासाठीं हें आपलें हृदय वज्राचें बनवावें कीं काय याचा आपणच विचार करा! ६२. दुसरें असें पहा कीं, कुलक्षय करून शरीराकरितां राज्यसुखाची इच्छा करावयाची तें शरीर तर क्षणिक आहे, असें जाणूनहि आम्ही कुलक्षयाचे दोष करण्याचें सोडूं नये काय? ६३. आमचे जे हे सर्व पूज्य वडील जमलेले आहेत त्यांचा वध करावा या हेतूनें मी त्यांच्याकडे दृष्टि फेकली हेच आमच्या हातून काय लहान पातक घडले आहे? तुम्हीच सांगा बरें ६४.

**अन्वयार्थ**—**यदि**–जर–**अप्रतिकारम् अशस्त्रं मां**–शत्रूंचा प्रतिकार न करणाऱ्या व शस्त्र सोडून बसलेल्या मला–**शस्त्रपाणयः धार्तराष्ट्राः**–ज्यांच्या हातांत शस्त्रें आहेत असे दुर्योधनादि धृतराष्ट्रपुत्र–**रणे**–रणांगणांत–**हन्युः**–मारतील तर–**तत्**–तें–**मे**–मला–**क्षेमतरं**–अतिशय क्षेम–कल्याणकर–**भवेत्**–होईल ४६.

तर आतां या उपर जिवंत राहाण्यापेक्षां आपलीं शस्त्रें टाकून देऊन कौरवांचें बाण सहन करावें हे बरें! ६५. असें केल्यामुळें जरी मरण प्राप्त झालें, तरी चांगलें; परंतु यांचा वध करून पाप जोडण्याची माझी इच्छा नाहीं ६६. याप्रमाणें अर्जुनानें आपलें सर्व कुल पाहून म्हटलें कीं, यांचा क्षय करून राज्य मिळविणें म्हणजे केवळ नरकाची जोड करणें होय [ असें बोलून तो स्वस्थ बसला ] ६७.

**अन्वयार्थ**—**अर्जुनः**–अर्जुन–**एवम् उक्त्वा**–असें बोलून **संख्ये**–संग्रामांत–रणमैदानांत–**सशरं चापं**–बाणासह धनुष्य–**विसृज्य**–टाकून–**शोकसंविग्नमानसः**–शोकानें ज्याचें मन उद्विग्न झालें आहे असा होत्साता–**रथोपस्थे**–रथाच्या एका विशिष्ट भागीं–**उपाविशत्**–बसला ४७.

संजय म्हणतो—राजा धृतराष्ट्रा ऐक. त्या समरांगणांत अर्जुन असें बोलला; ६८. अर्जुन अत्यंत उदासीन झाला व अनिवार गहिंवर येऊन त्यानें रथांतून खाली उडी टाकली ६९. ज्याप्रमाणें एखादा राजकुमार पदच्युत झाला म्हणजे तो जसा सर्वथा निस्तेज होतो, किंवा राहूच्या योगानें सूर्यास ग्रहण लागलें म्हणजे तो तेजरहित होतो २७०. किंवा तपस्वी महासिद्धीच्या प्राप्तीमुळें भ्रमानें व्यापला म्हणजे तपाचा त्याग करून कामाच्या सपाट्यांत सांपडून दीनतेस प्राप्त होतो ७१. त्याप्रमाणें तो धनुर्धारी अर्जुन रथांतून खालीं उतरला, त्यावेळीं तो दुःखानें अतिशय व्याकुळ झालेला दिसूं लागला ७२. संजय म्हणतो, राजा, आणखी असें घडलें कीं, त्यानें धनुष्यबाण टाकून दिलें व त्याच्या डोळ्यांतून आपोआप सारख्या अश्रुधारा चालल्या ७३. आतां यापुढें अर्जुनास दुःख झालेलें पाहून वैकुंठनाथ श्रीकृष्ण त्यास कशा रीतीनें तत्त्वज्ञानाचा बोध करतील ७४. ती पुढें येणारी सविस्तर कौतुककारक कथा उत्सुकतेनें ऐका, असें संतास श्रीनिवृत्तिनाथांचे दास श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणाले २७५.

१ नरक. २ कल्पाचे अंतापर्यंतसुद्धां. ३ सुटका. ४ घातलें. ५ थोड-थोडकें [ पाप ]. ६ पापाची. ७ गरज. ८ नरकवास. ९ भानरहित. १० अणिमादि सिद्धींच्या मोहानें.



# अध्याय संगति व पहिल्या अध्यायाचें तात्पर्य

## तरी पहिला जो अध्यावो । तो शास्त्र प्रवृत्ति प्रस्तावो ।। अ. १८।१४३५

श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं 'अध्याय संगति' सांगतेवेळीं हा पहिला अध्याय म्हणजे 'शास्त्र-प्रवृत्ति प्रस्ताव' आहे असें म्हटलें आहे. अर्थात् 'गीताशास्त्रा'चे प्रवृत्तिनिमित्त म्हणजे भगवंत 'गीताशास्त्र' सांगण्याकरितां कां प्रवृत्त झाले, ते या अध्यायांत सांगितलें आहे.

पहिल्या ओवींत 'ॐनमोजी आद्या' म्हणून अर्थात् 'ओम्' या परमात्मवाचक, मांगलिक नामाचा-शब्दाचा औचित्यपूर्ण उपयोग करून आदिबीजाला अर्थात् परमात्म्याला अभेदत्वानें 'नमन' केलें आहे. कारण, 'ओम्', 'ॐ' हा परब्रह्माचा वाचक आहे. 'तस्य वाचकः प्रणवः' परमात्म्याचे वाचक नाम व नामी जो सर्वव्यापक, परममंगलरूप परमात्मा यांचा तत्त्वतः 'अभेद'च आहे. 'ओम्' या नामांत 'अ', 'उ' आणि 'म' यांचा अंतर्भाव होतो. आणि 'हें तिन्ही एकवटलें' म्हणजे त्यांत संपूर्ण वेद कवटाळला जातो. शिवाय प्रत्येक अक्षरांत 'अ' अंतर्भूतच असतो. 'अकारो ह वै सर्वावाक्' किंवा 'अक्षराणाम् 'अ'कारोस्मि' या श्रुति-स्मृति वचनावरून 'अ'-कार हा सर्ववर्णप्रकृति व भगवद्विभूति आहे व त्या 'अ'चा 'ओम्' या नामांत अंतर्भाव आहे. सारांश, श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं 'ओम्' या परब्रह्मवाचक मांगलिक नामाचा हेतुगर्भ प्रयोग करून सच्चिदानंदरूप, परममंगलरूप परब्रह्माचा निर्देश करून 'श्रीज्ञानेश्वरी-ग्रंथारंभीं' वस्तुनिर्देशरूप मंगल केले आहे असो.

भगवान् बादरायणाचार्यांनीं ब्रह्मसूत्रांत पहिल्या चतुःसूत्रींतच वेदान्तशास्त्रांतील सर्व सिद्धान्ताचें सारसर्वस्व गाइले आहे. चतुःसूत्रींत पहिलें सूत्र म्हणजे '**अथातो ब्रह्मजिज्ञासा**' हे होय. त्या ब्रह्मवाचक अशा 'ओम्' पदाची योजना करून प्रथम सूत्रार्थ 'सूचित' केला आहे. कारण, पुढील तीन सूत्रांचा तंतोतंत अनुवाद श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं याच ओवीमध्यें ज्याअर्थी केला आहे. त्याअर्थी उपरिनिर्दिष्ट पहिलें सूत्र ज्ञानेश्वरीच्या पहिल्या ओवींत अर्थतः आक्षिप्त आहेच, असें सिद्ध होतें.

दुसरें सूत्र म्हणजे '**जन्माद्यस्य यतः**' हे होय. अर्थात् जगाचे उत्पत्ति-स्थिति-लय ज्या कारणापासून होतात ते ब्रह्म होय. त्याचा अनुवाद 'ओम् नमोजी आद्या' हा होय. 'आद्या' म्हणजे आद्य जगत् कारण ब्रह्म होय.

तिसरें सूत्र म्हणजे '**शास्त्रयोनित्वात्**' हे होय. त्याचा अनुवाद म्हणजे 'वेदप्रतिपाद्या' वेदकर्ता, वा वेदैकगम्य असा परमात्मा आहे हा होय. आणि चौथें सूत्र म्हणजे '**तत्तु समन्वयात्**' हे होय. त्याचा अनुवाद म्हणजे 'जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा' हा होय. सर्व वेदान्तांचा समन्वय एकमेव जगत् कारण ब्रह्मांतच आहे असें सांगून महावाक्यार्थरूप जीवब्रह्मैक्याचे अर्थात् अखंडार्थतेचे प्रतिपादन या सूत्रांत केले आहे तेंच ऐकांतिक ऐक्य यांत श्रीज्ञानेश्वर महाराजांनीहि सांगितले आहे. जे ब्रह्म 'ओम्'कार स्वरूप आहे, जे ब्रह्म अखिल जगाचे 'आद्य' कारण आहे, जे ब्रह्म 'वेद प्रतिपाद्य' म्हणजे सर्वज्ञ, वेदकर्ता किंवा वेदैकगम्य अर्थात् वेद कारण आहे. जे ब्रह्म 'स्वसंवेद्य' म्हणजे स्वयंप्रकाश असून 'आत्मरूप' म्हणजे त्वंपदलक्ष्याशीं अभिन्न आहे त्या परमात्म्यास माझा नमस्कार असो. सारांश, चतुःसूत्रींचें तात्पर्य, किंबहुना!! सर्व वेदान्त सिद्धान्ताचे सारसर्वस्व श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं या ग्रंथारंभीं लिहिलेल्या ओव्यांपैकीं पहिल्या साडेतीन चरणात्मक एकाच ओवींत गोवलें आहे. दुसऱ्या ओवीपासून ते वीस ओवीपर्यंत श्रीगणेशाचे काव्यमय नमन लिहिलें आहे. त्यांत प्रथम ओवींत सांगितलेला ओंकारस्वरूप, आद्य जगत् कारण केवळ वेद प्रतिपाद्य, स्वसंवेद्य असून आत्मरूप अर्थात् त्वंपदलक्ष्याशीं अभिन्न असणाऱ्या देवा! तूंच गणेश आहेस व तूंच संपूर्ण विषय आणि वृत्तिज्ञान यांचा सामान्य प्रकाशक आहेस त्या तुला माझा नमस्कार असो. त्यानंतर ओवी २१ मध्ये चातुर्य, वागर्थ व कला यांची देवता जी विश्वमोहिनी 'शारदा' तिला नमन केले आहे. त्यानंतर ज्यांच्या कृपेनें

आपण पूर्णकाम झालो त्या श्रीगुरु निवृत्तिनाथांना नमन केलें [ २२ ते २७ ]. पुढें भगवद्गीता ज्या महाभारतान्तर्गत भाग आहे, त्या महाभारत ग्रंथाचे महात्म्य 'परमार्थाची जन्मभूमि, सर्व विद्यांचे मूळपीठ, सर्व काव्यांचा रावो' इत्यादि विशेषणांनीं वर्णिलें आहे. अतिप्राचीन अशा संस्कृत वाङ्मयांत अध्यात्म-तत्त्वज्ञान साहित्य आणि इतिहास या बाबतींत श्रीभगवान् व्यास महर्षींचें स्थान महत्त्वपूर्ण असें आहे यांत वाद नाहीं.

भगवान् व्यासांनीं ब्रह्मसूत्र, अठरा पुराणें, महाभारत, श्रीमद्भागवत इत्यादि अनेक ग्रंथांची रचना केली. "व्यास-सूत्रें" ही श्रुत्यर्थ निर्णयाकरितां लिहिलीं. त्यांतहि महाभारत म्हणजे जणुं पांचवा वेदच होय. कारण, महाभारतांत असलेल्या तत्त्वज्ञान, आख्यानें, धर्मनीतिपरक प्रकरणें, नामभक्तियोग इत्यादि विषयांच्या दृष्टीनें महाभारताचें ज्ञान सर्वज्ञतुल्य वेदासारखें अगाध आहे, म्हणून 'सर्व विद्यांचे मूळपीठ' आहे.

तसेंच महाभारतांत प्रामुख्यानें सांगितलेलें धर्म-नीति-भक्ति, ज्ञान-वैराग्य, वेदाचें निरंकुश प्रामाण्य इत्यादि विषय हाच एक "उच्छिष्टाचा भाग" इतर ग्रंथकारांनीं स्पष्ट करून सांगितला. भक्ति व तत्त्वज्ञान यासारखें विषय अपूर्व-सुंदर कथा-संवाद, दृष्टांतद्वारां व तेहि काव्यपूर्ण रसाळभाषेंत महाभारतांत सांगितलें आहेत. या लोकोत्तर प्रतिपादन शैलीमुळें श्रोत्यास किंबहुना!! विषयासक्तासहि भगवत्प्राप्तीची ओढ निर्माण होते. त्या महाभारतांतील श्रीव्यासांच्या अपूर्वसुंदर शैलीचाच सर्व ग्रंथकारांनीं, साधुसंतांनीं आपापल्या ग्रंथांतून उपयोग केल्याचें आढळांत येतें. त्यांतहि भागवतधर्मीय साधुसंतांनीं आपापल्या ग्रंथांमधून भक्ति-ज्ञान-वैराग्यादि विषय इतक्या अमृतमधुर, रोचक, गोड अर्थपूर्ण भाषेंत सांगितलें आहेत कीं, ते पाहिले म्हणजे भगवान् व्यासांच्याच अपूर्वसुंदर प्रतिपादन शैलीचीच छाया त्यावर पडली असल्याचें दिसून येते. वेदोपनिषदांत प्रतिपादिलेला जो ब्रह्मस्थितीरूप मोक्ष श्रीव्यासांनीं अन्तिमसाध्य म्हणून सांगितला; त्याची जी विवेक, वैराग्य, हरि-गुरुकृपा इत्यादि अन्तरंग-बहिरंग साधनें उपदेशिलीं, तोच मोक्ष व तीच साधनें इतर ग्रंथकारांनींहि प्रतिपादिलीं. तेच विषय त्याच भूमिकेवर सांगितलें फक्त मांडणींत सुलभता आणली इतकाच काय तो फरक "याकारणे म्हणिपे पाही। व्यासोच्छिष्ट जगत्रय" [ २८ ते ४९. ]

त्यानंतर ज्या गीताशास्त्रावर टीका, व्याख्यान करावयाचें त्या गीताग्रंथाचें महात्म्यहि 'भारत कमळ परागु, जिची अपेक्षा विरक्त करतात, जिचे सेवन अनुभवी संत करतात, सोहंभावी पारंगतहि जिचे सेवन करतात व जिची प्रत्यक्ष ब्रह्मदेव व शंकरहि प्रशंसा करतात' असें वर्णिलें आहे. यांत अतीन्द्रिय, सच्चिदानंदघन, प्राणिमात्रांच्या इच्छेचा विषय जो अद्वितीय परमात्मा तोच या ग्रंथाचा 'विषय' आहे, असें सूचित केलें आहे [ ५० ते ५५ ]. त्यानंतर हें गीताशास्त्र श्रवण करणाऱ्या श्रोत्यांनीं आपापल्या चित्तास हलुवारपणा आणून श्रवण करावें. शिवाय अर्जुनाच्या पंक्तीला बसून ऐकण्याची ज्यांची योग्यता आहे तेंच या ग्रंथाचे **'अधिकारी'** आहेत. म्हणजे ऐहिक राज्यवैभवादिकांचा त्याग करणारे वैराग्यशील व पापरहित असतील तेंच अधिकारी होत. त्यांनीं कृपा करून इकडे लक्ष द्यावें [ ५६ ते ६२ ]. आपल्या या बोलण्यानें समोर बसलेल्या थोर श्रोत्यांचा अनादर झाला असेल म्हणून 'मी सलगीने बोलतो ती माझी आपले चरणीं लडिवाळपणाची विनंतीच आहे', अशा लडिवाळपणाचा परिहार दिला आहे [ ६३ ते ६५ ]. पुढे गीताशास्त्राचा विचार करतांना प्रत्यक्ष श्रीशंभूहि आश्चर्यचकित झाले, सर्वज्ञतुल्य वेदहि जेथें वेडावले, त्या थोर अशा गीताशास्त्रावर व्याख्यान करण्यास मी अल्पज्ञ व मतिमंद बालकानें प्रवृत्त होणें धाष्ट्र्याचे आहे. याची जाणीव आपणास असल्याचें सुचविलें आहे [ ६६ ते ७४ ]. परंतु ज्या श्रीगुरूंच्या कृपाप्रसादाच्या आधारावर हे व्याख्यान करण्याचें धाडस केलें आहे. ती गुरुकृपा मी हें हातीं घेतलेलें कार्य तडीस नेईल, असें आत्मविश्वासानें सांगून त्या कृपेची 'वस्तुसामर्थ्यशक्ति' वर्णिली आहे.

अत्यन्त-निर्विशेष-सत्-सामान्य ब्रह्मस्वरूपच, आपल्याशीं अभिन्न असलेल्या मायाशक्तीच्या सहकार्यानें सोपाधिक झाले. म्हणजे शब्द, पद आणि अर्थ, वस्तु किंवा पदार्थ या अशा उभय स्वरूपानें अविष्कृत, अभिव्यक्त प्रमाणगोचर होऊं लागते. चराचरात्मक विविध नाम-रूपें-वर्तनें यांनीं युक्त असलेल्या विशाल विश्वभ्रमाचे अधिष्ठान

एकमेवाद्वितीय ब्रह्मच आहे. तें पूर्णस्वरूप तत्त्वच मूळच्या एकत्वस्वरूपांत मुळींच बिघाड न होऊं देतां माया शक्तीमुळें अनेकत्वानें भासते. पद व अर्थ-वस्तुरूपानें प्रपंचाचा असीम विस्तार, अफाट पसारा म्हणजेच हे दृश्यमान 'विश्व' होय.

त्यांत प्रत्येक 'शब्दांत' व प्रत्येक 'वस्तूंत', पदार्थांत सामर्थ्यरूप वेगवेगळ्या शक्ति आहेत. त्यास अनुक्रमें 'शब्दशक्ति' व 'वस्तुशक्ति' असें म्हणतात. सर्व शब्दप्रपंच सर्व वर्णप्रकृतिरूप ओंकारांतच अंतर्भूत आहे. तसेंच सर्व 'शब्दशक्ति' व 'वस्तुशक्ति' मूळ मायेच्याच अंगभूत आहेत. ती माया अनादि असल्यामुळें 'शब्दसामर्थ्य शक्ति' व 'वस्तुसामर्थ्य शक्ति'हि अनादिच आहेत. त्यांत शब्दनिष्ठशक्ति अर्थात् 'शक्तिवृत्ति' वा 'लक्षणावृत्ति' ज्यास ज्ञान असेल त्यासच शब्द आपल्या अर्थाचें ज्ञान करून देतो; इतरांस नाहीं. अतींद्रिय धर्म, ब्रह्माचें ज्ञानप्राप्त्यर्थ श्रीगुरु शरण व्हावे लागते; श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ सद्गुरूंच्याच 'तत्त्वमस्यादि' महावाक्योपदेशाविना मोक्ष होत नाहीं.

"वस्तुसामर्थ्य शक्ती"ची गोष्ट मात्र तशी नाहीं. कारण, जल, अग्नि इत्यादि पदार्थांत–वस्तूंत अनुक्रमें ओले करण्याची किंवा दाह करण्याची शक्ति आहे. हें सर्वानुभव सिद्ध आहे. त्या अग्न्यादि पदार्थांशीं ज्यांचा संबंध होईल. त्याजवर अग्न्यादि पदार्थ आपापल्या अंगभूत शक्तिद्वारां दाहादि कार्य करीतच असतात. ते स्वकार्य करतेवेळीं आपल्याशीं संबंधित होणाऱ्या व्यक्तीस आपल्या शक्तीचें ज्ञान आहे किंवा नाहीं. ती संबंधित होणारी वस्तु योग्य आहे वा अयोग्य आहे याचीहि त्यास अपेक्षा असत नाहीं. अतएव आपली शक्ति ज्ञात असणाऱ्या वा नसणाऱ्या व्यक्तीवर पात्रापात्र-विचार-निरपेक्षतेने अग्न्यादि 'वस्तु' आपापल्या अंगभूत सामर्थ्यरूप शक्तीचे कार्य करीतच असतात.

मनुष्यदेहांत रागद्वेषमूलक देहात्मभ्रांतीनें केलेल्या शुभाशुभ कर्मांतहि अदृष्टोत्पत्तीद्वारां सुखदुःखात्मक फळें निर्माण करण्याची अंगभूत शक्ति आहेच. म्हणूनच ती प्रकर्षानें फलोन्मुख झाल्यावर भोक्त्यास त्याचें ज्ञान असो वा नसो, त्यास ते फळ आवडो अगर न आवडो, बलवान अदृष्ट त्यास सुखदुःखात्मक फलें भोगावयास लावतेच लावते. हीच ती शुभाशुभ कर्मांतील अंगभूत सामर्थ्यरूप 'वस्तुशक्ति' होय. त्याची ईश्वर फक्त व्यवस्थिति ठेवणारा 'विश्वस्त' आहे. परिसाचा लोखंडाशीं कोणत्या कां निमित्ताने होईना; पण संबंध झाला कीं, लोखंडाचे सोनेंच होतें ही केवळ वस्तुसामर्थ्य शक्तिच आहे. त्यांत नवल असे कांहीं नाहीं 'देवाच्या' वस्तुसामर्थ्यशक्तिविषयीं एक संग्राहक श्लोक आहे तो असा:–

अयमुत्तमोऽयमधमो जात्यारूपेण संपदा वयसा । श्लाघ्यो वाऽश्लाघ्यो वेत्थं न वेत्ति भगवाननुग्रहावसरे ॥

याचा भावार्थ असा कीं, षड्गुणैश्वर्य भगवान् एखाद्यावर अनुग्रह करण्याचे अवसरीं त्याच्या उत्तम अधमतेस न जाणता जाति, संपत्ति, पात्रापात्र विचार निरपेक्ष राहून त्यास कृतार्थ करतो याविषयीं श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात:–

तुझे औदार्य जाणो स्वतंत्र । देता न म्हणसी पात्रापात्र । पै कैवल्या ऐसे पवित्र । जे वैरीयाहि दिधले ॥

देवा! तुझे औदार्य स्वतंत्र आहे तूं द्यावयास लागलास म्हणजे हा पात्र आहे, हा अपात्र आहे अशी निवड मुळींहि करीत नाहींस, मोक्षासारखी पवित्र वस्तु पण ती तूं आपल्या वैऱ्यांनाहि दिलीस त्याप्रमाणें सकलार्थमतिप्रकाशु म्हणजे ज्ञेय व वृत्तिज्ञान–साक्षीत्वाने सामान्य प्रकाशक स्वयंप्रकाश, श्रीगणेशाशीं अभिन्न असणारी मायाशक्तिरूप अनादिसिद्ध सरस्वति, वाग्देवताच जर खरोखर प्रगट झाली म्हणजे एखाद्यावर प्रसन्न झाली तर मुक्यालाहि ती सौष्ठवपूर्ण, यथार्थ अर्थवाहक शब्दाविष्कारक्षम अशी भारती म्हणजे वाणी देते. ही केवळ वस्तुसामर्थ्य शक्तीच आहे. त्यांत नवल ते काय? असा दृष्टान्त देऊन श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "श्रीगुरुकृपेनें काय एक होणार नाहीं!" माझे अनायासानें वाहणारें श्वासोच्छ्वासहि काव्य ग्रंथ होतील. हा गीतार्थ करण्याची माझी योग्यता नाहीं. तरीपण श्रीगुरुकृपेच्या सामर्थ्यावर प्रवृत्त झालों आहें. मी हा ग्रंथ करतो असें नव्हे तर "हे कृपेचे वैभव तिये" बरें! असा गीतार्थ करण्यांत केवळ श्रीगुरूंचे महात्म्य, ही श्रीगुरूंची वस्तुसामर्थ्य शक्तिच आहे; त्यांत नवल ते काय? म्हणून हे गुरुवर्या! मी आपला अनुग्रहित आहे. त्यामुळें आपणच मजकडून गीतार्थ बोलविणार आहांत अशी या ओवींत अत्यंत मार्मिकतेनें व अगदीं आटोपत्या शब्दांत श्रीगुरुकृपेची "वस्तुसामर्थ्यशक्ति" श्रीज्ञानेशांनीं प्रतिपादिली आहे.

मी कळसूत्री लाकडाची बाहुली असून तिला दोऱ्याच्या आधारें नाचविणारें 'सूत्रधार' श्रीगुरु निवृत्तिनाथ

आहेत. म्हणून त्यांचेजवळ गीताशास्त्रावरील टीकाग्रंथ करण्यास 'आरंभ कर' अशी आशीर्वादपूर्वक आज्ञा मागितली व ती मिळाल्यामुळें परम उल्हासास पावून गीताशास्त्राचा टीकाग्रंथ अर्थात् भगवंतांनीं अर्जुनास केलेल्या उपदेशाचा अनुवाद करण्यास श्रीज्ञानेश्वर महाराज आरंभ करतात [ ७९ ते ८४ ].

पुत्रस्नेहानें मोहित झालेल्या धृतराष्ट्रानें संजयास असा प्रश्न विचारला कीं, धर्मक्षेत्रावर माझे व पंडूचे पुत्र जावून एवढा वेळ काय करीत आहेत. याचे उत्तर देतेवेळीं संजयानें कौरव व पांडव या उभय पक्षांतील सैन्याचे रथीमहारथी, त्यांचे रथ यांचे वर्णन केलें आहे. दुर्योधनानें द्रोणाचार्यांच्या जवळ पांडवसैन्याची व त्याचा सेनापति जो भीम त्याची अवहेलना करून, आपल्या सैन्याचें वर्णन करून तो आपल्या सैन्याचे सेनापति जे भीष्म त्यांच्या आज्ञेत सर्वांनीं रहावें अशी आपल्या सैन्यास आज्ञा करतो. त्यानंतर सर्वांच्या शेवटीं श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं अर्जुनाच्या रथाचे, भगवन्ताच्या भक्तवात्सल्याचे उत्कृष्ट वर्णन केले आहे. त्या युद्धक्षेत्रावर जो शंखनिनाद झाला त्यामुळें प्रत्यक्ष आदि-पुरुष विस्मित होऊन कदाचित् सृष्टीचा अंत होईल असें जाणून तो आवेशयुक्त शंखनाद बंद केला; तथापि त्या शंखनिनादाचा पडिसाद घुमत होता, त्यामुळेंच कौरव सैन्याची धांदल झाली. आतां युद्धाची सर्व तयारी होऊन उभयपक्षीं प्रलयांतील मेघवर्षवाप्रमाणें बाणांची वृष्टि करण्याची वेळ आली असें श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं वर्णन केले आहे. कौरव सैन्याची तयारी पाहून त्याप्रसंगीं मनांत संतोषयुक्त होऊन अर्जुनानें त्या सर्व सैन्यावर नजर टाकली व आपलें धनुष्य सहजलीलेनें उचललें [ ८९ ते १६८ ]. त्यावेळीं अर्जुनानें आपला रथ दोन्ही सैन्याच्या मध्यभागीं नेऊन उभा करण्यास भगवन्तास सांगितलें. कारण, रणांत मला कोणाशीं युद्ध करावयाचें आहे ते पाहिले पाहिजे. या अर्जुनाच्या म्हणण्याप्रमाणें भगवन्तांनीं रथ दोन्ही सैन्याच्या मध्यभागीं नेऊन उभा केला ते सर्व सैन्य पाहून अर्जुनास तेथें युद्धाकरितां जमलेले भीष्म-द्रोणादिक शत्रु आहेत असें न वाटतां ते आपले पूजनीय गुरु, भाऊ, मामा, पुत्र, पौत्र, आहेत असेंच वाटलें. त्यामुळें अतिस्नेहानें मोहित झालेला अर्जुन खेदयुक्त अन्तःकरणानें अच्युतास म्हणाला देवा ! हा येथें जमलेला मेळावा माझ्या गोत्रवर्गाचाच आहे. हे पाहून अर्जुनाचे अन्तःकरणांत अकस्मात् कृपा उत्पन्न झाली व त्यामुळें त्या अपमानानें अर्जुनाची पूर्वींची स्वाभाविक असलेली वीरवृत्ति लोपली गेली. प्रत्यक्ष शंकरांनाहि युद्धांत जिंकणाऱ्या निधड्या छातीच्या अर्जुनाचीं गात्रें युद्धास आरंभ होण्यापूर्वींच शिथिल होऊन त्याच्या हातांतील गांडीव धनुष्यहि गळून पडला, अशी अर्जुनाची करुणास्पद स्थिति श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं वर्णिली आहे [ १६९ ते २०३ ]. मोहित झालेल्या अर्जुनानें आपण युद्धापासून परावृत्त कां झालो याची प्रवृत्तिशास्त्रदृष्ट्या कारण-मीमांसा सांगितली आहे. त्याचा अनुवाद पहिल्या अध्यायाच्या शेवटपर्यंत श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं केला आहे. त्यांत क्षत्रियास योग्य असणारीं जी वीरवृत्ति तिचा लोप होऊन अर्जुन दया-करुणा-कृपा या अयोग्य अशा सात्त्विकवृत्तीनें युक्त झाला होता असें प्रतिपादिलें आहे. अर्जुन म्हणतो देवा ! आचार्य पितर-पितामह या सर्वांना मारून मिळणारा विजय व राज्य यांतील मला कांहींहि नको. कारण, गुरुगोत्राजांना मारल्याचें मला पाप लागेल असें सांगून श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं अर्जुन पापभिरु अर्थात् पापाला किती भीत होता हें सांगितलें आहे. दुर्योधनादिक अभिमान मदानें भुलून गेले असल्यामुळें त्यांना जरी कळत नसले तरी माझे हिंत-अनहित मला कळतें. कारण गुरु व कुलादिकांचा वध केल्यामुळें, कुलधर्माचा नाश, त्यामुळें धर्मनाश, अधर्मवृद्धि, वर्णसंकर, त्यामुळें शेवट कुलाच्या अधःपाताला मी कारणीभूत होईन. ज्या युद्धप्रवृत्तीमुळें हे वरील अनर्थ घडणार ते युद्धच न करणें बरें ! मी अशस्त्र अशा अवस्थेंत असतां मला सशस्त्र असणाऱ्या कौरवांनी मारलें तरी तेच मला क्षेमतर आहे. म्हणून मी युद्ध करणार नाहीं. असा अर्जुन उद्वेगयुक्त होऊन व नधरत गहिंवर येऊन त्यानें शस्त्रादिकांचा त्याग केला व रथांतून खाली उडी टाकली. [ २०४ ने २७३ ].

खेदयुक्त अर्जुनास श्रीकृष्ण परमात्मा कोणत्या रीतीनें परमार्थाचा उपदेश करतील ती सविस्तर कथा दुसऱ्या अध्यायांत सांगूं; असें श्रीनिवृत्तिनाथांचे शिष्य श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं सांगून हा पहिला अध्याय समाप्त केला.

★

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय दुसरा

संजय उवाच :—

तं तथा कृपयाऽऽविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् । विषीदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥

मग संजयो म्हणे रायातें । आईके तो पार्थु तेथें । शोकाकुल रुदनातें करितु असे ॥ १ ॥ तें कुळ देखोनि समस्त । स्नेह उपनलें अद्भुत । तेणें द्रवलें असे चित्त । कवणेपरी ॥ २ ॥ जैसें लवण जळें झळंबलें । ना तरी अभ्र वातें हाले । तैसें सधीर परी विरमलें । हृदय तयाचें ॥ ३ ॥ म्हणौनि कृपा आकळिला । दिसतसे अति कोमाइला । जैसा कर्दमीं रुपला । राजहंस ॥ ४ ॥ तयापरी तो पांडुकुमरु । महामोहें अति जर्जरु । देखोनि श्रीशार्ङ्गधरु । काय बोले ॥ ५ ॥

श्रीभगवान् उवाच :—

कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् । अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥

म्हणे अर्जुना आदि पाहीं । हें उचित काय इये ठायीं । तूं कवण हें कायी । करीत आहासी ॥ ६ ॥ तुज सांगे काय जाहलें । कवण उणें आलें । करितां काय ठेलें । खेदु कायिसा ॥ ७ ॥ तूं अनुचिता चित्त नेदिसी । धीरु कहीं न संडिसी । तुझेनि नामें अपयशी । दिशा लंघिजे ॥ ८ ॥ तूं शूरवृत्तीचा ठावो । क्षत्रियांमाजीं रावो । तुझिया लाठेपणाँचा आंवो । तिहीं लोकीं ॥ ९ ॥ तुवां संग्रामीं हरु जिंकिला । निवात-कवचांचा ठावो फेडिला । पवाडा तुवां केला । गंधर्वांसीं ॥ १० ॥ पाहतां तुझेनि पाँडें । दिसे त्रैलोक्यही थोकडें । ऐसें पुरुषत्व चोखडें । पार्था तुझें ॥ ११ ॥ तो तूं कीं आजि एथें । सांडूनियां वीरवृत्तीतें । अधोमुख रुदनातें । करितु आहासी ॥ १२ ॥ विचारी तूं अर्जुनु । कीं कारुण्यें किजसी दीनु । सांग पां अंधकारें भानु । ग्रासिला आथी ? ॥ १३ ॥ ना तरी पवनु मेघासी बिहे ? । कीं अमृतासी मरण आहे ? । पाहें पां इंधनचि गिळोनि जाये । पावकातें ? ॥ १४ ॥ कीं लवणेंचि जळ विरे ? । संसर्गें काळकूट मरे ? । सांग पां महाफणी दर्दुरें । गिळिजे कायी ? ॥ १५ ॥ सिंहासी

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय दुसरा

**अन्वयार्थ—मधुसूदनः**—श्रीकृष्ण-**तथा**-वर वर्णन केल्याप्रमाणें-**कृपया आविष्टं**-कृपेनें युक्त झालेल्या-**अश्रुपूर्णा-कुलेक्षणं**-ज्याचे नेत्र अश्रूंनीं भरले आहेत व त्यामुळें आकुल झाले आहेत अशा-**विषीदन्तं**-खेद करणाऱ्या-**तं**-त्या अर्जुनाला-**इदं वाक्यं**-हें वाक्य-**उवाच** बोलला १.

मग संजय धृतराष्ट्र राजास म्हणतोः-महाराज, ऐका. अर्जुन त्या ठिकाणीं शोकानें व्याकुळ होऊन रडूं लागला १. तें आपलें सर्व कूळ पाहून त्याच्या मनांत विलक्षण मोह उत्पन्न झाला आणि त्यायोगानें त्याचें चित्त द्रवलें; कसें म्हणाल तर २. जसें पाण्यानें मीठ विरघळलें जातें अथवा वाऱ्यानें ढग नाहींसे होतात-त्याप्रमाणें. अर्जुन मोठा धैर्यवान् होता तरी त्याचे हृदय द्रवीभूत झाले ३. जसा राजहंस पक्षी चिखलांत रुतल्यावर म्लान दिसतो, तसा तो ममतेनें व्याकुळ होऊन अगदीं कोमेजून गेलेला दिसूं लागला ४. तो अर्जुन याप्रमाणें महामोहानें ग्रस्त झालेला पाहून भगवान् श्रीकृष्ण त्यास काय म्हणाले:-५.

**अन्वयार्थ—अर्जुन**-हे अर्जुना ! **इदम् अनार्यजुष्टम् अस्वर्ग्यम् अकीर्तिकरं कश्मलं**-हें श्रेष्ठांनीं न अंगीकारलेलें, स्वर्ग न देणारें व अकीर्ति करणारें पाप-**त्वा**-तुला-**विषमे**-या कठिण प्रसंगीं-**कुतः**-कोठून-**समुपस्थितम्**-प्राप्त झालें? २.

ते म्हणाले अर्जुना, तूं अगोदर असें पाहा कीं, या युद्ध प्रसंगीं तुला युद्ध टाकून जाणें हें शोभतें कां ? अरे तूं आहेस कोण व हें करतोस काय ? याचा अगोदर विचार कर ६. तुला काय झालें ? सांग बरें कोणतें कमी पडलें ? तुझें काय करण्याचें राहिलें ? म्हणून तूं दुःख करीत आहेस ? ७. अरे तूं अनुचित गोष्टीकडे कधींहि लक्ष देणारा नाहींस किंवा कधींहि धीर सोडणारा असा नाहींस. तुझ्या नांवाचाच असा महिमा आहे कीं, तुझें नांव ऐकतांच अपयशांनीं दिगंति पळून जावें ८. तूं शौर्याचें केवळ ठिकाण आहेस व क्षत्रियांचा मुगुटमणि राजाच आहेस, अरे ! तुझ्या शौर्याचा तर तिन्ही लोकांत दबदबा असून डंका गाजत आहे ९. तूं युध्दांत शंकरास जिंकिलेंस; [ साडेतीन कोटि ] निवातकवच दैत्यांचा समूळ उच्छेद केलास, आणि [ चित्ररथगंधर्वादिकांशीं पराक्रमपूर्वक सामना करून ] त्यांना आपलें यश [ त्या गंधर्वास ] गावयास विषय करून ठेविलेस ? १०. अर्जुना, तुझा पराक्रम इतका उत्कृष्ट आहे कीं, तुझ्या पराक्रमाशीं तुलना करून पाहिल्यास हें त्रैलोक्यहि क्षुद्र दिसूं लागते ११. तोच तूं आज रणागणांवर येऊन वीरवृत्ति टाकून खालीं तोंड घालून रडत बसला आहेस ! १२. अर्जुना, तूं विचार कर कीं, असें असतां तुला करुणेनें इतकें दीन करावें काय ? अरे ! अंधकारानें सूर्याला कधीं गिळून टाकलें आहे कां ? सांग बरें ? १३. किंवा वाऱ्यास मेघाचें भय कधी वाटलें आहे कां ? अथवा अमृतास कधीं मरण आहे कां ? किंवा लांकडानें कधीं अग्नि गिळला आहे कां ? १४. अथवा मिठानें पाणी कधीं विरलें आहे कां ? किंवा काळकूट विष हें दुसऱ्याच्या संसर्गानें मेलें आहे कां ? अथवा मोठ्या भुजंगाला कधीं बेडकानें गिळलें आहे कां ? सांग बरें ! १५. बरें, कधीं कोल्ह्यानें सिंहाबरोबर झोंबी केली आहे कां ? अशा-अघटित विलक्षण गोष्टी कधींतरी घडल्या आहेत का ? पण काय सांगावें त्या तूं सर्व गोष्टी येथें आज खऱ्या करून

---

१ विरघळलें. २ अयोग्य गोष्टीला. ३ देत नाहींस. ४ शौर्याचा. ५ प्रताप, डंका. ६ गाण्याचा विषय, यश. ७ बरोबरीनें. ८ चांगलें. ९ खाली तोंड घालून. १० भितो. ११ मोठा भुजंग. १२ बेडकानें.

झोंबे कोल्हा । ऐसा अपाडु आथि कें जाहला ?। परी तो त्वां साच केला । आजि एथ ॥ १६ ॥ म्हणौनि अझुनी अर्जुना । झणें चित्त देसी या हीना । वेगीं धीर करूनियां मना । सावधु होईं ॥ १७ ॥ सांडीं हें मूर्खपण । उठीं घे धनुष्यबाण । संग्रामीं हें कवण । कारुण्य तुझें ? ॥ १८ ॥ हां गा तूं जाणता । तरी न विचारिसी कां आतां । सांगें झुंजावेळे सदयता । उचित कायी ? ॥ १९ ॥ हे असतीये कीर्तीसी नाशु । आणि पारत्रिकासी अपभ्रंशु । म्हणे जगन्निवासु । अर्जुनातें ॥ २० ॥

क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते । क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥

म्हणौनि शोकु न करीं । तूं पुरता धीरु धरीं । हें शोच्यता अव्हेरीं । पंडुकुमरा ॥ २१ ॥ तुज नव्हे हें उचित । येणें नासेल जोडलें बहुत । तूं अझुनी वरी हित । विचारीं पां ॥ २२ ॥ येणें संग्रामाचेनि अवसरें । एथ कृपाळूपण नुपकरे । हे आतांचि काय सोयरे । जाहले तुज ? ॥ २३ ॥ तूं आधींचि काय नेणसी ? । कीं हे गोत्रज नोळखसी ? । वायांचि काय करिसी । अतिशो आतां ? ॥ २४ ॥ आजिचें हें झुंज । काय जन्मा नवल तुज ? । हें परस्परें तुम्हां व्याज । सदांचि आथी ॥ २५ ॥ तरी आतां काय जाहलें । कायि स्नेह उपनलें । हें नेणिजे परी कुडें केलें । अर्जुना तुवां ॥ २६ ॥ मोहो धरिलीया ऐसें होईल । जे असती प्रतिष्ठा जाईल । आणि परलोकही अंतरेल । ऐहिकेंसी ॥ २७ ॥ हृदयाचें ढिलेपण । एथ निकयासी नव्हे कारण । हें संग्रामीं पतन जाण । क्षत्रियांसीं ॥ २८ ॥ ऐसेनि तो कृपावंतु । नानापरी असे शिकवितु । हें ऐकोनि पंडुसुतु । काय बोले ॥ २९ ॥

अर्जुन उवाच :—

कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन । इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥

देवा हें येतुलेवरी । बोलावें नलगे अवधारीं । आधीं तूंचि विचारीं । संग्रामु हा ॥ ३० ॥ हें झुंज नव्हे प्रमादु । एथ प्रवर्तलिया दिसतसे बाधु । हा उघड लिंग-भेदु । वोढवला आम्हां ॥ ३१ ॥ देखें मातापितरें अर्चिजती । सर्वस्वें तोषु पावविजती । तिये पाठीं केवीं वधिजती । आपुलिया हातीं ॥ ३२ ॥ देवा संतवृंद नमस्कारिजे । कां घडे तरी पूजिजे । हें वांचूनि केवीं निंदिजे । स्वयें वाचा ? ॥ ३३ ॥ तैसे गोत्रगुरु आमुचे । हे पूजनीय आम्हां नियमाचे । मज बहुत भीष्म-द्रोणांचें वर्ततसे ॥ ३४ ॥ जयांलागीं मनें विरूं । आम्ही स्वप्नींही न शकों धरूं ।

दाखविल्यास ! असे झाले नाहीं कां ? १६. म्हणून अर्जुना, तूं या मोहाला आपल्या चित्तांत कदाचित् थारा देशील; पण तसा थारा किंवा त्याकडे लक्ष देऊं नकोस ! मनास लवकर धीर देऊन सावध हो १७. अरे काय हा वेडेपणा ! तो टाकून दे आणि हातांत धनुष्यबाण घेऊन उठ. कारण, या रणभूमीवर तुझ्या करुणेचा उपयोग काय ? १८. अर्जुना, अरे तूं ज्ञाता ना ? मग या वेळीं विचार कसा करीत नाहींस ? अरे युद्धाचे प्रसंगीं कारुण्य म्ह. दया करणे क्षत्रियास योग्य आहे का, सांग बरें ? १९. श्रीकृष्ण अर्जुनास म्हणाले. हें तुझें वर्तन आजपर्यंत संपादन केलेल्या कीर्तीचा नाश करणारें व परलोकप्राप्तीस मुकविणारे, अडयळा आणणारें असें आहे ! २०.

**अन्वयार्थ—हे पार्थ**–हे पार्था !–**क्लैब्यं**–अशा दुर्बलपणास–**मा स्म गमः**–प्राप्त होऊं नकोस.–**एतत्**–हें मानसिक दौर्बल्य–**त्वयि**–तुझ्या ठिकाणीं–**न उपपद्यते**–उचित दिसत नाहीं–**हे परंतप**–शत्रूंना संताप देणाऱ्या हे अर्जुना !–**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं**–हृदयाचें हें क्षुद्र दुर्बलत्व–**त्यक्त्वा**–टाकून **उत्तिष्ठ**–ऊठ ३.

म्हणून अर्जुना ! तूं शोक करूं नकोस, पूर्ण धीर धर आणि [ आप्तांविषयींचा ] हा विषाद सोडून दे २१. तुला असा खेद करणें शोभत नाहीं. अरे ! तूं आजपर्यंत जें कांहीं [ यश इत्यादि ] संपादन केलें आहेस, त्याचा या योगानें नाश होईल; म्हणून तूं अजून तरी आपलें हित कशांत आहे याचा नीट विचार कर २२. अरे ! [ क्षत्रियाला ] ऐन युद्धप्रसंगीं कृपाळूपणा उपयोगी नाहीं. हे [ कौरव ] काय आतांच तुझे नातलग झाले आहेत ? २३. अरे, ही [ कौरव नातलग असल्याची ] गोष्ट तुला पूर्वीं माहीत नव्हती का ? हे नातेवाईक आहेत हें तूं ओळखीत नव्हतास काय ? मग आतांच या युद्धप्रसंगीं व्यर्थ खेद कां करतोस ? २४. काय सांगावें ! आजचा हा युद्धप्रसंग तुझ्या जन्मांत अपूर्व म्हणजे नवीन आहे कीं काय ? अरे ! तुम्हां परस्परांतील कलहाचें निमित्त हे नेहमींचेंच आहे २५. मग आतांच काय विशेष झालें ! हा मोह तुला कसा कोठून उत्पन्न झाला कोण जाणें ! पण अर्जुना ! तूं हें फार वाईट केलेंस. २६ जर तूं हा मोह धरून ममताभ्रांतीत पडलास तर त्याचा परिणाम असा होईल कीं, आजपर्यंत तूं मिळविलेली विख्याति, लौकिक जाईल आणि इहलोकासह परलोकांसहि अंतरशील २७. तुझ्या अंतःकरणांतील नेभळेपणा हा कांहीं या प्रसंगीं तुझ्या कल्याणाला कारण होणार नाहीं. कारण हा नेभळेपणा म्हणजे क्षत्रियांना त्याचा युद्धांतील एक अधःपातच होय असे समज २८. याप्रमाणें त्या दयाळु भगवंतांनीं अर्जुनास पुष्कळ प्रकारे बोध केला. तो बोध ऐकून त्यावर अर्जुन काय बोलतो, ( तें ऐका ) २९.

**अन्वयार्थ—हे मधुसूदन**–हे मधुसूदना !–**अहं**–मी–**संख्ये**–संग्रामांत–लढाईंत–**भीष्मं च द्रोणं**–भीष्म व द्रोण यांच्याशीं–**इषुभिः**–बाणांनीं–**कथं**–कसा बरें–**प्रतियोत्स्यामि**–लढाई करूं : कारण–**हे अरिसूदन**–हे शत्रुनाशका !–[ **तौ** ]–ते दोघेहि–**पूजार्हौ**–पूजा करण्यास योग्य आहेत ४.

देवा, तुम्ही हें इतकें कांहीं मला सांगावयास नको. प्रथम माझें काय म्हणणें आहे, तें ऐका. ह्या युद्धाविषयीं आधीं आपणच विचार करा की ३०. खरोखर हें युद्ध नसून हा आमचे हातून एक मोठा दोषच घडत आहे; त्यांत प्रवृत्त झाल्यास माझी मोठी हानी होईल असें मला दिसतें. इतकेंच नव्हे तर आम्हांवर थोर पूज्यजनांचा उघड–उघड उच्छेद करण्याचा मोठा अवघड प्रसंग ओढवला आहे ३१. असें पाहा कीं, मातापितरांची सेवा करावी, त्यांना सर्व प्रकारें संतुष्ट ठेवावें, असा पुत्राचा धर्म आहे. असें असतां उलट त्यांचाच आपण आपल्या हातानें वध कसा बरें करावा ? ३२. देवा ! साधुसंतांना नमस्कार करावा अथवा घडेल तर त्यांची पूजाहि करावी, पण हें सोडून आपण आपल्याच वाणीने त्यांची निंदा कशी करावी ? ३३. त्याचप्रमाणें हे आमचे गोत्रज व कुलगुरू असून आम्हाला नित्य नेमानें सर्वदा पूज्य आहेत. त्यांतल्या त्यांत भीष्म व द्रोणाचार्य यांविषयीं तर माझें मन अतिशयच कळवळत आहे. [ कारण, त्यांनीं मला सदाचेच ऋणाईत करून ठेवले आहे ] ३४. देवा, ज्यांच्याविषयीं मनानें आम्हीं स्वप्नांत देखील वैर धरूं शकत नाहीं, त्यांचा आपल्याच हातानें प्रत्यक्ष घात कसा करावा बरें ?

१ विलक्षण प्रसंग. २ कोठें. ३ हानी. ४ खेद. ५ वाईट. ६ चूक. ७ दोष. ८ थोरांचा उच्छेद.

तयां प्रत्यक्ष केवीं करूं । घातु देवा? ॥ ३५ ॥ वरी जळो हें जियालें । एथ आघवेयांसि हेंचि काय जाहलें । जे यांच्या वधीं अभ्यासिले । मिरविजे आम्हीं ॥ ३६ ॥ मी पार्थु द्रोणाचा केला । येणें धनुर्वेदु मज दिधला । तेणें उपकारें काय आभारैला । वधी तयातें? ॥ ३७ ॥ जेथींचिया कृपा लाहिजे वरु । तेथेंचि मनें व्यभिचारु । तरी काय मी भस्मासुरु । अर्जुन म्हणे ॥ ३८ ॥

गुरूनहत्वा हि महानुभावान्श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।
हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुञ्जीय भोगान्रुधिरप्रदिग्धान् ॥ ५ ॥

देवा समुद्र गंभीर आइकिजे । वरि तोहि आहाच देखिजे । परी क्षोभु मनीं नेणिजे । द्रोणाचिये ॥ ३९ ॥ हें अपार जें गगन । वरी तयाही होईल मानें । परि अगाध भलें गहन । हृदय याचें ॥ ४० ॥ वरी अमृतही विटे । कीं काळवशें वज्रही फुटे । परी मनोधर्मु न लोटे । विकैरविलाही ॥ ४१ ॥ स्नेहालागीं माये । म्हणिपे तें कीरु होये । परी कृपा ते मूर्त आहे । द्रोणीं इये ॥ ४२ ॥ हा कारुण्याची आदि । सकल गुणांचा निधि । विद्यासिंधु निरवधि । अर्जुन म्हणे ॥ ४३ ॥ हा येणें मानें महंतु । वरी आम्हांलागीं कृपावंतु । आतां सांग पां येथ घातु । चिंतूं येईल ॥ ४४ ॥ ऐसे हे रणीं वधावे । मग आपण राज्यसुख भोगावें । तें मना न ये आघवें । जीवितेसीं ॥ ४५ ॥ हें येणें मानें दुर्धर । जे याहीहुनी भोग सधरैं । ते असतु येथवर । भिक्षा मागतां भली ॥ ४६ ॥ ना तरी देशत्यागें जाइजे । कां गिरिकंदर सेविजे । परी शस्त्र आतां न धरिजे । इयांवरी ॥ ४७ ॥ देवा नवनिशतीं शरीं । वावरोनी यांच्या जिव्हारीं । भोग गिंवसावे रुधिरीं । बुडाले जे ॥ ४८ ॥ ते काढूनि काय किजती? । लिंपै केवी सेविजती? । मज नये हे उपपत्ती । याचिलागीं ॥ ४९ ॥ ऐसें अर्जुन तिये अवसरी । म्हणे श्रीकृष्णा अवधारीं । परी तें मना नयेचि मुरारी । आइकोनियां ॥ ५० ॥ हें जाणोनि पार्थु बिहाला । मग पुनरपि बोलों लागला । म्हणे देवो कां चित्त या बोला । देतीचिना ॥ ५१ ॥

न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।
यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥

---

१ माप. २ कालपरत्वें. ३ क्षोभविला. ४ मूळ. ५ कठीण. ६ महत्त्वाचें, चांगलें. ७ ताजी धार लावलेल्या बाणांनीं. ८ मर्मस्थानीं. ९ शोधावें. १० रक्तानें माखलेलें. ११ युक्ती १२ वेळी.

३९. त्यापेक्षां आग लागो असल्या जिण्याला ! आज या सर्वांनाच असें झाले आहे तरी काय ? कारण आम्हीं जी शस्त्रविद्या यांच्यापाशीं अभ्यास करून संपादन केली आहे, तिचा उपयोग या सर्वांना मारण्याकडे करावा व त्याविषयींचीं आम्हीं प्रतिष्ठा मिरवावी, हेंच का आमचें कर्तव्य ? ३६. मी–अर्जुन द्रोणाचार्यांचा [ शिकवून तयार केलेला ] शिष्य आहे, अर्थात् त्यांनींच मला धनुर्विद्या शिकविली; त्या उपकारानें आभारी झालेला मीच त्यांना मारावें काय ? ३७. अर्जुन म्हणतो:–ज्यांच्या कृपेनें आम्हीं वरप्राप्ति करून घ्यावी, त्यांच्याशींच मनानें कृतघ्नपणा करावा ! तर मग काय मी भस्मासूर आहे ! ३८.

**अन्वयार्थ**—**हि**-कारण-**महानुभावान्**-अति प्रभावशाली-**गुरून्**-गुरूंना-**अहत्वा**-न मारून-**इह लोके**-या इहलोकीं-**भैक्ष्यम् अपि**-भिक्षान्नहि-**भोक्तुं**-खाणें-**श्रेय:**-श्रेयस्कर आहे-**तु**-पण तेंच-**गुरून्**-या गुरूंस-**हत्वा**-मारून-**इह एव**-या लोकींच-**रुधिरप्रदिग्धान्**-रक्तानें माखलेल्याप्रमाणें निंद्य असलेल्या-**अर्थकामान्-भोगान्**-अर्थ व काम याच भोगांस-**भुंजीय**-मी भोगीन ५. शिवाय–

देवा, समुद्र गंभीर आहे असें ऐकतों; पण तोहि तसा वरकरणीच आहे. कारण तो कधीं तरी क्षुब्ध झालेला प्रत्यक्ष दिसतोच; परंतु द्रोणाचार्यांच्या मनांत क्षोभ उत्पन्न झालेला मात्र आम्हीं कधींच पाहिला नाहीं ३९. अहो ! आकाशाचा अंत नसला तरी त्याचेंहि मोजमाप करितां येईल–परंतु द्रोणाचार्यांचें अंत:करण इतकें विचारपूर्ण व सखोल आहे कीं त्याचें प्रमाण कोणालाहि कळत नाहीं ४०. कदाचित्–अमृतहि आंबेल किंवा कालगतीनें वज्रहि फुटेल–पण द्रोणाचार्यांस क्रोधादि विकार उत्पन्न करण्याचा कसाहि प्रयत्न केला तरी देखील त्यांची शांत मनोवृत्ति पालटत नाहीं ४१. आईशिवाय इतरांची माया व्यर्थ होय अशी जी म्हण आहे ती अगदीं खरी आहे. पण या द्रोणाचार्यांच्या ठिकाणीं करुणा ही तर मूर्तिमंत वास करीत आहे ४२. अर्जुन म्हणतो:–अहो ! हे आचार्य म्हणजे काय सांगावें ! जणुं दयेचे उगम स्थान होत, सर्व गुणांचा केवळ महानिधीच आहेत व विद्येचे अमर्याद सागरच आहेत ४३. अशा प्रकारें हें सर्व श्रेष्ठ कृपाळू आहेत. शिवाय आम्हांविषयीं तर त्यांची कृपा किती आहे हें विचारूंच नका. कारण ते पूर्ण कृपावंत आहेत. असें असतां त्यांचा घात करण्याचें आमच्या मनांत तरी आणतां येईल का ? सांग ४४. अशांना रणांत मारावें व मग आपण राज्यसुख उपभोगावें, ही गोष्ट माझ्या अंत:करणापासून मनांत तर मुळीहि येत नाहीं; ४५. इतकें हें कृत्य कठीण आहे, याच्यापेक्षां [ द्रोणादिकापेक्षां ] राज्योपभोग श्रेष्ठ आहेत असें कोणी म्हणेल तर म्हणोत बिचारे ! पण मला तर त्या भोगापेक्षां भिक्षा मागणेंच बरें वाटतें ! ४६. नाहींपेक्षां देशत्याग करून जावे हे एक अथवा गिरिकंदारांत जाऊन तरी राहावें; परंतु या द्रोणादिकांवर आतां शस्त्र म्हणून धरूं नये, [ असें मला निश्चित वाटतें ] ४७. देवा, अहो ! नवीन पाजळलेल्या तीक्ष्ण बाणांनीं यांच्या मर्मस्थानीं प्रहार करून त्यांच्या रक्तांत बुडालेले जे गलिच्छ भोग तें आम्हीं भोगण्याकरितां शोधीत बसावें काय ? ४८. ते रक्तांत बुडालेले भोग बाहेर काढून तरी काय करावयाचें आहे ? अहो, रक्तानें माखलेल्या त्या भोगांचें सेवन तरी आम्हीं कसें करावें ? म्हणूनच भीष्म-द्रोणांवर बाण टाकाण्याचा उपर्युक्त युक्तिवाद माझ्या मनास मुळींच पटत नाहीं ४९. अर्जुन या वेळेस श्रीकृष्णास असें म्हणतो, कीं, "देवा, ऐका. मी म्हणतो या गोष्टीचा आपण चांगला विचार करा." पण अर्जुनाचें हें म्हणणें ऐकूनहि श्रीकृष्णास आवडलें नाहीं ५०. असें जाणून अर्जुन आपल्या मनांत भ्याला व पुन: देवास म्हणूं लागला कीं, देव माझ्या या बोलण्याकडे लक्ष कां बरें देत नाहींत ? ५१.

**अन्वयार्थ**—**च**-आणि-**न:**-आम्हां पांडवांना युद्ध करणें व भिक्षान्न खाणें या दोहोंतील-**कतरत्**-कोणतें एक-**गरीय:**-अधिक चांगलें आहे-[ **एतत्**-हें-**न विद्म:**-आम्ही जाणत नाहीं.-**यत् वा**-किंवा-**जयेम**-आम्ही यांना जिंकूं-**यदि वा**-अथवा **न:**-आम्हांला-**जयेयु:**-हे कौरव जिंकतील-**एतत् न विद्म:**-हें जाणत नाहीं–] **यान् एव**-ज्या दुर्योधनादि बंधूंनाच-**हत्वा**-मारून-**न जिजीविषाम:**-आम्ही जिवंत राहण्याची इच्छा करणार नाहीं.-**ते धार्तराष्ट्रा:**-धृतराष्ट्राचे पुत्र-**प्रमुखे**-आमच्या सन्मुख-**अवस्थिता:**-उभे राहिले आहेत ६.

येऱ्हवीं माझ्या चित्तीं जें होतें । तें मी विचारूनि बोलिलों एथें । परी निकें काय यापरौतें । तें तुम्हीं जाणा ॥ ५२ ॥ पैं वीरु जयांसी ऐकिजे । आणि या बोलींचि प्राणु सांडिजे । ते एथ संग्रामव्याजें । उभे आहाती ॥ ५३ ॥ आतां ऐसियांतें वधावें । कीं अव्हेरूनियां निघावें । या दोहींमाजीं बरवें । तें नेणों आम्ही ॥ ५४ ॥

कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।
यच्छ्रेयःस्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ ७ ॥

आम्हां काय उचित । तें पाहतां न स्फुरे एथ । जें मोहें येणें चित्त । व्याकुळ माझें ॥५५॥ तिमिरावरुद्ध जैसें । दृष्टीचें तेज भ्रंशे । मग पासींच असतां न दिसे । वस्तुजात ॥ ५६ ॥ देवा तैसें मज जाहलें । जें मन हें भ्रांती ग्रासिलें । आतां काय हित आपुलें । तेंही नेणें ॥ ५७ ॥ तरी श्रीकृष्णा तुवां जाणावें । निकें तें आम्हां सांगावें । जे सखा सर्वस्व आघवें । आम्हांसि तूं ॥ ५८ ॥ तूं गुरु बंधु पिता । तूं आमुची इष्ट देवता । तूंचि सदा रक्षिता । आपदीं आमुतें ॥ ५९ ॥ जैसा शिष्यांतें गुरु । सर्वथा नेणें अव्हेरू । कीं सरितांतें सागरू । त्यजीं केवीं ॥ ६० ॥ नातरी अपत्यांतें माये । सांडूनि जरी जाये । तरी तें कैसेंनि जिये । ऐकें कृष्णा ॥ ६१ ॥ तैसा सर्वांपरी आम्हांसी । देवा तूंचि एक आहासी । आणि बोलिलें जरी न मानिसी । मागील माझें ॥ ६२ ॥ तरी उचित काय आम्हां । जें व्यभिचरेना धर्मा । तें झडकरी पुरुषोत्तमा । सांगें आतां ॥ ६३ ॥

न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणाम् ।
अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाऽऽधिपत्यम् ॥ ८ ॥

हें सकळ कुळ देखोनि । जो शोकु उपनलासे मनीं । तो तुझिया वाक्या-वांचुनी । न जाय आणिकें ॥ ६४ ॥ एथ पृथ्वीतळ आपु होईल । हें महेंद्रपदही पाविजेल । परी मोह हा न फिटेल । मानसींचा ॥ ६५ ॥ जैसीं बीजें सर्वथा आहाळलीं । तीं सुक्षेत्रीं जऱ्ही पेरिलीं । तरी न विरूढती सिंचिलीं । आवडे तैसीं ॥ ६६ ॥ ना तरी आयुष्य पुरलें आहे । तरी औषधें कांहीं नोहे । एथ एकचि उपेगा जाये । परमामृत ॥ ६७ ॥ तैसे राज्यभोगसमृद्धि । उज्जीवन नोहे जीव बुद्धि । एथ जिव्हाळा कृपानिधि । कारुण्य तुझें ॥ ६८ ॥ ऐसें अर्जुन तेथ बोलिला । जंव

वाकी माझ्या मनांत जें होतें, तें मीं येथें सविस्तर विचार करून बोललों, परंतु यापेक्षां खरें चांगले कोणतें तें तुम्हांसच माहीत ५२. हें पाहा – ज्यांच्याशीं आमचें वैर आहे, हीं अक्षरें ऐकल्याबरोबर आम्हीं प्राण सोडावे, तेच भीष्म-द्रोणादिक रणभूमीवर आज युद्ध करण्याच्या-निमित्तानें माझ्यासमोर उभे आहेत ५३. तर आतां अशांना मारावें किंवा यांना सोडून निघून जावें; या दोहोंमध्यें चांगली गोष्ट कोणती, हें आम्हांला तर मुळींच समजत नाहीं ५४.

**अन्वयार्थ—कार्पण्य – दोष – उपहत – स्वभावः**– कार्पण्य म्हणजे कृपणता, दैन्य, आत्म्याचें स्वरूप न जाणणें या दोषांमुळें ज्याचा स्वभाव-क्षात्रधर्म उपहत–तिरस्कृत-नष्ट झाला आहे आणि त्यामुळेंच-**धर्मसंमूढचेताः**-स्वधर्माविषयीं-परमात्म्याविषयीं ज्याचें चित्त मूढ झाले आहे, असा–**अहं**–मी–**त्वां**–तुला–**पृच्छामि**-विचारतों–**यत् निश्चितं श्रेयः स्यात्**–जें निश्चित श्रेय असेल, ज्याच्यापासून परमपुरुषार्थरूप अव्यभिचारी फल प्राप्त होईल–**तत्**–तें–**मे**–मला–**ब्रूहि**–सांग–**अहं**–मी–**ते** तुझा–**शिष्यः**–शिष्य आहें.–**त्वां प्रपन्नं मां**–तुला शरण आलेल्या मला–**शाधि**–तूं उपदेश कर ७.

आम्हांस कोणती गोष्ट करणें योग्य आहे, हें विचार करून पाहिले तरीहि या प्रसंगीं आम्हांस सुचत नाहीं; कारण, या मोहानें माझे चित्त व्याकुळ झालें आहे ५५. ज्याप्रमाणें अंधकाराच्या प्रतिबंधामुळें डोळ्यानें दिसेनासे झाले म्हणजे दृष्टीचे तेज लोपते व मग जवळ असलेलाहि कोणताच पदार्थ दिसत नाहीं ५६. तशी देवा! माझी स्थिति झाली आहे. कारण माझें मन भ्रांतीनें ग्रासले आहे म्हणून आपलें हित कशांत आहे, तेंहि मला या वेळीं समजत नाहीं ५७. तर श्रीकृष्णा! आपण विचार करून पहावें व जे खरें हितकर असेल तें आम्हांला सांगावें. कारण, आमचे इष्टमित्र वगैरे सर्व कांहीं तूंच आहेस ५८. आमचे गुरु, बंधु, बाप, कुलदैवत आणि नेहमीं संकटसमयीं रक्षण करणाराहि तूंच आहेस ५९. ज्याप्रमाणें श्रीगुरु शिष्यांचा सर्वथैव अव्हेर करण्याचे मुळींच जाणत नाहींत, किंवा समुद्र नद्यांचा अव्हेर कसा करील? [ तर करीत नाहीं ] त्याप्रमाणें आपण माझा अव्हेर करणार नाहींच ६०. अथवा देवा! ऐका आपणच विचार करा कीं, आई जर मुलाला सोडून गेली तर तें कसें जगेल? [ सुखी होईल? ] ६१. तसे आम्हांस तूंच सर्वस्वी एकमेव आधार आहेस व इतका वेळपर्यंत जें मी आपल्याला [ धर्मशास्त्र ] सांगितलें तें जर तुम्हांस पटत नसेल तर ६२. पुरुषोत्तमा! जी गोष्ट आम्हांस करण्यास उचित असून जी धर्मविरुद्ध नसेल, ती तुम्ही आतां लवकर सांगा ६३. [ या व्याख्यानांत कोणत्याहि दृष्टीनें धर्माला प्रतिकूल नाहीं, असा मोक्षप्राप्तीचा निश्चित फलपर्यवसायी उपाय सांगा. मी आपल्याला शिष्यबुद्धीनें शरण आलों आहें हें अर्जुनाच्या विनंतीचे तात्पर्य असल्याचे महाराजांनीं 'उचित' पदानें सुचविले आहे; कारण तो पुढें असे म्हणतो कीं, ]

**अन्वयार्थ—भूमौ**–या भूलोकीं–**असपत्न**–शत्रुरहित-**ऋद्धं**–समृद्ध–**राज्यं**–राज्य–**च**–व–**सुराणाम् अपि**–देवांचेंहि–**आधिपत्यं**–राज्य–**अवाप्य**–प्राप्त करून–**यत्** जें–**मम इंद्रियाणाम् उच्छोषणं शोकं**–माझ्या इंद्रियांना सुकविणाऱ्या शोकाला–**अपनुद्यात्**–घालवील–[ **तत्**–तें साधन–तो उपाय– ] **न हि प्रपश्यामि**–मला दिसतच नाहीं ८.

हें सर्व गोत्रज पाहून माझ्या मनांत जो शोक उत्पन्न झाला आहे, तो आपल्या उपदेशावांचून दुसऱ्या कोणत्याहि उपायानें नाहींसा होणार नाहीं ६४. समजा आज मला पृथ्वीचें राज्य मिळालें किंवा इंद्रपदहि प्राप्त झालें, तरीदेखील माझ्या अंतःकरणांत उत्पन्न झालेला हा मोह–शोक दूर होणारच नाहीं ६५. जसे पूर्णतया भाजलेलें बीं कितीहि उत्तम जमिनींत पेरलें व त्यास जरी मनमुराद, हवे तितकें पाणी घातलें तरी ते उगवत नाहीं ६६. किंवा जेथें आयुष्य संपलें आहे तेथें इतर कोणत्याहि औषधांचा कांहींहि उपयोग होत नाहीं, फक्त एका परमामृताचाच उपयोग होतो ६७. तसे मला सर्व राज्यभोग व संपत्ति प्राप्त झाली तरीहि जीवत्वानें मोहित झालेल्या माझ्या बुद्धीला या

१ अंधकारानें वेष्टित. २ विरुद्ध नसेल. ३ सार्वभौम राज्य. ४ प्राप्त. ५ इंद्रपद. ६ भाजलेली. ७ शिंपली. ८ सरलें. ९ भगवन्नामामृत. १० जीवंत होणें, पुनः मोहातून पार पडणे. ११ जीवन देणारें तत्त्व, आश्रय.

क्षण एक भ्रांति सांडिला । मग पुनरपि व्यापिला । उर्मी तेणें ॥ ६९ ॥ कीं मज पाहतां उर्मी नोहे । हें अनारिसें गमत आहे । तो ग्रासिला महामोहें । काळसर्पें ॥ ७० ॥ सवर्म हृदयकेल्हारीं । तेथ कारुण्यवेळेच्या भरीं । लागला म्हणोनि लहरी । भांजेचिना ? ॥ ७१ ॥ हें जाणोनि ऐसी प्रौढी । जो दृष्टिसवेंचि विष फेडी । तो धांवया श्रीहरी गारुडी । पातला कीं ॥ ७२ ॥ तैसिया पंडुकुमरा व्याकुळा । मिरवतसे श्रीकृष्ण जवळा । तो कृपावशें अवलीळा । रक्षील आतां ॥७३॥ म्हणोनि तो पार्थु । मोहफणिग्रस्तु । म्यां म्हणितला हा हेतु । जाणोनियां ॥ ७४ ॥ मग देखा तेथ फाल्गुनु । घेतला असे भ्रांती कवळूनु । जैसा घनपटळीं भानु । आच्छादिजे ॥ ७५ ॥ तयापरी तो धनुर्धरु । जाहलासे दुःखें जर्जरु । जैसा ग्रीष्मकाळीं गिरिवरु । वणवला कां ॥ ७६ ॥ म्हणोनि सहजें सुनीळु । कृपामृतें सजळु । तो वोळलासे श्रीगोपाळु । महामेघु ॥ ७७ ॥ तेथ सुदर्शनांची द्युति । तेचि विद्युल्लता झळकती । गंभीर वाचा ते आंयती । गर्जनेची ॥ ७८ ॥ आतां तो उदार कैसा वर्षेल । तेणें अर्जुनाचळु निवेल । मग नवी विरूढी फुटेल । उन्मेषांची ॥ ७९ ॥ ते कथा आइका । मनाचिया आराणुका । ज्ञानदेवो म्हणे देखा । निवृत्तिदासु ॥८०॥

संजय उवाच :—

**एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप । न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ ९ ॥**

ऐसें संजयो असे सांगतु । म्हणे राया तो पार्थु । पुनरपि शोकाकुळितु । काय बोले ॥ ८१ ॥ आइके सखेदु बोले श्रीकृष्णातें । आतां नाळवावें तुम्हीं मातें । मी सर्वथा न झुंजें एथें । भरंवसेनी ॥ ८२ ॥ ऐसें येकि हेळां बोलिला । मग मौन धरूनि ठेला । तेथ श्रीकृष्णा विस्मो पातला । देखोनि तयातें ॥ ८३ ॥

**तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत । सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥ १० ॥**

मग आपुलां चित्तीं म्हणे । एथ हें कायी आदरिलें येणें । अर्जुन सर्वथा कांहीं नेणें । काय कीजे ॥ ८४ ॥ हा उमजे आतां कवणेपरी । कैसेनि धीरू स्वीकारी । जैसा ग्रहांतें पंचाक्षरी । अनुमांनी कां ॥ ८५ ॥ ना तरी असाध्य देखोनि व्याधि । अमृतासम दिव्य औषधि । वैद्य सूंचि निरंवाधि । निदानीची ॥८६॥ तैसे विवरीतु

---

१ हृदयकमळीं. २ आटपेना. ३ मोहरूपी सर्पानें ग्रासलेला. ४ रीत, प्रकार. ५ पालवी. ६ विचारांची. ७ समाधानार्थ, शांत्यर्थ. ८ पिशाच्चादिकांला. ९ मंत्री. १० परीक्षा करी. ११ आठवण करून देतो, योजितो. १२ तत्काळ.

मोहांतून पार पडण्यास त्यांचा मुळींच उपयोग होणार नाहीं. हें कृपानिधे, तुझ्या कृपेचा जिव्हाळाच–आधार म्ह. ब्रह्मात्मैक्यज्ञानोपदेशद्वारां उपयोगी पडेल ६८. याप्रमाणें, जेव्हां क्षणभर भ्रांति दूर झाली तेव्हां त्या ठिकाणीं अर्जुन असें बोलला; परंतु त्याला पुन्हां मोहलहरीनें व्यापिलें ६९. या अर्जुनाच्या स्थितीवर श्रीज्ञानेश्वर महाराज असें रूपक करितात कीं, विचार केला असतां याला ही मोहाची लहर नसून हा कांहीं निराळाच प्रकार असावा असें मला वाटतें; तो कोणता म्हणाल तर, महामोहरूपी [ अविद्यारूपी ] काळसर्पानेंच अर्जुनास ग्रासिलें असावें ७०. आणि मर्मस्थान जे हृदयकमल त्या ठिकाणीं कारुण्याची पूर्ण भरतीची वेळ आहे अशी संधि साधून त्या महामोहरूपी काळसर्पानें त्याला दंश केला, त्यामुळें त्या लहरी उतरतच नाहींत. [ त्यांस लहरीवर लहरी येऊन झेंडू फुटणार नाहीं काय ? ] ७१. अशी त्या विषाची तीव्रता जाणून ज्याच्या कृपादृष्टीनें त्या महामोहरूपी सर्पाचें विष नाहींसें होतें तो श्रीकृष्णरूपी गारुडी अर्जुनाच्या हांकेसरसा त्याचें रक्षण करण्याकरितांच तेथें धांवून आला ७२. अशा त्या मोहानें व्याकूळ-व्याप्त झालेल्या अर्जुनाजवळ श्रीकृष्ण शोभूं लागला. आतां तो श्रीकृष्ण आपल्या कृपेनें म्हणजे आत्मज्ञानोपदेशद्वारां त्याचें सहजच रक्षण करील ७३. हा अभिप्राय मनांत जाणला म्हणूनच मोह हाच कोणी एक सर्प आणि त्यानें पार्थाला ग्रासलें आहे, असें हेतुपुरःसरच मी येथें हें रूपकानें कथन केलें आहे ७४. आतां दुसरें रूपक असें कीं, जसा मेघपटलांनीं सूर्य आच्छादित व्हावा, त्याप्रमाणें अर्जुन ह्या वेळीं भ्रांतीनें घेरला गेला होता असें समजा ७५. किंवा जसा उन्हाळ्यांत वणव्यानें डोंगर व्यापला जावा, तसा अर्जुन दुःखानें अगदीं जर्जर होऊन गेला होता ७६. म्हणून अशा वेळीं वणवा लागलेल्या डोंगरावर जसे पाण्यानें भरलेले नीलवर्ण मेघ कोसळून तो शांत करावा तसा आधींच स्वभावतः अत्यंत सांवळावर्ण असलेला व कृपामृतरूप जलानें भरलेला असा तो महामेघरूप गोपाळ अर्जुनाकडे वळून आला ७७. त्या श्रीकृष्णरूप मेघाचे ठिकाणीं शुभ्र दांतांची प्रभा हीच कोणी एक वीज चमकत होती व त्याचें गंभीर भाषण हीच कोणी एक मेघगर्जना होती ७८. असा तो श्रीभगवानरूप उदार मेघ आतां कशी वृष्टि करील, आणि त्या वृष्टीनें दुःखानें पेटलेला अर्जुनरूप पर्वत कसा शांत होईल आणि त्याला ब्रह्मज्ञानाचा नवा अंकूर कसा फुटेल ७९. ती कथा शांत व सावधान चित्तानें ऐका, असें श्रीनिवृत्तिदास, श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात ८०.

**अन्वयार्थ—परंतप**–राजन् ! **गुडाकेशः**– अर्जुन–**हृषीकेशं**–कृष्णाला–**एवम् उक्त्वा**–असें बोलून–**च**–व पुनः –**न योत्स्ये**–मी युद्ध करणार नाहीं,–**इति**–असें–**गोविंदं**–त्या गोविंदाला–**उक्त्वा**–सांगून–**तूष्णींबभूव ह**–गप्प बसला–मुकाट्यानें बसला ९.

पुढे संजय आणखी म्हणतोः–राजा ! पुनः तो अर्जुन शोकाकुल अंतःकरणानें काय बोलूं लागला ते ऐक ८१. अर्जुन खेदयुक्त अंतःकरणानें श्रीकृष्णास म्हणतो, "देवा ! ऐका, आतां आपण मला युद्ध करण्याविषयीं कोणत्याहि प्रकारें भीड घालण्याचे भानगडींत पडूं नका. आतां स्वजनांशीं मी निःसंशय युद्ध करणार नाहीं, हें पक्कें समजा ८२. असें पुनः आलेल्या मोहाच्या लहरींत एकदम बोलून तो स्तब्ध बसला. अशी त्याची स्थिती पाहून देवास मोठें आश्चर्य वाटलें ८३.

**अन्वयार्थ–हे भारत**–हे धृतराष्ट्रमहाराज–**हृषीकेशः**–इंद्रियांचा स्वामी–**उभयोः सेनयोः मध्ये**–दोन्ही सैन्यांच्यामध्यें–**विषीदन्तं तं**–खेद करणाऱ्या त्या अर्जुनाला–**प्रहसन् इव**–जणूं काय हसतच–**इदं वचः**–हें वचन–**उवाच**–बोलला १०.

तेव्हां भगवान् आपल्या मनांत म्हणतातः–ह्या प्रसंगीं अर्जुनानें आपल्या मनानेंच हें काय आरंभिलें आहे कोण जाणें ? प्रस्तुत अर्जुनाला कांहींच कळेनासें झालें आहे याला काय करावें ? ८४. आतां याची कोणत्या उपायानें समजूत पडेल ! काय केलें असतां हा धैर्य धरील !–जसा एखादा मांत्रिक पिशाच्चादिकांची निवृत्ति कशी होईल याची विचारपूर्वक परीक्षा करितो ८५. अथवा रोग असाध्य आहेसें पाहतांच वैद्य जसा निर्वाणीच्या अमृततुल्य दिव्य औषधीची तत्काळ योजना करतो ८६. त्याप्रमाणें त्या दोनहि सैन्यांमध्यें स्थित असलेले भगवान् श्रीकृष्ण

असे श्रीअनंतु । तया दोन्ही सैन्याआंतु । जयापरी पार्थु । भ्रांती सांडी ॥८७॥ तें कारण मनीं धरिलें । मग सरोष बोलों आदरिलें । जैसे मातेच्या कोपीं थोकुलें । स्नेह आथी ॥ ८८ ॥ कीं औषधाचिया कडुवटपणीं । जैसी अमृताची पुरवणीं । ते आहाच न दिसे परी गुणीं । प्रकट होय ॥ ८९ ॥ तैसीं वरिवरी पाहतां उदासें । आंत तरी अतिसुरसें । तियें वाक्यें हृषीकेशें । बोलों आदरिलीं ॥ ९० ॥

श्रीभगवानुवाच :—

अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे । गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पंडिताः ॥ ११ ॥

मग अर्जुनातें म्हणितलें । आम्हीं आजि हें नवल देखिलें । जें तुवां एथ आदरिलें । माझारींचि ॥ ९१ ॥ तूं जाणता तरी म्हणविसी । परी नेणिवेतें न संडिसी । आणि शिकवूं म्हणों तरी बोलसी । बहुसाल नीति ॥९२॥ जात्यंधा लागे पिसें । मग तें सैरा धांवे जैसें । तुझें शहाणपण तैसें । दिसतसे ॥९३॥ तूं आपणपें तरी नेणसी । परी या कौरवांतें शोचूं पहासी । हा बहु विस्मय आम्हांसी । पुढपुढती ॥९४॥ तरी सांग पां अर्जुना । तुजपासूनि स्थिति या त्रिभुवना ? । हे अनादि विश्वरचना । तें लटके कायी ? ॥ ९५ ॥ एथ समर्थु एक आथी । तयापासूनि भूतें होती । तरी हें वायांचि काय बोलती । जगामाजीं ? ॥ ९६ ॥ हो कां सांप्रत ऐसें जाहलें । जे हे जन्ममृत्यु तुवां सृजिलें । आणि नाशु पावे नाशिलें । तुझेनि कायी ॥ ९७ ॥ तूं भ्रमलेपणें अहंकृती । यांसि घातु न धरिसी चित्तीं । तरी सांगें कायि हे होती । चिरंतनें ॥ ९८ ॥ कीं तूं एक वधिता । आणि सकळ लोकु हा मरता । ऐसी भ्रांति झणें चित्ता । येवों देसी ॥ ९९ ॥ अनादिसिद्ध हें आघवें । होत जात स्वभावें । तरी तुवां कां शोचावें । सांगें मज ॥ १०० ॥ परी मूर्खपणें नेणसी । न चिंतावें तें चिंतीसी । आणि तूंचि नीति सांगसी । आम्हांप्रति ॥१॥ देखैं विवेकी जे होती । ते दोहीतेंहीं न शोचिती । जे होय जाय हे भ्रांती । म्हणौनियां ॥ २ ॥

न त्वेवाहं जातुनाऽऽसं न त्वं नेमे जनाधिपाः । न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥

अर्जुना सांगेन आइक । एथ आम्ही तुम्ही देख । आणि हे भूपति अशेख । आदिकरूनी ॥ ३ ॥ नित्यता ऐसेचि असोनी । ना तरी निश्चित क्षया जाउनी । हे भ्रांति वेगळी करूनी । दोन्ही नाहीं ॥ ४ ॥ हे उपजे आणि नाशे । तें

कोणत्या उपायानें अर्जुन आपला मोह टाकील, याचा विचार करूं लागले ८७. याच्या या भ्रांतिजन्य शोकाचे कारण यथार्थ आत्मस्वरूपाचे अज्ञान आहे, त्याचा नाश केल्याशिवाय अर्जुनाच्या भ्रांतिजन्य दुःखाचा नाश होणार नाहीं. असा देव आपल्याशीं निश्चय करून आईच्या रागांत पुत्रप्रेम गुप्तरूपानें भरलेलें असतें, त्याप्रमाणें भगवान् प्रथम रागावल्यासारखें बोलूं लागले ८८. किंवा औषधाच्या कडवटपणांतच जसा अमृताचा पुरवठा असतो, पण तो वरकांती दिसत नाहीं तरीपण गुणावरून पुढें प्रगट होतो ८९. त्याप्रमाणें वरकांतीं पाहतां ऐकण्यास कठोर, अशी दिसली तरीपण परिणामीं सुरस म्ह. अत्यंत हितकर अशी उपदेशाची भाषा देव बोलूं लागले ९०.

**अन्वयार्थ–त्वं–तूं–अशोच्यान्**–शोक करण्यास योग्य नसलेल्या भीष्मादिकांना उद्देशून–त्यांच्यासाठीं–**अन्वशोचः**–शोक केला आहेस–**च**-आणि-**प्रज्ञावादान्**–बुद्धिमानाच्या गोष्टी तर–**भाषसे**–सांगतोस. पण–**पण्डिताः**–पंडित आत्मज्ञानी–**गतासून्**–मेलेल्याविषयीं-**च अगतासून्**-व जिवंत असलेल्याविषयीं–**न अनुशोचन्ति**–असा शोक करीत नाहींत ११.

मग देव अर्जुनास म्हणतातः–आज आम्ही हें एक आश्चर्यच पहात आहोंत. कारण, युद्धसमयीं तूं हें अकस्मात् मध्येंच काय आरंभिलें आहेस? ९१. तूं आपल्याला तर मोठा ज्ञानी म्हणवितोस, पण अज्ञान-मुर्खपण तर सोडीत नाहींस; बरें, तुला एखादी गोष्ट शिकवावी म्हटलें, तर उलट तूंच आम्हांला नीतीच्या, शहाणपणाच्या मोठमोठ्या गोष्टी सांगतोस ९२. जन्मांधाला वेड लागल्यावर तो जसा सैरावैरा धांवतो त्यापैकींच तुझें हें शहाणपण मला दिसत आहे ९३. तूं स्वतःस [ अगोदर तूं आपल्या शुद्ध आत्मस्वरूपास ] जाणत नाहींस; पण या कौरवां करितां मात्र शोक करूं पाहतोस, ह्याचेच आम्हांस वारंवार अतीव आश्चर्य वाटतें ९४. तर अर्जुना! तूंच सांग बरें, सर्वज्ञ ईश्वराकडून या विश्वाची जी अनादि रचना झालेली आहे असें म्हणतात ते खोटें आहे काय? तूंच कां या त्रैलोक्याचा पालनकर्ता आहेस? ९५. अरे वेड्या! या सृष्टींत सर्वैश्वर्यशक्तिसंपन्न असा एक ईश्वर आहे व त्याच्यापासून प्राणिमात्राची उत्पत्ति होते, असें जें जगामध्यें श्रेष्ठ म्हणतात, तें सर्व व्यर्थ, खोटेंच कीं काय? ९६. तर मग आतां असें झालें, जणुं काय हें जन्ममृत्यु तूंच उत्पन्न केलेस; म्हणून तूंच जर त्यांचा नाश केलास तरच ते नाश पावतील असें म्हणावयाचे काय? ९७. जरी भ्रममूलकतेनें, अहंकारानें ग्रस्त होऊन या कौरवांचा घात करण्याचे आज तूं मनांत आणलें नाहींस, तरी हे चिरंजीव होतील का? सांग बरें! ९८. अर्जुना! असें समजूं नकोस कीं तूंच काय तो एक मारणारा! आणि बाकीचे हे सर्व मरणारे, असें तर वास्तविक नाहींच; पण तशी भ्रांति कदाचित् तुझ्या चित्ताला होईल, पण ती होऊं देऊं नको हो! ९९. अरे! हें सर्व अनादिसिद्ध म्ह. अनादिकालापासून चालत आले आहे. तें स्वभावतःच उत्पत्ति नाश पावणारें आहे. तर मग याबद्दल तूं व्यर्थ शोक कां करितोस? मला सांग पाहूं! १००. असें असूनहि मूर्खपणामुळें तुला समजत तर नाहींच नाहीं, पण तूं ज्या गोष्टी मनांतहि आणूं नयेत त्या गोष्टी मनांत आणून त्याचे निष्कारण चिंतन करतोस आणि उलट आम्हांलाच तूं नीतीच्या गोष्टी सांगतोस १. हें पहा! जे विचारवंत आहेत ते जन्म आणि मृत्यु ही केवळ भ्रांति आहे, असें जाणून दोहोंविषयीं शोक करीत नाहींत २.

**अन्वयार्थ–अहं**–मी-**जातु**-केव्हांहि-**न आसम्**-नव्हतों [ **इति** ] **तु न एव**–असे तर नाहींच–**त्वं** [ **जातु** ] **न आसीः**– तूं केव्हांही नव्हतास–[ **इति** ] **न** [ **एव** ] असेंहि नाहीं–**इमे जनाधिपाः**–हे राजे-**न** [ **आसन् इति न एव** ] कधीं नव्हते असें नाहींच–**च**–आणि **वयं सर्वे**-आम्ही सर्व–**अतः परं**–या शरीराचा नाश झाल्यावर–**न भविष्यामः**–नसूं–नाहींसे होऊं–**इति न एव**–असेंहि नाहींच १२.

अर्जुना! आणखी एक सांगतों, ऐक. हे पहा! तुम्ही, आम्ही व हे सर्व राजे, जे ह्या ठिकाणीं जमलों आहोंत ३. ते आपण असेंच निरंतर राहूं किंवा खात्रीनें लयाला जाऊं ही भ्रांति सोडून दिली म्हणजे यांपैकीं एकहि खरें नाहीं असें कळेल ४. कारण, आपला सर्वांचा आत्मा एक

१ अज्ञानपणाला. २ पालन, आधार. ३ अहंकार. ४ चिरंजीव. ५ अनादि कालापासून घडलेलें.

मायावशें दिसे । एऱ्हवीं तत्वता वस्तु जें असे । तें अविनाशचि ॥ ५ ॥ जैसें पवनें तोय हालविलें । आणि तरंगाकार जाहलें । तरी कवण कें जन्मलें । म्हणों ये तेथ ? ॥ ६ ॥ तेंचि वायूचें स्फुरण ठेलें । आणि उदक सहज सपाट जाहलें । तरी आतां काय निमालें । विचारीं पां ॥ ७ ॥

देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा । तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥

आइकें शरीर तरी एक । परी वयसा भेद अनेक । हें प्रत्यक्षचि देख । प्रमाण तूं ॥ ८ ॥ एथ कौमारत्व दिसे । मग तारुण्यीं तें भ्रंशे । परी देहचि हा न नाशे । एकेकासवें ॥ ९ ॥ तैसीं चैतन्याच्या ठायीं । इयें शरीरांतरें होती जाती पाहीं । ऐसें जाणे तया नाहीं । व्यामोह[1]दुःख ॥ ११० ॥

मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः । आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ १४ ॥

एथ नेणावया हेंचि कारण । जें इंद्रियां आधीनपण । तिहीं आकळिजे अंतःकरण । म्हणऊनि भ्रमे ॥ ११ ॥ इंद्रियें विषय सेविती । तेथ हर्ष शोक उपजती । ते अंतर ओं[2]प्लविती । संगें येणें ॥ १२ ॥ जयां विषयांच्या ठायीं । एकनिष्ठ[3]ता कहीं नाहीं । तेथ दुःख आणि कांहीं । सुखही दिसे ॥ १३ ॥ देखें शब्दाचि व्याप्ति । निंदा आणि स्तुति । तेथ द्वेषाद्वेष उपजती । श्रवणद्वारें ॥ १४ ॥ मृदु आणि कठीण । हे स्पर्शाचे दोन्ही गुण । जे वपूचेनि संगें कारण । संतोषखेदां ॥ १५ ॥ भ्यासुर आणि सुरेख । हें रूपाचें स्वरूप देख । जें उपजवी सुखदुःख । नेत्रद्वारें ॥ १६ ॥ सुगंधु आणि दुर्गंधु । हा परिमळाचा भेदु । जो घ्राणसंगें विषादु । तोषु देता ॥ १७ ॥ तैसाचि द्विविध रसु । उपजवी प्रीति त्रासु । म्हणौनि हा अपभ्रंशु । विषयसंगु ॥ १८ ॥ देखें इंद्रियां आधीन होईजे । तैं शीतोष्णांतें पाविजे । आणि सुखदुःखीं आकळिजे । आपणपें ॥ १९ ॥ या विषयांवांचूनि कांहीं । आणीक सर्वथा रम्य नाहीं । ऐसा स्वभावोचि पाहीं । इंद्रियांचा ॥ १२० ॥ हे विषय तरी कैसे । रोहिणीचें[5] जळ जैसें । कां स्वप्नींचा आभासे । भद्र[6]जाति ॥ २१ ॥ देखें अनित्य तियापरी । म्हणौनि तूं अव्हेरीं । हा सर्वथा संगु न धरीं । धनुर्धरा ॥ २२ ॥

---

१ भ्रांतीपासून उत्पन्न होणारे दुःख. २ भ्रमविती. ३ स्थैर्य. ४ भ्रष्ट करणारा. ५ रोहिणी–अकरापासून बारापर्यंत दुपारी जेव्हा रोहिणी नक्षत्राचा काळ असतो त्यांत दिसतें म्हणून रोहिणी मृगजळ. ६ हत्ती, गजांतलक्ष्मी.

आहे. देहाच्या उपाधीनें भेद दिसतो. देहाच्या उपाधी-संबंधामुळें आत्म्याच्या ठिकाणीं भासणारा उत्पत्ति-नाश मायेच्या योगानें दिसतो; एरव्ही वास्तविक जी आत्मवस्तु आहे ती अविनाशीच आहे ५. ज्याप्रमाणें वाऱ्यानें पाणी हलविलें म्हणजे तें तरंगाकारतेस प्राप्त होते, तर या ठिकाणीं कोण व कोठें जन्मास प्राप्त झाले, असें म्हणतां येईल ? ६. बरें ! पुढे तेंच वाऱ्याचें वाहणें थांबलें व पाणी स्वभावतःच स्थिर झालें, तर आतां त्यांत कशाचा नाश झाला, याचा विचार कर पाहूं ! ७.

**अन्वयार्थ**—**यथा**–ज्याप्रमाणें-**अस्मिन् देहे**–या देहांत शरीरांत–**देहिनः**–देहवान् आत्म्याला–**कौमारं**–बाल्यावस्था–लहानपण,–**यौवनं**–मध्यावस्था–तरुणपण,-**जरा**–जीर्णावस्था–म्हातारपण, अशा तीन अवस्था प्राप्त होतात–**तथा**–तशीच–**देहान्तर प्राप्तिः**–दुसऱ्या देहाची प्राप्ति होते-**तत्र**–त्याविषयीं–**धीरः**–विद्वान्, तत्त्ववेत्ता, पंडित–**न मुह्यति**–मोहित होत नाहीं १३.

आणखी असें पहा कीं, शरीर तर एकच असतें, पण वयपरत्वें त्यांत देखील अनेक दशा दृष्टीस पडतात, हा तूं प्रत्यक्षच पुरावा पहा ८. त्याच शरीरांत पहिल्यान्दा बालपण दिसतें; पुढें तेंच बालपण तारुण्यांत नाश पावतें; परंतु त्या प्रत्येक अवस्थेबरोबर शरीर मात्र कांहीं नाहींसें होत नाहीं ९. त्याचप्रमाणें, असें पहा कीं, एकमेवाद्वितीय आत्मचैतन्याच्या ठिकाणीं हीं अनंत देहदेहांतरे उत्पन्न होतात व नाश पावतात, असें जो यथार्थ जाणतो त्यास भ्रमामुळें होणारें दुःख मुळींहि अनुभवावें लागत नाहीं ११०.

**अन्वयार्थ**—**कौन्तेय**–हे कुंतीपुत्रा !–**तु**–परंतु **मात्रा-स्पर्शाः**–मात्रा म्ह० इंद्रियें, त्यांचे स्पर्श म्ह० विषयांशीं संयोग–**शीत उष्ण सुख दुःखदाः**–शीत व उष्ण देऊन–थंडी व उष्णता यांचा अनुभव देऊन त्यांच्या द्वारां–शीतोष्णाच्या योगानें सुख व दुःख देणारे आहेत; तसेंच **ते–आगम–अपायिनः**–उत्पत्ति व विनाश यांनीं युक्त आहेत. म्ह० त्यांना आदि व अंत आहेत. म्हणूनच ते–**अनित्याः**-अनित्य-कांहीं काल राहणारे आहेत.-[ **अतः**–यास्तव ] **भारत**–हे अर्जुना ! **तान्**–त्या शीतोष्णादि देणाऱ्या मात्रास्पर्शास–**तितिक्षस्व**–सहन कर १४.

पण हें तत्त्व न कळण्याचे कारण जर कोणते असेल तर ते म्हणजे 'इंद्रियाधीनता' हेंच होय व तींच इंद्रियें अंतःकरणास आपल्या कह्यांत घेतात. [ विषयोन्मुख करतात ] म्हणून [ अज्ञान्यास ] भ्रम होतो ११. इंद्रिय विषयांचे सेवन करितात, त्यामुळें [ अंतःकरणांत ] सुखदुःखें उत्पन्न होतात; त्या आसक्तीमुळें ते विषय अंतःकरणाला मोहग्रस्त करून टाकतात १२. ज्या शब्दस्पर्शादिक विषयांच्या ठिकाणीं एकरस नित्य स्थिति अशी कधींच नसते, [ म्हणजे विषयाचे सुख किंवा दुःख यांपैकीं निश्चित असें कोणतेंहि स्वरूप नाहीं ] कारण, त्या विषयापासून कधीं दुःख होते तर कधीं सुखहि होते, असें दिसून येते १३. आतां शब्द विषयांची व्याप्ति पहा कीं, त्यामुळें जर कानांनीं निंदापर शब्द ऐकले तर मनांत द्वेष उत्पन्न होतो; आणि स्तुतिपर शब्द ऐकले तर [ अंतःकरणांत ] समाधान होतें १४. तसेंच मऊपणा व कठीणपणा हे स्पर्श या विषयाचे दोन प्रकार आहेत; ते शरीराच्या संसर्गानें म्ह. त्वगिंद्रिय संबंधद्वारां सुख व दुःखाला कारण होतात १५. पहा ! तसेंच भेसूर आणि सुरेख अशीं हीं दोन स्वरूपें रूपविषयाचीं आहेत; पण तीं डोळ्यांनीं पाहिल्यावर तद्द्वारां अनुक्रमें दुःख व सुख उत्पन्न करतात १६. त्याचप्रमाणें, गंध विषयाचे सुगंध व दुर्गंध हे दोन प्रकारचे भेद आहेत. हे घ्राणेंद्रिय सन्निकर्षद्वारां संतोष व असंतोष उत्पन्न करितात १७. तसाच चांगला व वाईट असा दोन प्रकारचा रस आहे तो प्रीति आणि त्रास उत्पन्न करितो. म्हणून इंद्रिय-विषयसंग हाच जीवांला शुद्ध आत्मस्वरूपासून भ्रष्ट करणारा आहे १८. असें पहा कीं, जे इंद्रियांच्या स्वाधीन होतात, त्यांना शीतोष्णांचीं बाधा होते मग ते स्वतः सहजच सुखदुःखांकडून जखडले जातात १९. असे पहा कीं, या विषयांशिवाय जगतांत नितांतरमणीय असें दुसरें कांहींच नाहीं असा या इंद्रियांचा स्वभावच आहे १२०. हे विषय कसे आहेत असा त्यांच्या स्वरूपाचा विचार केला तर, ते विषय रोहिणी मृगजळाप्रमाणें किंवा स्वप्नांतील गजान्त लक्ष्मीप्रमाणें, ऐश्वर्याप्रमाणें मिथ्या भासतात २१. विषय अनित्यच आहेत असा तूं निश्चय कर आणि तूं त्यांचा त्याग कर. पार्था ! त्यांची यत्किंचितहि संगति धरूं नकोस २२.

यं हि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ । समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥

हे विषय जयातें नाकळिती । तया सुखदुःखें दोनी न पवती । आणि गर्भवासुसंगती । नाहीं तया ॥ २३ ॥ तो नित्यरूप पार्था । वोळखावा सर्वथा । जो या इंद्रियार्थां । नागवेचि ॥ २४ ॥

नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः । उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ १६ ॥

आतां अर्जुना कांहीं एक । सांगेन मी आईक । जे विचारपर लोक । वोळखिती ॥ २५ ॥ या उपाधिमाजीं गुप्त । चैतन्य असे सर्वगत । तें तत्त्वज्ञ[1] संत । स्वीकारिती ॥ २६ ॥ सलिलीं पय जैसें । एक होऊनि मीनलें असे । परी निवडूनि राजहंसें । वेगळें कीजे ॥ २७ ॥ कीं अग्निमुखें किडाळ । तोडोनियां चोखाळ । निवडिती केवळ । बुद्धिमंत ॥ २८ ॥ ना तरी जाणिवेच्या आयणी[3] । करितां दधिकडसणी । मग नवनीत निर्वाणीं । दिसे जैसें ॥ २९ ॥ कीं भूस बीज एकवट । उपणितां राहे घनवट । तेथ उडे तें फलकट । जाणों आलें ॥ १३० ॥ तैसें विचारितां निरसलें । तें प्रपंचु सहजें सांडवलें । मग तत्त्वतां[4] तत्त्व उरलें । ज्ञानियांसि ॥ ३१ ॥ म्हणौनि अनित्याच्या ठायीं । तयां[5] आस्तिक्यबुद्धि नाहीं । निष्कर्षु दोहींही । देखिला असे ॥ ३२ ॥

अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् । विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ १७ ॥

देखें सारासार विचारितां । भ्रांति ते पाहीं असारता । तरी सार तें स्वभावता । नित्य जाणें ॥ ३३ ॥ हा लोकत्रयाकारु । तो जयाचा विस्तारु । तेथ नाम वर्ण आकारु । चिन्ह नाहीं ॥ ३४ ॥ जो सर्वदा सर्वगतु । जन्मक्षयातीतु । तया केलियाहि घातु । कदा नोहे ॥ ३५ ॥

अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः । अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥ १८ ॥

आणि शरीरजात आघवें । हें नाशिवंत स्वभावें । म्हणौनि तुवां झुंजावें । पंडुकुमरा ॥ ३६ ॥

---

१ ब्रह्मस्वरूप जाणणारे, यथार्थ ज्ञानी. २ उदकांत. ३ सामर्थ्यानें. ४ यथार्थपणें. ५ ज्ञान्याला.

**अन्वयार्थ**—**पुरुषर्षभ**—हे पुरुषश्रेष्ठा!—हि—**समदुःखसुखं धीरं पुरुषं**—ज्याला सुख व दुःख हीं दोन्हीं समान आहेत. अशा धीर-बुद्धिमान् पुरुषाला—**एते**—हे शीतोष्णादिक—**न व्यथयन्ति**—व्यथा उत्पन्न करूं शकत नाहींत. —नित्य आत्मदर्शनापासून ढळवून 'हें सुख व दुःख मलाच होत आहे' असा भ्रम उत्पन्न करीत नाहींत—**सः**—तो—**अमृतत्वाय**—मोक्षाला—**कल्पते**—समर्थ होतो १५.

जो पुरुष या इंद्रियांचे जे विषय त्यांच्या स्वाधीन होत नाहीं त्याला सुख-दुःखें हीं दोन्हीं प्राप्त होत नाहींत; अर्थात् गर्भवासाची संगति त्यास कधींहि घडत नाहीं. [जन्म प्राप्त होत नाहीं] २३. अर्जुना! विवेकदृष्टीनें जो शुद्ध आत्मा जाणतो व जो या विषय-इंद्रियांच्या पाशांत, तडाक्यांत सांपडत नाहीं, तोच अविनाशी पूर्ण ब्रह्मरूप आहे, असें निःशंकपणें समजावें २४.

**अन्वयार्थ**—**असतः**—असत्—अविद्यमान पदार्थांचा—**भावः**—भाव म्ह० अस्तित्व **न विद्यते**—नसतें.—**सतः**—विद्यमान पदार्थांचा—**अभावः**—अभाव—**न विद्यते**—नसतो.—**अनयोः उभयोः अपि तु**—या दोवांचाहि—**अन्तः**—निर्णय—**तत्त्वदर्शिभिः**—तत्त्ववेत्त्यांनीं—**दृष्टः**—पाहिलेला आहे १६.

आतां अर्जुना! तुला आणखी एक गोष्ट मी सांगतों, ती फक्त जे आत्मानात्मविचार पारायण आहेत ते विचारवंत लोकच ओळखतात २५. असे पहा कीं, [देहादि उपाधीरूप] जगामध्यें सर्वव्यापक असें जें एक गूढ आत्मचैतन्य आहे, त्याचाच तत्त्वज्ञ म्ह. जगाचे अंतिमतत्त्व जाणणारे संत सदैव स्वीकार करितात २६. ज्याप्रमाणें पाण्यामध्यें दूध एकरूप होऊन मिसळून गेलेलें असतें; पण राजहंस पक्षी त्याला पाण्यापासून निवडून अगदीं वेगळें करितो २७. अथवा चतुर सोनार लोक डागलग सोनें अग्नींत घालून, ताव देऊन त्यांतील हिणकस धातू काढून टाकून, वाईट सोन्यापासून शुद्ध सोनें निवडून अगदीं निराळें काढतात २८. किंवा बुद्धीच्या चातुर्यानें दही घुसळले असतां शेवटीं जसें सारभूत लोणी निघालेलें दृष्टीस पडतें २९. अथवा एकत्र मिसळलेलें फलकट किंवा कोंडा आणि धान्य हीं वाऱ्यावर धरून उफणल्यावर ज्याप्रमाणें निव्वळ धान्य खालीं जाग्यावरच राहतें व उडून जाते ते फोलकट, असें समजून येतें १३०. त्याप्रमाणें विचाराअंतीं ज्याचा निरास होतो तो प्रपंच ज्ञानीपुरुषांकडून सहजच टाकला जातो व मग ज्ञानीपुरुषाला विचार करण्याला फक्त त्रिकालाबाधित तत्त्व अर्थात् ब्रह्मच उरतें ३१. म्हणून त्यांची अनित्याचे ठिकाणीं सत्यत्वबुद्धि नसते, कारण नित्य व अनित्य या दोहोंचाहि निर्णय त्यांनीं ओळखलेला असतो. [त्याप्रमाणें शुद्ध आत्मचैतन्य आणि देहादि अनात्मा हे अविवेकानें एकत्र झालेले आहेत त्या सत्यानृताच्या मिश्रणासच अन्योन्याध्यास म्हणतात त्याच्यांत सत्य व मिथ्यारूपानें असलेल्या भेदज्ञानासच 'विचार' म्हणतात त्या विचाराचे धारेवर धरले असतां देहादि प्रपंचाचा तो मिथ्या असल्यामुळें वस्तुतः अभाव होतो, आणि सत्य ब्रह्मतत्त्व मात्र शिल्लक उरते, असा शुद्ध आत्मा आणि अनित्य देहादि संसार या दोहोंतील भेद म्ह. विवेकपूर्ण बिनचूक असा निर्णय ज्ञानी पुरुषांनीं निश्चित केलेला असतो] ३२.

**अन्वयार्थ**—**तु**—पण—**येन**—ज्यानें—**इदं सर्वं**—हें सर्व दृश्य जगत्—**ततं**—व्यापिलें आहे—**तत्**—तें आत्मतत्त्व—ब्रह्म—**अविनाशि**—नाश न पावणारें, नित्य आहे असें—**विद्धि**—तूं जाण **अस्य अव्ययस्य**—या अव्ययाचा **विनाशं** विनाश-**कर्तुं**—करण्यास-**कश्चित्**—कोणी—**न अर्हति**—योग्य समर्थ नाहीं १७.

आतां सार काय? असार काय? याविषयीं विचार केला असतां त्यांत जी भ्रांति असते ती असार आहे, असें पहा आणि जे आत्मतत्त्व स्वभावतः नित्य आहे ते सार होय असा तूं जाणून निश्चय कर ३३. अरे! हा त्रैलोक्याचा आकार ज्या आत्मतत्त्वाचा विस्तार आहे, त्याच्या ठिकाणीं नाम, रंग, रूप हीं चिन्हें मुळींच नाहींत ३४. जो नित्य [कालपरिच्छेदरहित, प्राक्प्रध्वंसाभावरहित] व सर्व व्यापक [देशपरिच्छेदरहित, अत्यंताभावरहित] असून जन्मरणादि षड्भावविकाररहित आहे; म्हणून त्याचा जरी नाश करूं म्हटलें तरी तो कधींसुद्धां होणार नाहीं ३५.

**अन्वयार्थ**—**नित्यस्य**—नित्य,—**अनाशिनः**—अविनाशी व **अप्रमेयस्य**—अप्रमेय अशा या—**शरीरिणः**—शरीरी—आत्म्याचे—**इमे देहाः**—हे सर्व देह—**अन्तवन्तः**—अन्त नाश पावणारे—**उक्ताः**—सांगितले आहेत. **तस्मात्**—म्हणून—**भारत**—हे अर्जुना! **युध्यस्व**—तूं युद्ध कर १८.

आणि अर्जुना! शरीर म्हणून जेवढें आहे तेवढें सर्वच्या सर्व स्वभावतःच नाशवंत आहे, ह्याकरितां तूं युद्ध कर. [या ठिकाणीं युद्ध करण्याविषयीं देवांनीं विधी केला नाहीं, फक्त अर्जुनाच्या युद्धप्रवृत्तीस अनुमति दिली, एवढेंच] ३६.

य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम् । उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥ १९ ॥

तूं धरूनि देहाभिमानातें । दिठी सूनि शरीरातें । मी मारिता हे मरते । म्हणतु आहासी ॥ ३७ ॥ तरी अर्जुना तूं हें नेणसी । जरी तत्त्वता विचारिसी । तरी वधिता तूं नव्हेसी । हे वध्य नव्हती ॥ ३८ ॥

न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वाऽभविता वा न भूयः ।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ २० ॥
वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् । कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम् ॥ २१ ॥

जैसें स्वप्नामाजीं देखिजे । तें स्वप्नींचि साच आपजे । मग चेऊनियां पाहिजे । तंव कांहीं नाहीं ॥ ३९ ॥ तैसी हे जाण माया । तूं भ्रमतु आहासी वायां । शस्त्रें हाणितलिया छाया । जैसी आंगीं न रुपे ॥ १४० ॥ कां पूर्ण कुंभ उलंडला । तेथ बिंबाकारु दिसे भ्रंशला । परी भानु नाहीं नासला । तयासवें ॥ ४१ ॥ ना तरी मठीं आकाश जैसें । मठाकृती अवतरलें असे । तो भंगलिया आपैसें । स्वरूपचि ॥ ४२ ॥ तैसें शरीराच्या लोपीं । सर्वथा नाशु नाहीं स्वरूपीं । म्हणौनि तू हें नारोपी । भ्रांति बापा ॥ ४३ ॥

वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।
तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥ २२ ॥

जैसें जीर्ण वस्त्र सांडिजे । मग नूतन वेढिजे । तैसें देहांतरातें स्वीकारिजे । चैतन्यनाथें ॥ ४४ ॥

नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः । न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥ २३ ॥
अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च । नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २४ ॥

हा अनादि नित्यसिद्धु । निरुपाधि विशुद्धु । म्हणौनि शस्त्रादिकीं छेदु । न घडे यया ॥ ४५ ॥ हा प्रळयोदकें नाप्लवे । अग्निदाहो न संभवे । एथ महाशोषु न प्रभवे । मारुताचा ॥ ४६ ॥ अर्जुना हा नित्यु । अचळु हा शाश्वतु । सर्वत्र सदोदितु । परिपूर्णु हा ॥ ४७ ॥

अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते । तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २५ ॥

---

१ चित्कलेच्या ठायीं. २ आरोपूं नको. ३ आत्म्यानें. ४ उत्पत्तिरहित. ५ नित्य असणारा. ६ मायावरणरहित. ७ न बुडे. ८ घडत नाही. ९ वायूचा. १० कालत्रयीं अवध्य.

**अन्वयार्थ**—**यः**–जो कोणी–**एनं**–या आत्म्याला–**हन्तारं हन्ता**–मारणारा–**वेत्ति**–समजतो **च**–व–**यः**–जो–**एनं**–या आत्म्याला-**हतं**-मेलेला-**मन्यते**–समजतो **तौ उभौ**-ते दोघे–**न विजानीतः**-आत्म्याला जाणत नाहींत, त्याचें ते स्वरूप त्यास माहीत नाहीं, कारण-**अयं**-हा आत्मा-**न हन्ति**–मारीत नाहीं, **न हन्यते**–व मारला जात नाहीं १९.

अरे! तूं देहाचा अभिमान धरून व या शरीरावरच दृष्टी ठेवून मी अर्जुन मारणारा आणि हे [ कौरव ] मरणारे असें म्हणत आहेस ३७. तरीपण, अर्जुना! त्यांतील खरा तत्त्वार्थ तुला कळत नाहीं. जर यथार्थ विचार करशील तर, तूं मारणारा नव्हेस व ते मरणारेहि नव्हेत ३८.

**अन्वयार्थ**—**अयं**–हा आत्मा–**कदाचित्**–केव्हांही–**न जायते**–उत्पन्न होत नाहीं.–**वा**–किंवा–**कदाचित्**–केव्हांहीं–**न म्रियते**–मरत नाहीं. [ **अयं**–हा– ] **भूत्वा**–होऊन–**भूयः**–पुनरपि–**अभविता**–न होणारा–**न**–नाहीं **अयं**–हा–**अजः**–न जन्मणारा–**नित्यः**–त्रिकालीं असणारा–**शाश्वतः** – निर्विकार–अक्षय –**पुराणः**– एकरूप आहे–**शरीरे हन्यमाने अपि**–शरीरांत जरी विकार होत असला, तरी–**न हन्यते**–याच्यामध्यें–कोणताही विपरिणाम होत नाहीं २०. –**पार्थ**–हे अर्जुना! **यः**–जो **एनं**–या आत्म्याला–**अविनाशिनं नित्यम् अजम् अव्ययं वेद**–अविनाशी, नित्य, अज व अव्यय समजतो **सः पुरुषः**-तो पुरुष–**कं**–कोणाला–**कथं**–कसा–**हन्ति**–मारणार ? व **कं**–कोणाला–[ **कथं** ] कसा–**घातयति**–मारविणार ? २१.

ज्याप्रमाणें स्वप्नांत पाहिलेले विषय स्वप्नांतच खरे भासतात, परंतु जागृत होऊन पहावें तों कांहींएक नसतें ३९. त्याप्रमाणें हें सर्व मायिक आहे असे समज, तूं भ्रमांत व्यर्थ पडला आहेस. अरे! मनुष्याच्या सावलीवर शस्त्रानें प्रहार केला तर तो घाव जसा त्याच्या अंगास लागत नाहीं १४०. किंवा पाण्यानें भरलेलें भांडें पालथें केल्यावर त्यांतील सूर्यप्रतिबिंब नाहींसें झालेलें दिसतें; परंतु त्या प्रतिबिंबाबरोबर खरा सूर्य मात्र नाश पावलेला नसतो ४१. अथवा आकाश हें बांधलेल्या घरांत त्या घराच्या आकृतीचें झालेले दिसतें, पण तें घर मोडल्यावर ते नष्ट न होता त्याचें सहजच मूळ स्वरूप जसेंच्या तसे राहातें ४२. त्याचप्रमाणें शरीर नाश पावलें तरी मूळ आत्मस्वरूपाचा कधींहि नाश होत नाहीं; म्हणून बाबारे! तूं ही जन्ममरणाची नुसतीच भ्रांति आत्म्यावर आरोपूं नकोस ४३.

**अन्वयार्थ**—**यथा**–ज्याप्रमाणें–**नरः**–पुरुष–**जीर्णानि वासांसि**–जुनीं वस्त्रें–**विहाय**–टाकून–**अपराणि**–दुसरीं–**नवानि**–नवीं वस्त्रें–**गृण्हाति**–घेतो–**तथा**–त्याप्रमाणें **देही**–देहवान् आत्मा–**जीर्णानि शरीराणि**–जीर्ण–निर्बल झालेलीं शरीरें –**विहाय**–सोडून–**अन्यानि नवानि**–दुसरीं नवीं शरीरें–**संयाति**–घेतो–नव्या शरीरांत जातो २२.

मनुष्यानें ज्याप्रमाणें जुनें झालेलें वस्त्र टाकावें व नवें धारण करावें, नेसावें,–त्याप्रमाणें हा चैतन्यनाथ–आत्मा एक देह टाकून दुसऱ्या देहाचा स्वीकार करितो. [ तात्पर्य आत्मचैतन्याचे आश्रयावरच शरीराची जन्ममरण भ्रांति होते ] ४४.

**अन्वयार्थ**—**एनं**–या आत्म्याला–**शस्त्राणि**–शस्त्रें–**न छिन्दन्ति**–तोडीत नाहींत–**एनं पावकः न दहति**–अग्नि जाळीत नाहीं–**एनम् आपः न क्लेदयंति**–पाणी कुजवीत नाहीं. **च मारुतः न शोषयति**–व याला वायु सुकवीत नाहीं २३. **अयम् अच्छेद्यः अयम् अदाह्यः अयम् अक्लेद्यःच अशोष्यः एवम्**–हा तोडतां, जाळतां, कुजवितां व सुकवितां येण्यासारखा नाहीं म्हणून–**अयं**–हा-**नित्यः** नित्य आहे-**सर्वगतः**–त्यामुळें सर्वव्यापक आहे. **स्थाणुः**–झाडाच्या खोडाप्रमाणें स्थिर आहे.–**अचलः**–अचल आहे. म्हणूनच तो–**सनातनः**–चिरकालीन आहे २४. तसाच–

निरवयव असल्यामुळें हा आत्मा जन्ममरणरहित असून नित्य, स्वतःसिद्ध, वस्तुतः [ कार्यकारणात्मक ] उपाधिरहित व अत्यंत शुद्ध आहे; म्हणून याचा शस्त्रादिकांनीं सुद्धां घात होत नाहीं ४५. हा प्रलयकालच्या पाण्यानेंहि बुडत नाहीं; हा अग्नीनें जळणें संभवनीय नाहीं; तसेंच वायूचा महाशोषण शक्तिप्रभावहि येथें चालत नाहीं ४६. म्हणून अर्जुना! हा आत्मा नित्य, क्रियारहित व शाश्वत असून सर्व ठिकाणीं सदा [ स्वयंप्रकाश ] व परिपूर्ण व्यापकरूपानें भरला आहे ४७.

**अन्वयार्थ**–**अयम् अव्यक्तः**–हा आत्मा अव्यक्त आहे. **अयम् अचिन्त्यः**–हा अचिन्त्य आहे.–**अयम् अविकार्यः उच्यते**–हा अविकार्य म्हटला जातो.–**तस्मात्**-यास्तव–**एनं**–या आत्म्याला–**एवं**-असें–**विदित्वा**-जाणून **अनुशोचितुं**–भीष्मादिकांविषयीं शोक करण्यास–**न अर्हसि**-तूं योग्य नाहींस २५.

हा तर्कांचिये दिठी । गोचर नोहे किरीटी । ध्यान याचिये भेटी । उत्कंठा वाहे ॥ ४८ ॥ हा सदा दुर्लभु मना । आपु नोहे साधना । निःसीमु हा अर्जुना । पुरुषोत्तमु ॥ ४९ ॥ हा गुणत्रयरहितु । अनादि अविकृतु । व्यक्तीसी अतीतु । सर्वरूप ॥ १५० ॥ अर्जुना ऐसा हा जाणावा । सकळात्मकु देखावा । मग सहजें शोकु आघवा । हरेल तुझा ॥ ५१ ॥

अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् । तथापि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥

अथवा ऐसा नेणसी । तूं अंतवंतचि मानिसी । तऱ्ही शोचूं न पवसी । पंडुकुमरा ॥५२॥ जो आदि स्थिति अंतु । हा निरंतर असे नित्यु । जैसा प्रवाहो अनुस्यूतु । गंगाजळाचा ॥ ५३ ॥ तें आदि नाहीं खंडलें । समुद्रीं तरी असे मीनलें । आणि जातचि मध्यें उरलें । दिसे जैसें ॥ ५४ ॥ इयें तिन्ही तयापरी । सरसींच सदा अवधारीं । भूतांसि कवणीं अवसरीं । ठाकती ना ॥ ५५ ॥ म्हणौनि हें आघवें । एथ तुज नलगे शोचावें । जे स्थितीचि हे स्वभावें । अनादि ऐसी ॥ ५६ ॥ ना तरी हें अर्जुना । नयेचि तुझिया मना । जे देखोनि लोकु अधीना । जन्मक्षया ॥ ५७ ॥ तरी एथ कांहीं । तुज शोकासि कारण नाहीं । हे जन्ममृत्यु पाहीं । अपरिहर ॥५८॥

जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च । तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥

उपजे तें नाशे । नाशलें पुनरपि दिसे । हें घटिकायंत्र जैसें । परिभ्रमे गा ॥५९॥ ना तरी उदो अस्तु आपैसें । अखंडित होत जात जैसें । हें जन्ममरण तैसें अनिवार जगीं ॥ १६० ॥ महाप्रळयअवसरें । हें त्रैलोक्यहि संहरे । म्हणौनि हा न परिहरे । आदि अंतु ॥ ६१ ॥ तूं जरी हें ऐसें मानिसी । तरी खेदु कां करिसी ? । काय जाणतुचि नेणसी । धनुर्धरा ॥ ६२ ॥ एथ आणीकही एक पार्था । तुज बहुतीं परीं पहातां । दुःख करावया सर्वथा । विषो नाहीं ॥ ६३ ॥

अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत । अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २८ ॥

जियें समस्तें इयें भूतें । जन्माआदि अमूर्तें । मग पातली व्यक्तीतें । जन्मलेया ॥ ६४ ॥ तियें क्षयासि जेथ जाती । तेथ निभ्रांत आनें नव्हती । देखें पूर्वस्थितीच येती । आपुलिये ॥ ६५ ॥ येर मध्यें जें प्रतिभासे । तें निद्रिता स्वप्न जैसें । तैसा

१ तर्कशास्त्राच्या दृष्टीला. २ विकार न पावलेला. ३ आकाराला. ४ अखंड. ५ सृष्टिक्रम. ६ कालज्ञानार्थ केलेलें वाळूचें घड्याळ, रहाटगाडगें. ७ फिरते. ८ निराकार. ९ आकाराला. १० निःसंशय.

हा आत्मा तर्कशास्त्राच्या दृष्टीनें दिसणारा, अनुमान प्रमाणास विषय होणारा नव्हे; ध्यान तर याच्याच भेटीसाठीं उत्कंठित झालेले असते ४८. अर्जुना ! हा मनास नेहमीं दुर्लभ, साधनानें प्राप्त न होणारा, अनंत म्ह. देशकालवस्तुपरिच्छेदरहित व पुरुषोत्तम म्हणजे क्षराक्षर पुरुषांत समव्याप्त असून त्या उभय उपाधींहून अतीत केवळ निर्विशेष अनुभूतिरूप उत्तम पुरुष होय ४९. हा गुणत्रयरहित म्हणजे निर्गुण, निर्विशेष उत्पत्तिरहित, विकाररहित, जगतादि किंवा रूपादि आकाररहित व वस्तुमात्राच्या स्वरूपांत समव्याप्त आहे १५०. अर्जुना ! आत्मा हा असा आहे, असें जाणावें, तसेंच हा सर्वव्यापी आहे असें तूं जाणलेस म्हणजे मग तुझा हा शोक आपोआप नाहींसा होईल ५१.

**अन्वयार्थ**—**अथ च**—आतां जरी—**त्वं**—तूं—**एनं**—या आत्म्याला—**नित्यजातं**—नित्य उत्पन्न झालेला—**वा**—किंवा—**नित्यं मृतं**—नित्य मेलेला-मानीत असशील—**तथापि** तरी—**महाबाहो**—हे पराक्रमी अर्जुना !—**एवं**—अशा रीतीनें—**शोचितुं**—शोक करण्यास—**न अर्हसि**—तूं योग्य नाहींस २६.

अथवा असें पहा कीं, अर्जुना ! आत्मा अविनाशी आहे, हा विचार कळत नसल्यानें असें न मानतां तो नाशवंत आहे, असें जरी तूं मानलेंस, तरी देखील तुला शोक करण्याचें कारण नाहीं ५२. कारण, गंगेच्या पाण्याचा ओघ ज्याप्रमाणें अविच्छिन्न आहे. त्याप्रमाणें उत्पत्ति, स्थिति आणि लय याचा क्रम, प्रवाहहि अखंडच आहे. [ या तिन्ही अवस्थेंत आत्मा अखंड व नित्य आहे ] ५३.—तें गंगेचें पाणी उगमाच्या ठिकाणीं खंड पावलेले नसतें. पुढें तें समुद्राला जाऊन एकसारखें मिळत असतें, आणि जात असतांना मध्यंतरी वाहत्या प्रवाहांतहि तें पाणीच जसें दिसतें—५४. त्याप्रमाणें उत्पत्ति, स्थिति व लय हीं तिन्ही [ प्राणिमात्रांच्या ] नेहमीं बरोबरच आहेत. त्यांचा प्रवाह प्राणिमात्रास कोणत्याहि वेळीं थांबविता येत नाहीं, असें समज ५५. म्हणून तुला येथें सर्वांकरितां किंवा यांतील कोणाकरितांच शोक करावयास नको. कारण, स्वभावतःच हा असा सृष्टिक्रम अनादिसिद्ध म्ह. आरंभापासून चालत आलेला आहे ५६. हें प्राणिमात्र जन्ममरणाच्या आधीन आहेत असें पाहून जर हे म्हणणें तुझ्या मनाला पटत नसेल ५७. तरीपण यांतील कोणाविषयींच तुला येथें शोक करण्याचें कारण नाहीं. कारण, हे जन्ममृत्यु अपरिहार्य, अटळ आहेत, असें तूं समज ५८.

**अन्वयार्थ**—**हि**—कारण—**जातस्य**—उत्पन्न झालेल्या आत्म्याचा—**मृत्युः**—मृत्यु—**ध्रुवः**—निश्चित आहे—**च**—आणि **मृतस्य**—मेलेल्या आत्म्याचा—**जन्म**—जन्म—**ध्रुवं** [ **भवति** ]—निश्चित आहे—**तस्मात्**—यास्तव—**अपरिहार्ये**—**अर्थे**—या अपरिहार्य—टाळतां न येणाऱ्या गोष्टीविषयीं—**त्वं**—**तूं**—**शोचितुं**—शोक करण्यास—**न अर्हसि** योग्य नाहींस २७.

अरे ! जे जन्मास आले ते नाश पावणारच व नाश पावलेले पुनः जन्मास आल्याचे दिसते, ही जन्ममरणपरंपरा रहाटगाडग्याप्रमाणें सतत चालू आहे ५९. अथवा सूर्याचे उदयास्त ज्याप्रमाणें आपोआप निरंतर होत-जात असतात, त्याप्रमाणें या जगांत हे जन्ममरण कोणालाहि अनिवार आहेत, टळत नाहींत १६०. महाप्रलयाच्या वेळीं या त्रैलोक्याचाहि संहार होतो, म्हणूनच उत्पत्ति व नाश हें टळत नाहींत ६१. असें हें जर [ आत्म्याला आदि व अंत ] मानीत असलास तर मग खेद कां करितोस ? अर्जुना ! तूं शहाणा असून समजून उमजून असा वेडांत कां शिरतोस ? ६२. अर्जुना ! आणखी एक गोष्ट तुला सांगतों कीं, पुष्कळ प्रकारानें विचार करून पाहिलें असतां तुला येथें दुःख करावयास कांहींच कारण दिसत नाहीं ६३.

**अन्वयार्थ**—**हे भारत**—हे अर्जुना !—**भूतानि अव्यक्तादीनि**—भूतें उत्पत्तीच्या पूर्वी अव्यक्त असतात. तीं शरीरेन्द्रियरूपानें दिसत नाहींत—**व्यक्तमध्यानि**—उत्पत्तींनतर मरणापर्यंत जी मध्यमावस्था त्यांत शरीरेन्द्रियरूपानें तीं व्यक्त असतात—**अव्यक्तनिधनानि एव**—निधनानंतर तीं पुनः अव्यक्त होतात—दिसत नाहींत—**तत्र**—मग त्याविषयीं **का परिदेवना**—शोक काय करावयाचा आहे ? २८.

अरे ! असें पहा कीं, हे सर्व प्राणी उत्पत्तीपूर्वी निराकार होतें, मग जन्म धारण केल्यावर ते आकाराला प्राप्त झालें ६४. मग ते जेथें लय पावून जातात तेथेंहि ते निःसंशय दुसऱ्या स्थितींत जात नाहींत, तर पूर्वीच्या आपल्या अव्यक्त स्थितीलाच प्राप्त होतात ६५. आतां मध्यंतरी [ जन्म व मृत्यु या दोन अवस्थांमध्यें ] जे दुसरे

आकारू हा मायवशें । सत्स्वरूपीं ॥ ६६ ॥ ना तरी पवनें स्पर्शिलें नीर । पढियासे तरंगाकार । कां परापेक्षां अळंकार । व्यक्ती कनकीं ॥ ६७ ॥ तैसें सकळ हें मूर्त । जाणपां मायाकारित । जैसें आकाशीं बिंबत । अभ्रपटल ॥ ६८ ॥ तैसें आदीचि जें नाहीं । तयालागीं तूं रुदसी कायी । तूं अवीट तें पाहीं । चैतन्य एक ॥ ६९ ॥ जयाचि आर्तीचि भोगित । विषयीं त्यजिले संत । जयालागीं विरक्त । वनवासिये ॥ १७० ॥ दिठी सूनि जयातें । ब्रह्मचर्यादि व्रतें । मुनीश्वर तपातें । आचरताती ॥ ७१ ॥

आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।
आश्चर्यवच्चैनमन्यः श्रृणोति श्रुत्वाऽप्येनं वेद न चैव कश्चित् ॥ २९ ॥

एक अंतरीं निश्चळ । जें निहाळितां केवळ । विसरले सकळ । संसारजात ॥ ७२ ॥ एकां गुणानुवादु करितां । उपरति होऊन चित्ता । निरवधि तल्लीनता । निरंतर ॥ ७३ ॥ एक ऐकतांचि निवाले । ते देहभावीं सांडिले । एक अनुभवें पातले । तद्रूपता ॥ ७४ ॥ जैसे सरिता ओघ समस्त । समुद्रामाजीं मिळत । परी माघौते न समात । परतले नाहीं ॥ ७५ ॥ तैसिया योगीश्वरांचिया मती । मिळवणीसवें एकवटती । परी जे विचारूनि पुनरावृत्ति । भजतीचिना ॥ ७६ ॥

देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत । तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥ ३० ॥

जें सर्वत्र सर्वही देहीं । जया करितांही घातु नाहीं । तें विश्वात्मक तूं पाहीं । चैतन्य एक ॥ ७७ ॥ जयाचेनि स्वभावें । हें होत जात आघवें । तरी सांग काय शोचावें । एथ तुवां ॥ ७८ ॥ एऱ्हवीं तरी पार्था । तुज कां नेणों न मनें चित्ता । परी किडाळ हें शोचितां । बहुतीं परीं ॥ ७९ ॥

स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि । धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥ ३१ ॥

तूं अझुनी कां न विचारिसी । काय हें चिंतितु आहासी । स्वधर्मु तो विसरलासी । तरावें जेणें ॥ १८० ॥ या कौरवां भलतें जाहलें । अथवा तुजाचि कांहीं पातलें । कीं युगचि हें बुडालें । जऱ्ही एथ ॥ ८१ ॥ तरी स्वधर्मु एकु आहे । तो सर्वथा त्याज्य नोहे । मग तरिजेल काय पाहें । कृपाळूपणें ॥ ८२ ॥ अर्जुना तुझें चित्त । जऱ्ही जाहलें द्रवीभूत । तऱ्ही हें अनुचित । संग्रामसमयीं ॥ ८३ ॥ अगा गोक्षीर जरी जाहलें । तरी पथ्यासि नाहीं म्हणितलें । ऐसेनिहि

[ व्यक्त, प्रत्यक्ष गोचर झालेला आकार हा ] निजलेल्या मनुष्याला ज्याप्रमाणें स्वप्न दिसतें त्याप्रमाणें होय. तसाच हा जगदाकार मायेच्या योगानें सत्य ब्रह्मस्वरूप अधिष्ठानावर भासतो ६६. किंवा वायूचा पाण्याला स्पर्श झाल्याबरोबर जल जसें लाटांच्या आकारानें भासतें किंवा दुसऱ्याच्या इच्छेनें सुवर्णाच्या ठिकाणीं अलंकाराचा आकार व्यक्त होतो ६७. त्याप्रमाणें, सर्व साकार व्यक्त जगत् मायाकार्य [ म्ह. मिथ्या अनिर्वचनीय उत्पन्न झालें आहे ] असें समज जसा आकाशांत मेघांचा पडदा भासतो ६८. [ तें कसें ? ] उत्तर—अरे ! जें मुळांतच नाहीं, त्याजबद्दल तूं रडतोस ! याला काय म्हणावें ? तर नित्य असें जें एक ब्रह्मचैतन्य त्याजकडे लक्ष दे. त्याचे आत्मत्वाने ज्ञान संपादन करून घे ६९. साधूंना त्या ब्रह्माची आवड, तीव्र जिज्ञासा उत्पन्न झाल्याबरोबर विषय त्या संतांना सोडून जातात, आणि ज्या ब्रह्माची आत्मत्वानें प्राप्ति होण्याकरितां वैराग्यसंपन्न अधिकारी वनवासी होतात १७०. आणि त्या ब्रह्मप्राप्तिकडे दृष्टी ठेवूनच श्रेष्ठ मुनी ब्रह्मचर्यादि व्रतें व तपें आचरतात ७१.

**अन्वयार्थ—कश्चित्**-कोणी एखादा-**आश्चर्यवत्**-आश्चर्याप्रमाणें – **एनं**–या आत्म्याला–**पश्यति**–पाहतो–**तथा एव च**–तसाच–**अन्यः**–दुसरा कोणी–**आश्चर्यवत्**-आश्चर्यासारखेंच–**वदति**–आत्म्याविषयीं बोलतो–**च**–आणि **अन्यः**–कोणी–**एनं आश्चर्यवत्**–याला आश्चर्याप्रमाणेंच–**शृणोति**–ऐकतो–**च**–आणि–**कश्चित्**–कोणी तर–**एनं**–याचें–**श्रुत्वा अपि**–श्रवण करूनहि–**न वेद एव**–जाणत नाहींच २९.

कित्येकजण त्या शुद्ध ब्रह्मास एकाग्र अंतःकरणानें निरीक्षण करून पाहतांच अंतर्यामीं स्थिर होऊन सर्व प्रकारचा संसार विसरतात ७२. कित्येकास त्याचे गुणानुवाद गातांना चित्तास उपरति, [ वैराग्य ] उत्पन्न होऊन शेवटीं त्यांना अमर्याद, निःसीम व त्याच्या ठिकाणीं अखंड तन्मयता लाभली ७३. कोणी एक तर त्याचें स्वरूपवर्णन ऐकूनच शांत होतात व देहाभिमानरहित, देहभान विवर्जित होतात आणि कोणी ब्रह्मात्मैक्य साक्षात्काररूप अनुभवानें तद्रूपतेस प्राप्त होतात ७४. ज्याप्रमाणें नद्यांचें सर्व ओघ समुद्रास मिळतात; परंतु समुद्रांत समावेश होण्यास जागा नाहीं म्हणून मागें परतल्या असें केव्हांहि नाहीं ७५. त्याप्रमाणें ह्या थोर योग्यांच्या बुद्धि ब्रह्मसाक्षात्काराबरोबर तद्रूप होतात. पुन्हां संसाराला, देहतादात्म्य भ्रांतीला प्राप्त होत नाहींत ७६.

**अन्वयार्थ—हे भारत**-हे अर्जुना !–**अयं देही**-हा देहवान् आत्मा–**सर्वस्य देहे**-सर्व प्राण्यांच्या देहांत–**नित्यं अवध्यः**–सर्वदा अवध्य आहे–**तस्मात्**–म्हणून–**त्वं**–तूं–**सर्वाणि भूतानि**–भीष्मादि कोणत्याच भूताला उद्देशून–**शोचितुं**–शोक करण्यास–**न अर्हसि**–योग्य नाहींस ३०.

अर्जुना ! जें सर्वत्र, सर्व देहांत, सर्व सर्वांतर्यामी रूपानें व्यापलेलें आहे व ज्याचा घात करूं गेलें असतांहि तो होत नाहीं, असें एक विश्वव्यापी अधिष्ठान चैतन्यच आहे, असें तूं पहा. लक्षांत ठेव ७७. ज्या अधिष्ठान चैतन्याच्या केवळ आश्रयावर हें सर्व जग स्वभावतःच उत्पन्न होतें व नाश पावतें, तर मग तूं यांतील कशाविषयीं शोक करावास, तें सांग बरें ? ७८. हें अर्जुना ! विचार करून पाहिलें असतां तुझ्या मनाला हे का पटत नाहीं, तें मलाहि समजत नाहीं; परंतु एकंदरींत हा शोक करणें अनेक प्रकारें तुला अनुचित होय ७९.

**अन्वयार्थ—च**-शिवाय-**स्वधर्मं**-आपल्या धर्माला **अवेक्ष्य अपि**–पाहूनहि-स्वधर्माकडे दृष्टि देऊनहि **विकम्पितुं**–असा डगमगण्यास–**न अर्हसि**–तूं योग्य नाहींस–स्वधर्मापासून च्युत होणें तुला उचित नाहीं–**हि**-कारण-**क्षत्रियस्य**-क्षत्रियाला–**धर्म्यात्**–धर्माला सोडून नसलेल्या, धर्मरूप–**युद्धात्**–युद्धाहून–**अन्यत्**–दुसरें कांहीं–**श्रेयः**–श्रेयस्कर–**न विद्यते**–नाहीं ३१.

अरें वेड्या ! अजून तूं कां विचार करीत नाहींस ? हे तूं मनांत काय घेऊन बसला आहेस ? अरे ! ज्या स्वधर्माचरणानें मनुष्य तरतो, त्याला तूं अगदींच विसरला आहेस ! १८०. असें समज कीं, ह्या ठिकाणीं सर्व मेलें किंवा तुझ्यावरच कांहीं प्रसंग ओढवला अथवा सगळें जगहि बुडून नाहींसें झालें ८१. तरीहि स्वधर्म म्हणून जो एक आहे, तो केव्हांहि टाकतां येत नाहीं; असे असतां त्याचा त्याग केल्यावर तुझ्या या कृपाळूपणानें तूं तरला जाशील काय ? याचा विचार कर ८२. अर्जुना ! तुझें चित्त जरी दया उत्पन्न झाल्यामुळें विरघळून गेलें आहे, तरी तसें होणें ह्या युद्धप्रसंगीं अयोग्य आहे ८३.

१ दुसऱ्याच्या इच्छेनें होणारें. २ प्रकट दिसणारें. ३ आवड.

४ घालून, ठेवून. ५ मीपणानें. ६ तदाकारता.

विष होय सुदलें । नवज्वरीं देतां ॥ ८४ ॥ तैसें आनी आन करितां । नाशु होईल हिता । म्हणौनि तूं आतां । सावध होईं ॥ ८५ ॥ वायांचि व्याकुळ कायी । आपुला निजधर्मु पाहीं । जो आचरितां बाधु नाहीं । कवणें काळीं ॥ ८६ ॥ जैसें मार्गेंचि चालतां । अपावो न पवे सर्वथा । कां दीपाधारें वर्ततां । नाडळिजे ॥ ८७ ॥ तयापरी पार्था । स्वधर्मे राहाटतां । सकळ कामपूर्णता । सहजें होय ॥ ८८ ॥ म्हणौनि यालागीं पाहीं । तुम्हां क्षत्रियां आणीक कांहीं । संग्रामावांचूनि नाहीं । उचित जाणें ॥ ८९ ॥ निष्कपटा होआवें । उसिणा घाई झुंजावें । हें असो काय सांगावें । प्रत्यक्षावरी ॥ १९० ॥

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् । सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभंते युद्धमीदृशम् ॥ ३२ ॥**

अर्जुना झुंज देखें आतांचें । हें हो कां जें दैव तुमचें । कीं निधान सकळ धर्माचें । प्रगटलें असे ॥ ९१ ॥ हा संग्रामु काय म्हाणिपे । कीं स्वर्गुचि येणें रूपें । मूर्त कां प्रतापें । उदो केला ॥ ९२ ॥ ना तरी गुणाचेनि पतिकरें । आर्तीचेनि पडिभरें । हें कीर्तीचि स्वयंवरें । आली तुज ॥ ९३ ॥ क्षत्रियें बहुत पुण्य कीजे । तैं झुंज ऐसें लाहिजे । जैसें मार्गे जातां आडळिजे । चिंतामणि ॥ ९४ ॥ ना तरी जांभया पसरे मुख । तेथ अवचटें पडे पीयुख । तैसा संग्रामु हा देख । पातला असे ॥९५॥

**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि । ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥ ३३ ॥**

आतां हा ऐसा अव्हेरिजे । मग नाथिलें शोचूं बैसिजे । तरी आपण आहोणा होईजे । आपणपेयां ॥ ९६ ॥ पूर्वजांचें जोडलें । आपणाचि होय धाडिलें । जरी आजि शस्त्र सांडिलें । रणीं इये ॥ ९७ ॥ असती कीर्ति जाईल । जगचि अभिशापु देईल । आणि गिंवसित पावतील । महादोष ॥ ९८ ॥ जैसी भातांरेंहीन वनिता । उपहती पावे सर्वथा । तैशी दशा जीविता । स्वधर्मेंवीण ॥९९॥ ना तरी रणीं शव सांडिजे । तें चौमेरीं गिधीं विदारिजे । तैसें स्वधर्महीना अभिभविजे । महादोषीं ॥ २०० ॥

**अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम् । संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥**

म्हणौनि स्वधर्मु हा सांडसील । पापा वरपडां होसील । आणि अपेश तें न वचेल । कल्पांतवरी ॥ १ ॥ जाणतेनि तंवचि जियावें । जंव अपकीर्ति आंगा न पवे । आणि सांग पां केवीं निगावें । एथोनियां ?॥२॥ तूं निर्मत्सर सदयता । येथूनि

अरे असें पहा कीं, गाईचें दूध उत्तम आहे, तरी तें पथ्याला घेऊं नये असे वैद्याने सांगितलें, असें असतांहि जर तें नवज्वरांतल्या मनुष्याला दिलेंच तर विषवत् [ बाधक ] होतें ८४. त्याचप्रमाणें, भलत्या वेळीं, भलत्या ठिकाणीं, भलत्यानें भलतेंच कर्माचरण केलें तर त्यांच्या हिताचा नाश होतो; म्हणून तूं आतां सावध हो. [ अनधिकाऱ्यानें कोणताहि व्यवहार वा साधनानुष्ठान केलें तर त्या व्यवहाराचें–साधनाचें ' उचित ' फल त्यास प्राप्त होत नाहीं. फलनाश होतो; म्हणून अधिकारानुरूप वेदविहित व्यवहारांत, साधनांत प्रवृत्त होणें अवश्य आहे. हे यांतील तात्पर्य होय ] ८५. तूं व्यर्थ शोकाकुल का होतोस आणि ज्याचें आचरण केलें असतां कोणतेंहि काळीं दोष लागत नाहीं त्या आपल्या स्वधर्माकडे तूं लक्ष दें ८६. ज्याप्रमाणें सरळमार्गानें चाललें म्हणजे जसा कधींहि अपाय पोहोंचत नाहीं किंवा दिव्याच्या उजेडाचें साह्यानें चाललें असतां अडखळत नाहीं ८७. त्याप्रमाणें अर्जुना ! स्वधर्मानें वागले असतां त्याच्या सर्व इच्छा सहजच पूर्ण होतात ८८. म्हणून ह्यासाठींच तूं असें समज कीं, तुम्हां क्षत्रियांना संग्रामांवाचून दुसरें कांहीं योग्य नाहीं ८९. मनांत कपट न धरतां सामोरासमोर उभे राहून एकमेकांवर प्रहाराला प्रतिप्रहार करून युद्ध करावें, हें असो. प्रत्यक्ष तुला माहीत आहेच; त्या ज्ञात गोष्टीविषयीं आणखी आम्हीं काय सांगावें ? १९०.

**अन्वयार्थ**—**च हे पार्थ**–आणि हे अर्जुना–**यदृच्छया**–नशिबानें–**उपपन्नं**–प्राप्त झालेलें–**अपावृतं**–उघडलेलें–**स्वर्गद्वारं**–स्वर्गाचें द्वारच–**ईदृशं**–अशा प्रकारचें हें–**युद्धं**–युद्ध–**सुखिनः क्षत्रियाः लभन्ते**–मोठ्या भाग्यशाली क्षत्रियांना प्राप्त होतें ३२.

अर्जुना ! सांप्रतचे हें युद्ध म्हणजे तुमचें पूर्वजन्मीचें भाग्यच समजा ! अथवा सर्व धर्मांचा ठेवाच उघड रूपानें प्रगट झालेला आहे ! ९१. अरे! याला काय युद्ध म्हणावें? हा तर तुमच्या प्रतापानें मूर्तिमंत स्वर्गच तुम्हांपुढें युद्धरूपानें उभा केला आहे ९२. किंवा तुझ्या गुणांचा लौकिक ऐकून तुजवर अतिशय आसक्त झाल्यामुळें ही कीर्तिरूप स्त्रीच उत्कट स्वेच्छेनें तुला वरण्यास आली आहे ९३. अरे ! असल्याप्रकारचे युद्ध क्षत्रियाला सहज प्राप्त होणारें नव्हे. कारण, क्षत्रियानें पुष्कळ पुण्य करावें, तेव्हां त्याला हा असला युद्धप्रसंग प्राप्त होतो. परंतु ज्याप्रमाणें एखाद्याला मार्गानें जातांना इच्छित फळ देणारा चिंतामणि अकस्मात् सांपडावा ९४. किंवा जांभई आल्यामुळें तोंड पसरलें असतां त्यांत अकस्मात् अमृत येऊन पडावें, त्याप्रमाणें हा युद्धप्रसंग अनायासानें तुम्हाला प्राप्त झाला आहे, असें तूं समज ९५.

**अन्वयार्थ**—**अथ**–आतां–**त्वं**–**इमं धर्म्यं संग्रामं**–या धर्मरूप विहित संग्रामास–**न करिष्यसि चेत्**–जर न करशील–हें शास्त्र विहित युद्धहि न करशील–**ततः**–तर–**स्वधर्मं च कीर्तिं**–स्वधर्म व कीर्ति दोघांनाहि–**हित्वा**–सोडून–या दोघांनाहि मुकून–**पापं**–पापाला–**अवाप्स्यसि** जोडशील,–तुला पाप लागेल ३३.

आतां असला हा संग्राम टाकून नसत्या भलत्याच गोष्टीचा शोक करीत बसलास, तर तूं आपली आपणच हानि करून घेतली असें होईल ९६. ह्या रणाचे ठिकाणीं जर तूं आज शस्त्र टाकून दिलेंस, तर पूर्वजांनीं जोडून ठेवलेली पुण्यकीर्ति तूं स्वतः घालविलीस, असें होईल ९७. इतकेंच नव्हे, तर तुझ्या असलेल्या कीर्तीचाहि नाश होईल व सर्व जग तुझी निंदा करील; आणि मग अनेक मोठाले दोष तुला शोधीत येऊन गांठतील ९८. ज्याप्रमाणें पतिविरहित स्त्री सर्वतोपरी तिरस्करणीय होते. त्याप्रमाणेंच स्वधर्मावांचून स्वधर्मत्यागी जीविताची तशी दशा होते ९९. अथवा रणांत प्रेत पडलें म्हणजे ज्याप्रमाणें चोहोंकडून त्याला गिधाडें फाडतात–त्याप्रमाणें स्वधर्मविहीन मनुष्याला महादोष व्यापून टाकतात २००.

**अन्वयार्थ**—**भूतानि**–सर्व लोक–**ते**–तुझी–**अव्ययाम् अकीर्तिं च अपि**–अक्षय अपकीर्तीहि–**कथयिष्यन्ति**–सांगतील,–**च**–आणि–**संभावितस्य**–एखाद्या संभावित–मान्य पुरुषाची–**अकीर्तिः**–अपकीर्ति–**मरणात्**–मरणाहून–**अतिरिच्यते**–अधिक आहे ३४.

एवढ्याचकरितां जर तूं प्रस्तुत प्राप्त झालेल्या आपल्या धर्माचा त्याग करशील तर तुला पाप लागेल आणि कल्पांतापर्यंतहि अपकीर्तीचा डाग नाहींसा होणार नाहीं १. जोंपर्यंत अपकीर्ति झाली नाहीं तोंपर्यंतच व्यवहारज्ञ सज्जनानें जगावें; असें असतां तूंच सांग कीं, आतां या संग्रामांतून कसें परत फिरावें ? २. या संग्रामांतून तूं

१ प्रत्यवाय, दोष. २ अडखळत नाहीं. ३ मनोरथसिद्धि. ४ मूर्तिमंत. ५ नसतें. ६ हानि करणारा. ७ पतिविरहित. ८ चोहोंकडून. ९ जिंकतात. १० प्राप्त. ११ दूर होणार नाहीं.

निघसील कीर माघौता । परी ते गती समस्तां । न मनेल ययां ॥३॥ हे चहूंकडूनि वेढितील । बाणवरी घेतील । तेथ पार्थों न सुटिजेल । कृपाळुपणें ॥४॥ ऐसोनिहि प्राणसंकटें ॥ जरी विपायें पां निघणें घटे । तरी तें जियालेंही वोखटें । मरणाहुनी ॥५॥

भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः । येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥ ३५ ॥

तूं आणीकही एक न विचारिसी । एथ संभ्रमें झुंजों आलासी । आणि सकणवपणें निघालासी । मागुता जरी ॥ ६ ॥ तरी तुझें तें अर्जुना । या वैरियां दुर्जनां । कां प्रत्यया येईल मना । सांगैं मज ॥ ७ ॥

अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यन्ति तवाहिताः । निंदन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३६ ॥

हे म्हणती गेला रे गेला । अर्जुन आम्हां बिहाला । हा सांगैं बोलु उरला । निका कायी ? ॥ ८ ॥ लोक सायासें करूनि बहुतें । कां वेंचिती आपुलीं जीवितें । परी वाढविती कीर्तीतें । धनुर्धरा ॥ ९ ॥ ते तुज अनायासें । अनकळित जोडिली असे । हें अद्वितीय जैसें । गगन आहे ॥ २१० ॥ तैसी कीर्ती निःसीम । तुझ्या ठायीं निरुपम । तुझे गुण उत्तम । तिहीं लोकीं ॥ ११ ॥ दिगंतीचे भूपति । भाट होऊनि वाखाणिती । जे ऐकिलिया दचकती । कृतांतादिकं ॥१२॥ ऐसी महिमा घनवट । गंगा जैसी चोखट । जया देखीं जगीं सुभट । वोट जाहली ॥ १३ ॥ तें पौरुष तुझें अद्भुत । आइकोनियां हे समस्त । जाहले आथि विरक्त । जीवितेंसी ॥ १४ ॥ जैसा सिंहाचिया हांका । युगांतु होय मदमुखा । तैसा कौरवां अशेखां । धाकु तुझा ॥ १५ ॥ जैसे पर्वत वज्रातें । ना तरी सर्प गरुडातें । तैसे अर्जुना हे तूतें । मानिती सदा ॥ १६ ॥ तें अगाधपण जाईल । मग हीणावो अंगा येईल । जरी मागुता निघसील । न झुंजतुचि ॥ १७ ॥ आणि हे पळतां पळों नेदिती । धरूनि अवकळा करिती । न गणित कुटीं बोलती । आइकतां तुज ॥ १८ ॥ मग ते वेळीं हियें फुटावें । आतां लाठेपणें कां न झुंजावें ? । हे जिंतलें तरी भोगावें । महीतळ ॥ १९ ॥

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् । तस्मादुत्तिष्ठ कौंतेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥

ना तरी रणीं एथ । झुंजतां वेंचलें जीवित । तरी स्वर्गसुख अनकळित । पावसील ॥ २२० ॥ म्हणौनि ये गोठी । विचारु न करी किरीटी । आतां धनुष्य घेऊनि उठीं । झुजैं वेगीं ॥ २१ ॥ देखैं स्वधर्मु हा आचरतां । दोषु नाशे

मत्सररहित होऊन दयायुक्त अंतःकरणानें माघारा फिरशील खरा; परंतु ह्या सर्वांना ती गोष्ट वा तुझी स्थिति ही मुळींच पटणार नाहीं ३. हे कौरव तुला चोहींकडून–चारी बाजूंनीं घेरतील व तुजवर बाणांचा मारा करतील; पार्था, मग त्याप्रसंगीं ह्या तुझ्या कनवाळूपणानें कांहीं तुझी सुटका होणार नाहीं ४. इतकें करूनहि जर कदाचित् मोठ्या कष्टानें त्या प्राणसंकटांतून तुझी कशी तरी सुटका झाली, तरी तें तसे जगणें मरणापेक्षांहि वाईटच आहे ५.

**अन्वयार्थ–महारथाः** दुर्योधनादिक वीर–**त्वां**-तुला-**रणात्**–रणांतून–**भयात्**–भयानें–**उपरतं**–परतला असें–**मंस्यन्ते**–समजतील–**च**–आणि–**येषां**-ज्यांना–**त्वं**-तूं पूर्वी –**बहुमतः** [ अभूः तेषां तत्र तादृश्यः ] **भूत्वा**–बहुमत-मोठा शूर योद्धा–खरा क्षत्रिय म्हणून अतिशय मान्य झाला होतास, त्याच भीष्मादिकांस तसा मान्य होऊन–**लाघवं यास्यसि**-लघुत्वास–हलकेपणास–साक्षात् तिरस्कारास पात्र होशील ३५.

आणखी एका गोष्टीचा तूं विचार करीत नाहींस, तूं ह्या ठिकाणीं मोठ्या उत्सुकतेनें लढण्यासाठीं आलास आणि दया उत्पन्न झाल्यामुळें आतां माघारा परत जाण्यास फिरलास ६. तर तूंच मला सांग बरें! कीं तुझें तें दयाळूपण हे तुझे दुर्जन वैरी जे कौरव त्यांच्या मनाला खरें वाटेल कां! ७.

**अन्वयार्थ**—**च**-- व --**तव** --तुझ्या – **सामर्थ्यं** – सामर्थ्यास--**निदन्तः**-निंदणारे--**तव**--तुझे--**अहिताः**--शत्रु--**बहून् अवाच्यवादान्**--अनेक अवाच्य शब्द--**वदिष्यन्ति**-बोलतील--**ततः**--त्याहून--**दुःखतरं**--अधिक दुःखकर--**किं नु**--काय बरें ? ३६.

हे म्हणतील, "गेला रे गेला! अर्जुन आम्हांला भिऊन पळून गेला." अरे, असा हा तुझ्यावर लोकापवाद राहिला तर तो चांगला का? सांग ८. अर्जुना! वाटेल तें अनेक कष्ट करून, प्रसंगीं आपलें प्राणहि खर्ची घालतात; पण लोक कीर्तीचें संपादन करून वाढवितात ९. ती अनुपमेय व निष्प्रतिबंध कीर्ति तुला सायास न करतां पुरती लाभली आहे हें तुला आकाश जसें अद्वितीय आहे २१०. तशी ही अमर्याद व उपमारहित कीर्ति तुझ्या ठिकाणीं आहे व तुझें गुणहि उत्तम आहेत. अशी तिन्ही लोकांत ख्याति आहे ११. देशदेशांतरींचे राजेरजवाडे, स्तुतिपाठक होऊन तुझीच गुणकीर्ति गातात. ती ऐकून यमादिक देखील तुला भितात! १२. असा त्या तुझ्या कीर्तीचा महिमा गंगेच्या पाण्याप्रमाणें निर्मल व गहन आहे, आणि तो पाहून व ऐकून जगांतील मोठमोठ्या योद्ध्यांना कीर्ति संपादन करण्याचा तो एक मार्ग झाला आहे १३. असा तुझ्या अपूर्व शौर्याचा महिमा ऐकून हे सर्व कौरव आपल्या जीविताची आशा सोडून प्राणावर उदार झाले आहेत १४. ज्याप्रमाणें सिंहाची गर्जना ऐकल्याबरोबर मदोन्मत्त हत्तीलाहि प्रलयकाळच ओढवला असें वाटतें, त्याप्रमाणें ह्या सर्व कौरवांस तुझा धाकच वाटतो १५. ज्याप्रमाणें पर्वत वज्राला किंवा सर्प गरुडाला भयप्रद समजतात, त्याप्रमाणें हे कौरव तुला नेहमीं मानतात १६. तेव्हां आतांच तूं युद्ध न करितांच जर माघारी फिरशील. तर ही तुझी थोरवी-महती नाहीशीं होईल व मग तुझ्या अंगीं हीनत्व प्राप्त होईल १७. बरें! पळून जाऊ लागलास तर हे तुला जाऊ देणार नाहींत. तुला धरून आणून तुझी फजिती करतील, आणि तूं ऐकत असतां तुझ्या तोंडावर तुझी अतिशय निंदा करतील १८. ते मर्मभेदक शब्द ऐकून मग अंतःकरण विदीर्ण होण्यापेक्षां आतांच शौर्यानें कां युद्ध करूं नये? जर ह्यांना तूं जिंकिलेंस तर पृथ्वीचें राज्य भोगशील १९.

**अन्वयार्थ**—**हतः वा**–युद्धांत शत्रूकडून मारला गेलास तर –**स्वर्गं**–स्वर्गाला–**प्राप्स्यसि**–प्राप्त होशील–**जित्वा वा**–किंवा शत्रूंना तूं जर जिंकलेस, तर–**महीं भोक्ष्यसे**–पृथ्वीचा उपभोग घेशील–**तस्मात्**–यास्तव–**हे कौन्तेय**–हे कुंतीपुत्रा!–**कृतनिश्चयः**–मी शत्रूंना मारीन किंवा मरेन, असा निश्चय करून–**युद्धाय**–युद्ध करावयास–**उत्तिष्ठ**–ऊठ ३७.

अथवा ह्या रणामध्यें युद्ध करतांना तुझे प्राण खर्ची पडले तर अनायासाने सहजच स्वर्गसुख प्राप्त होईल २२०. म्हणून अर्जुना ह्याबद्दल आतां विचार करीत बसूं नकोस तर ऊठ आणि हातांत धनुष्य घेऊन लवकर युद्धास आरंभ कर २१. हें पहा या स्वधर्माचें आचरण केलें

१ आवेशानें, तयारीनें. २ अक्लेश, सहज. ३ स्तुतिपाठ करणारे. ४ यमादिक. ५ महायोद्धे. ६ तटस्थ, स्तब्ध. ७ उन्मत्त हत्तीला. ८ नीचपणा, कमीपणा. ९ कुशब्द, निंदा. १० हृदय. ११ उपद्रवरहित.

असता । तुज भ्रांति हे कवण चित्ता । पातकाची ॥ २२ ॥ सांगैं प्लवेंचि[१] काय बुडिजे । कां मार्गीं[२] जातां आडळिजे[३] । परी विपायें[४] चालों नेणिजे । तरी तेंही घडे ॥ २३ ॥ [५]अमृतें तरीच मरिजे । जरी विखेंसि[६] सेविजे । तैसा स्वधर्मीं दोषु पाविजे । हेतुकपणें[७] ॥ २४ ॥ म्हणौनियां पार्था । हेतू सांडोनि सर्वथा । तुज क्षात्रवृत्ति[८] झुंजतां । पाप नाहीं ॥ २५ ॥

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ । ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥**

सुखीं संतोषा न यावें । दुःखीं विषादा[९] न भजावें[१०] । आणि लाभालाभ न धरावे । मनामाजीं ॥ २६ ॥ [११]एथ विजयपण होईल । कीं सर्वथा देह जाईल । हें आधींचि कांहीं पुढील । चिंतावेनां[१२] ॥ २७ ॥ [१३]आपणयां उचिता । स्वधर्में राहाटतां[१४] । जें पावे तें निवांतां[१५] । साहोनि जावें ॥ २८ ॥ ऐसियां मनें होआवें । तरी दोषु न घडे स्वभावें । म्हणौनि आतां झुंजावें । निभ्रांत तुवां ॥ २९ ॥

**एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु । बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि ॥ ३९ ॥**

हे सांख्यें[१६]स्थिति मुकुळितें[१७] । सांगितली तुज येथ । आतां बुद्धियोगु[१८] निश्चित । अवधारीं पां ॥ २३० ॥ जया बुद्धियुक्ता । जाहलिया पार्था । कर्मबंधु सर्वथा । बाधूं न पवे ॥ ३१ ॥ जैसें वज्रकवच[१९] लेइजे । मग शस्त्रांचा वर्षावो साहिजे । परी जैतेसीं उरिजे । [२०]अचुंबित ॥ ३२ ॥

**नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते । स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥**

तैसें ऐहिक तरी न नशे । आणि मोक्षु तो उरला असे । जेथ पूर्वानुक्रमु दिसे । चोखाळत ॥ ३३ ॥ कर्माधारें राहाटिजे । परी कर्मफळ न निरीक्षिजे । जैसा मंत्रज्ञु न बांधिजे । भूतबाधा ॥ ३४ ॥ तियापरी जे सु[२१]बुद्धि । आपुलालिया निरवधि । हा असतांचि उपाधि । आकळूं न सके ॥ ३५ ॥ जेथ न संचरे पुण्यपाप । जें सूक्ष्म अति निष्कंप । गुणत्रयादि लेप । न लगती जेथ ॥ ३६ ॥ अर्जुना तें पुण्यवशें ।

१ नौकेने. २ रस्त्यानें. ३ अडखळावें. ४ कदाचित्. ५ दुधाने. ६ विषाबरोबर. ७ सकामतेनें. ८ क्षत्रिय धर्मानें. ९ खेदाला. १० मानावें. ११ समरांगणांत. १२ चिंतूं नये. १३ आपल्याला. १४ व्यवहार करीत असतां. १५ निमुटपणें. १६ ज्ञानयोग. १७ संक्षिप्त. १८ निष्काम कर्मयोग. १९ वज्राचें चिलखत. २० अबाधित. २१ ईश्वरार्पण बुद्धी.

तर असलेलेच दोष–पातकें नाश पावतात–असें असून या धर्म्य युद्धापासूनच मला पातक लागेल, हा भ्रम तुझ्या मनांत कोठून उत्पन्न झाला कोण जाणे ? २२. तूंच सांग कीं,–नावेनेंच कधीं कोणी बुडेल का ? किंवा चांगल्या रस्त्यानें जात असता कधीं ठेंच लागून अड-खळेल का ? परंतु कदाचित् एकाद्यास नीट चालतांच येत नसले तर–तेही होईल [ तो मात्र कदाचित् ठेंच लागून पडण्याचा संभव आहे ] २३. दूध प्याल्यानें मरण येणार नाहीं; ते दूधच परंतु विषासह सेवन केले तरच त्या दूध सेवन करणारास मरण येईल. त्याचप्रमाणें स्वधर्माचें आचरण केल्यानेंहि दोष मात्र लागतील, पण मनांत फलकामना धरली असेल तर २४. म्हणून, अर्जुना ! फलेच्छा सर्वथैव सोडून क्षत्रियधर्मानें युद्ध कर, म्हणजे पातकाचा लेशहि तुला लागणार नाहीं २५.

**अन्वयार्थ—सुखदुःखे**–सुख व दुःख यांना–**समे**–तुल्य–एकसारखे–**कृत्वा**–करून मानून–म्ह० सुखाविषयीं आसक्ति–राग व दुःखाविषयीं द्वेष न करतां–**लाभालाभौ च जयाजयौ [ समौ कृत्वा ]**–त्याचप्रमाणें लाभ व अलाभ, जय व पराजय यांनाहि तुल्य समजून–**ततः**–मग–**युद्धाय**–युद्ध करावयास–**युज्यस्व**–तयार हो–**एवं**-अशा भावनेनें युद्ध करूं लागलास म्हणजे–**पापं-न अवाप्स्यसि**–तुला पाप लागणार नाहीं ३८.

सुख प्राप्त झालें असतां संतोष मानूं नये, दुःख प्राप्त झालें असतां खेद मानूं नये आणि मनांत लाभ व हानी धरूं नये २६. ह्या युद्धांत आपल्यास जय मिळेल किंवा आपला देहच सर्वथैव नाहींसा होईल, ह्या पुढील गोष्टींचे अगोदरच चिंतन करीत बसूं नये २७. आपल्याला विहित अशा स्वधर्मानें वागत असतांना जें बरें वाईट प्रसंग प्राप्त होतील तें निमुटपणें सहन करीत जावेंत २८. अशा रीतीनें मनाचा निश्चय करून तूं युद्ध केलेस तर तुला दोष सहजच घडणार नाहींत. म्हणून तूं निःसंदिग्धपणें आतां युद्धास आरंभ कर २९.

**अन्वयार्थ—एषा**–ही–**ते**–तुला–**सांख्ये**–परमार्थ वस्तूच्या विवेकाविषयीं–**बुद्धिः**–ज्ञान–**अभिहिता**–सांगितली–**तु**–पण आतां–**योगे**–त्याच्या प्राप्तीच्या उपायाविषयींची–**इमां**–ही बुद्धि–**शृणु**–तूं ऐक–**पार्थ**–हे अर्जुना !–**यया बुद्धया युक्तः [ त्वं ]**–ज्या योगबुद्धीनें–युक्त झालेला तूं **कर्मबंधं**–कर्मरूप बंधाला–**प्रहास्यसि**–टाकशील ३९.

एथपर्यंत हा ज्ञानयोग तुला संक्षिप्तपणें सांगितला. आतां बुद्धियोग म्ह. निष्काम कर्ममार्ग, निश्चित सांगतों तो तूं ऐक. [ बुद्धियोग म्हणजे नित्य नैमितिक कर्मांची जी स्वर्गादि फलें त्याची इच्छा न करतां ईश्वरार्पणबुद्धीनें स्व-कर्म म्हणून कर्म करणें, याचेच नांव बुद्धियोग, नित्य-नैमित्तिक कर्मास दोन फाटे फुटतात; सकाम बुद्धीनें कर्म केले तर स्वर्गादि लोकप्राप्ति होते आणि तेंच कर्म निष्काम बुद्धीनें केले तर, वैराग्य, चित्तशुद्धि, विविदिषा, हरि-गुरु कृपा; ज्ञानद्वारां मोक्ष प्राप्ति होते. ] २३०. अर्जुना ! ज्यास निष्काम कर्म करण्याची हातवटी साधली म्हणजे त्याला कर्मबंध मुळींच बाधत नाहीं ३१. ज्याप्रमाणें अंगांत वज्रकवच, चिलखत घातलें म्हणजे शस्त्रांचीं वृष्टी सहन करता येते, इतकेंच नव्हे तर त्याला [ त्याच्या अंगाला ] शस्त्राचा स्पर्शहि न होतां खात्रीनें विजयी होऊन राहतां येते ३२.

**अन्वयार्थ—इह**–या मोक्षमार्गरूप कर्मयोगांत–**अभिक्रमनाशः**–आरंभिलेल्या कर्माचा नाश–**न अस्ति**–होत नाहीं. त्यांत–**प्रत्यवायः न विद्यते**–दोष नाहीं. **अस्य**–**धर्मस्य**–या योगरूप धर्माचें–**स्वल्पम् अपि**–थोडेसेंहि अनुष्ठान–**महतः भयात्**–संसाररूप मोठ्या भयापासून **त्रायते**–रक्षितें ४०.

त्याप्रमाणें इहलोकचें भोग्यसुख नाहीसें न होतां मोक्षहि अंतरत नाहीं. तो खात्रीनें ठेवल्यासारखाच आहे व ज्या निष्काम कर्मयोगांत पूर्वींपासून चालत आलेले पवित्र धर्मानुष्ठान शुद्धपणानें चालू राहिलेलें दिसून येते ३३. म्हणून निष्काम कर्मानुष्ठान करीत राहावें, परंतु त्या कर्म-फलाची इच्छा धरूं नये. – जसा पंचाक्षरी मंत्रवेत्ता असल्यामुळें भूतापासून बाधा पावत नाहीं ३४. त्याच-प्रमाणें कर्मफलाच्या ठिकाणीं आसक्ति न ठेवितां निरभि-मान बुद्धीनें कर्म करण्याची सद्बुद्धि पूर्णपणें आपलीशी झाली म्ह. प्राप्त झाली असतां हा उपाधींत असूनहि उपाधी त्याला जन्ममरणद्वारां बाधा करूं शकत नाहीं ३५. [ योगी ज्या परमतत्त्वरूप ब्रह्मस्थितीस प्राप्त होतात अर्थात् ] जेथें पुण्य-पापादि कर्मजन्य अदृष्टाचा प्रवेशच होत नाहीं, जे

जरी अल्पचि हृदयीं बुद्धि प्रकाशे । तरी अशेषहि नाशे । संसारभय ॥ ३७ ॥

व्यवसायात्मिका बद्धिरेकेह कुरुनंदन । बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१ ॥

जैसी दीपकलिका धाकुटी । परी बहु तेजातें प्रकटी । तैसी सद्बुद्धि हे थेकुटी । म्हणों नये ॥ ३८ ॥ पार्था बहुतीं परी । हे अपेक्षिजे विचारशूरीं । जे दुर्लभ चराचरीं । सद्वासना ॥ ३९ ॥ आणिकासारिखा बहुवसु । जैसा न जोडे परिसु । कां अमृताचा लेशु । दैवगुणें ॥ २४० ॥ तैसी दुर्लभ जे सद्-बुद्धि । जिये परमात्माचि अवधि । जैसा गंगेसी उदधि । निरंतर ॥ ४१ ॥ तैसें ईश्वरावांचुनी कांहीं । जिये आणीक लाणी नाहीं । ते एकचि बुद्धि पाहीं । अर्जुना जगीं ॥ ४२ ॥ येर ते दुर्मति । जे बहुधा असे विकरति । तेथ निरंतर रमती । अविवेकिये ॥ ४३ ॥ म्हणौनि तयां पार्था । स्वर्ग संसार नरकावस्था । आत्मसुख सर्वथा । दृष्ट नाहीं ॥ ४४ ॥

यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः । वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीतिवादिनः ॥ ४२ ॥

कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् । क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥

भोगैश्वर्यप्रसक्तानां तयाऽपहृतचेतसाम् । व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥

वेदाधारें बोलती । केवळ कर्म प्रतिष्ठिती । परी कर्मफळीं आसक्ती । धरूनियां ॥ ४५ ॥ म्हणती संसारीं जन्मिजे । यज्ञादिक कर्म कीजे । मग स्वर्गसुख भोगिजे । मनोहर ॥ ४६ ॥ येथ हें वांचूनि कांहीं । आणिक सर्वथा सुखचि नाहीं । ऐसें अर्जुना बोलती पाहीं । दुर्बुद्धि ते ॥ ४७ ॥ देखें कामना अभिभूत । होऊनि कर्में आचरत । ते केवळ भोगीं चित्त । देऊनियां ॥ ४८ ॥ क्रियाविशेषें बहुतें । न लोपिती विधीतें । निपुण होऊन धर्मातें । अनुष्ठिती ॥ ४९ ॥ परी एकचि कुंडें करितीं । जे स्वर्गकामु मनीं धरिती । यज्ञपुरुषा चुकती । भोक्ता जो ॥ २५० ॥ जैसा कर्पुराचा राशी कीजे । मग अग्नि लाऊन दीजे । कां मिष्टान्नीं संचरविजे । काळकूट ॥ ५१ ॥ दैवें अमृतकुंभ जोडला । तो पायें हाणोनि उलंडिला । तैसा नासिती धर्मु निपजला । हेतुकपणें ॥ ५२ ॥ सायासें पुण्य अर्जिजे । मग संसारु कां अपेक्षिजे ? । परी नेणती ते काय कीजे । अप्राप्य देखें ॥ ५३ ॥ जैसी रांधवणी रसंसोय निकी । करूनियां मोलें विकी । तैसा

सूक्ष्मातिसूक्ष्म आहे, जे चिरस्थिर आणि सत्वरजतम या त्रिगुणादिकांचा ज्यास मुळींच स्पर्शहि होत नाहीं ३६. अर्जुना! ते [ परब्रह्मतत्त्व ज्या बुद्धीचे अन्तिम साध्य आहे अशी ] सद्बुद्धि जर अनंतजन्मींच्या पुण्याईच्या बलानें थोडीशींच अंतःकरणांत प्रकाशित, प्रगट झाली तर तेवढ्यानेंच सर्व संसारभय नाहींसे होते ३७.

**अन्वयार्थ–हे कुरुनंदन**–हे कुरुवंशजा अर्जुना!--**इह**-या मोक्षमार्गांत--**व्यवसायात्मिका बुद्धिः**--ही निश्चयस्वभावाची बुद्धि--**एका**--एकच आहे--**अव्यवसायिनां**–अनिश्चयी पुरुषांच्या--**बुद्धयः**--बुद्धि--**बहुशाखाः**--अनेक प्रकारच्या -**च**--व **अनन्ताः**--**हि**--अनन्त आहेत हें प्रसिद्ध आहे ४१.

ज्याप्रमाणें दिव्याची[१] ज्योत लहानच असते तरीपण मोठा प्रकाश[२] पाडते, त्याप्रमाणें ही सद्बुद्धि अल्प[३] जरी असली तरी तिला लहान समजूं नये ३८. अर्जुना! जे विचारनिष्णात ज्ञानी आहेत ते अशा बुद्धीची अनेक प्रकारें उत्कट इच्छा[४] करितात; कारण ती सद्बुद्धि सहज प्राप्त होण्यासारखी नाहीं तर फारच दुर्लभ आहे ३९. ज्याप्रमाणें इतर दगडांसारखें[६] परीस कांहीं पुष्कळ[७] सांपडत नाहींत[८], अथवा लेशमात्र[९] अमृत प्राप्त होण्यास देखील तसा दैवयोगच लागतो २४०. त्याचप्रमाणें, परमेश्वरप्राप्तींतच जिचें अंतिम पर्यवसान होतें अशी ही सद्बुद्धि फार दुर्लभ आहे.--ज्याप्रमाणें गंगेचें पर्यवसान निरंतर समुद्रच आहे ४१.त्याप्रमाणें अर्जुना, जिला ईश्वरप्राप्तीवांचून दुसरी कांहीं प्राप्ति नाहीं, अंतिम साध्य नाहीं, अशी ती जगतामध्यें एकच बुद्धि, सद्बुद्धि आहे असें जाण ४२. इच्याशिवाय इतर बुद्धि त्या दुर्बुद्धि होत,कीं ज्या बुद्धींत फार विकार उत्पन्न होतात अशा बुद्धीच्या ठिकाणीं जे अविचारी आहेत तेच नेहमी रममाण होतात ४३. म्हणून अर्जुना! त्याच अविवेकी लोकांना स्वर्ग, संसार किंवा नरकावस्था प्राप्त होते; परंतु त्यांना आत्मसुखाचे मुळींच दर्शन ज्ञान होत नाहीं ४४.

**अन्वयार्थ—हे पार्थ**-- हे अर्जुना! **वेदवादरताः**--वेदांच्या अर्थवादांतच आसक्त झालेले--**अन्यत् न अस्ति इतिवादिनः**-स्वर्गादि फल देणाऱ्या कर्माहून दुसरें साधन नाहीं असें बोलणारें–**कामात्मानः**--कामस्वभाव--विषयमय झालेले -- **स्वर्गपराः** -- स्वर्गाला श्रेष्ठ पुरुषार्थ समजणारें असे--**अविपश्चितः**--अविवेकी लोक--**याम् इमां पुष्पितां**--ज्या फुललेल्या वृक्षाप्रमाणें वाटणाऱ्या --**जन्मकर्मफलप्रदां**-- जन्म हेंच कर्माचें फल देणाऱ्या--**भोगैश्वर्यगतिं प्रति क्रियाविशेषबहुलां**--भोग व ऐश्वर्य यांच्या प्राप्तीसाठीं जिच्यामध्यें अनेक प्रकारचीं कर्में सांगितली आहेत, अशा--**वाचं**--वाणीला-- **प्रवदन्ति**-- बोलतात -- **तया** --त्या वाणीनें--**अपहृतचेतसां**--ज्यांचें चित्त हरण केलें आहे अशा--**भोगैश्वर्यप्रसक्तानां**--भोग व ऐश्वर्य यांत अत्यंत आसक्त झालेल्या--[ **तेषां**--त्या अविवेक्यांच्या ]--**समाधौ** अंतःकरणात--**व्यवसायात्मिका बुद्धिः**--निश्चयस्वभाव--सांख्य--योगबुद्धि--**न विधीयते**--होत नाहीं ४२-४४.

ते [ पूर्वमीमांसक ] वेदाचे आधारानें अर्थात् प्रमाणपूर्वक बोलतात व दुर्दैवानें वेदाच्या स्तावक वचनांवर जोर देऊन केवळ कर्मयोगाचेंच श्रेष्ठत्व स्थापन करतात, परंतु त्या कर्मजन्य स्वर्गादि फलावर लोभ ठेवतात ४५. ते असें म्हणतात कीं, मृत्युलोकीं जन्मास यावे यज्ञादिक कर्मेंच करावीत व आल्हाददायक असें स्वर्गसुख भोगावें ४६. अर्जुना! ते दुर्बुद्धि लोक नेहमीं असें म्हणतात कीं, या लोकांत जीवाला स्वर्गसुखावांचून प्राप्त करून घेण्याच्या साधनानुष्ठानावांचून दुसरें कर्तव्यच नाहीं, आणखी दुसरें सुख मुळींच नाहीं ४७. असें पहा कीं, [ ते दुर्बुद्धीचे लोक ] कामनासक्त होऊन, फलाभिलाष भारानें दडपून जाऊन व केवळ भोगजन्य सुखावर चित्तवृत्ति, नजर ठेवूनच [ सकाम ] कर्में करीत असतात ४८. व अनेक प्रकारचीं क्रियात्मक अनुष्ठानें विधीचा मुळींच लोप होऊ न देता, तीं शेवटास नेण्याकरितां फार दक्षतेनें धर्माचरण करतात ४९. परंतु अर्जुना! ते एकच गोष्ट फार वाईट[१०] करतात ? ती ही कीं, ते मनामध्यें स्वर्गाची इच्छा धारण करतात; आणि यज्ञभोक्ता जो ईश्वर[११] त्याला विसरतात! २५०.–ज्याप्रमाणें कापुराचा ढीग करावा, आणि मग त्याला आग लावून द्यावी, अथवा मिष्टान्नांत काळकूट विष मिसळावें ५१. किंवा दैवयोगानें मिळालेल्या अमृताचा घडा पायानें लाथ मारून लवंडून द्यावा,–त्याप्रमाणें [ धर्मानुष्ठानानें ] संपादन केलेला धर्म क्षणिक फलप्राप्तीचे इच्छेनें वायां घालवितात ५२. अर्जुना! विचार कर कीं, मोठ्या परिश्रमानें पुण्य संपादन[१२] करावें, मग संसाराची क्षणिक इच्छा का करावी याचे आश्चर्य वाटते. परंतु काय करावें हें त्या अज्ञानी लोकांना सद्बुद्धि प्राप्त झाली नसल्यामुळें समजतच नाहीं ५३. अरे! उत्तम स्वयंपाकीण[१३] नानातऱ्हेचा चांगला स्वयंपाक

१ दिव्याची ज्योत. २ प्रकाशाला. ३ अल्प. ४ इच्छावी. ५ श्रेष्ठ विचारी पुरुषांनी. ६ इतर दगडादिकांप्रमाणें. ७ पुष्कळ. ८ मिळत नाहीं. ९ थेंब. १० वाईट. ११ ईश्वराला. १२ संपादावें. १३ स्वयंपाक करणारी. १४ पाकनिष्पत्ति

भोगासाठीं अविवेकी। धाडिती धर्मु ॥ ५४ ॥ म्हणोनि हे पार्था। दुर्बुद्धि देख सर्वथा। तया वेदवादरतां। मनीं वसे ॥ ५५ ॥

त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन। निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥ ४५ ॥

तिन्हीं गुणीं आवृत। हे वेद जाणें निभ्रांत। म्हणौनि उपनिषदादि समस्त। सात्विक तें ॥ ५६ ॥ येर रजतमात्मक। जेथ निरूपिजे कर्मादिक। जे केवळ स्वर्गसूचक। धनुर्धरा ॥ ५७ ॥ म्हणौनि तूं जाण। हे सुखदुःखांसीच कारण। एथ झणें अंतःकरण। रिगों देसी ॥ ५८ ॥ तूं गुणत्रयातें अव्हेरीं। मी माझें हें न करीं। एक आत्मसुख अंतरीं। विसंब झणीं ॥ ५९ ॥

यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके। तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥

जरी वेदें बहुत बोलिलें। विविध भेद सूचिले। तऱ्ही आपण हित आपुलें। तेंचि घेपें ॥ २६० ॥ जैसा प्रगटालिया गभस्ती। अशेषही मार्ग दिसती। तरी तेतुलेहि काय चालिजती। सांगें मज ॥ ६१ ॥ कां उदकमय सकळ। जऱ्ही जाहले असें महीतळ। तरी आपण घेपें केवळ। आर्तीचिजोगें ॥ ६२ ॥ तैसें ज्ञानीये जे होती। ते वेदार्थातें विवरिती। मग अपेक्षित तें स्वीकारिती। शाश्वत जें ॥ ६३ ॥

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन। मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥

म्हणोनि आइकें पार्था। याचिपरी पाहतां। तुज उचित होय आतां। स्वकर्म हें ॥ ६४ ॥ आम्हीं समस्तही विचारिलें। तंव ऐसेचि हें मना आलें। जें न सांडिजे तुवां आपुलें। विहित कर्म ॥ ६५ ॥ परी कर्म फळीं आस न करावी। आणि कुकर्मीं संगाति न व्हावी। हे सत्क्रियाचि आचरावी। हेतूविणें ॥ ६६ ॥

योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा धनंजय। सिध्दयसिध्दयोः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥

तूं योगयुक्त होऊनी। फळाचा संगु टाकुनी। मग अर्जुना चित्त देउनी। करीं कर्में ॥ ६७ ॥ परी आदरिलें कर्म दैवें। जरी समाप्तीतें पावे। तरी विशेषें तेथ तोषावें। हेंही नको ॥ ६८ ॥ कीं निमित्तें कोणें एकें। तें सिद्धी न वचतां ठाके। तरी तेथिंचेनि अपरितोखें। क्षोभावें ना ॥ ६९ ॥ आचरतां सिद्धी गेलें। तरी काजाची कीर आलें। परी ठेलियाही सगुण जहालें। ऐसेंचि मानीं ॥ २७० ॥ देखें जेतुलालें कर्म निपजे। तेतुलें आदिपुरुषीं अर्पिजे। तरी

तयार करून तो लोभानें द्रव्य घेऊन विकते,–त्याप्रमाणें हें अविचारी लोक सुखोपभोगासाठीं अनेक परिश्रम करून संपादिलेला हातीचा धर्म निष्फल दवडतात ९४. म्हणून अर्जुना! वेदांतील अर्थवादांत मग्न झालेल्या त्या लोकांच्या मनांत सर्वप्रकारें ही दुर्बुद्धीच वास करिते, हें लक्षांत असूं दे ९५.

**अन्वयार्थ—हे अर्जुन**--हे अर्जुना! **वेदाः त्रैगुण्य-विषयाः**--वेदांचा विषय त्रैगुण्य म्ह० संसार आहे--[ **त्वं-तूं**-- ] **निस्त्रैगुण्यः**--निष्काम--**निर्द्वंद्वः**--शीतोष्ण-सुखदुःख, लाभालाभ इत्यादि द्वंद्वांनीं रहित--**नित्यसत्त्वस्थः**--नेहमीं सत्त्वगुणी--**निर्योगक्षेमः**--योगक्षेमाची चिंता न करणारा व-**आत्मवान्**-आत्मस्वरूपाविषयीं सावधान-**भव**--हो ४५.

तूं निश्चयानें असें समज कीं, वेद सत्त्व, रज, तम या तीन गुणांनीं व्याप्त-भरलेले आहेत; म्हणून सर्व उपनिषदांची मात्र ज्ञान प्रधान असल्यामुळें सत्त्वगुणामध्यें गणना केली जाते ९६. धनुर्धरा बाकीचे [ वेदाचे भाग ] ज्यामध्यें कर्म, उपासना इत्यादिकांचें निरूपण केलेलें आहे, ते सर्व रज व तम ह्या गुणांनीं युक्त आहेत कारण ते केवळ स्वर्गसूचकच आहेत ९७. म्हणून तूं असें पक्कें समज कीं हें [ रजतमात्मक भाग ] केवळ सुखदुःखांनाच कारण आहेत; व ह्याकरितां तूं आपलें मन कदाचित् तेथें शिरूं देशील हो! पण तेथे तसे जाऊं देऊं नकोस ९८. तूं ह्या त्रिगुणांना टाकून दे, मी व माझें असा अहंममाध्यास धरूं नकोस, अंतःकरणांत एका आत्मस्वरूपसुखाला विसरशील पण विसरूं नकोस हो! ९९.

**अन्वयार्थ—उदपाने**-विहीर, आड, तळें, इत्यादि अनेक लहान लहान जलाशयांत-**यावान्**-जेवढा-**अर्थः**-कार्यभाग होतो-[ **सः सर्वः–तो** सर्व ]-**सर्वतः संप्लुतोदके**-चोहोंबाजूंनीं पाण्यानें भरलेल्या समुद्रादिकांत-**तावान्** [ **एव** ] तेवढाच होतो. त्याच न्यायानें-**सर्वेषु वेदेषु**-सर्व कर्मकांडरूप वेदांत [ **यः अर्थः** ]-जो अर्थ-जें फल मिळतें-[ **सः सर्वः** ] ती सर्व फलनिष्पत्ति-**विजानतः ब्राह्मणस्य**-[ **फले** ] विद्वान् ब्राह्मणाच्या फलांत-[ **तावान् एव** ] [ तेवढाच ] अंतर्भूत होते ४६.

जरी वेदांत पुष्कळ गोष्टी सांगितल्या आहेत, व [ अधिकार भेदानें ] अनेक प्रकारचें साधन मार्गहि सुचविले आहेत, तरी त्यांतील आपण आपलें ज्यांत हित असेल तेंच तेवढे घ्यावें २६०.–अरे! जसें सूर्योदय झाल्यावर सर्वच्या सर्व रस्ते दृष्टीस पडतात, परंतु, त्या सर्वच रस्त्यांनीं का मनुष्य चालतो? सांग बरें मला? ६१. अथवा, सर्व भूतल जरी जलमय झालें, तरी आपण आपल्या गरजेपुरतेंच त्यांतील पाणी घेतले पाहिजे ६२. त्याप्रमाणें ज्ञानी जे आहेत, जे विचारवान् मुमुक्षु आहेत ते वेदार्थाचा विचार करतात, मग वेदतात्पर्य विषयीभूत व आपल्याला अपेक्षित अशा शाश्वत ब्रह्मतत्त्वाचाच तेवढा स्वीकार करतात ६३.

**अन्वयार्थ—ते**-तुझा-**अधिकारः**-अधिकार-**कर्मणि एव**-कर्मांतच आहे-ज्ञानामध्यें नाहीं-कर्मे करीत असतांनाहि-**फलेषु** – फलांविषयीं – **कदाचन** – केव्हांहि – **मा**-तुझा अधिकार-तुझी तृष्णा नसो. त्याचप्रमाणें तूं-**कर्मफलहेतुः मा भूः**-कर्मफलाची इच्छा करून त्या फलाचें कारण-निमित्त होऊ नकोस. **ते संगः**-तुझी प्रीति-**अकर्मणि**-कर्मच न करणें, या गोष्टींत-**मा अस्तु**-न होवो ४७.

म्हणून अर्जुना! ह्या सर्व गोष्टींचा विचार करून पाहिले असतां तुला आतां स्वकर्मच उचित [ निश्चित फलप्रद ] आहे ६४. आम्हीं सर्व गोष्टींचा विचार करून पाहिला, तेव्हां आमचे मनास हे असेंच उचित म्हणून आलें कीं, तूं आपलें विहित असें कर्तव्यकर्म सोडूं नयेस, ६५. मात्र कर्मफलाची इच्छा ठेवूं नकोस आणि निषिद्ध कर्माकडेहि प्रवृत्ति होऊं देवूं नकोस. हे सत्कर्मांचेंच निष्काम वृत्तीने आचरण करावेंस ६६.

**अन्वयार्थ—हे धनंजय**-हे धनंजया!-**योगस्थः**-तूं योगांत स्थित होऊन-**सङ्गं त्यक्त्वा**-कर्मफलाविषयींची आसक्ति सोडून-**सिद्ध्यसिद्ध्योः समः भूत्वा**-सिद्धि व असिद्धि याविषयीं सम होऊन-**कर्माणि**-विहित कर्में-**कुरु**-कर-**समत्वं**-सिद्धि व असिद्धि यांना समान मानणें, हाच-**योगः उच्यते**-योग म्हटला जातो ४८.

अर्जुना! तूं निष्काम कर्मयोगानें युक्त होऊन फलाची इच्छा टाकून मन लावून वेदविहित कर्में करावीस ६७. परंतु दैवानुकुलतेनें आरंभिलेलें कर्म जरी त्या दैवयोगानेंच यथासांग पूर्ण झालें तरी त्याचा विशेष संतोष मानावा हेहि नको ६८. किंवा कोणत्याहि कारणानें तें कर्म सिद्धीस न जातां तसेंच राहिलें तरी त्याबद्दल मनांत असंतोष मानून त्रासूंहि नकोस ६९. आरंभिलेले कर्म करतांना जर शेवटास गेलें तर तें खरोखर आपल्या उपयोगालाच आलें; परंतु [ कदाचित् विघ्न येऊन ] अपुरें राहिलें, तरीहि ते सफल झालें असेंच समज २७०. कारण,

१ निषिद्धकर्मी, काम्यकर्मी. २ कारणाविण, निष्काम. ३ आशा. ४ असंतोषानें. ५ सफल. ६ ईश्वरीं.

परिपूर्ण सहजें । जहालें जाणें ॥ ७१ ॥ देखें संतासंतकर्मीं । हें जें सरिसेंपण मनोधर्मीं । तेचि योगस्थिति उत्तमीं । प्रशंसिजे ॥ ७२ ॥

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय । बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥
बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते । तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥ ५० ॥

अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाणें योगाचें । जेथ मन आणि बुद्धीचें । ऐक्य आथी ॥ ७३ ॥ तो बुद्धियोग विवरितां । बहुतें पाडें पार्था । दिसे हा अरुता । कर्मयोगु ॥ ७४ ॥ परी तेंचि कर्म आचरिजे । तरीच हा योगु पाविजे । जें कर्मशेष सहजें । योगस्थिति ॥ ७५ ॥ म्हणौनि बुद्धियोगु सधरु । तेथ अर्जुना होई स्थिरु । मनें करीं अव्हेरु । फलहेतूचा ॥ ७६ ॥ जे बुद्धियोगा योजिले । तेचि पारंगत जाहले । इहीं उभयबंधीं सांडिले । पापपुण्यीं ॥ ७७ ॥

कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः । जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयम् ॥ ५१ ॥

ते कर्मीं तरी वर्तती । परी कर्मफळा नातळती । आणि यातायाति न लोपती । अर्जुना तयां ॥ ७८ ॥ मग निरामयभरित । पावती पद अच्युत । ते बुद्धियोग-युक्त । धनुर्धरा ॥ ७९ ॥

यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति । तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥ ५२ ॥

तूं ऐसा तैं होसी । जैं मोहातें यया सांडिसी । आणि वैराग्य मानसीं । संचरैल ॥ २८० ॥ मग निष्कळंक गहन । उपजेल आत्मज्ञान । तेणें निचाडें होईल मन । अपैसें तुझें ॥ ८१ ॥ तेथ आणिक कांहीं जाणावें । कां मागिलातें स्मरावें । हें अर्जुना आघवें । पारुषेल ॥ ८२ ॥

श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला । समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ ५३ ॥

इंद्रियांचिया संगति । जिये पसरु होतसे मति । ते स्थिर होईल मागुती । आत्मस्वरूपीं ॥ ८३ ॥ समाधिसुखीं केवळ । जैं बुद्धि होईल निश्चळ । तैं पावसी तूं सकळ । योगस्थिति ॥ ८४ ॥

अर्जुन उवाच :—

स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव । स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ ५४ ॥

तेथ अर्जुन म्हणे देवा । हाचि अभिप्रावो आघवा । मी पुसेन आतां सांगावा । कृपानिधी ॥ ८५ ॥ मग अच्युत म्हणे सुखें । जें किरीटी तुज निकें । तें पूस पां

असें पहा–जेवढे म्हणून आपल्या हातून कर्म घडेल ते तेवढें सर्वच ईश्वराला अर्पण केलें म्हणजे ते सहजरीत्याच पूर्ण झालें, असें समज ७१. आणखी असें पहा कीं, पूर्ण-अपूर्ण किंवा चांगल्या व वाईट कर्माचे बाबतींत मनोधर्म सारखा समतोल रहाणें हीच योगस्थिति होय तिचीच ज्ञाते लोक वाखाणणी करतात ७२.

**अन्वयार्थ—हे धनंजय**–हे धनंजया!–**बुद्धियोगात्**–या समत्वबुद्धियुक्त कर्माहून किंवा ज्ञानयोगाहून–**कर्म**–फलाच्या इच्छेनें केलेलें कर्म–**दूरेण हि**–फारच–**अवरं**–निकृष्ट आहे–[ **अतः** ]–यास्तव–**बुद्धौ**–बुद्धींत-ज्ञानांत–**शरणम् अन्विच्छ**–आश्रय मिळविण्याची इच्छा कर. परमार्थज्ञानशरण हो. कारण–**फलहेतवः**–फलाच्या तृष्णेनें कर्मफलाचे हेतु होणारे कर्मठ–**कृपणाः**–कृपण–अज्ञ आहेत. –**बुद्धियुक्तः**–ज्ञानयुक्त पुरुष–ज्ञानी–**इह**–या लोकीं–**सुकृतदुष्कृते उभे**–पुण्य व पाप हीं दोन्ही–**जहाति**–सोडतो.–**तस्मात्**–म्हणून–**योगाय**–समत्वरूप योगाला–**युज्यस्व**–तूं तयार हो. समत्वरूप योगामध्यें सहजच स्थित होऊन ज्ञानप्राप्तीसाठीं कर्में कर, कारण–**योगः**–सिद्धि व असिद्धि यांना सम मानणें, हा योग–**कर्मसु**–कर्मांतील–**कौशलं**–कुशलता आहे ४९-५०.

अर्जुना! अशी चित्ताची जी समता तेंच योगाचें सार–तात्पर्य आहे, असें तूं समज. ज्या समतेंत मन [ क्रिया ] व बुद्धि [ ज्ञान ] यांचें ऐक्य असतें ७३. अर्जुना! त्या बुद्धियोगाविषयीं विचार करूं लागलें असतां [ अहंकार-युक्त व फलेच्छासहित ] हा [ सकाम ] कर्मयोग पुष्कळ प्रमाणानें कमी योग्यतेचा दिसतो ७४. परंतु त्या कर्माचें निरहंकार व निष्कामबुद्धीनें आचरण केलें तरच हा बुद्धि-योग साध्य होतो; कारण या कर्माची जी उत्तरावस्था म्ह. कर्मपर्यवसानरूप जी अवस्था तीच स्वाभाविक योगस्थिति होय ७५. म्हणून अर्जुना! बुद्धियोगच श्रेष्ठ आहे, आणि त्याचेच ठिकाणीं तूं निश्चल हो, आणि मनानें फलप्राप्ती-च्या आशेचा त्याग कर हो! ७६. ज्यांची बुद्धियोगाकडे प्रवृत्ती झाली, तेच ( भवांतून ) पार पडले आणि तेंच पाप व पुण्य या दोन्ही स्वरूपाच्या बंधनांतून सुटले ७७.

**अन्वयार्थ—हि**–कारण –**बुद्धियुक्ताः मनीषिणः**–ज्ञानानें युक्त असलेले विद्वान्–**कर्मजं फलं त्यक्त्वा**–कर्मा-पासून उत्पन्न होणारें सुख-दुःखरूप फल टाकून–**जन्म-बन्धविनिर्मुक्ताः** [ **सन्तः** ] जन्मरूप बंधनापासून सर्वथा मुक्त होत्साते–**अनामयं पदं**– सर्व उपद्रवरहित पदाला विष्णूच्या परम पदाला–**गच्छन्ति**–प्राप्त होतात ५१.

अर्जुना! ते कर्मांचे अनुष्ठान तर करतात; पण ते कर्मांच्या फलांची इच्छा धरीत नाहींत, म्हणून त्यांच्या जन्ममरणाच्या येरझारा–खेपा पार संपतात, म्हणजे जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सदाचीच सुटका होते ७८. हे अर्जुना! मग ते बुद्धियोगानुष्ठान करणारें लोक सर्वोपद्रव-रहित, ब्रह्मानंद भरित, अढळ, अविनाशी, अशा पदास पावतात ७९.

**अन्वयार्थ—यदा** ज्यावेळीं–**ते बुद्धिः**–तुझी बुद्धि–**मोहकलिलं**–मोहरूपी मलास–**व्यतितरिष्यति**–उल्लंघन करील–**तदा**–त्यावेळीं–**श्रोतव्यस्य च श्रुतस्य**–श्रवण कर-ण्यास योग्य व श्रवण केलेलें शास्त्रादिक यांच्या–**निर्वेदं**–वैराग्यास–**गन्तासि**–तूं प्राप्त होशील ५२.

जेव्हां तूं स्वजनांच्या मोहाचा त्याग करशील आणि तुझ्या मनांत आपण होऊन वैराग्य सहज उत्पन्न होईल तेव्हां तूं उपर्युक्त स्थितीस प्राप्त [ बुद्धियोगयुक्त ] होशील २८०. मग त्या योगाने निर्दोष आणि गहन असें आत्म-ज्ञान उत्पन्न होईल व त्यामुळें तुझें अंतःकरण सर्व प्रकारें सहजच निरिच्छ होईल ८१. त्या अवस्थेंत आणखीं कांहीं ज्ञान मिळवावें किंवा पूर्वी मिळविलेले ज्ञान ते पुनः आठवावें, हें सर्व अर्जुना! सहजच थांबेल ८२.

**अन्वयार्थ—श्रुतिविप्रतिपन्ना**– अनेक–साध्य–साधन-संबंध दाखविणाऱ्या श्रवणांनीं विक्षिप्त झालेली–**ते बुद्धिः**–तुझी बुद्धि–**यदा निश्चला** [ **सती** ]– जेव्हां विक्षेपरहित होऊन व–**अचला**–त्यांतूनहि विकल्पशून्य होऊन–**समाधौ**–आत्म्यामध्यें–**स्थास्यति**–स्थिर होईल–**तदा**–त्या वेळीं–**योगं**–खऱ्या मुख्य योगाला–**अवाप्स्यसि**–तूं प्राप्त होशील ५३.

अरे! इंद्रियांच्या संगतीनें जी बुद्धि चंचल होत असते तीच पुनः आत्मस्वरूपीं स्थिर होईल ८३. केवळ समाधि-सुखाचे शुद्ध आत्मसुखाचे ठिकाणीं जेव्हां तुझी बुद्धि स्थिर होईल, तेव्हांच तुला सर्व योगस्थिति प्राप्त होईल ८४.

**अन्वयार्थ—हे केशव**–हे केशवा! –**समाधिस्थस्य स्थितप्रज्ञस्य**–समाधिस्थ–आत्मनिष्ठ स्थितप्रज्ञाचें–**भाषा**–लक्षण–**का**–काय आहे? **स्थितधीः**–स्थितप्रज्ञ–**किं प्रभा-षेत**–काय बोलतो? **किम् आसीत**–तो कसा राहातो?–**किं व्रजत**–व्यवहार कसा करितो? ५४.

त्या वेळीं अर्जुन म्हणाला—देवा! कृपानिधे! आतां ह्याजबद्दलचाच खुलासा मी जो विचारीन, तो कृपा करून मला सांगावा ८५. मग श्रीकृष्ण म्हणतात–अर्जुना! जें तुला

१ बरेंवाईट. २ कमी योग्यतेचा. ३ बुद्धियोग. ४ कर्माचा शेवट. ५ जन्ममरणादि येरझारा. ६ ब्रह्मानंदभरित.

उन्मेखें । मनाचेनि ॥ ८६ ॥ या बोला पार्थें । म्हणितलें सांग पां श्रीकृष्णातें । काय म्हणिपे स्थितप्रज्ञातें । वोळखों केवीं ॥८७॥ आणि स्थिरबुद्धि जो म्हणिजे । तो कैसिया चिन्हीं जाणिजे । जो समाधिसुख भुंजे । अखंडित ॥ ८८ ॥ तो कवणें स्थिती असे । कैसेनि रूपीं विलसे । देवा सांगावें हें ऐसें । लक्ष्मीपती ॥८९॥ तंव परब्रह्म अवतरणु । जो षड्गुणाधिकरणु । तो काय तेथ नारायणु । बोलतु असे ॥ २९० ॥

श्रीभगवान् उवाच :—

**प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् । आत्मन्येवाऽऽत्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥**

म्हणे अर्जुना परियेसीं । जो हा अभिलाषु प्रौढ मानसीं । तो अंतराय स्वसुखेंसीं । करीतु असे ॥ ९१ ॥ जो सर्वदा नित्यतृप्तु । अंतःकरण भरितु । परी विषयामाजीं पतितु । जेणें संगें कीजे ॥ ९२ ॥ तो कामु सर्वथा जाये । जयाचें आत्मतोषीं मन राहे । तोचि स्थितप्रज्ञु होये । पुरुष जाणें ॥ ९३ ॥

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः । वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥**

नाना दुःखीं प्राप्तीं । जयासी उद्वेगु नाहीं चित्तीं । आणि सुखाचिया आर्तीं । अंडपैजेना ॥ ९४ ॥ अर्जुना तयाच्या ठायीं । कामक्रोधु सहजें नाहीं । आणि भयातें नेणें कहीं । परिपूर्णु तो ॥ ९५ ॥ ऐसा जो निरवधि । तो जाण पां स्थिरबुद्धि । जो निरसूनि उपाधि । भेदरहितु ॥ ९६ ॥

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् । नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥**

जो सर्वत्र सदा सरिसा । परिपुर्णु चंद्रु कां जैसा । अधमोत्तम प्रकाशा–। माजीं न म्हणे ॥ ९७ ॥ ऐसी अनवच्छिन्न समता । भूतमात्रीं सदयता । आणि पालटु नाहीं चित्ता । कवणें वेळे ॥ ९८ ॥ गोमटें कांहीं पावे । तरी संतोषें तेणें नाभिभंवे । जो वोखटेनि नागवे । विषादासी ॥ ९९ ॥ ऐसा हरिखशोकरहितु । जो आत्मबोधभरितु । तो जाण पां प्रज्ञायुक्तु । धनुर्धरा ॥ ३०० ॥

**यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः । इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥**

कां कूर्म जियापरी । उवाइलें अवेवें पसरी । ना तरी इच्छावशें आवरी । आपुले आपण ॥ १ ॥ तैसीं इंद्रियें आपैतीं होती । जयाचें म्हणितलें करिती । तयाची प्रज्ञा जाण स्थिति । पातली असे ॥ २ ॥

संतोषित, मोकळ्या, प्रसन्न मनानें योग्य वाटेल, तें खुशाल विचार " ८६. असें म्हटल्यावर अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला, स्थितप्रज्ञ [ ज्यांची बुद्धि स्थिर आहे तो ] कोणाला म्हणावें ? व त्यास ओळखावें कसे ? हें उघड करून सांगा बरे ! ८७. ज्याला स्थिरबुद्धि म्हणतात, व जो निरंतर समाधिसुख भोगतो तो कोणत्या चिन्हांनीं ओळखावा ? ८८. देवा ! लक्ष्मीपते ! तो कोणत्या स्थितींत असतो, व कोणत्या प्रकारें वर्तन करतो, हें कृपा करून मला सांगावें " ८९. तेव्हां षड्गुणैश्वर्यसंपन्न, सर्व गुणांचें अधिष्ठान व परब्रह्मावतार असे भगवान् श्रीकृष्ण काय बोलूं लागले २९०.

**अन्वयार्थ**—हे **पार्थ**–हे पार्था ! **यदा**–जेव्हां–**मनोगतान् सर्वान् कामान्**–मनांतील सर्व कामांस–**प्रजहाति**–सर्वथा सोडतो, आणि–**आत्मनि एव**–आत्म्यामध्येंच–**आत्मना तुष्टः**–आत्मस्वरूपानेंच संतुष्ट झालेला असतो–**तदा**–त्या वेळीं–**स्थितप्रज्ञः**–तो स्थितप्रज्ञ–**उच्यते**–म्हटला जातो ५५.

श्रीभगवान् म्हणतातः—अर्जुना ऐक. मनांतील जी बलवत्तर विषयासक्ति–कामवासना तीच आत्मानंदानुभवाला नेहमी प्रतिबंध–विघ्न करते ९१. [ वास्तविक आत्मा नित्य आनंदरूप आहे अशा ब्रह्मात्मैक्य ज्ञानामुळें ] जो सर्वदा सुखतृप्त असून ज्याचें अंतःकरण आत्मज्ञानानें, आनंदाने भरलेलें आहे, पण ज्या कामाच्या संगतीनें पुरुष विषयासक्त होऊन दीन केला जातो ९२. तो काम ज्याच्या मनांतून पूर्णतया निवृत्त होऊन गेलेला असतो; ज्याचें मन आत्मसंतोषांत म्हणजे आत्मानंदांत रममाण असतें, तोच पुरुष स्थितप्रज्ञ-स्थिरबुद्धि होय असें जाणावें ९३.

**अन्वयार्थ–दुःखेषु अनुद्विग्नमनाः**–आध्यात्मिकादि दुःखें प्राप्त झालीं असतां ज्याचें मन उद्विग्न होत नाहीं–**सुखेषु**–नाना प्रकारचीं सुखें प्राप्त झालीं असतां–**विगतस्पृहः**–त्याविषयींची ज्याची इच्छा गेलेली आहे म्ह० त्याविषयीं जो निरिच्छ असतो,–**वीतरागभयक्रोधः**–ज्याचे राग, प्रीति, भय व क्रोध निवृत्त झालेले असतात तो–**स्थितधीः**–स्थितप्रज्ञ–**मुनिः**–मुनि–**उच्यते** –म्हटला जातो ५६.

नाना प्रकारचीं दुःखें प्राप्त झालीं असतांहि ज्याच्या मनांत त्रास उत्पन्न होत नाहीं आणि जो सुखाच्या इच्छेमध्यें मुळींहि अडकून राहात नाहीं; ९४. अर्जुना ! त्या सत्पुरुषाचे अंतःकरणांतून कामक्रोध सहजच नाहींतसे झालेले असतात, व त्या पूर्णावस्थेस पोहोंचलेल्या पुरुषास केव्हांहि भयाचें नांव देखील माहित नसतें ९५. अशा प्रकारें जो कार्य-कारणात्मक उभय उपाधींचा निरास करून केवळ परिपूर्ण भेदरहित आत्मरूप झालेला असतो, तोच पुरुष स्थिरबुद्धि होय. असें समजावें ९६.

**अन्वयार्थ**–**यः**–जो–**सर्वत्र**–देह-जीवितादिकांविषयींहि –**अनभिस्नेहः**– प्रीति नसलेला–**तत् तत् शुभाशुभं प्राप्य**–तें तें शुभ वा अशुभ यांस प्राप्त होऊन–**न अभिनन्दति न द्वेष्टि**–अभिनंदन करीत नाहीं व द्वेष करीत नाहीं–**तस्य प्रज्ञा**–त्याची प्रज्ञा–त्याची बुद्धि–**प्रतिष्ठिता**–प्रतिष्ठित आहे ५७.

पौर्णिमेचा परिपूर्ण चंद्र जसा आपला प्रकाश देतेवेळीं हा चांगला हा वाईट असें म्हणत नाहीं तर सर्व लोकांस सारखा प्रकाश देतो, तसा सर्वांशीं सदैव सारखें वर्तन ठेवितो; ९७. त्याप्रमाणें अखंड समता आणि प्राणिमात्राविषयीं ज्याच्या चित्तांत दया असते. ज्याच्या चित्ताची स्थिति कोणत्याहि वेळीं पालटत नाहीं ९८. दैववशात् कांहीं चांगलें प्राप्त झालें तरी त्याच्या संतोषानें वश होऊन त्यांत अडकत नाहीं. आणि प्रतिकूल विषयाच्या प्राप्तिपासून दुःखाच्या तावडींत सांपडत नाहीं ९९. असा हर्षशोकरहित असतो व नेहमीं आत्मानुभूतिसंपन्न असतो. तोच, स्थिरबुद्धि होय असें समज ३००.

**अन्वयार्थ**—**च**–आणि–**कूर्मः**–कासव–**अंगानि इव**–आपले अवयव जसे एकदम आंवरून घेतो तसा–**अयं**–हा पुरुष–**यदा**–जेव्हां–**इंद्रियार्थेभ्यः**–विषयांपासून–**इंद्रियाणि**–इंद्रियें–**सर्वशः**–सर्व प्रकारें – **संहरते** – परतवून घेतो–[ **तदा** ]–तेव्हां–**तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता**–त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित झाली आहे ५८.

किंवा कांसव आनंदांत असतांना आपले हातपाय जसें पसरतें अथवा वाटेल तेव्हां आपले आपण आंवरून घेतें १. त्याप्रमाणें ज्याचीं इंद्रियें स्वाधीन असतात व तीं तो आपल्या इच्छेप्रमाणें जशी आज्ञा करील तसें वागतात, त्याची बुद्धि स्थिरतेस पावली आहे असें समज २.

---

१ स्थिरबुद्धि. २ भोगतो. ३ परब्रह्माचा अवतार. ४ यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य आणि ऐश्वर्य ह्या सहा गुणांचें स्थान. ५ आत्मसुखाला. ६ आशेला. ७ अडचणींत पडत नाहीं, गुंतत नाहीं. ८ प्राणिमात्रांवर. ९ बेहोष होत नाही. १० स्थिरबुद्धीचा. ११ कासव. १२ आंखडलेला. १३ अवयव. १४ स्वाधीन.

विषया विनिवर्तंते निराहारस्य देहिनः । रसवर्जं रसोप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥

अर्जुना आणिकही एक । सांगेन ऐकें कवतिक । या विषयांतें साधक त्यजिती नियमें ॥ ३ ॥ श्रोत्रादि इंद्रियें आवरिती । परि रसने नियमु न करिती । ते सहस्रधा कवळिजती । विषयीं इहीं ॥ ४ ॥ जैसी वरिवरि पालवी खुडिजे । आणि मुळीं उदक घालिजे । तरी कैसेनि नाशु निपजे । तया वृक्षा ॥ ५ ॥ तो उदकाचेनि बळें अधिकें । जैसा आडवेनि आंगें फांके । तैसा मानसीं विषो पोखे । रसनाद्वारें ॥ ६ ॥ येरां इंद्रियां विषय तुटे । तैसा नियमूं न ये रस हेंटें । जे जीवन हें न घटे । येणेंविण ॥ ७ ॥ मग अर्जुना स्वभावें । ऐसियाही नियमातें पावे । जैं परब्रह्म अनुभवें । होऊनि जाइजे ॥ ८ ॥ तैं शरीरभावँ नासती । इंद्रियें विषय विसरती । जैं सोहंभावँ प्रतीति । प्रगट होय ॥ ९ ॥

यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितः । इंद्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥ ६० ॥

येऱ्हवीं तरी अर्जुना । हें आयां नये साधना । जे राहटताती जतना । निरंतर ॥ ३१० ॥ जयातें अभ्यासाची घरटी । यमनियमांची तोंटी । जे मनातें सदा मुठी । धरूनि आहाती ॥ ११ ॥ तेही किजती कासाविसी । या इंद्रियांची प्रौढी ऐसी । जैसी मंत्रज्ञातें विवंसी । भुलवी कां ॥ १२ । देखैं विषय हे तैसे । पावती ऋद्धि-सिद्धीचेनि मिषें । मग आकाळिती स्पर्शें । इंद्रियांचेनि ॥ १३ ॥ तिये संधीं मन जाये । मग अभ्यासीं ठेठावलें ठाये । ऐसें बळकटपण आहे । इंद्रियांचें ॥ १४ ॥

तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः । वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥

म्हणौनि आइकें पार्था । यांतें निर्दळी जो सर्वथा । सर्व विषयीं आस्था । सांडूनियां ॥ १५ ॥ तोचि तूं जाण । योगनिष्ठेसी कारण । जयाचे विषयसुखें अंतःकरण । झकवेना ॥ १६ ॥ जो आत्मबोधयुक्तु । होऊनि असे सततु । जो मातें हृदयाआंतु । विसंबेना ॥ १७ ॥ येऱ्हवीं बाह्य विषय तरी नाहीं । परी मानसीं होईल जरी कांहीं । तरी साद्यंतुचि पाहीं । संसारु असे ॥ १८ ॥ जैसा कां विषाचा लेशु । घेतलियां होय बहुवसु । मग निभ्रांत करी नाशु । जीवितासी ॥ १९ ॥ तैसी विषयाची शंका । मनीं वसती देखा । घातु करी अशेखा । विवेकजाता ॥ ३२० ॥

ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते । संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥

**अन्वयार्थ—निराहरस्य**—जो विषयांचें हरण करूं शकत नाहीं, अनुभव घेऊं शकत नाहीं, अशा उपाशीं किंवा अशक्त—**देहिनः**—प्राण्यापासूनहि—**विषयाः**—शब्द-स्पर्शादि विषय—**रसवर्जं**—प्रीतीवांचून—**विनिवर्तन्ते**-निवृत्त होतात. [ विषयासक्तीसह निवृत्त होत नाहींत. ]—**अस्य**—या स्थितप्रज्ञाचा—**रसः अपि**—तो विषयासक्तीरूप रसहि **परं दृष्ट्वा**—परमार्थतत्वाचा अनुभव घेऊन—**विवर्तते**—निवृत्त होतो ५९.

अर्जुना! आणखी एक मौजेची गोष्ट तुला सांगतो; ऐक. जे साधक या विषयांचा नियमानें निग्रहपूर्वक त्याग करितात, ३. श्रोत्रादि इंद्रियांना आवरतात, परंतु जिभेला मात्र निग्रहाने आवरीत नाहींत, ते ह्या विषयांकडून हजारो प्रकारांनी वेढले जातात ४. एखाद्या वृक्षाची वरची वरची पालवी खुडली आणि त्याच्या मुळाला पाणी घातलें तर वृक्षाचा नाश कसा होईल? ५. तो वृक्ष जसा उदकाच्या बळानें अधिक आडव्या अंगाने फोफावतो त्याप्रमाणें ह्या रसनेच्या द्वारें म्हणजे हवा तसा अन्नरस घेतला असतां अंतःकरणांत विषयवासना पोसल्या जाऊन अधिकाधिकच पुष्ट होतात ६. जसे इतर इंद्रियांचे विषय निग्रहाने कमी केले असतां कमी होतात; पण त्याचप्रमाणें जिव्हेचा रस हा विषय हट्टानें कमी करतां येत नाहीं; कारण यावांचून [ शरीर ] जिवंतच राहणे शक्य नाहीं ७. पण या रसनेंद्रियाचा विषय तुटावा कसा? असें म्हणशील तर, अर्जुना! जेव्हां साधक श्रीगुरुकृपेने परब्रह्माच्या अपरोक्षानुभवद्वारा ब्रह्मरूप होईल तेव्हांच रसनेंद्रियाची लालसा शिथिल होईल. मग अशाहि रसनेचे सहज नियमन होऊं शकतें ८. अरे! ज्या वेळीं ते ब्रह्म मीच आहें असा साक्षात्कारात्मक अनुभव येतो, त्यावेळीं शरीराचे व्यवहार नाहींसे म्ह. बाधित होतात [ दृढ मिथ्यात्वनिश्चय ] होऊन इंद्रियें आपापले विषयांना विसरून जातात ९.

**अन्वयार्थ—हि**—कारण—**हे कौन्तेय**—हे कुंतीपुत्रा!—**यततः अपि**—यत्न करणाऱ्याहि—**विपश्चितः पुरुषस्य**—बुद्धिमान् पुरुषाची—**प्रमाथीनि इंद्रियाणी**—व्याकुळ करणारीं इंद्रियें—**मनः**—त्याच्या मनाला—**प्रसभं**—बलात्कारानें—**हरन्ति**—हरण करितात ६०.

येव्हवी अर्जुना! [ असे न झाले तर ] ही इंद्रियें इतर दुसऱ्या कोणत्याहि साधनानुष्ठानानें स्वाधीन होत नाहींत म्हणून जे या इंद्रियांना जिंकण्याकरितां जपून-दक्षतेनें निरंतर प्रयत्न करतात ३१०. जे साधक आपल्या भोंवतीं अभ्यासाचें घरटें करून यमनियमांची ताटी लावितात आणि मनाला तर सदा मुठींत धरून असतात ११. अशा साधकांलासुद्धां हीं इंद्रियें विषय भोगण्याकरितां व्याकुळ करून टाकतात. अरे एवढा या इंद्रियांचा प्रताप आहे. ज्याप्रमाणें मांत्रिकांस जखीण, हडळ भुलवून चकविते १२. त्याप्रमाणेंच पहा हें विषय ऋद्धिसिद्धींच्या रूपानें योग्याला प्राप्त होतात व इंद्रियासंबंधद्वारां योग्यांचीहि मनें भ्रष्ट करितात १३. त्याप्रमाणें इंद्रियांच्या कचाट्यांत मन सांपडलें तर ते मन पंगु झाल्यामुळें अभ्यास जागच्या जागीं राहतो. असा ह्या इंद्रियांचा मोठा प्रताप आहे! १४.

**अन्वयार्थ—तानि सर्वाणि**—त्या सर्व इंद्रियांचें—**संयम्य**—संयमन करून—त्यांना आपल्या वश ठेवून—**युक्तः**—शांतचित्त व—**मत्परः**—मीच ज्याला श्रेष्ठ आहे, दुसरा कोणी श्रेष्ठ नाहीं, असें होऊन—**आसीत**—राहावें,—**हि**—कारण—**इंद्रियाणि**—इंद्रियें—**यस्य**—ज्याच्या—**वशे**—आधीन असतात—**तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता**—त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित असते ६१.

म्हणून अर्जुना ऐक! जो सर्व विषयांची आसक्ति-इच्छा सोडून या इंद्रियांना सर्वतोपरी दमन करून आपल्या स्वाधीन ठेवतो १५. व ज्याचें अंतःकरण विषयांच्या सुखानें मुळून फसले जात नाहीं, तोच योगनिष्ठा प्राप्त होण्यास योग्य अधिकारी आहे, असें जाण १६. कारण, तो नेहमीं आत्मज्ञानानें संपन्न होऊन राहतो व अंतःकरणांत मला कधींहि विसरत नाहीं १७. एरवीं कोणी एखाद्याने शब्दादि बाह्य विषयांचा स्वीकार तर केलाच नाहीं, पण मनांत जर विषयांची थोडीशीहि वासना असेल तर, त्याला आरंभापासून शेवटपर्यंत सर्व संसार [ जन्ममरणाचा फेरा ] आहेच तो चुकत नाहीं असें समज १८. विष हें सेवन करते वेळीं जरी थोडें असलें तरी ते परिणामीं फार होते व मग तें शरीरांत पसरून जीवाचा निःसंशय नाश करितें १९. त्याप्रमाणें मनांत विषयांची सूक्ष्म संस्काररूप थोडी इच्छा राहिली तरी ती सर्व विचारसमूहाचा घात करिते! ३२०.

**अन्वयार्थ—विषयान् ध्यायतः पुंसः**—विषयांचें ध्यान—चिंतन करणाऱ्या पुरुषाची—**तेषु**—त्या विषयांचे ठिकाणीं—**सङ्गः**—प्रीति-आसक्ति—**उपजायते**—उत्पन्न होते—**सङ्गात्**—आसक्तीमुळें **कामः**—विषयाविषयींची इच्छा—**संजायते**—उत्पन्न होते.—**कामात्**—विषयेच्छेपासून—**क्रोधः**—क्रोध—**अभिजायते**—उत्पन्न होतो ६२.

१ योगसाधन करणारे मुमुक्षु. २ आग्रहानें, हट्टानें. ३ व्यवहार बंद होतात. ४ आपण ब्रह्म आहो असा अनुभव.

क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः । स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥

जरी हृदयीं विषय स्मरती । तरी निसंगाही आपजे संगती । संगें प्रगटे मूर्ति । अभिलाषाची ॥ २१ ॥ जेथ कामु उपजला । तेथ क्रोधु आधींचि आला । क्रोधीं असे ठेविला । संमोह जाणें ॥ २२ ॥ संमोहा जालिया व्यक्ति । तरी नाशु पावे स्मृति । चडवातें ज्योति । आहत जैसी ॥ २३ ॥ कां अस्तमानीं निशी । जैसी सूर्य तेजातें ग्रासी । तैसी दशा स्मृतिभ्रंशीं । प्राणियांसी ॥ २४ ॥ मग अज्ञानांध केवळ । तेणें आप्लविजे सकळ । तेथ बुद्धि होय व्याकुळ । हृदयामाजीं ॥ २५ ॥ जैसें जात्यंधा पळणीं पावे । मग ते काकुळती सैरा धांवे । तैसें बुद्धीसि होती भंवे । धनुर्धरा ॥ २६ ॥ ऐसा स्मृतिभ्रंशु घडे । मग सर्वथा बुद्धि अवघडे । तेथ समूळ हें उपडे । ज्ञानजात ॥ २७ ॥ चैतन्याच्या भ्रंशीं । शरीरा दशा जैशी । तैसें पुरुषा बुद्धिनाशीं । होय देखें ॥ २८ ॥ म्हणौनि आइकें अर्जुना । जैसा विस्फुलिंग लागे इंधना । मग तो प्रौढ जालिया त्रिभुवना । पुरों शके ॥ २९ ॥ तैसें विषयांचें ध्यान । जरी विपायें वाहे मन । तरी येसणें हें पतन । गिंवसित पावे ॥ ३३० ॥

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् । आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥

म्हणौनि विषय हे आघवे । सर्वथा मनौनि सांडावे । मग रागद्वेष स्वभावें । नाशतील ॥ ३१ ॥ पार्था आणिकही एक । जरी नाशले रागद्वेष । तरी इंद्रियां विषयीं बाधक । रमतां नाहीं ॥ ३२ ॥ जैसा सूर्य आकाशगतु । रश्मिकरें जगातें स्पर्शतु । तरी संगदोषें काय लिंपतु । तेथिचेनि ॥ ३३ ॥ तैसा इंद्रियार्थीं उदासीन । आत्मरसेंचि निर्भिन्न । जो कामक्रोधविहीन । होऊनि असे ॥ ३४ ॥ तरी विषयां तयां कांहीं । आपणपेंवांचूनि नाहीं । मग विषय कवण कायी । बाधितील कवणा ॥ ३५ ॥ जरी उदकीं उदक बुडिजे । कां अग्नि आगी पोळिजे । तरी विषयसंगें आप्लविजे । परिपूर्णु तो ॥ ३६ ॥ ऐसा आपणचि केवळु । होऊनि असे निखळु । तयाचि प्रज्ञा अचळु । निभ्रांत मानीं ॥ ३७ ॥

प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते । प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥

देखें अखंडित प्रसन्नता । आथी जेथ चित्ता । तेथ रिगणें नाहीं समस्तां । संसारदुःखां ॥ ३८ ॥ जैसा अमृताचा निर्झरु । प्रसवे जयाचा जठरु । तया क्षुधेतृषेचा अडदरु । कहींचि नाहीं ॥ ३९ ॥ तैसें हृदय प्रसन्न होये । तरी दुःख

**क्रोधात्** - क्रोधापासून - **सम्मोहः** अविवेक - **भवति** होतो. -**सम्मोहात्**-कार्य व अकार्य यांच्या अविवेकापासून - **स्मृतिविभ्रमः** - स्मृतिभ्रंश होतो-शास्त्रादिकांच्या उपदेशाची आठवण नाहींशी होते-**स्मृतिभ्रंशात्**-आठवण नाहींशी झाल्यामुळें-**बुद्धिनाशः**-बुद्धीचा नाश होतो व **बुद्धिनाशात्**-बुद्धीचा नाश झाल्यामुळें-**प्रणश्यति**-पुरुष नाश पावतो. तो पुरुषार्थाला योग्य होत नाहीं ६३.

अरे! अंतःकरणांत विषयांची [ भोग्यत्व रूपानें ] नुसती आठवण जरी झाली तरी संगरहित विरक्तालाहि पुनः त्या विषयाचा संग घडतो व त्या विषयासक्तिद्वारां मूर्तिमंत काम उत्पन्न होतो २१. जेथें काम उत्पन्न झाला तेथें [ त्या अगोदरच ] क्रोध आपले बिऱ्हाड घेऊन ठेवल्यासारखा आलाच म्हणून समज व क्रोध जेथें आला तेथें कर्तव्याकर्तव्याविषयीचा अविचार हा ठेविलेला आहेच.असें जाण २२. ज्याप्रमाणें दिव्याची ज्योत प्रचंड वाऱ्यानें नाहींशी होते, त्याचप्रमाणे संमोह अभिव्यक्त झाला कीं अविचारामुळें स्मृति नाश पावतें २३. सूर्य मावळण्याची वेळ होतांच रात्र जशी सूर्यतेजाला गिळून टाकते-त्याप्रमाणें स्मृतिचा भ्रंश झाल्यावर मनुष्याची तशी दयनीय दशा होते २४. मग केवळ अज्ञानांधता होऊन तद्द्वारां सर्व व्यापिले जाते; तेव्हां अंतरांत बुद्धिहि व्याकुळ होते. [ सर्वत्र केवळ अज्ञानांधकार होतो; त्याचेच सर्वांवर आवरण पडते; त्यामुळें त्याची बुद्धि आंधळी होऊन त्याला कांहीं सुचेनासें होते व मग तो परमात्म-प्राप्तीस सर्वथैव आंचवतो ] २५. जसा जन्मांधाला पळण्याचा प्रसंग प्राप्त झाला तर तो अगतिकतेने दीन होऊन सैरावैरा धावूं लागतो, त्याप्रमाणें अर्जुना! मग बुद्धीला भ्रमण होतें २६. अशा रीतीनें [ बुद्धीला ] स्मृति भ्रंश झाला म्हणजे मग बुद्धि सर्वतोपरी घोंटाळ्यांत पडते आणि मग सर्वच्या सर्व ज्ञान समूळ नष्ट होतें २७. शरीरांतील प्राण निघून गेला म्हणजे देहाची प्रेतरूप दशा होते-त्याप्रमाणें बुद्धि नष्ट झाल्यावर त्या जीवाची स्थिति होते असें जाण २८. म्हणून अर्जुना ऐक, जळणाला ठिणगी लागली व ती एकदां कां भडकली म्हणजे मग ती जशी त्रिभुवनाला देखील जाळण्यास पुरती समर्थ होते २९. त्याप्रमाणें विषयांचें स्मरण अंतःकरणाकडून चुकून यत्किंचित् जरी झालें, तरी एवढा हा अनर्थ त्यास शोधीत येतो! ३३०.

**अन्वयार्थ—तु**-परंतु-**रागद्वेषवियुक्तः**-रागद्वेषरहित-**आत्मवश्यैः**-व आपल्या वश असलेल्या-**इंद्रियैः**-इंद्रियांनीं-**विषयान्** -विषयांचा - **चरन्** - अनुभव घेणारा-**विधेयात्मा**-ज्याच्या इच्छेप्रमाणें चालणारें अंतःकरण असतें असा-**प्रसादं**-चित्ताच्या स्वास्थ्यास-**अधिगच्छति** प्राप्त होतो ६४.

म्हणून साधकानें पूर्णपणें मनांतूनच हे सर्व विषय काढून टाकावे. अर्थात् विषयांतील अनित्यत्व, जडत्व, मिथ्यात्वादि दोषदर्शनाने त्यापासून परावृत्त व्हावे. म्हणजे राग, प्रीति आणि द्वेष [ अप्रीति ] हे आपोआप नाहींतसे होतात ३१. अर्जुना! आणखी एक गोष्ट तुला सांगतों कीं, राग द्वेष नाहींतसे झाल्यावर जरी इंद्रियें विषयांचे ठिकाणीं रममाण झालीं, तरी ते विषय [ सिद्धाला ] बाधक होत नाहींत ३२. ज्याप्रमाणें आकाशांतून सूर्य हा आपल्या किरणरूपी हातांनीं साऱ्या जगाला स्पर्श करितो, परंतु त्यांच्या संसर्गदोषानें सूर्य लिप्त होतो काय? [ नाहीं! ] ३३. त्याप्रमाणें जो ज्ञानवान विषयांचें ठिकाणीं मिथ्यात्वनिश्चयामुळें उदासीन, आत्मानंदांत निमग्न व कामक्रोधापासून अलिप्त असतो ३४. आणि ज्याला विषयामध्येंहि आपल्या आत्मस्वरूपाहून भिन्न असें दुसरें कांहींच दिसत नाहीं, त्याला विषय तरी कसले? आणि बाधतील तरी कोणाला? ३५. अरे जर पाण्यांत पाणी बुडेल, अग्नीनें अग्नि जळेल-तर मात्र तो परिपूर्णत्वावस्थेस पावलेला पुरुष विषयांचे संगतीनें लिप्त होईल ३६. अशा प्रकारें जो आपण स्वतःच शुद्ध आत्मस्वरूप होऊन राहतो, तोच अचलप्रज्ञ [स्थिरबुद्धि होय ]असें निःसंदिग्धपणे समज ३७.

**अन्वयार्थ-प्रसादे**-चित्तप्रसाद झाला असतां-चित्त स्वस्थ झालें असतां,-**अस्य**-याच्या-**सर्वदुःखानां**-सर्व-आध्यात्मिकादि त्रिविध दुःखांची **हानिः**-हानि नाश-**उपजायते**-होते व-**हि**-ज्याअर्थी-**प्रसन्नचेतसः**-ज्याचें चित्त प्रसन्न झालें आहे त्याचें-**बुद्धिः**-चित्त-मन-**आशु**-सत्वर-**पर्यवतिष्ठते**-सर्व बाजूनीं स्थिर होतें, त्याअर्थी राग-द्वेषरहित इन्द्रियांनीं अनिषिद्ध व अगदीं अवश्य तितक्याच विषयांचा अनुभव घ्यावा ६५.

असें पहा कीं-ज्या ठिकाणीं मनाचीं निरंतर पूर्ण शांति आहे, तेथें ह्या सर्व संसारदुःखांचा प्रवेश होतच नाहीं ३८. अरे! ज्याचे उदरांतच अमृताचा झरा उत्पन्न झाला आहे, त्याला जशी तहानभुकेची कधींच पीडा-भय नसते ३९. त्याचप्रमाणें ज्याचे अंतःकरण प्रसन्न आहे त्याला

कैचें कें आहे ?। तेथ आपैसी बुद्धि राहे। परमात्मरूपीं ॥३४०॥ जैसा निर्वातीचा दीपु। सर्वथा नेणें कंपु। तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूपु। योगयुक्तु ॥ ४१ ॥

नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना। न चाभावयतः शांतिरशान्तस्य कुतः सुखम् ॥ ६६ ॥

ये युक्तीची कडसणी। नाहीं जयाच्या अंतःकरणीं। तो आकळिला जाण गुणीं। विषयादिकीं ॥ ४२ ॥ तया स्थिरबुद्धि पार्था। कहीं नाहीं सर्वथा। आणि स्थैर्याची आस्था। तेही नुपजे ॥ ४३ ॥ निश्चळत्वाची भावना। जरी नव्हेचि देखें मना। तरी शांति केवीं अर्जुना। आपु होय ॥४४॥ जेथ शांतीचा जिव्हाळा नाहीं। तेथ सुख विसरोनि न रिगे कहीं। जैसा पापियाच्या ठायीं। मोक्षु न वसे ॥ ४५ ॥ देखें अग्निमाजीं घापती। तियें बीजें जरी विरूढती। तरी अशांता सुखप्राप्ती। घडों शके ॥ ४६ ॥ म्हणौनि अयुक्तपण मनाचें। तेंचि सर्वस्व दुःखाचें। या कारणें इंद्रियांचें। दमन निकें ॥ ४७ ॥

इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते। तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ ६७ ॥

इंद्रियें जें जें म्हणती। तें तेंचि जे पुरुष करिती। ते तरलेचि न तरती। विषयसिंधु ॥ ४८ ॥ जैसी नाव थडिये ठाकितां। जरी वरपडी होय दुर्वाता। तरी चुकलाही मागौता। अपावो पावे ॥ ४९ ॥ तैसीं प्राप्तेंही पुरुषें। इंद्रियें लाळिलीं जरी कौतुकें। तरी आक्रमिला जाण दुःखें। संसारिकें ॥ ३५० ॥

तस्माद्यस्य महाबाहो निगृहितानि सर्वशः। इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥

म्हणौनि आपुलीं आपणपेया। जरी इंद्रियें येती आया। तरी अधिक कांहीं धनंजया। सार्थक असे ?॥ ५१ ॥ देखें कूर्म जियापरी। उवाइला अवेव पसरी। ना तरी इच्छावशें आवरी। आपणपेंचि ॥ ५२ ॥ तैसीं इंद्रियें आपैतीं होती। जयाचें म्हणितलें करिती। तयाची प्रज्ञा जाण स्थिती। पातली असे ॥ ५३ ॥ आतां आणिक एक गहन। पूर्णाचें चिन्ह। अर्जुना तुज सांगेन। परिस पां ॥ ५४ ॥

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी। यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥

देखें भूतजात निदेलें। तेथेंचि जया पाहलें। आणि जीव जेथ चेइलें। तेथ निद्रितु जो ॥ ५५ ॥ तोचि तो निरुपाधि। अर्जुना तो स्थिरबुद्धि। तोचि जाणें निरवधि। मुनीश्वर ॥ ५६ ॥

दुःख कसलें ? आणि तें होणार तरी कोठून ? कारण तेथें त्याची बुद्धि आपोआपच परमात्मस्वरूपीं स्थिर होऊन रहाते; ३४०. ज्याप्रमाणें निवाऱ्यांतील दिव्याची ज्योत मुळींच कधींहि हालत नाहीं, त्याप्रमाणें योगयुक्त म्हणजे जो स्थिरबुद्धि आहे तो आत्मस्वरूप समाधीमध्यें निश्चलपणें रत असतो ४१.

**अन्वयार्थ—अयुक्तस्य**–ज्याचें चित्त स्थिर झालेले नसतें, त्याला–**बुद्धिः**–आत्म्याविषयींचीं बुद्धि–**न अस्ति**–नसते,–**च**–व–**अयुक्तस्य**–ज्याचें चित्त स्थिर झालेलें नसतें त्याला–**भावना**–आत्मज्ञानाविषयींचा अभिमान–**न**–नसतो–सतत आत्मानुसंधान, 'मीच ब्रह्म' ही बुद्धि नसतें–**च**–आणि–**अभावयतः**–तशी भावना न करणाराला–**शान्तिः**-शांति-चित्ताची स्वस्थता–**न अस्ति**-नसते–**अशान्तस्य–**आणि ज्याचें चित्त शांत-स्वस्थ झालेलें नाहीं त्याला–**सुखम्**–सुख–**कुतः**–कोठचें ? ६६.

हा योगयुक्तीचा म्ह. योगबुद्धीचा विचार ज्याचे अंतःकरणांत नाहीं, त्याला शब्दादिक विषय आपले पाशांत गोवून घेतात ४२. अर्जुना ! त्याच्या बुद्धीला कधींहि स्थिरता लाभत नसते व बुद्धि स्थिरतेच्या प्राप्तीविषयीं त्याचे अंतःकरणांत आदर वा तीव्र इच्छाहि उत्पन्न होत नाहीं ४३. अर्जुना ! पहा ! स्थिरपणाची नुसती भावनाहि त्याचे अंतःकरणांत मुळींच उत्पन्न होत नाहीं. तर त्याला शांति तरी कशी बरें प्राप्त होईल ? ४४. पापी मनुष्याचे ठिकाणीं मोक्ष जसा चुकूनहि वास्तव्य करीत नाहीं, त्याप्रमाणें जेथें शांतीचा ओलावा, लेशहि नाहीं, तेथें सुख हें चुकून देखील प्रवेश करीत नाहीं ४५. हें पहा, जर विस्तवांत घातलेली धान्याचीं भर्जित बीजें उगवतील तरच शांतिहीन मनुष्याला सुखप्राप्ति घडूं शकेल ४६. म्हणूनच मनाचें चंचलत्व व त्याचे नियमन न करणें, हेंच सर्वतोपरी दुःखाचे कारण आहे; ह्याकरितां मुमुक्षुनें इंद्रियनिग्रह अवश्य करावा. हे चांगलें ४७.

**अन्वयार्थ**—**हि**–कारण–**चरताम् इंद्रियाणां**–आपापल्या विषयांमध्ये प्रवृत्त होणाऱ्या इंद्रियांच्या–**अनु**–मागोमाग–**यत् मनः**–जें मन – **विधीयते** जातें–**तत्**–ते मन–**अस्य**–या साधकाच्या–**प्रज्ञां**–प्रज्ञेला आत्मा व अनात्मा यांच्या विवेकापासून उत्पन्न झालेल्या बुद्धीला–**अम्भसि**–पाण्यांत–**वायुः**–वारा – **नावम् इव**–नावेला जसा अमार्गानें नेतो त्याप्रमाणें–**हरति**–हरण करतें ६७.

जे पुरुष इंद्रियें जें जें म्हणतील त्या त्यांच्या इच्छेप्रमाणें वागतात, ते ह्या विषयरूपी सागरांतून आपण तरलों आहों, असें समजत असले तरी खरोखर तरले नाहींत, असे जाण ४८. ज्याप्रमाणें एखादी नाव तीराजवळ येऊन टेंकते न टेंकते तोंच, जर वादळ उत्पन्न होऊन त्या वादळांत नाव सांपडली तर ती ज्या अपत्तींना चुकवून आली त्याच आपायांत फिरून पुनः सांपडते ४९. त्याप्रमाणें सिद्धदशेला पोचण्याजवळ आलेल्या म्हणजे कृतार्थ होण्याच्या बेतांत आलेल्या [ परोक्ष ज्ञानसंपन्न ] पुरुषानें जरी कौतुकानें इंद्रियांचें लालन केलें, लाड पुरविले तरीहि तो संसारदुःखांनीं व्यापिला जातो, असें समज ३५०.

**अन्वयार्थ—तस्मात्**–म्हणून–**हे महाबाहो**–हे महापराक्रमी अर्जुना ! –**यस्य**–ज्यांची–**इन्द्रियाणि**–इंद्रियें–**इन्द्रियार्थेभ्यः**– विषयांपासून – **सर्वशः**–सर्व प्रकारें – **निगृहीतानि**–निग्रह करून ठेवलेलीं – आंवरून धरलेलीं असतात – **तस्य** – त्याची – **प्रज्ञा** – आत्मानात्मविवेकापासून उत्पन्न झालेली बुद्धि–**प्रतिष्ठिता**–प्रतिष्ठित–झालेलीं असते ६८.

म्हणून धनंजया ! आपलीं हीं इंद्रियें जर आपल्या आज्ञेच्या आधीन करता येतील तर मग ह्यापेक्षां अधिक दुसरे सार्थक तें काय आहे ? ५१. पहा कीं, ज्याप्रमाणें कांसव प्रसन्न असतांना आपलें हातपायादि अवयव पसरते व आपले पसरलेलें अवयव स्वेच्छेनें स्वतःच आंवरतें ५२. त्याप्रमाणें, ज्यांचीं इंद्रियें स्वाधीन असून तो म्हणेल त्या आज्ञेप्रमाणें करतात, त्यांचीच बुद्धि स्थिरत्वाप्रत पावली असें समज ५३. अर्जुना ! आतां पूर्णावस्थेस प्राप्त झालेल्या ज्ञान्यास ओळखण्याची आणखी एक सूक्ष्म गूढ [ सहजीं लक्षात न येणारी ] खूण तुला सांगतों, ती ऐक ५४.

**अन्वयार्थ–सर्वभूतानां**–सर्वभूतांची–**या**–जीं–**निशा**–रात्र [ परमार्थदर्शन ]–**तस्यां** – तिच्यामध्यें – **संयमी**–संयमवान् जितेंद्रिय योगी–स्थितप्रज्ञ–**जागर्ति**–जागतो–[ **च** ] **यस्याम्**–व जिच्यामध्यें म्ह० ज्या व्यवहारावस्थेंत–**भूतानि**–भूतें–**जाग्रति**–जागतात-**सा**–ती-**पश्यतः मुनेः**-ज्ञानी मुनीची–**निशा**–रात्र आहे ६९.

सर्व प्राणी [ आत्माज्ञान निद्रा परवश ] ज्या आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं निजलेले आहेत तेथें ज्यास उजाडलेले असते म्ह. त्या आत्मस्वरूपाविषयीं ज्याला पूर्ण यथार्थ ज्ञान असतें आणि ज्या व्यावहारिक विषयसुखाच्या प्राप्तीविषयीं प्राणिमात्र जागे आहेत, त्या विषयसुखाचे ठिकाणीं जो निजलेला [ अहंममाध्यासरहित ] असतो, ५५. तोच अर्जुना ! खरा उपाधिरहित, स्थिरबुद्धि, गंभीर आणि मुनींमध्यें म्हणजे मनन करणारांमध्यें श्रेष्ठ आहे, असें समज ५६.

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ।
तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी ॥ ७० ॥

पार्था आणीकही परी । तो जाणों येईल अवधारीं । जैसी अक्षोभता सागरीं । अखंडित ॥५७॥ जऱ्ही सरितावोघ समस्त । परिपूर्ण होऊनि मिळत । तऱ्ही अधिक नोहे ईषत् । मर्यादा न संडी ॥ ५८ ॥ ना तरी ग्रीष्मकाळीं सरिता । शोषूनि जाती समस्ता । परी न्यून नव्हे पार्था । समुद्र जैसा ॥५९॥ तैसा प्राप्तीं ऋद्धिसिद्धी । तयासि क्षोभु नाहीं बुद्धी । आणि न पवतां न बाधी । अधृति तयातें ॥३६०॥ सांगें सूर्याच्या घरीं । प्रकाशु काय वातीवेरी । कां न लविजे तरी अंधारीं । कोंडेल तो ॥६१॥ देखें ऋद्धिसिद्धि तयापरी । आली गेली से न करी । तो विगुंतला असे अंतरीं । महासुखीं ॥६२॥ जो आपुलेनि नागरपणें । इंद्रभुवनातें पाबळें म्हणे । तो केवीं रंजे पालिवणें । भिल्लांचेनि ? ॥६३॥ जो अमृतासी ठी ठेवी । तो जैसा कांजी न सेवी । तैसा स्वसुखानुभवी । न भोगी ऋद्धि ॥ ६४ ॥ पार्था नवल हें पाहीं । जेथ स्वर्गसुख लेखनीय नाहीं । तेथ ऋद्धिसिद्धी कायी । प्राकृता होती ॥ ६५ ॥

विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः । निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति ॥ ७१ ॥

ऐसा आत्मबोधें तोषला । जो परमानंदें पोखला । तोचि स्थिरप्रज्ञु भला । वोळख तूं ॥ ६६ ॥ तो अहंकारातें दंडुनी । सकळ कामु सांडोनी । विचरे विश्व होऊनी । विश्वामाजीं ॥ ६७ ॥

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति । स्थित्वास्यामंतकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥ ७२ ॥
इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

हे ब्रह्मस्थिति निःसीम । जे अनुभवितां निष्काम । ते पावले परब्रह्म । अनायासें ॥ ६८ ॥ जे चिद्रूपीं मिळतां । देहांतींचि व्याकुळता । आड ठाकों न सके चित्ता । प्राज्ञा जया ॥ ६९ ॥ तोचि हे स्थिति । स्वमुखें श्रीपति । सांगत अर्जुनाप्रति । संजयो म्हणे ॥ ३७० ॥ ऐसें कृष्णवाक्य ऐकिलें । तेथ अर्जुनें मनीं म्हणितलें । आतां आमुचियाचि काजा कीर आलें । उपपत्ति इया ॥ ७१ ॥ जें कर्मजात आघवें । एथ निराकारिलें देवें । तरी पारुषलें म्यां झुंजावें । म्हणौनियां ॥ ७२ ॥ ऐसा श्रीअच्युताचिया बोला । चित्तीं धनुर्धरु उवाइला । आतां प्रश्नु करील भला । आशंकोनी ॥ ७३ ॥ तो प्रसंगु असे नागरु । जो सकळ धर्मासी आगरु । कीं विवेकामृतसागरु । प्रांतहीनु ॥ ७४ ॥ जो आपण सर्वज्ञनाथु । निरूपिता होईल श्रीअनंतु । ज्ञानदेवो सांगेल मातु । निवृत्तिदासु ॥ ३७५ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥ श्लोक ७२, ओव्या ३७५.



**अन्वयार्थ—यद्वत्**–ज्याप्रमाणें–**आपः**–पाणी-**आपूर्यमाणं**–पाण्यानें चोहोंबाजूंनीं भरल्या जाणाऱ्या–**अचलप्रतिष्ठम्**–तथापि ज्याची मर्यादा थोडीसुद्धां न्यूनाधिक होत नाहीं–ज्याच्यामध्यें कांहीं फरक पडत नाहीं अशा–**समुद्रम्**–समुद्रास–समुद्रामध्यें–**प्रविशन्ति**–शिरतें–**तद्वत्**–त्याप्रमाणें–**सर्वे कामाः** सर्व इच्छा–**यं प्रविशन्ति**–ज्या पुरुषामध्यें त्याला विकारयुक्त न करतां प्रवेश करितात–**सः**–तो–**शान्ति** – शांतीला – **आप्नोति** – प्राप्त होतो–**न कामकामी**–विषयांची इच्छा करणारा शांतीला प्राप्त होत नाहीं ७०.

पार्था ! आणखी एका प्रकारानें तो स्थितप्रज्ञ मनुष्य ओळखतां येतो तो प्रकार कोणता, तो ऐक–समुद्राचे ठिकाणीं जशी निरंतर शांतता असते [ तशी शांती ह्या पुरुषाचे ठिकाणीं असते ] ५७. जरी समुद्रास पावसाळ्यांत सर्व नद्यांचे प्रवाह तुडुंब भरून मिळतात, तरी त्यामुळे तो किंचितही वाढत नाहीं व आपल्या मर्यादेचेंहि उल्लंघन करीत नाहीं; ५८. किंवा अर्जुना ! उन्हाळ्याच्या वेळीं सर्व नद्यांचे पाणी जरी आटून जाते तरीहि तो समुद्र ज्याप्रमाणें ओसरून यत्किंचितहि कमी होत नाहीं ५९. त्याप्रमाणें ऋद्धिसिद्धि प्राप्त झाल्यानें त्या पुरुषाच्या बुद्धीला उल्हास होत नाहीं, आणि त्या जर प्राप्त न झाल्या तरी त्यास असंतुष्टता, धैर्य गलितता प्राप्त होत नाहीं ३६०. अरे ! तूंच सांग बरे ! कीं–सूर्याचे घरीं दिव्याचे ज्योतीचा प्रकाश केला तरच उजेड पडतो काय ? किंवा तो दिवा न लावला तर तो सूर्य अंधारांत कोंडला जाईल काय ? ६१. पहा त्याप्रमाणें, त्या पुरुषाच्या घरीं ऋद्धिसिद्धि आल्या काय व गेल्या काय, त्याची खिजगणतीहि [ भानहि ] त्याला नसते कारण, तो अंतःकरणानें नित्य निरतिशय परमात्मसुखाचे ठिकाणींच निमग्न झालेला असतो ६२. जो आपल्या ऐश्वर्यापुढें [ घराच्या सौन्दर्यापुढे ] इंद्रभुवनालासुद्धां तुच्छ मानतो, त्याला भिल्लाच्या· पाल्याच्या झोपड्यापासून [ पर्णकुटींत ] कसें समाधान होणार ? ६३. अरे ! जो अमृताला देखील नांवे ठेवितो किंवा अमृत सेवनांत स्थिर–तृप्त असतो तो जसा कांजी–पेज पीत नाहीं–तसा आत्मानंदाचा अनुभव घेणारा पुरुष क्षुल्लक ऋद्धीचा–क्षुद्र ऐहिक ऐश्वर्याचा उपभोग घेत नाहीं ६४. अर्जुना ! काय हा चमत्कार आहे पहा, ज्या पुरुषाला स्वर्गसुखाची पर्वा, मोजदाद नाहीं, त्याला क्षुल्लक सामान्य ऋद्धिसिद्धींची काय किंमत ? ६५.

**अन्वयार्थ—यः**–जो–**पुमान्**–पुरुष–**सर्वान् कामान् विहाय**–सर्व कामांना टाकून–सर्व कामांचा त्याग करून–**निःस्पृहः**–निरिच्छ–**निर्ममः**–ममतारहित– **निरहंकारः**–अहंकाररहित होऊन–**चरति**–पर्यटण करतो,–**सः**–तो–**शान्ति**–शांतीला–**अधिगच्छति**–प्राप्त होतो ७१.

ह्याप्रमाणें जो आत्मज्ञानानें संतोष पावला आणि परमानंदानें निमग्न होऊन पुष्ट झाला, तोच खरा स्थिरबुद्धि होय असें तूं समज ६६. तो आपले ठिकाणचा ‘ मीपणा [ प्रमातृत्वाध्यास ] ’ घालवून व सर्व विषयवासना टाकून [अज्ञान व तत् कार्य जगत बाधित करून] सर्व जगत् स्वतः अधिष्ठान ब्रह्मरूपच समजून जगांत संचार करतो ६७.

**अन्वयार्थ—हे पार्थ**–हे अर्जुना !–**एषा**–ही वर सांगितलेली **ब्राह्मी** – ब्रह्मांतील – ब्रह्मासंबंधीं – **स्थितिः**–आहे. **एनां**–या स्थितीला–**प्राप्य**–प्राप्त होऊन–[ **यः** ] **न विमुह्यति**–जो मनुष्य मोहित होत नाहीं–**अस्याम्**–या स्थितींत–**अन्तकाले अपि स्थित्वा**–अन्त्य वयामध्येंहि स्थित होऊन तो–**ब्रह्मनिर्वाणं** मोक्षास–**ऋच्छति**–प्राप्त होतो ७२.

जे निष्काम पुरुष अशा अमर्याद ब्रह्मस्थितीचा अनुभव घेतात ते अनायासेंच परब्रह्मास आत्मत्वाने प्राप्त होतात. ६८. कारण, त्या स्थितप्रज्ञाला [ देह असतांना देहतादात्म्यरहित, चिद्रूपब्रह्मस्थितीस प्राप्त झालेल्या जीवन्मुक्ताला ] देहाच्या अंतकाळीं, मरण समयीं होणारी व्याकुळता, तळमळ, चिंता ज्या ब्रह्मस्थितीमुळें स्थितप्रज्ञाच्या चित्तांत [ उत्पन्न होऊन देहरहित ब्रह्मस्थितिरूप विदेह कैवल्यास ] प्रतिबंध करू शकत नाहीं ६९. संजय धृतराष्ट्रास म्हणतो, “ राजा तीच ही स्थिति श्रीकृष्णांनीं स्वतः आपल्या मुखानें अर्जुनास सांगितली ” ३७०. असें श्रीकृष्णाचें बोलणें ऐकल्यावर अर्जुनानें आपल्या मनांत असे म्हटले कीं, ही विचारसरणी आतां आमच्या कार्यास बरी पथ्यावर पडली ! ७१. [ कारण आत्मस्वरूपाचे ठिकाणीं ] सर्वांच्या सर्व कर्माचा श्रीकृष्णानें येथवरच्या निरुपणांत निषेध केला, त्या निषेधानेंच माझे युद्ध करणे सहजच थांबले [ असे असले तरीहि मी युद्ध करावें म्हणून मला मात्र ‘ तूं युद्ध कर ’ असे बजावून सांगतात, असो ] ७२. ह्याप्रमाणें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून अर्जुन आपले मनांत फार हर्षित झाला. आतां तीच शंका घेऊन पुढें अर्जुन चांगला प्रश्न करील ७३. तो प्रसंग फार सुरस आहे. जणू तो सर्व धर्माचें उत्पत्तिस्थान अथवा विचाररूपी अमृताचा समुद्रच आहे ७४. त्या संवादाचें निरूपण सर्वश्रेष्ठ जगदीश्वर स्वतः करतील व ती गोष्ट श्रीनिवृत्तिदास श्रीज्ञानदेव सांगतील ३७५.



# अध्याय संगति व दुसऱ्या अध्यायाचें तात्पर्य

**मोक्षदानीं स्वतंत्र । ज्ञानप्रधान हें शास्त्र ।**
**येतुलालें दुजीं सूत्र । उभारिलें ।। अ. १८-१४३६**

पहिल्या अध्यायांत अर्जुनाला कसा शोक उत्पन्न झाला हें सांगून गीताशास्त्राच्या प्रतिपाद्य विषयाचा उपोद्घात सांगितला आणि आतां या दुसऱ्या अध्यायांत श्रीकृष्णार्जुन संवादांत 'सूत्ररूपानें' सर्व गीताशास्त्र अर्थात् संपूर्ण गीताशास्त्राचा 'प्रतिपाद्य विषय' सांगितला आहे. कारण, श्रीज्ञानेश्वर महाराजांचें मतानुसार गीतेंत कर्म, उपासना आणि ज्ञान या कांडत्रयाचे निरूपण केले असले तरी गीताशास्त्र हे 'ज्ञानप्रधान' असून जीवास मोक्ष प्राप्त करून देण्याचें बाबतींत स्वतंत्र आहे. या अध्यायांतच संपूर्ण गीताशास्त्राचें सूत्र आहे. ते असे:-

या अध्यायांत 'योगस्थः कुरु कर्माणि', 'कर्मण्येवाधिकारस्ते' या श्लोकांत सूत्ररूपानें म्हणजे थोडक्यांत सांगितलेली अंतःकरणशुद्धीस साधनभूत अशा निष्काम-कर्मनिष्ठेचेच सामान्यरूपानें तिसऱ्या अध्यायांत प्रतिपादन केले आहे आणि विशेषरूपानें चवथ्या अध्यायांत प्रतिपादन केलें आहे. नंतर ज्याचे अंतःकरण शुद्ध झालें आहे, त्याचेकरितां 'विहाय कामान्यः सर्वान्' या श्लोकांत सूत्ररूपानें सांगितलेल्या शमदमादि साधनसंपत्तिपूर्वक सर्व कर्मसंन्यासनिष्ठेचे संक्षेपतः निरूपण पांचव्या अध्यायांत केलें आहे. शिवाय या [ १ ते ६ ] सहा अध्यायांतच 'त्वम्' पदाच्या अर्थाचाहि विचार सांगण्यांत आला आहे. त्यानंतर यापुढील सहा अध्यायांच्याद्वारां 'युक्त आसीत मत्परः' [ २-६१ ] या श्लोकांत सांगितलेल्या वेदान्त वाक्य-विचारासहित अनेक प्रकारच्या भगवत्‌भक्तिनिष्ठेचे प्रतिपादन केले आहे [ ७ ते १२ ] या सहा अध्यायांतच, 'तत्' पदाच्या अर्थाचाहि विचार निरूपिला आहे.

शिवाय प्रत्येक अध्यायांतील अवान्तर अध्याय संगति व प्रयोजन त्या त्या अध्यायाचें तात्पर्याचे वेळीं सांगितले आहेच. त्यानंतर 'वेदाविनाशिनंनित्यम्' [ २-२१ ] इत्यादि श्लोकांत सूचित अशा 'तत्' आणि 'त्वम्' या पदांच्या अर्थाच्या एकतेचें अर्थात् 'असि' या पदाचें तेराव्या अध्यायांत 'क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि' या रूपानें निरूपण केलें व त्याच तेराव्या अध्यायांत जीवब्रह्मैक्यज्ञानरूप तत्त्वज्ञाननिष्ठेचे प्रकृतिपुरुष विवेकद्वारां निरूपण केले आहे. तेराव्या अध्यायांत सांगितलेल्या तत्त्वज्ञाननिष्ठेची फलरूप अशा त्रैगुण्य निवृत्तीचा कीं जिचा "त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्योभवार्जुन" [ २-४५ ] या श्लोकांत सूत्ररूपानें उल्लेख करण्यांत आला आहे. त्याचेच चवदाव्या अध्यायांत वर्णन केले आहे. त्याच त्रिगुणातीत अवस्थेस जीवन्मुक्ति म्हणतात. म्हणून त्या गुणातीताचें लक्षण विस्तारानें सांगितलें आहे. नंतर 'तदा गन्तासि निर्वेदम्' [ २।५२ ] इत्यादि श्लोकांत सूत्ररूपानें सांगितलेले परवैराग्यनिष्ठेचे संसार वृक्षाचें छेदनद्वारां पंधराव्या अध्यायांत कथन केलें आहे. तसेंच 'दुःखेष्वनुद्विग्नमनाः' [ २।५६ ] इत्यादि श्लोकांत स्थितप्रज्ञाचें लक्षणाचेद्वारां संक्षेपानें सांगितलेल्या पर वैराग्यास उपकारिणी उपादेयभूत अशा दैवीसंपत्तीचें आणि 'यामिमां पुष्पितां वाचम्' [ २।४२ ] इत्यादि श्लोकांत सूचित कीं जी परवैराग्यास विरोधिनी होय, अशा आसुरी संपत्तीचें निरूपण सोळाव्या अध्यायांत केलें आहे. तसेंच 'निर्द्वन्द्वो नित्यसत्त्वस्थो' [ २।४५ ] इत्यादि श्लोकार्धानें सूचित दैवीसंपत्तीस असाधारण कारण असणाऱ्या सात्विक श्रद्धेचें व तीस विरोधिनी असणाऱ्या राजसी, तामसी श्रद्धेचें परिहारपूर्वक असें वर्णन सतराव्या अध्यायांत केलें आहे. शेवटीं अठराव्या अध्यायांत सर्व गीताशास्त्राचा उपसंहार सांगितला आहे. सूत्ररूपानें अशी ही गीतेच्या संपूर्ण प्रतिपाद्य विषयाची संगति आहे. धृतराष्ट्रास संजय म्हणतो कीं, रणभूमिवर आपल्यासमोर जमलेल्या आप्तजनांचा समुदाय पाहून अर्जुन शोकाकुल होऊन, त्यास स्नेह उत्पन्न होऊन चिखलांत रुतलेल्या राजहंसाप्रमाणें अर्जुनाची स्थिति झाली. हे पाहून त्या अर्जुनास मोहांतून मुक्त करण्याकरितां भगवान् या अध्यायांत त्यास उपदेश करण्यास आरंभ करतात [ १ ते ९ ]. प्रथम अर्जुनास त्याच्या शौर्य,

पराक्रम या गुणांची शंकराशीं केलेल्या युद्धादिकांचे दृष्टांतानें आठवण करून देऊन 'या युद्धप्रसंगीं निःशस्त्र होणें व हृदयाचे ढिलेपणास प्राप्त होणें षंढासारखें आहे. अरे! मोहामुळें तुझी असलेली प्रतिष्ठा तर जाईलच; परंतु इहपरलोकास तूं अंतरशील-संग्रामसमयीं असा हृदयाचा ढिलेपणा ठेवणें पतनास कारण असतें. हे लक्षांत ठेव व खेद करणें टाकून दे' असें अर्जुनास कृपावंत भगवंतानें नानापरीनें सांगितलें [ ६ ते २९ ].

आतांपर्यंत अर्जुन निश्चयानें म्हणत होता कीं, 'मी युद्ध करणार नाहीं';' पण तो निश्चय सोडून अर्जुन संशयांत येऊन म्हणतो, "हे मधुसूदना! या युद्धामध्यें भीष्म व द्रोणांवर बाण टाकून कसा बरें युद्ध करूं. कारण, हें मोठें पातक घडणार आहे. पूज्य गुरुजनांचा व इष्टमित्र, सोयरे यांचा वध करण्यापेक्षां भीक मागितलेली बरी! कारण, मी या सर्व आप्तजनांचा वध करून त्यांच्या रक्तानें माखलेल्या भोगांचें सेवन तरी कसें करावें? म्हणून देवा मला युद्ध करूं नये असेंच वाटतें", असें बोलून अर्जुनानें देवाकडे पाहिलें, तेव्हां देवास आपलें म्हणणें पटलेलें नाहीं. असें त्यास वाटलें. हें जाणून अर्जुन भ्याला, नंतर म्हणाला देवा! माझ्या बोलण्याकडे कां लक्ष देत नाहीं. देवा! मी युद्ध करावे कीं नाहीं? हें मला कळत नाहीं [ २९ ते ५४ ].

नंतर अर्जुन आपला देवाविषयींचा अनन्यभाव प्रगट करून देवास शरण गेला व म्हणाला, "देवा! माझें हित काय व अनहित काय हें मला कळत नाहीं. मी तुझा शिष्य आहे. मला सर्वतोपरी तूंच एक आहेस. तेव्हां तूंच मला योग्य व धर्मविरुद्ध नसेल अर्थात् धर्म्य काय आहे तें चटकन् सांग" असें अर्जुन म्हणाला [ ५५ ते ६३ ].

कोणत्याहि दृष्टीनें धर्माला प्रतिकूल नसेल असा कल्याणाचा [ मोक्षाचा ] उपाय सांग. हें अर्जुनाच्या विनंतीचे तात्पर्य श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं 'उचित' पदानें सुचविलें आहे. पुढें मोहरूपी काळसर्पाचा दंश झालेल्या अर्जुनाचें रक्षण करण्याकरितां, ज्याच्या केवळ कृपाकटाक्ष दृष्टीतच तें विष उतरविण्याचें सामर्थ्य आहे, असें श्रीहरिरूप गारुडी कसें धांवून आलें हें श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं मोठ्या उत्कृष्ट रूपकानें प्रतिपादिलें आहे. तशीच पुढें 'ज्ञानप्राप्तीनें मोहनिवृत्ति' यावर सुंदर दोन रूपकें करून श्रीकृष्णरूपी मेघ कीं जो कृपामृतरूप जीवनानें युक्त आहे तो अर्जुनरूपी पर्वतावर वर्षाव करील व त्यामुळें अर्जुनरूपी पर्वत शांत होऊन ज्ञानरूपी नवीन अंकुर त्या ठिकाणीं कसा फुटेल ते पहा. ती कथा समाधान वृत्तीनें ऐका; असें निवृत्तिनाथांचे शिष्य श्रीज्ञानदेव म्हणतात [ ६४ ते ८० ]. येथपर्यंत देवाचे बोलणें वरकरणीं उपचाराप्रमाणें होते; परंतु सद्वैद्य जसा रोग असाध्य आहे असें पाहून त्या रोगाची खोलवर चिकित्सा करून रोगाचे निश्चित निदान करतो व मग अमृततुल्य निर्वाणीच्या दिव्य औषधीची तात्काळ योजना करतो. त्याप्रमाणें अतिस्नेहाने युक्त अर्जुनाच्या 'मी युद्ध करणार नाहीं, कारण मला पाप लागेल व कुलाच्या अधःपतनाला मीच कारण होईन' या म्हणण्याचें बारकाईनें निदान करून मोहनिवृत्तीकरितां भगवंतांनीं आतां येथूनच वरवर पाहतां कठोर; पण परिणामीं अति सुरस अत्यंत हितकर असा उपदेश अध्यात्मज्ञानाच्या बैठकीवरून करण्यास सुरुवात केली आहे. कारण, अध्यस्त मोह निवृत्यर्थ अध्यात्म ज्ञानच समर्थ आहे [ ८१ ते ९० ]. श्रीभगवंतांनीं अर्जुनास असें विचारलें कीं, १. तूं काय आत्म्याचा नाश होईल म्हणून शोक करतोस कां, २. देहाचा नाश होईल म्हणून शोक करतोस, कां ३. प्राणिमात्रांचा नाश होईल म्हणून शोक करतोस, कां ४. स्वधर्माचा नाश होईल म्हणून शोक करतोस? अशा चार विकल्पांचे क्रमानें विवेचन करून अर्जुना! तुला कोणत्याहि दृष्टीनें शोक करण्याचें कारण नाहीं, असें भगवान् सांगतात.

अरे अर्जुना! या जगाचा नियन्ता सर्वज्ञ, सर्व शक्तिमान् असा ईश्वर असून सृष्टीच्या उत्पत्तिनाशांचा क्रम अखंड चालू आहे. असें असतां तूं आपल्या ठिकाणीं 'मी मारले तरच हे मरतील व त्यामुळें मला पाप लागेल' अशी व्यर्थ अहंता कां घेतोस? अरे! तूं मारशील तरच हे मरतील, नाहीं तर हे चिरंजीव होणार आहेत कीं काय? अरे! जन्ममृत्यु ही केवळ भ्रांति असल्यामुळें विचारवंत या दोहोंचाहि शोक करीत नाहींत असें सांगितलें [ ९१ ते १०२ ].

जें तत्त्वज्ञ संत आहेत ते सार काय? असार काय? याचा विचार करून नित्य अस्तिभातिप्रियरूप परमात्म-

चैतन्यच, या त्रिगुणात्मक जगांत सार असून भ्रांति असार आहे अर्थात् त्रिगुणात्मक असत्, जड, दुःखरूप प्रपंच मिथ्या आहे असें जाणतात. अर्थात् विचाराने ज्याचा निरास होतो तो प्रपंच मिथ्या व उपाधी निरासानंतर उर्वरित तत्त्वतः जें ब्रह्मतत्त्व उरते तें सत्य आहे असें तत्त्वज्ञान्यांनीं जाणलेलें असते. अर्जुना ! तूंहि तसेंच जाण. हा लोकत्रयाकार ज्याचा विस्तार आहे, त्याला नाम, वर्ण आकार इत्यादि कांहीं एक चिन्ह नाहीं. जो शाश्वत, सर्वांतर्यामी, जन्मक्षयातीत आणि "सर्वदा–सर्वगत' म्हणजे देशकाल–वस्तु परिच्छेदरहित आत्मा आहे त्याचा कोणत्याहि शस्त्रानें घात करूं गेले तरी केव्हांही घात होत नाहीं. नव्हे, आत्म्याचा घात होणे शक्य नाहीं [ १०३ ते १३५ ] आतां शरीर नाशाकरितां तूं शोक करीत असलास तरी तें योग्य नाहीं. कारण, शरीराचा नासणें हा स्वभावच आहे. म्हणजे शरीरजात हे ' स्वभावतः 'च नाशिवंत आहे. तूं शस्त्रानें शरीराचा नाश केला नाहीं तरी आज ना उद्या त्या शरीराचा नाश होणारच. तूं त्या शरीरावर नजर ठेवूनच मी मारणारा व हे कौरव मरणारे म्हणत आहेस. जशी जुनी वस्त्रें फाटलीं म्हणजे मनुष्य नवी वस्त्रें घेतो त्याप्रमाणें हा आत्मा एक देह टाकून दुसरा देह स्वीकारतो. शरीराच्या नाशानें मूळ चैतन्यस्वरूपाचा नाश होत नाहीं. अनादि, नित्यसिद्ध, निरुपाधिक विशुद्ध चैतन्यनाथाचा या शस्त्रादिकांकडून नाश होणें शक्य नाहीं. असा गुणत्रयरहित, अविकृत, आकारातीत, सर्वात्मक आत्मा आहे, हे तूं जाण म्हणजे तुझा सगळा शोक आपोआपच नाहींसा होईल [ १३६ ते १५१ ]. [ येथपर्यंत आत्मा अमर आहे अविनाशी आहे त्या दृष्टीनें विचार केला अथवा शरीर पुनः पुनः जन्माला येणारे व जाणारेच आहे या दृष्टीनें विचार केला तरी तुला शोक करण्यास अवकाशच नाहीं असें दोन विकल्पांचे स्पष्टीकरण केले ] आतां प्राणिमात्रांचा किंवा जीवात्म्याचा नाश होईल म्हणून शोक करीत असलास तरी ते योग्य नाहीं. कारण, जीवात्मा खरा ब्रह्मरूप असून नित्य आहे हे न जाणतां हा देहाच्या उत्पत्ति-नाशाबरोबर उत्पत्ति-नाशवान् आहे असें मानिलें, तरी तुला शोक करणें उचित नाहीं. अरे ! गंगेच्या पाण्याच्या प्रवाहाप्रमाणें ' आदि - स्थिति - अंत ' यांचा क्रम अखंड चालू आहे. हा प्रवाह तुला थांबविता येणार नाहीं. जीवलोक जन्ममृत्यूच्या अधीन आहे हे पाहून शोककरीत असलास तरी जन्ममृत्यु हे अपरिहर -अटळ आहेत. त्यामुळें तुला शोक करण्याचें कारण नाहीं. जे उत्पन्न होतें ते नाश पावतें व नाश पावलेलें पुनः उत्पन्न होऊन दिसतें असा हा क्रम रहाटगाडग्याप्रमाणें सतत चालू आहे. हें सर्व जीव जन्मापूर्वीं निराकार होते, मग जन्मानंतर आकारास येतात; पुनः नाश होऊन अव्यक्त अशा पूर्वस्थितीसच येतात. आकारास आलेलीं सृष्टि मायाकरित आहे. मुळांतच जे नाहीं त्यासाठीं तूं काय रडत बसला आहेस ! ज्या चैतन्याच्या प्राप्तीकरितां संतांचें ठिकाणीं तळमळ उत्पन्न होतांच, त्यांना विषय सोडून जातात, विरक्त आत्मलाभाकरितां वनवास सहन करतात, ज्याच्यावर नजर ठेवून मुनीश्वर तपाचे आचरण करतात, ज्या चैतन्यास निश्चळ अन्तःकरणानें निरखून पहातांच सर्व संसार विसरून जातात, कित्येक त्याचे गुणानुवाद करतां करतां चित्तांत वैराग्य उत्पन्न होऊन शेवटीं तद्रूप झाले. कित्येक त्याचे स्वरूप एकतांच शांत होऊन देहभाव विवर्जित झालें. कित्येक त्याच्या अनुभवानें तद्रूपता पावले. त्या चैतन्याकडे तूं लक्ष दे. जन्म व मृत्यु हें भ्रांतीला वश झाल्यामुळें अनुभवास येतात, तत्त्वतः आत्मवस्तु ही अविनाशीच आहे. असे पहा कीं, जशा एकाच शरीराचें ठिकाणीं बालपण, तरुणपण इत्यादि अनेक अवस्था येतात व जातात त्या एकेक अवस्थेबरोबर शरीराचा कांहीं नाश होत नाहीं. त्याप्रमाणें एकाच अद्वितीय चैतन्याचें ठिकाणीं अनेक शरीरें येतात व जातात असें जो जाणतो तो व्यामोहदुःखास प्राप्त होत नाहीं. अरे ! या विषयांचें ठिकाणीं एकनिष्ठता नाहीं. हें विषय अनुकुलतेने केव्हां सुखास तर प्रतिकूलतेने केव्हां केव्हां दुःखासहि कारण होतात. विषयप्राप्ति व सुखदुःख यांचा अव्यभिचरित संबंध आहे असें मुळींच नाहीं. म्हणून तूं विषयसंगाचा अव्हेर कर. जो या देह आणि इंद्रिय यांच्या तडाख्यांत तादात्म्य भ्रांति ठेवून रहात नाहीं त्यास सुखदुःखें होत नाहींत. अर्थात् इंद्रिय व विषय यांच्या कच्यांत जो सांपडत नाहीं त्यास केवळ आत्माच दिसतो. कारण वस्तुस्थितीच अशी आहे कीं, या देहादि व्यष्टि व समष्टि उपाधींमध्यें सर्वत्र चैतन्य गुप्तरूपानें आहे.

जें सर्व देहांत, सर्वत्र आहे ज्याचा करूं लागले तरी घात होत नाहीं असें विश्वव्यापि एक चैतन्य तें तूं पहा. जीवात्मा उपाधितादात्म्याने जीव बनला वास्तविक प्राणिमात्र आत्मरूप आहेत तो आत्मा अमर आहे. म्हणून तुला शोक करण्याचें कारण नाहीं जग स्वभावत: उत्पन्न होते–जाते मग तेथें तुला शोक करण्यासारखें काय आहे? सारांश शोक करणें! पुष्कळ प्रकारांनीं वाईटच आहे [ १९२ ते १७९ ]. आतां स्वधर्म नाश होईल म्हणून शोक करीत असशील तरी तेहि योग्य नाहीं. कारण, क्षत्रियांस जगांत युद्धासारखें दुसरें कांहींहि धर्म्य व उचित नाहीं. जरी गाईचें दूध असलें एऱ्हवीं तें कितीहि पवित्र व गोड असलें तरी नवज्वराच्या रोग्याला ते देऊं नये असें सांगितलें असतांहि आग्रहानें रोग्यास दिलेंच तर ते त्यास विषवत् मारक होते. त्याप्रमाणें दया, करुणा, कृपा हें गुण कितीहि चांगलें असलें तरी युद्धप्रसंगीं क्षत्रियानें अंगिकारलें तर त्यांत त्याचा संपूर्ण नाशच होईल. अर्जुना! सांप्रतचे युद्ध म्हणजे जणुं तुमचे दैवच फळले आहे. क्षत्रियानें बहुत पुण्य करावें त्या वेळीं त्यांना असला युद्ध करावयाचा प्रसंग येतो. तो प्रसंग तूं टाकून जाणे म्हणजे पूर्वजांनीं मिळवून ठेवलेले पुण्य, यश व कीर्ति आपणच घालविल्यासारखें होईल, सगळे जग तुला नांवें ठेवील, आणि महापातकें तुला हुडकीत येऊन गांठतील. कारण, स्वधर्महीन पुरुषास महादोष घेरत असतात [ १८० ते २०० ].

असा हा धर्म्यसंग्राम टाकून नसत्या गोष्टीचा शोक करीत बसलास, तर पापाला पात्र होशील व अपकीर्तीचा डाग तर कल्पांतापर्यंतहि जाणार नाहीं. अरे! अपकीर्ति जोपर्यंत अंगाला शिवली नाहीं तोपर्यंतच शहाण्यानें जगावे, आतां सांग बरें येथून कसें परत फिरावें? तूं दयेनें रणांतून परत फिरशील; ही तुझी स्थिति या सर्वांना पटणार नाहीं. हे कौरव तुला चारी बाजूंनीं घेरतील; तुझ्यावर बाणांचा वर्षाव करतील तेव्हां तुझी कृपाळूपणानें सुटका होणार नाहीं. थोडक्यांत सांगावयाचे तर तुला धरून कौरव बेअब्रू करतील व असलेली कीर्ति जाऊन तुझी अपकीर्ति होऊन तूं पापास पात्र होशील [ २०१ ते २१९ ].

त्यापेक्षां युद्ध करणेंच चांगलें. कारण, युद्ध करतां करता मरण आले तर स्वर्ग मिळेल, बरे! जय मिळाला तर राज्य हे ठेवलेलेच आहे. म्हणून अर्जुना फलाशा सोडून क्षत्रिय धर्माप्रमाणें युद्ध कर. त्यांत जय झाला काय किंवा अपजय झाला काय ते श्रेयस्करच आहे, अशी समत्वबुद्धि ठेवून 'उचित' असे युद्ध करण्यास तयार हो, त्या धर्म्य युद्धाचें आचरण करीत असतांना जो जो प्रसंग येईल तो तो मुकाट्यानें सहन करणें हेंच तुला श्रेयस्कर आहे व मग सहजच तुला पाप लागणार नाहीं. म्हणून तूं आतां खुशाल लढावें [ २२० ते २२९ ].

येथपर्यंत चार विकल्पांचे विवेचन करून, थोडक्यांत सांख्यस्थिति सांगितली. आतां वज्रकवचाप्रमाणें रक्षण करणारा जो 'निष्काम कर्मयोग' तो तुला सांगतों. ज्या कर्मयोगांत-बुद्धियोगांत इहलोकच्या सुखाचा नाश तर होत नाहींच; पण मोक्षहि प्राप्त होतो. ईश्वरावांचून ज्या बुद्धीला अन्य आश्रयस्थान नाहीं. अर्थात् जिचे पर्यवसान परमेश्वर-प्राप्तींतच आहे, जगांत तीच एक दुर्लभ सद्बुद्धि आहे. तीहून अन्य जी बुद्धि आहे ती अनेक प्रकारची असून तिच्या ठिकाणीं अविचारीच रममाण होतात. ईश्वरार्पण बुद्धीनें स्वधर्माचरण केले म्हणजे मग या देहादि उपाधींत असूनहि ती उपाधि मनुष्याला बाधा करूं शकत नाहीं. कारण नित्यनैमित्तिक कर्माला दोन फाटे फुटतात. त्यांत एक म्हणजे सकामबुद्धीनें करणाराला स्वर्गादि फलांची प्राप्ति होते. दुसरा म्हणजे स्वर्गादि फलांची इच्छा न करतां ईश्वरार्पण, निष्कामबुद्धीनें स्वकर्म म्हणून करणाराला वैराग्यादि सामग्रीद्वारां मोक्षप्राप्ति होते. ते आत्मसुख ज्ञात होईपर्यंत स्वर्ग-संसारांपैकींच कोणती तरी अवस्था प्राप्त होते [ २३० ते २४४ ]. वेदांतील अर्थवादात्मक स्तावक वचनावर जोर देऊन केवळ कर्मयोगाचेच महत्त्व, तेहि मनोहर दिसणाऱ्या स्वर्गसुखादि फलाच्या दृष्टीनेंच स्थापन करतात. अविचारी लोक क्षणिक सुखास भुलून त्याकरितां अनेक परिश्रम करून संपादिलेला धर्म निष्फल करतात. त्यांच्या पुष्पित वाणीला भुलून कदाचित् त्यांची संगती करून आत्मसुख विसरून जाशील! पण तसा विसर पडूं देऊं नकोस हो! [ २४४ ते २९९ ]. अधिकारपरत्वें वेदांत बऱ्याच साध्यांचें व साधनांचें प्रतिपादन केलें आहे. तरीसुद्धां त्यांपैकीं

आपणास जे हितावह, अपेक्षित असेल त्याचाच स्वीकार करावा. केवळ प्रमाणसिद्ध असतें ते ते सर्व ग्राह्यच असतें असें नाहीं; तर प्रमाण सिद्ध असून जें तात्पर्य विषयीभूत असतें तेंच ग्राह्य असतें अशी व्याप्ति आहे. याविषयीं दृष्टान्तपूर्वक सांगतात. सूर्योदय झाल्यावर सगळे रस्ते दिसूं लागतात, म्हणून त्या सर्वच रस्त्यांनीं कां चालावयाचे ? सांग पाहूं ! संपूर्ण भूतल जलमय झाले तरीहि त्यांतून आपण आपल्या गरजेपुरतेंच पाणी घेतो त्याप्रमाणें विचारी मुमुक्षु संप्रदायपूर्वक 'वेदतात्पर्याचा' विचार करतात. त्यांत जें 'शाश्वत तत्त्व' असेल तेंच खरें हितावह व अपेक्षित असल्यामुळें त्याचाच स्वीकार करतात. अर्थात् तें वेदाविषयीं उपक्रमोपसंहारादि षड्लिंगपूर्वक विचार करून 'वेदतात्पर्य-विषयीभूत', 'प्रमाणसिद्ध', 'शाश्वततत्त्व' आणि मुमुक्षूस अपेक्षित जें 'अद्वितीय ब्रह्म' तेंच ग्राह्य असल्यानें त्याचाच तेवढा स्वीकार करतात [ २६० ते २६३ ]. याप्रमाणें विचार केल्यास तुला मात्र निष्काम कर्म करणेंच उचित आहे. कुकर्माचा अंगिकार न करतां सत्कर्मच निष्काम बुद्धीनें करीत रहा. ते निष्काम कर्म कांहीं प्रतिबंधामुळें यथासांग न होतां अपुरें, अर्धवट राहिलें तरी ईश्वरार्पण केलें असल्यामुळें तें परिपूर्णच आहे. बरें तें कर्म यथासांग पार पडलें तरी त्यामुळें संतोषातिशयास प्राप्त व्हावें, हेंहि नको. या रीतीनें ईश्वरार्पण बुद्धीनें कर्म करणें व त्यांत चित्ताची समता रहाणें हेंच योगाचे सार आहे. कर्तृत्वमद-अहंकारयुक्त व फलास्वाद-फलेच्छासहित म्ह. सकाम कर्मयोग हा निष्काम कर्माच्या मानानें फारच कमी प्रतीचा आहे. [ सकाम कर्म करतां करतां यच्चयावत् प्रयत्नसाध्य विषयभोग अनित्य आहेत असा निश्चय झाला तर त्यामुळें विषयसौख्याविषयीं त्यागबुद्धिरूप वैराग्य होऊन कर्तृत्वमद व फलस्वाद टाकून देऊन उर्वरित राहिलेल्या 'कर्मशेष' अनुष्ठानानें चित्तशुद्धिद्वारां गुरुकृपेनें शेवटीं जी स्थिति प्राप्त होते तीच योगस्थिति किंवा ] निरहंकार व निष्कामबुद्धीनें केलेल्या कर्माचें पर्यवसानरूप जी स्वाभाविक योगस्थिति तिच्यामुळें जन्ममरण रूप संसाराच्या पार पलीकडे जातो व पाप व पुण्यरूप बंधांतूनहि सुटका होते, असें समज [ २६४ ते २७७ ]. अरे ! तुझी बुद्धि, देह व इंद्रियें यांच्या संगतीनें चंचल व मोहयुक्त झाली आहे. ती जेव्हां स्वजनांचा, देहेंद्रियाचा मोह टाकून शुद्ध होईल, वैराग्यसंपन्न होईल किंवा निरिच्छ होऊन आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिर होईल त्यावेळीं तुला या स्वाभाविक योगस्थितीचा अर्थात् समाधीचा अनुभव येईल [ २७८ ते २८४ ]. असें समाधीचे वर्णन ऐकून 'या समाधीचा कोणी अनुभव घेणारा स्थितप्रज्ञ आहे काय ?' जो निरंतर समाधिसुखाचा अनुभव घेतो तो कोणत्या स्थितींत असतो, तो कसा आचरण करतो, हे देवा ! मला कृपा करून सांगा, अशी अर्जुनानें विनंती केली [ २८४ ते २८९ ]. यापुढें षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान् त्या स्थितप्रज्ञाची लक्षणें सांगूं लागले [ २९० ]. जो निरुपाधिक आत्मानंदानें सर्वदा तृप्त आहे, ज्यास विषयासक्ति अजिबात नसते. अर्थात् ज्याच्या कामनेची आत्यंतिक निवृत्ति झाली आहे. देहादि उपाधींवर आध्यात्मादिक दुःखांचे भयोत्पादक, उद्वेगजनक असें कितीहि प्रसङ्ग आलें तरी चित्त आत्मानंदांत तल्लीन झाले असल्यामुळें तो भयास किंवा उद्वेगास प्राप्त होत नाहीं. देहादि उपाधींचा निरास करून जो भेदरहित केवळ आत्मरूप झालेला असतो. चंद्राप्रमाणें जो आपला आत्मानंदप्रकाश सर्वांना अखंड सारखा देतो. अत्यंत बलवान् किंबहुना योग्यांसहि दुर्दम्य, ज्यांच्या कचाट्यांत मन सांपडले तर त्या साधकास व्याकुळ व हीन-दीन करणारीं इन्द्रियें ज्याच्या स्वाधीन आहेत. तो या विषयसुखास भुलून फसविला जात नाहीं. परमात्म्याला हृदयांत सांठविल्यामुळें संपूर्ण विषयवासनेचा नाश झालेला असतो [ २९१ ते ३१७ ]. यापुढें ज्यानें मनोनिग्रह व इन्द्रियनिग्रह केला नाहीं तो स्थितप्रज्ञ नव्हे, त्यास समाधिसुखाचा लेशहि मिळत नाहीं. याकरितां साधकांस इन्द्रियनिग्रह करणें अत्यंत जरूरीचे आहे. असें सांगितलें [ ३१८ ते ३३० ]. यःकश्चित् विषयाचे नुसते मनांत स्मरण झाले तरी अनर्थच ओढवतो. कारण, विषयाचे चिंतनांतच सर्वानर्थाचें व नाशाचे बीज सांठवलेलें असतें. म्हणून साधकानें आपल्या मनांतून संपूर्ण विषय काढून टाकण्याचा व मिथ्यात्व निश्चय करण्याचा प्रयत्न करावा, तो तसा निश्चय झाला कीं मग रागद्वेष आपोआप नष्ट होतात. नंतर 'इन्द्रियें विषयाचे ठिकाणीं रममाण झालीं, तर तें विषय त्यास बाधक होत नाहींत'. [ पूर्ण सिद्ध अवस्थेस प्राप्त झालेल्या दृढापरोक्षानुभूतिसंपन्न स्थितप्रज्ञाची ही गोष्ट आहे, हें लक्षांत ठेवावें. ] कारण, परमात्मरूप

झालेल्या स्थितप्रज्ञ पुरुषास किंवा जीवन्मुक्तास स्वभिन्न, स्वविरोधी व स्वपेक्षा श्रेष्ठ असें कोणी रहातच नाहीं त्याला विषय कसलें ? व ते बाधतील तरी कोणाला ? तो आपणच स्वतः सर्वरूप, परिपूर्णरूपानें असतो, तोच 'अचलप्रज्ञ' असें निभ्रांत समज. ज्याचे चित्तांत नेहमीं प्रसन्नता असते व ज्यास चिरशांतीचा लाभ झाला त्याला दुःख कसलें ? आणि तें होणार तरी कोठून ? निवाऱ्यांतील दिपज्योतिप्रमाणें जो स्थिर बुद्धि आहे तो आत्मस्वरूप समाधींत निश्चलपणें रत असतो [ ३३० ते ३४१ ]. हा योगयुक्त होऊन राहण्याचा विचार ज्याचे अन्तःकरणांत नाहीं त्याला शब्दादिक विषय आपल्या पाशांत गोवून टाकतात. अर्जुना ! ज्याचे ठिकाणीं मनाची चंचलता असल्यानें इंद्रियनिग्रह नाहीं, ज्यास शांतीचा लेशहि नाहीं त्याला सुख हे चुकूनदेखील मिळत नाहीं. म्हणून मुमुक्षूनें मनोनिग्रह व इन्द्रियनिग्रह अवश्य करावा. इतकेंच नव्हे तर कृतार्थ होण्याच्या बेतांत आलेल्या, सिद्धस्थितिप्राप्तीच्या जवळ आलेल्यांनाहि इन्द्रिय-निग्रह करणें जरूरीचे आहे. त्यानें कौतुकानें जरी इन्द्रियाचें लालन केलें तर तो संसारदुःखानें व्यापिला जातो, असें समज [ ३३१ ते ३५० ]. सर्व प्राण्यांस अज्ञात असलेल्या आत्मस्वरूपाविषयीं स्थितप्रज्ञ पूर्ण जागा असतो. असे पहा कीं यच्चयावत् प्राणी ज्या आत्मस्वरूपाचे ठिकाणीं झोपलेले आहेत अर्थात् ब्रह्मात्मैक्यस्वरूपाचे अज्ञान हीच कोणी एक निद्रा असून त्या अज्ञान निद्रापरवशतेमुळें प्राणी त्या ब्रह्मात्मैक्य तत्वास यथार्थत्वानें जाणत नाहींत, तेथें हा इन्द्रियसंयमपूर्वक स्थितप्रज्ञ झालेला पुरुष पूर्ण जागा असतो. म्हणजे ब्रह्मात्मैक्यस्वरूपाविषयक अज्ञानरूपी निद्रा संपूर्ण तया क्षय पावल्यामुळें जो प्रबोध अवस्थेस प्राप्त झाला आहे, अर्थात् ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारास प्राप्त झालेला असतो.

तसेंच ज्या अविद्यादशेंत-द्रष्टा-दृश्य-दर्शनादि भेदवती अवस्थेंत प्राणिमात्र जागे आहेत, म्हणजे अहं-ममाध्यास पूर्वक हा 'मी' व हे 'माझें' अशा व्यवहारपूर्वक दृश्यास सत्य व भोगसाधन समजतो व स्वतःस भोक्ता समजून व्यवहार करतो त्या अवस्थेंत तो ज्ञानी निजलेला असतो. म्हणजे अहं-ममाध्यासास हेतुभूत अनादि अविद्या सर्वथैव निवृत्त झाल्यामुळें तिच्याविषयीं नाहींचाच निश्चय झाल्यामुळें ज्ञानदशेंत 'हा-मी, हें माझें' असा प्राकृत व्यवहार तो मुळींच करीत नाहीं, ही एक सूक्ष्म खूण आहे. जो निरंतर शांत असतो; तो अनंत अखंड एकरस सुखात निमग्न असल्यामुळें त्यास ऋद्धि-सिद्धि आल्या काय नि गेल्या काय त्यांची खिजगणितहि नसते. किंबहुना ! स्वर्गसुखाचीहि त्याला पर्वा नसतें. कारण, तो आत्मबोधानें, परमानंदानें संतुष्ट झालेला असतो तो आपलें ठिकाणचा 'मीपणा' सर्व विषय बाधित करून संपूर्ण विश्व आत्मरूप समजूनच विश्वात संचार करीत असतो. [ ३५१ ते ३६७ ]. या सर्वोच्च ब्रह्मबोधावर निरंतर आरूढ असल्यामुळें त्याचा देहपात होण्याची वेळ आली तरीहि मरणकाळची चिंता, मृत्युसमयीचे देहदुःख त्याला मुळींच प्रतिबंध करूं शकत नाहीं. त्याच्या चित्तांत कोणतीच व्याकुळता न होतां देह पडतो. मरणा-पूर्वीच ब्रह्मस्थितीस लाभलेला ज्ञानी भक्त देहपातानंतर दुसरीकडे म्हणजे तरी कोठे जाणार ? तर त्याची ब्रह्मस्थितीरूप अवस्था देहांतींहि मोडणें सुतराम् अशक्य आहे. असें भगवंताचे बोलणें ऐकून अर्जुन आपलें मनांत फारच हर्षित झाला. यापुढें त्याच्या मनांत शंका येऊन अर्जुन देवांना प्रश्न करील तो संवाद श्रीनिवृत्तिनाथांचे शिष्य श्रीज्ञानदेव पुढच्या अध्यायांत सांगतील [ ३६८ ते ३७५ ].

[ या संपूर्ण दुसऱ्या अध्यायाचा नकाशा क्रमांक १ पहावा ]



# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय तिसरा

अर्जुन उवाच :--

ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन । तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १ ॥

मग आइका अर्जुनें म्हणितलें । देवा तुम्ही जें वाक्य बोलिलें । तें निकें म्यां परिसिलें । कमळापति ॥ १ ॥ तेथ कर्म आणि कर्ता । उरेचिना पाहतां । ऐसें मत तुझें श्रीअनंता । निश्चित जरी ॥ २ ॥ तरी मातें केवीं श्रीहरी । म्हणसी पार्था संग्रामु करीं । इये लाजसी ना महाघोरीं । कर्मीं सुतां ॥ ३ ॥ हां गा कर्म तूंचि अशेष । निराकरिसी निःशेष । तरी मजकरवीं हे हिंसक । कां करविसी ॥ ४ ॥ तरी हेंचि विचारीं हृषीकेशा । तूं मानु देसी कर्मलेशां । आणि येसणी हे हिंसा । करवीतु आहासी ॥ ५ ॥

व्यामिश्रेणेव वाक्येन बुध्दिं मोहयसीव मे । तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥

देवा तुवांचि ऐसें बोलावें । तरी आम्हीं नेणती काय करावें । आतां संपलें म्हण पां आघवें । विवेकाचें ॥ ६ ॥ हां गा उपदेश जरी ऐसा । तरी अपभ्रंशु तो कैसा । आतां पुरला आम्हां धिंवसा । आत्मबोधाचा ॥ ७ ॥ वैद्यु पथ्य वारूनि जाये । मग जरी आपणचि विष सुये । तरी रोगिया कैसेनि जिये । सांगें मज ॥ ८ ॥ जैसें आंधळें सुइंजे आव्हांटा । कां माजवणं दीजे मर्कटा । तैसा उपदेशु हा गोमटा । वोढवला आम्हां ॥ ९ ॥ मी आधींचि कांहीं नेणें । वरी कवळिलों मोहें येणें । श्रीकृष्णा विवेकु या कारणें । पुसिला तुज ॥ १० ॥ तंव तुझी एकेक नवाई । एथ उपदेशामाजीं गोवाई ॥ तरी अनुसरलिया काई । ऐसें कीजे ? ॥ ११ ॥ आम्हीं तनुमनुजीवें । तुझिया बोला वोटंगावें । आणि तुवांचि ऐसें करावें । तरी सरलें म्हण ॥ १२ ॥ आतां ऐसियापरी बोधिसी । तरी निकें आम्हां करिसी । एथ ज्ञानाची आस कायसी । अर्जुन म्हणे ॥ १३ ॥ तरी ये जाणिवेचें तरी सरलें । परी आणीक एक असे जाहलें । जें थितें हें डहुळलें । मानस माझें ॥ १४ ॥ तेवींचि श्रीकृष्णा हें तुझें ।

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय तिसरा

**अन्वयार्थ**—**हे जनार्दन**–हे कृष्णा !–**कर्मणः**–कर्मा-हून **बुद्धिः**–ज्ञान–**ते**–तुला–**ज्यायसि**–श्रेष्ठ –**चेत्**–जर – **मता**–संमत आहे–**तत्**–तर मग–**केशव**–हे केशवा !–**घोरे कर्मणि**–घोर कर्मांत–**मां**–मला–**किं**–कां बरें–**नियोजयसि**–नियुक्त करतोस ? १.

ज्ञानोबाराय म्हणतात:–कोणत्या प्रकारें अर्जुनानें शंका केली तें ऐका–मग अर्जुन म्हणाला, देवा ! कमलापते ! तुम्ही जें कांहीं आतां बोललां, तें मी सर्व लक्षपूर्वक ऐकिलें १. आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं विचार करून पाहिले असतां कर्म आणि कर्ता हीं उरतच नाहींत. श्रीअनंता हें जर तुझें निश्चित मत असेल २. तर मग हृषीकेशा ! 'पार्था, तूं युद्धच कर', असें मला कां सांगतां ? ह्या भयंकर कर्मांत मला घालतांना तुम्हांला लाज वाटत नाहीं काय ? ३. हें पहा, आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं सर्व कर्माचा तूंच निषेध करतोस आणि माझ्या-कडून मात्र हिंसात्मक कर्म करवित आहेत हे योग्य आहे कां ? ४. तर हृषीकेशा ! ह्याचा तूंच विचार कर. मला तर असें वाटतें कीं, तूंच कर्ममार्गाला मनांतून मान देतोस व माझ्या हातून हीं एवढी भयंकर हिंसा करवीत आहेस [ याचा मेळ कसा बसावा ] ५.

**अन्वयार्थ**—**व्यामिश्रेण इव**–जणुं काय अत्यंत घोटा-ळ्याच्या–**वाक्येन**–वाक्यानें–**मे बुद्धिं**–माझ्या बुद्धीला–**मोहयसि इव**–तूं मोहच पाडीत आहेस–मला जणुं काय भ्रमांत पाडीत आहेस–[ **तत्**–यास्तव ]–**येन**–ज्याच्या योगानें–**अहं**–मी–**श्रेयः**–परम कल्याणास–**आप्नुयाम्**–प्राप्त होईन–**तत्**–तें–**एकम्**–एक–**निश्चित्य**–ठरवून–**वद**–मला सांग २.

देवा ! तूंच जर असें [ संदेहकारक ] बोलूं लागलास तर आम्हीं अज्ञान्यांनीं काय करावें ? तर आतां सर्व विचार संपला असेंच म्हणण्याची पाळी आली ६. अहो ! ह्यालाच जर अज्ञान नाशाचा उपदेश म्हणावे, तर मग भ्रम उत्पन्न करणारें भाषण याहून निराळें ते काय राहिले ? आतां आमची आपणापासून आत्मबोध करून घेण्याची इच्छा पूर्णच झाली म्हणावयाची ! [ अर्थात् नाहीं ] ७. अहो ! वैद्य हा रोग्याची प्रकृति पाहून प्रथम त्यावर पथ्याची योजना [ रोग्याने काय खावें, काय खाऊं नये हे ] सांगून गेल्यावर मग जर वैद्यच त्या औषधांत विष घालील, तर तो रोगी जगेल तरी कसा ? हे मला सांग बरें ! ८. जसे आंधळ्यास आडवाटेला लावावें किंवा आधीच माकड आणि त्यांत त्याला मादक पदार्थ पाजावेत तसा तुझा हा उत्तम उपदेश आम्हांस फार चांगला लाभला म्हणावयाचा ! ९. अहो ! मला आधींच कांहीं समजत नाहीं, त्यांतून मी ह्या मोहानें ग्रस्त झालों आहें, म्हणून तर तुला श्रीकृष्णा सारासार विचार काय तो पुसला १०. तों तुझें एकेक पहावे तो सर्व नवलच ! तुझ्या उपदेशांत साराच घोंटाळा ! तर शरणांगताशीं तूं असें वागावेस कां ! ११. आम्हीं शरीरानें, मनानें व जीवा-भावानें तुझ्या बोलण्यावर भरंवसा ठेवावा आणि तूंच जर असें करूं लागलास तर मग [ सर्व कांहीं ] आटोपलेंच म्हणावयाचें ! १२. अर्जुन म्हणाला:–" आतां अशाच प्रकारें जर तूं बोध करणार असशील तर मग आमचें चांगलेंच कल्याण करतोस म्हणावयाचे ! आतां येथें ज्ञान संपादन करण्याची आशा कशाची ? १३. ज्ञान संपादन करण्याची हौस तर खरोखर संपलीच, परंतु यांत उलट एक असें झालें कीं, माझ्या मनाची प्राप्त असलेली स्थिरता जाऊन माझे मन जास्तच घोंटाळ्यांत मात्र पडलें ! १४. [ पुनः अर्जुन मनांत चपापून म्हणतो कीं, ] त्या-

१ घालितां. २ निषेधिसी. ३ भव्यपणा. ४ धाडावें. ५ मद्यादि पदार्थ. ६ घोंटाळा, गुंतागुंत. ७ आश्रय करावा.

चरित्र कांहीं नेणिजे। जरी चित्त पाहसी माझें। येणे मिषें ॥ १५ ॥ ना तरी झकवीतु आहासी मातें। कीं तत्त्वाचि कथिले ध्वंनितें। हें अवगमितां निरुतें। जाणवेना ॥ १६ ॥ म्हणौनि आइकें देवा। हा भावार्थु आतां न बोलावा। मज विवेकु सांगावा। मऱ्हाटा जी ॥ १७ ॥ मी अत्यंत जड असें। परी ऐसाही निकें परियेसें। श्रीकृष्णा बोलावें तुवां तैसें। एकनिष्ठ ॥ १८ ॥ देखैं रोगातें जिणावें। औषध तरी देयावें। परी तें अति रुच्य व्हावें। मधुर जैसें ॥ १९ ॥ तैसें सकळार्थभरित। तत्त्व सांगावें उचित। परी बोधें माझें चित्त। जयापरी ॥ २० ॥ देवा तुज ऐसा निजगुरु। आजि आर्तीधणी कां न करूं। एथ भीड कवणाची धरूं। तूं माय आमुची ॥ २१ ॥ हां गां कामधेनूचें दुभतें। दैवें जाहलें जरी आपैतें। तरीं कामनेची कां तेथें। वानी[२] कीजे ?॥ २२ ॥ जरी चिंतामणी हाता चढे। तरी वांछेचें कवण सांकडें। कां आपुलेनि सुरवाडें[३]। इच्छावें ना ?॥ २३ ॥ देखा अमृतसिंधूतें ठाकावें। मग ताहानाचि जरी फुटावें। तरी सायासु कां करावे। मागील ते ?॥ २४ ॥ तैसा जन्मांतरीं बहुतीं। उपासितां श्रीलक्ष्मीपती। तूं दैवें आजि हातीं। जाहलासी जरी ॥ २५ ॥ तरी आपुलिया सवेशां[४]। कां न मागावासि परेशां ?। देवा सुकाळु हा मानसा। पाहला असे ॥ २६ ॥ देखैं सकळार्तीचें जियालें। आजि पुण्य यशासि आलें। हें मनोरथ जहाले। विजयी माझे ॥ २७ ॥ जी जी परममंगळधामा। सकळ देवदेवोत्तमा। तूं स्वाधीन आजि आम्हां। म्हणौनियां ॥ २८ ॥ जैसें मातेच्या ठायीं। अपत्या अनवसरू नाहीं। स्तन्यालागूनि पाहीं। जियापरी ॥ २९ ॥ तैसें देवा तूतें। पुसिजतसे आवडे तें। आपुलेनि आर्तें। कृपानिधीं ॥ ३० ॥ तरीं पारत्रिकीं हित। आणि आचरितां तरी उचित। तें सांगें एक निश्चित। पार्थु म्हणे ॥ ३१ ॥

श्रीभगवानुवाच :—

लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयाऽनघ। ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥ ३ ॥

या बोला श्रीअच्युतु। म्हणतसे विस्मितु। अर्जुना हा ध्वंनितु। अभिप्रावो ॥ ३२ ॥ जे बुद्धियोगु सांगतां। सांख्यमतसंस्था। प्रकटिली स्वभावता। प्रसंगें आम्हीं ॥ ३३ ॥ तो उद्देशु[५] तूं नेणसीचि। म्हणौनि क्षोभलासि[६] वायांचि। तरी आतां जाणें म्यांचि। उक्त[१२] दोन्ही[१३] ॥ ३४ ॥ अवधारीं वीरश्रेष्ठा। ये लोकीं या दोन्ही निष्ठा। मजचिपासूनि प्रगटा। अनादिसिद्धा ॥ ३५ ॥ एकु ज्ञानयोगु म्हणिजे। जो सांख्यीं

बरोबरच श्रीकृष्णा! तुझी काय लीला आहे, हें मला कांहीं कळत नाहीं, कदाचित् ह्या उपदेशाच्या मिषानें तूं माझें मनहि पाहातोस कीं काय? [ कोण जाणें ते न कळे!! ] १५. किंवा तूं आम्हाला फसवितहि असशील अथवा गूढार्थानें ब्रह्मस्वरूपहि सांगितलें असेल यांत खरें काय? हे विचारपूर्वक पाहिलें तरीहि निश्चित असें मला कांहींच कळत नाहीं १६. देवा! आतां मी अशी विनंती करतो कीं, हा उपदेश असा गूढार्थानें सांगू नकोस. महाराज! आपला विचार असेल तो मला आडाण्यालाहि समजेल अशा सोप्या भाषेत स्पष्ट करून सांगा १७. श्रीकृष्णा! मी अतिशय मंदबुद्धि आहे; पण अशाहि मला चांगलें समजेल, असें एक निश्चयात्मक काय असेल ते सांगा १८. रोग नाहींसा व्हावा, म्हणून औषध तर द्यावेच; परंतु ते औषध जसे मधुर व अतीव रुचकर असावें १९. तसें सर्व अर्थानें परिपूर्ण व [ आचरणास ] उचित योग्य असें तत्त्व तर सांगावें; पण तें असें सांगावें कीं, जेणेंकरून माझ्या मनाला त्याचा निःसंदिग्धपणें पूर्ण बोध होईल २०. देवा! तुमच्यासारखा गुरु आज मला मिळाला आहे तेव्हां आज मी आपल्या मनाची इच्छा तृप्त करून कां घेऊं नये? तूं आमची माय आहेस तर मग! ह्या ठिकाणीं मी भीड कोणाची धरूं २१. असें पहा कीं, दैवयोगानें कामधेनूचें दुभतें जर प्राप्त झाले तर तेथें इच्छित वस्तु मागण्यास कमी कां करावें? २२. किंवा चिंतामणि हातीं आला तर मग इच्छित वस्तु मागण्याचे संकट कां पडावें? आपल्याला जें अपेक्षित असेल तें कां मागूं नये? हवें तें इच्छूं नये काय? २३. असें पहा कीं-अमृतसिंधूचें कांठीं येऊन उभे राहून अमृत न पितां जर तहानेनें तडफडावें तर मग अमृतसिंधूजवळ येण्याचे मागले श्रम तरी कां करावें? २४. त्याचप्रमाणें, हें कमलापते! तुझी अनेक जन्मजन्मांतरांमध्यें उपासना अर्थात् निष्काम सेवा केल्यामुळें दैवयोगानें आज जर तूं मला लाभला आहेस २५. तर मग परमेश्वरा! माझ्या इच्छेप्रमाणें तुझ्यापाशीं मी वाटेल तें कां मागून घेऊं नये? देवा! आज माझ्या मनांतील हेतु पूर्ण फलीभूत होण्याचा हा दिवस उगवला आहे! २६. हें पहा-आज माझ्या सर्व इच्छांचे जीवित परिपूर्ण सफल झालें व आज माझें पूर्वपुण्य यशास, फळद्रुपतेस आले व माझे सर्व मनोरथ आज सिद्धीस गेले; असेंच मी समजतों २७. कारण, अहो महाराज! सर्वोत्कृष्ट कल्याणाचें आदिपीठ व सर्व देवाचे देव जे तुम्ही, ते आज आमच्या आधीन झालां आहांत ना! म्हणून २८. असें पहा! आईचें जवळ स्तनपान करण्यास मुलाला जशी वेळ अवेळ ह्यांची मुळींहि अडचण नसते २९. त्याचप्रमाणें देवा! कृपानिधे!! मी तुम्हांला माझे इच्छेनुरूप असें वाटेल तें विचारीत आहें ३०. म्हणून देवा! इहलोकीं आचरण्यास योग्य व परलोकीं हितकारक असें जें एक निश्चित काय असेल ते मला सांग, असें अर्जुन म्हणाला ३१.

**अन्वयार्थ**—**हे अनघ**-हे निष्पाप अर्जुना!-**मया**-मी-**अस्मिन् लोके**-या लोकीं-**द्विविधा निष्ठा**-दोन प्रकारची स्थिति-अनुष्ठानतत्परता-**पुरा**-पूर्वीं-वैदिक संप्रदाय सुरू केला त्यावेळीं सृष्टीच्या आरंभीं-**प्रोक्ता**-सांगितली-**सांख्यानां**-स्थितप्रज्ञ संन्यास्यांची-**ज्ञानयोगन**-ज्ञानयोगानें-सांख्ययोगानें व-**योगिनाम्**-अज्ञ कर्मी अधिऱ्यांची-**कर्मयोगेन**-कर्मयोगानें स्थिति सांगितली ३.

हें बोलणें ऐकून श्रीकृष्ण आश्चर्यानें विस्मय पावून म्हणतात-अर्जुना! तुला मी कर्म करण्याविषयीं जे थोडक्यांत सांगितलें त्यांत थोडा गर्भितार्थ होता. [ देव आपल्याकडे थोडा कमीपणा घेऊन असें सांगतात कीं, मला प्राधान्यानें कर्म मार्गच सांगावयाचा होता ] ३२. कारण तो ईश्वरार्पणरूप कर्ममार्ग सांगतांना प्रसंगानुसार जो सहज सांख्य-ज्ञान्याच्या मताचा सिद्धान्त व ज्ञानमार्गाची व्यवस्था महती [ ज्या हेतूनें ] आम्ही सांगून गेलों ३३. तो आमचा सांगण्यांतला हेतु तूं जाणलाच नाहींस, म्हणून व्यर्थ रागावलास; असो तर आतां हें ध्यानांत ठेव कीं, [ सांख्य-ज्ञानयोग आणि बुद्धियोग-निष्काम कर्मयोग ] हे दोन्ही मार्ग मींच सांगितलेले आहेत ३४. ह्या लोकांत हे दोन्ही मार्गाचे संप्रदाय माझ्यापासूनच अनादिसिद्ध, पूर्वापार प्रकट झालेले आहेत ३५. त्यांपैकीं एका संप्रदायालाच 'ज्ञानयोग' म्हणतात. त्याचे आचरण [आत्मानात्म विचार संपन्न] ज्ञानी लोक करतात. आणि त्यांत चैतन्याची आत्मत्वानें ओळख होतांक्षणींच ते

१ संक्षेपानें, गुढार्थानें. २ कमतरता. ३ आवडेल तसें. ४ स्वच्छेनें. ५ परमेश्वरा. ६ साश्चर्य. ७ संक्षिप्त. ८ कर्मयोग. ९ आत्मानात्मविचार, ज्ञानयोग. १० हेतु, मतलब. ११ रागावलास. १२ सांगितले. १३ ज्ञानयोग व कर्मयोग.

अनुष्ठिजे । जेथ वोळखीसवें पाविजें । तद्रूपता ॥ ३६ ॥ एकु कर्मयोगु जाण । जेथ साधकजन निपुण । होऊनियां निर्वाण । पावती वेळे ॥ ३७ ॥ हे मार्गु तरी दोनी । परी एकवटतीं निदानीं । जैसी सिद्धसाध्य भोजनीं । तृप्ती एक ॥ ३८ ॥ कां पूर्वापर सरितां । भिन्न दिसती पाहतां । मग सिंधुमिळणीं ऐक्यता । पावती शेखीं ॥ ३९ ॥ तैसीं दोनीही मतें । सूचितीं एका कारणातें । परी उपास्ति ते योग्यते- । आधीन असे ॥ ४० ॥ देखें उत्प्लवनासरिसां । पक्षी फळासि झोंबे जैसा । सांगें नरू केवीं तैसा । पावे वेगा? ॥ ४१ ॥ तो हळू हळू ढाळेंढाळें । केउतेनि एके वेळे । तया मार्गाचेनि बळें । निश्चित ठाकी ॥ ४२ ॥ तैसें देख पां विहंगममतें । अधिष्ठूनि ज्ञानातें । सांख्य सद्य मोक्षातें । आकळिती ॥ ४३ ॥ येर योगिये कर्माधारें । विहितेंचि निजाचारें । पूर्णता अवसरें । पावतें होती ॥ ४४ ॥

न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते । न च संन्यसनादेव सिध्दिं समधिगच्छति ॥ ४ ॥

वांचोनि कर्मारंभ उचित । न करितां सिद्धवत । कर्महीना निश्चित । होईजेना ॥ ४५ ॥ कीं प्राप्तकर्म सांडिजे । येतुलेनि नैष्कर्म्य होईजे । हे अर्जुना वायां बोलिजे । मूर्खपणें ॥ ४६ ॥ सांगें पैलतीरा जावें । ऐसें व्यसन कां जेथ पावे । तेथ नावेतें त्यजावें । घडे केवीं ? ॥ ४७ ॥ ना तरी तृप्ति इच्छिजे । तरी कैसेनि पाकु न कीजे । कीं सिद्धुही न सेविजे । केवीं सांगें ? ॥ ४८ ॥ जंव निरार्तता नाहीं । तंव व्यापारु असे पाहीं । मग संतुष्टीच्या ठायीं । कुंठे सहजें ॥ ४९ ॥ म्हणौनि आईकें पार्था । जयां नैष्कर्म्यपदीं आस्था । तया उचित कर्म सर्वथा । त्याज्य नोहे ॥ ५० ॥ आणि आपुलिये चाडे । आपादिलें हें मांडे । कीं त्यजिलें कर्म सांडे । ऐसें आहे ? ॥ ५१ ॥ हें वायांचि सैरा बोलिजे । उकलु तरी देखोनि पाहिजे । परी त्यजितां कर्म न त्यजे । निभ्रांत मानीं ॥ ५२ ॥

न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् । कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥

जंव प्रकृतीचें अधिष्ठान । तंव सांडी मांडी हें अज्ञान । जे चेष्टा ते गुणाधीन । आपैसी असे ॥ ५३ ॥ देखें विहित कर्म जेतुलें । तें सळें जरी वोसंडिलें । तरी स्वभाव काय निमाले । इंद्रियांचे ॥ ५४ ॥ सांगें श्रवणीं ऐकावें ठेलें ? । कीं नेत्रींचें तेज गेलें ? । हें नासारंध्र बुझालें । परिमळु नेघे ? ॥ ५५ ॥ ना तरी प्राणापान-

तद्रूपतेस [ परमात्मस्वरूपास तन्मयतेनें प्राप्त होतात ३६. दुसऱ्यास कर्मयोग म्हणतात असे समज. त्या योगांत तत्पर, निष्णात होऊन मुमुक्षुजन परमगतीला पावतात; पण उशीरा, अवकाशानें [ म्हणण्याचें कारण म्हणजे निष्काम कर्मानें अंतःकरणशुद्धि, विविदिषा, हरि-गुरुकृपा आणि ज्ञानद्वारां मोक्षास पावतात ] ३७. तयार असलेल्या किंवा तयार करावयाच्या अशा दोन्ही अन्नाच्या भोजनापासून जशी सारखीच तृप्ति होते—तसे हे मार्ग तर दोन आहेत, पण ते परिणामीं एकच ठिकाणीं [ आत्मस्वरूपींच ] मिळतात ३८. किंवा जशा पूर्व पश्चिम दिशांकडे वाहणाऱ्या नद्या पाहिल्या तर वाहतेवेळीं भिन्न दिसतात, परंतु समुद्रांत मिळण्याचे वेळीं अखेरीस त्या एक समुद्ररूपच होतात ३९. तशीं हीं दोन्हीं [ सांख्य व बुद्धियोग ] मतें एकाच तत्त्वप्राप्तीचीं-साध्याचीं सूचक आहेत, परंतु त्यांचे उपासनानुष्ठान मात्र उपासकांच्या योग्यतेवर अवलंबून आहे ४०. जसा पक्षी एका उड्डाणाबरोबर झाडाचे फळ प्राप्त करून घेतो; पण त्याच वेगानें मनुष्यास तें फळ कसें प्राप्त करून घेतां येईल ? सांग बरें ? ४१. तो हळूहळू एका फांदीवरून दुसऱ्या फांदीवर जातां जातां तो कांहीं वेळानें त्या मार्गाच्या आधारानेंच फळाजवळ खात्रीनें पोहोंचेल व तोही फळ प्राप्त करून घेईल ४२. त्याचप्रमाणें पहा ! सांख्य ज्ञानमार्गाचा आश्रय करून; ते ज्ञानी विहंगम न्यायानें पक्षाच्या गतीप्रमाणें तत्काळ मोक्ष प्राप्त करून घेतात ४३. दुसरे जें कर्मयोगी ते कर्ममार्गाच्या आधारानें [ पिपीलिका मार्गानें ] वेदविहित अशा आपल्या वर्णाश्रमधर्माचें आचरण करून कांही कालानें अंतःकरण शुद्धि, ब्रह्मात्मैक्य ज्ञान इत्यादि द्वारानें परंपरेनें मोक्षरूप पूर्णतेस प्राप्त होतात ४४.

**अन्वयार्थ—पुरुषः**—अधिकारी पुरुष—**कर्मणाम्**—विहित कर्मांच्या-**अनारम्भात्**—आरंभावांचून-कर्मानुष्ठाला आरंभ केल्यावांचून—**नैष्कर्म्यं**—ज्ञानयोगनिष्ठेला—**न अश्नुते**—प्राप्त होत नाहीं—**च** आणि—**संन्यसनात् एव**—केवळ ज्ञानरहित संन्यासानेंच—**सिध्दि**—ज्ञानयोगनिष्ठेला—**न समधिगच्छति**—प्राप्त होत नाहीं ४.

शिवाय कोणीहि मनुष्य वेदविहित कर्माचा आरंभ न करतांच, आरंभापासूनच विहित प्राप्त कर्मे टाकून देईल व जर सिद्ध ज्ञानवानाप्रमाणें आपण नैष्कर्म्य होऊं म्हणेल तर निश्चयानें त्या कर्महीनास नैष्कर्म्य स्थितीस प्राप्त होता येणार नाहीं ४५. अरे ! अर्जुना ! जीं ज्याला वेदविहित कर्मे आहेत फक्त तीं टाकावीत व तेवढ्यानेच नैष्कर्म्य-कृतार्थ व्हावें असें म्हणणें निव्वळ मूर्खपणाचें होय ४६. पहा ! नदी दुथडी भरली आहे व ती उतरून पलीकडे जाण्याची तीव्र आवश्यकता आहे, तेथें नावेचा त्याग करून जाऊं म्हटलें तर कसें जातां येईल ? सांग बरें ! ४७. किंवा भोजनापासून ज्यास तृप्तीची इच्छा आहे, त्याला स्वयंपाक न करून कसें चालेल? अथवा स्वयंपाक करून तयार असलेलें अन्न न खातां कसें चालेल? तृप्ति कशी प्राप्त होईल? सांग बरें ! ४८. जोंपर्यंत निरिच्छता प्राप्त झाली नाहीं, तोंपर्यंत कर्म करणें हें असणारच असें समज; तीच तृप्ति प्राप्त झाली म्हणजे आत्मसंतोष झाला कीं, ते कर्म करणें साहजिकच थांबते ४९. म्हणून पार्था ! ज्याला नैष्कर्म्यस्थितीची—परमात्मप्राप्तीची तीव्र इच्छा आहे, त्याला वेदविहित कर्माचरण सोडणें कधींहि योग्य होणार नाहीं ५०. आणि दुसरें असें कीं, आपल्या इच्छेनेंच कर्माचा स्वीकार केला कीं ते घडते व त्याचा त्याग केला कीं कर्माचा त्याग होतो असें आहे कीं काय? ५१. हें व्यर्थ बहकल्यासारखें कांहीं तरी बोलणें आहे. ह्याचा नीट विचारपूर्वक उलगडा करून पाहिला तर नुसतें कर्म करण्याचें टाकल्यानें कर्माचा त्याग होत नाहीं, असें तूं निःसंशय पक्कें समज ५२.

**अन्वयार्थ—हि**—कारण-**कश्चित्**—कोणीहि—**क्षणम् अपि**—एक क्षणभरसुद्धां-**अकर्मकृत्**—कर्म न करणारा असा, कर्म सोडून—**जातु**—केव्हांहि—**न तिष्ठति**—राहात नाहीं—**हि**—कारण—**अवशः** [ **एव** ] **सर्वः**—कर्माच्या आधीन असलेला प्राणी प्रकृति पराधीन असलेला हरएक जीव—**प्रकृतिजः गुणैः**—ईश्वराच्या अचिन्त्य शक्तीपासून झालेल्या सत्त्व-रजस्तमोगुणांकडून—**कर्म**— कर्म—**कार्यते**—करविला जातो. [ गुण प्रत्येक अज्ञ जीवांकडून कर्म करवितात ] ५.

जोपर्यंत प्रकृतीचा [ प्रकृतीकार्य देहेंद्रियाचा ] संबंध, आश्रय आहे तोपर्यंत मी कर्मानुष्ठान करीन किंवा कर्माचा त्याग करीन हें म्हणणें अज्ञानपूर्वक, मुर्खपणाचें आहे. कारण, जेवढें म्हणून कर्म घडते ते सर्व स्वभावतःच सत्त्वादिगुणांच्या आधीन आहे ५३. असें पहा कीं, जेवढें म्हणून वेदविहित कर्म आहे, तेवढें सर्वच्या सर्व आपण द्वेषानें, हट्टानें करावयाचें सोडून दिले तरी कर्म करण्याचें देहेंद्रियादि उपाधीचे स्वाभाविक धर्म नाहींसे झाले आहेत असें होईल काय ५४. अरे ! जरी विहितकर्माचा त्याग हट्टानें केला तरी कानांनीं ऐकण्याचें बंद झालें आहे काय? कां डोळ्यांतील पाहण्याचें सामर्थ्य गेले आहे काय? नाकपुड्या बुजून जाऊन त्या वास घेईनाशा झाल्या आहेत कां? ५५. किंवा प्राणापानवायूंच्या

गति । कीं निर्विकल्प जाहली मती । कीं क्षुधातृषादि आर्ति । खुंटलिया ॥ ५६ ॥ हे स्वभावबोधु ठेले । कीं चरण चालों विसरले । हें असो काय निमाले । जन्म-मृत्यु ? ॥५७॥ हें न ठकेचि जरी कांहीं । तरी सांडिलें तें कायी । म्हणौनि कर्मत्यागु नाहीं । प्रकृतिमंता ॥ ५८ ॥ कर्म पराधीनपणें । निपजतसे प्रकृतिगुणें । येरी धरीं मोकलीं अंतःकरणें । वाहिजे वायां ॥ ५९ ॥ देखें रथीं आरूढिजे । मग जरी निश्चळा बैसिजे । तरी चळु होऊनि हिंडिजे । परतंत्रा ॥ ६० ॥ कां उच-लिलें वायुवशें । चळे शुष्क पत्र जैसें । निचेष्ट आकाशें । परिभ्रमें ॥ ६१ ॥ तैसें प्रकृतिआधारें । कर्मेंद्रियविकारें । नैष्कर्म्यही व्यापारे । निरंतर ॥ ६२ ॥ म्हणौनि संगू जंव प्रकृतीचा । तंववरी त्यागु न घडे कर्माचा । ऐसियाहि करूं म्हणती तयांचा । आग्रहोचि उरे ॥ ६३ ॥

कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् । इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ ६ ॥

जे उचित कर्म सांडिती । मग नैष्कर्म्य होऊं पाहती । परी कर्मेंद्रियप्रवृत्ती । निरोधुनी ॥६४॥ तयां कर्मत्यागु न घडे । जें कर्तव्य मनीं सांपडे । वरी नटती तें फुडें । दरिद्रं जाण ॥६५॥ ऐसे ते पार्था । विषयासक्त सर्वथा । ओळखावे तत्त्वता । भ्रांति नाहीं ॥६६॥ आतां देईं अवधान । प्रसंगें तुज सांगेन । या नैराश्याचें चिन्ह । धनुर्धरा ॥६७॥

यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्याऽरभतेऽर्जुन । कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥

जो अंतरीं दृढ । परमात्मरूपीं गूढ । बाह्य भागू तरी रूढ । लौकिकु जैसा ॥६८॥ जो इंद्रियां आज्ञा न करी । वि यांचें भय न धरी । प्राप्त कर्म नाव्हेरी । उचित जें जें ॥६९॥ तो कर्मेंद्रियें कर्मीं । राहटतां तरी न नियमी । परी तेथिचेनि उर्मीं । झांको-ळेना ॥७०॥ तो कामनामात्रें न घेपे । मोहमळें न लिंपे । जैसें जळीं जळें न शिंपे । पद्मपत्र ॥७१॥ तैसा संसर्गामाजीं असे । सकळांसारिखा दिसे । जैसें तोयसंगें आभासे । भानुबिंब ॥ ७२ ॥ तैसा सामान्यत्वें पाहिजे । तरी साधारणुचि देखिजे । येरवीं निर्धारितां नेणिजे । सोय जयाची ॥७३॥ ऐशा चिन्हीं चिन्हितु । देखसी तोचि मुक्तु । आशापाशरहितु । वोळख पां ॥ ७४ ॥ अर्जुना तोचि योगी । विशेषिजे जो जगीं । म्हणौनि ऐसा होय यालागीं । म्हणिपे तूतें ॥ ७५ ॥ तूं मानसा नियमु करीं ॥ निश्चळु होय अंतरीं । मग कर्मेंद्रियें व्यापारीं । वर्ततु सुखें ॥ ७६ ॥

गति बंद झाल्या काय? मनाचे संकल्प विकल्प करणें हें पार थांबले आहे कां? अथवा प्राणधर्म भूकतहान ह्यांची इच्छा नाहींशी झाली काय? ५६. किंवा स्वप्न व जागृति या अवस्था बंद झाल्या कां? किंवा पाय चालण्याचे विसरले काय? हें सर्व असो; पण जन्ममरण चुकलें आहेत काय? ५७. हे कोणतेंच व्यापार बंद राहात नाहींत, तर मग सोडलें तें काय? म्हणून प्रकृतीचा आश्रय करणाऱ्या देहाभिमान्याकडून 'कर्मत्याग' कधींहि होणार नाहीं ५८. कर्म हें पराधीनपणानें म्हणजे शरीरांतील प्रकृतीच्या गुणांमुळें होत असतें, म्हणून एकाद्यानें मी कर्म करीन अगर कर्म सोडीन असें अंतःकरणानें आग्रह धरणें व्यर्थ होय ५९. अरे! असें पहा कीं, कोणी रथांत आरूढ झाल्यावर मग जरी स्वस्थ बसला असला तरी तो रथाच्या आधीन असल्यामुळें सहजच रथाचें फिरण्यामुळें ह्याचेंहि हिंडणें फिरणें जसें घडत असतें ६०. किंवा झाडाचें वाळलेलें पान आपण स्वतः निश्चेष्ट, क्रियारहित असतांहि ज्याप्रमाणें, वायूच्या वेगानें उडून उंच आकाशांत इकडे तिकडे भ्रमण करितें ६१. त्याप्रमाणें, प्रकृती व तत्कार्य शरीरादिकांच्या आश्रयानें व कर्मेंद्रियांच्या विकारानें नैष्कर्म्यस्थितीला पोंचलेला पुरुषहि नेहमीं शारीरिक कर्म करितोच ६२. म्हणून जोंपर्यंत जीवाला शरीराचा, मायेचा संबंध आहे तोंपर्यंत कर्माचा त्याग घडणें कधींहि शक्य नाहीं; असें असूनहि जे "कर्माचा त्याग करूं" म्हणतील तर त्यांचा तो पोकळ आग्रह मात्र उरेल ६३.

**अन्वयार्थ—यः विमूढात्मा**—जे अत्यंत मूढबुद्धि पुरुष—**कर्मेंद्रियाणि**—कर्मेंद्रियांचें—**संयम्य**—संयमन करून **इंद्रियार्थान्**—विषयांचें—**मनसा**—मनानें — **स्मरन्** — स्मरण करीत—**आस्ते**—राहतो—**सः**—तो — **मिथ्याचारः** — ढोंगी—**उच्यते**—म्हटला जातो ६.

अरे! वेदविहित कर्माचा त्याग करतात; पण केवळ कर्मेंद्रियांचा निग्रह करून एवढ्यानेंच जें पुरुष कर्मातीत अवस्थेस प्राप्त होऊं इच्छितात ६४. त्यांना कर्मत्याग तर मुळींच घडत नाहीं. कारण, त्यांच्या मनामध्यें कर्तव्यबुद्धि शेष असतेच; तरीपण कर्मातीत झाल्याचे वरवर भिकार नाटक दाखवितात, खरोखर तें मात्र निव्वळ ढोंग, दैन्य आहे असें समज ६५. पार्था! असे असतील तें लोक नेहमीं खरोखर केवळ विषयासक्त असतात असें निःसंशय जाण ६६. आतां अर्जुना! प्रसंगप्राप्त अशी तुला खऱ्या निरिच्छ [ नैष्कर्म्य सिद्धीस पावलेल्या ] मनुष्याचीं लक्षणें सांगतों, तीं लक्ष देऊन ऐक ६७.

**अन्वयार्थ—हे अर्जुन**—हे अर्जुना!—**तु**—पण—**यः**—जो—**इंद्रियाणि**—ज्ञानेंद्रियांचा— **मनसा** — मनानें —**नियम्य**—निग्रह करून—**असक्तः** [ **सन्** ]—कर्मफलामध्यें आसक्त न होतां—**कर्मेंद्रियैः**—कर्मेंद्रियांनीं—**कर्मयोगम्**—कर्मयोगाचा—**आरभते**—आरंभ करतो—**सः**—तो—**विशिष्यते**—चांगला श्रेष्ठ होय ७.

जो अंतर्यामीं [ दृढ ब्रह्मात्मैक्यापरोक्ष ज्ञानानें ] निश्चल व परमात्म्याचे ठिकाणीं गढून तल्लीन असतो, आणि तो बाह्यतः लोकाचाराप्रमाणें इह लौकिक व्यवहार करीत असतो ६८. तसाच जो इन्द्रियांना कर्मप्रवृत्तिविषयीं आज्ञा करीत नाहीं आणि विषयांची भीतिहि बाळगीत नाहीं, ज्या ज्या वेळेस जीं जीं कर्में करावयाचीं त्या सर्व प्राप्त कर्मांचा अव्हेर अनादर करीत नाहीं ६९. कर्मेंद्रियें आपापलीं कर्में करीत असतांना तो पुरुष त्यांना आवरीत नाहीं हें खरें; पण इन्द्रियांच्या विकारांच्या आधीन किंवा त्यामुळें लिप्त होत नाहीं ७०. तो कोणत्याहि वासनेनें आकळला जात नाहीं व त्याचे मन अविवेकरूप मलानें मलीन होत नाहीं —कमळाचें पान जसें रात्रंदिवस पाण्यांत असून पाण्यानें भिजत नाहीं ७१. त्याप्रमाणें बाह्यतः संसारामध्यें राहून तो इतर जनांसारखा दिसतो; [ पण आंतून अलिप्त असतो ] ज्याप्रमाणें पाण्याच्या संगतीनें सूर्यबिंब पाण्याहून अलिप्त असूनहि त्याचें प्रतिबिंब मात्र पाण्यांत दिसतें ७२. त्याप्रमाणें वरकांती पहातां तो मनुष्य साधारण अज्ञान्यांप्रमाणें कर्म करणारा दिसतो; बाकी त्याची खरी स्थिति कोणती ते विचारपूर्वक ठरवूं पाहिलें तर त्याच्याविषयीं निश्चित अशी कोणतीहि कल्पना करण्याची सोय नाहीं ७३. अशा लक्षणांनीं जो युक्त असलेला पुरुष तुला दिसेल तोच आशापाशरहित व तोच मुक्त आहे असें तूं समज ७४. अर्जुना! तोच तो योगी होय कीं ज्याची जगांत विशेष स्तुती केली जाते म्हणूनच "तूं असा हो," असें मी तुला म्हणतों ७५. तूं आपल्या मनाला आंवरून धर व अंतर्यामीं स्थिरबुद्धि हो. [ मग ] हीं कर्मेंद्रियें आपापले व्यापारांत खुशाल प्रवृत्त होवोत ७६.

१ संकल्पविकल्परहित. २ ज्ञानी, निष्काम. ३ कर्मविमुक्त. ४ विटंबना. ५ विकारानें, वेगानें. ६ कमळाचे पान. ७ वरकांती. ८ मार्ग. ९ युक्त. १० विशेष वर्णिला जातो ११ सांगावयाचे. १२ आकलन, दमन.

नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः । शरीरयात्राऽपि च ते न प्रसिध्येदकर्मणः ॥ ८ ॥

म्हणौनि नैष्कर्म्य होआवें । तरी एथ तें न संभवें । आणि निषिद्ध केवीं राहाटावें । विचारीं पां ॥ ७७ ॥ म्हणौनि जें जें उचित । आणि अवसरेंकरूनि प्राप्त । तें कर्म हेतुरहित । आचरें तूं ॥ ७८ ॥ पार्था आणीकही एक । नेणसी तूं हें कवतिक । जें ऐसें कर्ममोचक । आपैसें असे ॥ ७९ ॥ देखैं अनुक्रमाधारें । स्वधर्मु जो आचरे । तो मोक्षु तेणें व्यापारें । निश्चित पावे ॥ ८० ॥

यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः । तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर ॥ ९ ॥

स्वधर्मु जो बापा । तोचि नित्ययज्ञु जाण पां । म्हणौनि वर्ततां तेथ पापा । संचारु नाहीं ॥ ८१ ॥ हा निजधर्म जैं सांडे । आणि कुकर्मीं रति घडे । तैंचि बंधु पडे । संसारिक ॥ ८२ ॥ म्हणौनि स्वधर्मानुष्ठान । तें अखंड यज्ञ याजन । जो करी तया बंधन । कहींच न घडे ॥ ८३ ॥ हा लोकु कर्में बांधिला । जो परतंत्रा भूत झाला । तो नित्य यज्ञातें चुकला । म्हणौनियां ॥ ८४ ॥ आतां येचिविशीं पार्था । तुज सांगेन एक मी कथा । जैं सृष्टयादि संस्था । ब्रह्मेनें केली ॥८५॥

सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः । अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥

तैं नित्ययागसहितें । सृजिलीं भूतें समस्तें । परी नेणतीचि तियें यज्ञातें । सूक्ष्म म्हणौनि ॥ ८६ ॥ ते वेळीं प्रजीं विनविला ब्रह्मा । देवा काय आश्रयो एथ आम्हां । तंव म्हणे तो कमळजन्मा । भूतांप्रति ॥ ८७ ॥ तुम्हां वर्णविशेषवशें । आम्हीं हा स्वधर्मुचि विहिला असे । यातें उपासा मग आपैसे । पुरती काम ॥ ८८ ॥ तुम्हीं व्रतें नियमु न करावे । शरीरातें न पीडावें । दुरी केंही न वचावें । तीर्थासी गा ॥८९॥ योगादिकें साधनें । साकांक्ष आराधनें । मंत्रयंत्रविधानें । झणीं करा ॥९०॥ देवतांतरा न भजावें । हें सर्वथा कांहीं न करावें । तुम्हीं स्वधर्मयज्ञीं यजावें । अनायासें ॥९१॥ अहेतुकें चित्तें । अनुष्ठा पां ययातें । पतिव्रता पतीतें । जियापरी ॥ ९२ ॥ तैसा स्वधर्मरूपमखु । हाचि सेव्यु तुम्हां एकु । ऐसें सत्यलोकनायकु । बोलता जाहला ॥ ९३ ॥ देखा स्वधर्मातें भजाल । तरी कामधेनु हा होईल । मग प्रजाहो न संडील । तुमतें कदा ॥ ९४ ॥

देवान्भावयताऽनेन ते देवा भावयंतु वः । परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥

जैं येणेंकरूनि समस्तां । परितोषु होईल देवतां । मग ते तुम्हां ईप्सिता । अर्थातें देती ॥ ९५ ॥ या स्वधर्मपूजा पूजितां । देवतागणां समस्तां । योगक्षेमु

**अन्वयार्थ—त्वम्**–तूं–**नियतं कर्म**–नित्य कर्म–**कुरु**–कर–**हि**–कारण–**अकर्मणः**–कर्म मुळींच न करण्यापेक्षां–**कर्म**–कर्म–**ज्यायः**–श्रेष्ठ आहे.–**च–व–ते**–तुझी–**शरीरयात्रा अपि**–शरीरस्थितिही–**अकर्मणः**–कर्म न करण्यानें–**न प्रसिध्दयेत्**–उत्तम प्रकारें–शास्त्रविहित मार्गानें सिद्ध होणार नाहीं ८.

म्हणून कर्मरहित होणें हें [ देहाभिमान्याला ] येथें संसारांत संभवनीय नाहीं, मग त्याने शास्त्रविरुद्ध आचरण कां करावें? ह्याचा तूं विचार कर ७७. म्हणून जें जें योग्य व समयानुसार प्राप्त झालेलें कर्म असेल तें तें कर्म तूं फलहेतु सोडून अर्थात् निष्कामबुद्धीनें कर ७८. अर्जुना! निष्काम कर्माचरणांतील आणखीं एक कौतुक आहे हें तुला माहीत नाहीं; तें हें कीं, निष्कामबुद्धीनें केलेलें हें कर्मच सर्व कर्मबंधापासून म्हणजे संसारांतून सहजच सोडविणारें होतें ७९. पहा [ वर्णपरंपरेनें वर्णाश्रम धर्माधिकाराप्रमाणें उचित स्वधर्माचें जो आचरण करितो, तो त्या आचरणानेंच, निश्चयें करून मोक्ष पावतो ८०.

**अन्वयार्थ—अयं लोकः**–हा अधिकारी कर्मठ मनुष्य–**यज्ञार्थात् कर्मणः**–ईश्वरार्थ केलेल्या कर्माहून–**अन्यत्र**–अन्य कर्मानें–**कर्मबंधनः**–कर्मबद्ध होतो, ईश्वरासाठीं केलेल्या कर्माहून बाकीचें सर्व कर्म त्याला बंधनकारक होतें, म्हणून–**कौन्तेय**–हें अर्जुना!–**मुक्तसङ्गः**– कर्मफलाविषयींचीं आसक्ति सोडून–**तदर्थम्**–ईश्वरासाठीं–**कर्म**–कर्म–**समाचर**–कर ९.

बाबारे! आपल्या धर्माप्रमाणें आचरण करणें हाच नित्ययज्ञ होय असें समज; म्हणून वर्णाश्रम धर्माप्रमाणें वर्तन केले असतां त्यांत पापाचा रिघावच होत नाहीं ८१. प्राण्यांकडून जेव्हां हे स्वधार्माचरण टाकले जातें आणि वाईट कर्माच्या ठिकाणीं आसक्ति वा प्रवृत्ति निर्माण होते, तेव्हांच त्यास संसारबंध प्राप्त होतो व जन्ममरणाचे फेऱ्यांत पडतो ८२. म्हणून स्वधर्माप्रमाणें आचरण करणें हाच अखंड यज्ञ-याजन आहे असें समज आणि जो पुरुष हा यज्ञ करतो, त्याला केव्हांहि बंधन प्राप्त होत नाहीं ८३. हे सर्व लोक जें कर्मानें बांधलें गेले आहेत ते स्वकर्माला चुकलें म्हणूनच ते कर्मपाशांत गुंतून परतंत्र झाले आहेत ८४. पार्था! आतां तुला मी ह्याविषयीं एक कथा सांगतों ऐक. प्रथम ज्या वेळेस ब्रह्मदेवानें सृष्टि ही आदि-संस्था निर्माण केली ८५.

**अन्वयार्थ—प्रजापतिः**–स्रष्टा ब्रह्मदेव–**पुरा**–सृष्टीच्या आरंभीं–**सहयज्ञाः**–यज्ञासहवर्तमान–**प्रजाः**–तीन वर्णांना **सृष्ट्वा**–उत्पन्न करून–**अनेन**–या यज्ञानें–**प्रसविष्यध्वम्**–प्रसव-वृद्धि करा, आपली वाढ करून घ्या. **एषः**–हा यज्ञ–**वः**–तुम्हांस–**इष्टकामधुक्**–इष्ट भोग–फल देणारा–**अस्तु**–होवो,–[ **इति**–असें ] **उवाच**–म्हणाला १०.

त्यावेळेस सर्व मानवादि प्राणी व त्यांनी नित्य आचरण्याचे यज्ञादि धर्म हीं दोन्हीं बरोबरच उत्पन्न केलीं; परंतु ते यज्ञ धर्मस्वरूप गहन सूक्ष्म असल्यामुळें प्रजांना ते समजले नाहींत ८६. तेव्हां त्यांनीं ब्रह्मदेवाची प्रार्थना केली कीं, देवा ह्या लोकांत आम्हांला काय तरणोपाय आहे? तेव्हां तो भगवानाच्या नाभिकमलापासून उत्पन्न झालेला ब्रह्मदेव त्या लोकांना म्हणालाः–८७. तुमच्या वर्णाश्रमविशेषाप्रमाणें आम्हीं [ पूर्वींच ] स्वधर्म नियमित केले आहेत, त्याप्रमाणें त्याचे तुम्ही आचरण करा म्हणजे तुमचे मनांतील हेतु सहजच पूर्ण होतील ८८. त्याखेरीज तुम्ही व्रतवैकल्यें करूं नका, उपासतापास करून शरीरास कष्ट देऊं नका व तीर्थयात्रेकरितां कोठें तरी दूर जाण्याचे श्रम करूं नका ८९. योगादिक साधनें, तसेंच कामनिक दैवताराधना व मंत्रतंत्रादि अनुष्ठानें कदाचित् कराल, करण्याच्या नादीं लागाल, पण करूं नका हो! तसेंच ९०. स्वधर्म टाकून इतर देवास भजूं नका, व ह्या गोष्टी धर्म समजून करूं नका, फक्त तुम्ही आपल्या वर्णाश्रमाप्रमाणें जो सहज प्राप्त धर्म सांगितला आहे, त्या स्वधर्मरूप यज्ञाचे सुखानें अनुष्ठान करा ९१. ज्याप्रमाणें पतिव्रता आपल्या पतीची सेवा निष्कामबुद्धीनें करिते; त्याप्रमाणें तुम्हीं आपल्या स्वधर्माचें निष्कामबुद्धीनें निर्हेतूक चित्तानें आचरण करा ९२. सत्य लोकाधिपती ब्रह्मदेव म्हणाले, या प्रकारें स्वधर्माचें आचरण हाच एक तुमचा यज्ञ होय, म्हणून तोच एक तुम्हांला आचरण करण्यास योग्य आहे ९३. जनहो! असें पहा कीं, तुम्ही जर स्वधर्मानें वागाल, तर तो धर्मच कामधेनूसारखा इच्छित फल पुरविणारा होईल. मग ही कामधेनु तुम्हांला कधींहि अंतर देणार नाहीं ९४.

**अन्वयार्थ—अनेन**–या यज्ञाच्या योगानें–**देवान्**–इंद्रादि देवांची–**भावयत**–तुम्ही वृद्धि करा.–**ते देवाः** ते देव–**वः**–तुमची–**भावयन्तु**–वृद्धि करोत. याप्रमाणें–**परस्परं भावयन्तः**–एकमेकांची वृद्धि करणारे असे होत्साते तुम्ही सर्व–**परंश्रेयः**–ज्ञानप्राप्तीच्या द्वारां परम श्रेयास–**अवाप्स्यथ**–प्राप्त व्हाल ११.

कारण, ह्या स्वधर्माच्या आचरणानें सर्व देवतांना संतोष होईल आणि मग त्या तुम्हांला इच्छित विषय-फल देतील ९५. अशा रीतीनें स्वधर्मआचरणरूप पूजेनें सर्व

निश्चिता । करिती तुमचा ॥ ९६ ॥ तुम्हीं देवांतें भजाल । देव तुम्हां तुष्टतील । ऐसी परस्परें घडेल । प्रीति जेथ ॥ ९७ ॥ तेथ तुम्हीं जें करूं म्हणाल । तें आपैसें सिद्धि जाईल । वांछितेंही पुरेल । मानसींचें ॥ ९८ ॥ वाचासिद्धि पावाल । आज्ञापक होआल । म्हणियें तुमतें मागतील । महाऋद्धि ॥ ९९ ॥ जैसें ऋतुपतीचें द्वार । वनश्री निरंतर । वोळगे फळभार । लावण्येसी ॥ १०० ॥

इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यंते यज्ञभाविताः । तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥ १२ ॥

तैसें सर्व सुखेंसहित । दैवचि मूर्तिमंत । येईल देखा काढत । तुम्हांपाठीं ॥१॥ ऐसें समस्त भोगभरित । होआल तुम्ही अनार्त । जरी स्वधर्मैनिरत । वर्ताल बापा ॥२॥ कां जालिया सकळ संपदा । जो अनुसरेल इंद्रियमंदा । लुब्ध होऊनियां स्वादां । विषयांचिया ॥३॥ तिहीं यज्ञभाविकीं सुरीं । जे हे संपत्ति दिधली पुरी । तयां स्वधर्मीं सर्वेश्वरीं । न भजेल जो ॥४॥ अग्निमुखीं हवन । न करील देवता पूजन । प्राप्तवेळे भोजन । ब्राह्मणाचें ॥५॥ विमुख होईल गुरुभक्ती । आदर न करील अतिथी । संतोष नेदील ज्ञाती । आपुलीये ॥६॥ ऐसा स्वधर्मक्रियारहितु । आथिलेपणें प्रमत्तु । केवळ भोगासक्तु । होईल जो ॥७॥ तया मग अपावो थोर आहे । जेणें तें हातींचें सकळ जाये । देखा प्राप्तही न लाहे । भोग भोगूं ॥८॥ जैसें गतायुषी शरीरीं । चैतन्य वासु न करी । कां निदैवाच्या घरीं । न राहे लक्ष्मी ॥९॥ तैसा स्वधर्मु जरी लोपला । तरी सर्व सुखांचा थारा मोडला । जैसा दीपासवें हरपला । प्रकाशु जाय ॥ ११० ॥ तैसी निजवृत्ति जेथ सांडे । तेथ स्वतंत्रते वस्ती न घडे । आइका प्रजाहो हे फुडें । विरिंचि म्हणे ॥११॥ म्हणौनि स्वधर्मु जो सांडील । तयातें काळु दंडील । चोरु म्हणौनि हरील । सर्वस्व तयाचें ॥१२॥ मग सकळ दोषु भंवते । गिंवसोनि घेति तयातें । रात्रिसमयीं स्मशानातें । भूतें जैसीं ॥ १३ ॥ तैसीं त्रिभुवनींचीं दुःखें । आणि नानाविधें पातकें । दैन्यजात तितुकें । तेथेंचि वसे ॥१४॥ ऐसें होय तया उन्मत्ता । मग न सुटे बापा रुदतां । कल्पांतींही सर्वथा । प्राणिगणहो ॥१५॥ म्हणौनि निजवृत्ती हे न संडावी । इंद्रियें बरळों नेदावीं । ऐसें प्रजांतें शिकवी । चतुराननु ॥१६॥ जैसे जळचरा जळ सांडे । आणि तत्क्षणीं मरण मांडे । हा स्वधर्मु तेणें पाडें । विसंबों नये ॥१७॥ म्हणौनि तुम्हीं समस्तीं । आपुलालिया कर्मीं उचितीं । निरत व्हावें पुढत पुढती । म्हणिपत असे ॥ १८ ॥

देवतागणांचें पूजन केलें असतां त्या तुम्हांला अप्राप्य वस्तूची प्राप्ति करून देऊन प्राप्त वस्तूचें संरक्षणरूप क्षेमहि निःसंशय करतील ९६. तुम्ही देवांना भजाल तर देवहि तुम्हांवर संतुष्ट होतील आणि अशा प्रकारें एक-मेकांचे एकमेकांवर जेव्हां प्रेम जडेल ९७. तेव्हां तुम्हीं जें करूं म्हणाल तें सहजच सिद्धीस जाईल आणि तुमच्या मनांतील सर्व इच्छित गोष्टीहि पूर्ण होतील ९८. तुम्ही वाणीनें जे बोलाल तें सिद्ध-खरें होईल, आणि तुम्ही दुसऱ्यांना आज्ञा करणारें व्हाल व महाऋद्धि नेहमीं तुमच्या दासी होऊन तुम्हांला "सेवा घ्या, आपली काय आज्ञा आहे" असें विचारतील ९९. ऋतुपति अशा वसंतऋतूचे द्वारांत ज्याप्रमाणें वनशोभा ही आपल्या फलपुष्पभाराच्या लावण्यासह निरंतरचें वास्तव्य व सेवा करिते-१००.

**अन्वयार्थ—यज्ञभाविताः देवाः**—यज्ञानें संतुष्ट केले गेलेले देव—**वः**—तुम्हांस—**इष्टान् भोगान् हि**—इष्ट असलेले भोगच—**दास्यन्ते**—देतील—**तैः**—त्या देवांनीं—**दत्तान्**-दिलेले भोग—**एभ्यः**—त्या देवांस—**अप्रदाय**—न देतां—**यः**—जो—**भुङ्क्ते**—भोगतो—**सः**—तो—**स्तेनः एव**—चोरच होय १२.

त्याप्रमाणें, तुम्हीं जेथें असाल तेथें सर्व सुखांसह मूर्तिमंत दैवच तुमचा शोध करीत तुमच्या मागोमाग येईल १. बाबांनो ! अशा रीतीनें जर तुम्ही एकनिष्ठेनें स्वधर्माचें आचरण कराल तर तुम्ही सर्व ऐश्वर्ययुक्त होऊन पूर्ण काम व्हाल अर्थात् तुम्हांला कसलीहि इच्छा राहणार नाहीं २. [ त्याहून उलटपक्षीं ] सकल संपत्ति प्राप्त झाली असतां जो कोण विषयसेवनाच्या गोडीला आसक्त होऊन उन्मत्त इंद्रियांच्या स्वैरवर्तनास अनुमोदन देऊन त्याच्या सांगीप्रमाणें वागतो ३. यज्ञानें संतुष्ट झालेल्या देवांनीं जी ही आपल्यास पूर्ण संपत्ति दिली आहे, त्या संपत्तीनें व स्वधर्माचरणानें जो सर्व व्यापक ईश्वरास भजणार नाहीं, ४. जो अग्नींत आहुति देणार नाहीं, देवतापूजन करणार नाहीं, यथायोग्यकालीं ब्राह्मणास भोजन घालणार नाहीं ५. अथवा गुरुभक्तीला जो कंटाळून पाठमोरा होईल, अतिथींचा आदर सत्कार करणार नाहीं व आपल्या जातीस संतोष देणार नाहीं ६. असा जो, स्वधर्माचे आचरण न करणारा, श्रीमंतीचा ज्याला ताठा भरला आहे आणि जो द्रव्यमदानें उन्मत होऊन केवळ भोगलोलुप, विषयासक्त होईल ७. त्याला महत्संकटें येण्याचा थोर धोका आहे तो असा कीं, त्याच्याजवळ असलेलें सर्व ऐश्वर्य नाहींसें होईल, आणि हे पहा ! प्राप्त असलेले भोग सुद्धां भोगावयास मिळणार नाहींत ८. जसा आयुष्य संपलेल्या शरीरांत प्राण वास करीत नाहीं, किंवा दैवहीन करंट्याचे घरीं लक्ष्मी राहात नाहीं ९. तसा, स्वधर्माचा लोप झाला म्हणजे सुखाचें आश्रयस्थान नष्ट झालें म्हणून समजावें. दीप मालवतांक्षणींच त्याबरोबर जसा प्रकाशहि नाहींसा होतो-११०. त्याप्रमाणें, ब्रह्मदेव म्हणतो प्रजाजनहो ! जो आपापल्या वर्णाश्रमधर्माचें आचरण सोडतो, त्याचें स्वातंत्र्य खरोखर नष्ट होते हे नीट ऐका ११. म्हणून स्वधर्माचा जो त्याग करील, त्याला काळ-यमधर्म शिक्षा करील आणि हा केवळ चोर आहे, असें समजून त्याच्या सर्वस्वाचें हरण करील १२. मग, रात्र झाल्यावर स्मशानाला जशीं भूतें व्यापून टाकतात तशीं सर्व संकटें त्याच्याजवळ येऊन त्याला घेरतात, त्रास देतात १३. तसेंच त्रिभुवनांतील सर्व दुःखें आणि हजारों प्रकारचीं पातकें, आणि झाडून सर्व दैन्यें, दारिद्र्यें हीं त्याचे ठिकाणीं वास करितात. [ भोगावी लागतात ] १४. जनहो, ह्याप्रमाणें त्या उन्मत्त मनुष्याची स्थिति होते आणि अशा दुःखांत ते प्राणी कितीही रडूं लागले, आक्रोश करूं लागले तरीहि, कल्पाचा अंत झाला तरीहि, त्यांची त्या दुःखातून मुळीहि सुटका होत नाही १५. ब्रह्मदेव प्रजेला असा बोध करितात कीं, तुम्ही आपला स्वधर्म कधींहि सोडूं नका, आणि इंद्रियांना स्वैर, स्वच्छंद वर्तन करूं देऊं नका. [ तसे वर्तन केले तर ] १६. ज्याप्रमाणें माशाला पाण्यांतून बाहेर काढल्याबरोबर त्याक्षणींच मृत्यु येतो; त्याप्रमाणे स्वधर्म त्यागानें तुमची स्थिति होईल. म्हणून तुम्हीं स्वधर्म केव्हांहि विसरूं नका १७. "म्हणून तुम्ही सर्वांनीं आपापलें उचित कर्म आचरण्याविषयीं नेहमीं अनुष्ठेय तत्पर असावे हेच माझे वारंवार सांगणे आहे १८.

१ आपोआप २ इच्छिलेल्या. ३ आज्ञाकर्ते. ४ वसंतऋतूचें. ५ अरण्यशोभा. ६ शोध करीत, पाठीस लागत. ७ सुखी, निरामय, पूर्णकाम. ८ एकनिष्ठ. ९ इंद्रियांच्या उन्मत्तपणाला. १० गोडीस. ११ यज्ञानें संतुष्ट झालेल्या देवांनीं.

यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः । भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥ १३ ॥

देखा विहित क्रियाविधि । निर्हेतुका बुद्धि । जो असतिये समृद्धि । विनियोगु करी ॥ १९ ॥ गुरु गोत्र अग्नि पूजी । अवसरीं भजे द्विजीं । निमित्तादिकीं यजी । पितरोद्देशें ॥ १२० ॥ या यज्ञक्रिया उचिता । यज्ञेशीं हवन करितां । हुतशेष स्वभावतः । उरे जें जें ॥ २१ ॥ तें सुखें आपुले घरीं । कुटुंबेंसी भोजन करी । कीं भोग्यचि तें निवारी । कल्मषातें ॥ २२ ॥ तें यज्ञावशिष्ट भोगी । म्हणौनि सांडिजे तो अघीं । जयापरी महारोगी । अमृतसिद्धि ॥ २३ ॥ कीं तत्त्वनिष्ठु जैसा । नागवे भ्रांतिलेशा । तो शेषभोगी तैसा । नाकळे दोषा ॥ २४ ॥ म्हणौनि स्वधर्में जें अर्जे । तें स्वधर्मेंचि विनियोगिजे । मग उरे तें भोगिजे । संतोषेंसीं ॥२५॥ हें वांचूनि पार्था । राहाटों नये अन्यथा । ऐसी आद्य हे कथा । श्रीमुरारी सांगे ॥ २६ ॥ जे देहचि आपणपें मानिती । आणि विषयांतें भोग्य म्हणती । यापरतें न स्मरती । आणिक कांहीं ॥ २७ ॥ हें यज्ञोपकरण सकळ । नेणतसां ते बरळ । अहंबुद्धि केवळ । भोगूं पाहती ॥ २८ ॥ इंद्रियरुचीसारिखें । करविती पाक निके । ते पापिये पातकें । सेविती जाण ॥ २९ ॥ संपत्तिजात आघवें । हें हवनद्रव्य मानावें । मग स्वधर्मयज्ञें अर्पावें । आदिपुरुषीं ॥ १३० ॥ हें सांडोनियां मूर्ख । आपणपेंयालागीं देख । निपजविती पाक । नानाविध ॥ ३१ ॥ जिहीं यज्ञु सिद्धी जाये । परेशा तोषु होये । तें हें सामान्य अन्न न होये । म्हणौनियां ॥ ३२ ॥ हें न म्हणावें साधारण । अन्न ब्रह्मरूप जाण । जें जीवनहेतु कारण । विश्वा यया ॥ ३३ ॥

अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः । यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥
कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् । तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥

अन्नास्तव भूतें । प्ररोहो पावती समस्तें । मग पर्जन्यु या अन्नातें । सर्वत्र प्रसवे ॥३४॥ तया पर्जन्या यज्ञीं जन्म । यज्ञातें प्रगटी कर्म । कर्मासि आदि ब्रह्म । वेदरूप ॥३५॥ तया वेदांतें परात्पर । प्रसवतसे अक्षर । म्हणानि हे चराचर । ब्रह्मबद्ध ॥३६॥ परी कर्माचिये मूर्ति । यज्ञीं अधिवासु श्रुति । ऐकें सुभद्रापति । अखंड गा ॥३७॥

एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः । अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥

ऐशी हे आदि परंपरा । संक्षेपें तुज धनुर्धरा । सांगितली या अध्वरा । लागूनियां ॥ ३८ ॥ म्हणौनि समूळ हा उचितु । स्वधर्मरूप क्रतु । नानुष्ठी जो मत्तु । लोकीं इये

**अन्वयार्थ**—**यज्ञशिष्टाशिनः**—देवयज्ञादिक करून अवशिष्ट राहिलेलें अन्न खाणारे-**सन्तः**-शिष्ट **सर्वकिल्बिषैः** सर्व पापांकडून-**मुच्यन्ते**-मुक्त केले जातात.-**तु**-परंतु-**ये**-जे-**आत्मकारणात्**-आपलें पोट भरण्यासाठीं-**पचन्ति** अन्न शिजवितात-**ते पापाः**-ते पापी लोक-**अघं**-पाप **भुंजते**-खातात १३.

असें हें पहा की जो विहित कर्माचें निष्काम बुद्धीनें आचरण करण्यामध्यें आपल्या जवळ असलेल्या संपत्तीचा विनियोग करितो १९. आपले गुरु, आप्त व अग्नि यांची पूजा करितो आणि यथाकालीं ब्राह्मणांची सेवा करितो व आपल्या पितरांच्या उद्देशानें जो श्राद्धादिक नैमित्तिक कर्म व [ पर्वकाळीं त्यांचें पूजन ] करितो, १२०. आणि ह्याप्रमाणें विहित कर्माचरण व पंचमहायज्ञादि करून जें यज्ञशेष अन्न सहज बाकी राहील, २१. ते [ यज्ञावशेषरूप अन्न ] सुखाने आपल्या कुटुंबासह सेवन करितो ते सेव्यस्वरूप यज्ञशेषसेवनच त्याच्या सर्व पातकांचा नाश करते २२. अमृताचें सेवन केल्यापासून ज्याप्रमाणें महारोग त्या महारोग्याला सोडून जातो त्याप्रमाणे यज्ञावशिष्ट अन्नाचें सेवन केल्यानें पातकें त्याला सोडून जातात २३. ज्याप्रमाणें ब्रह्मनिष्ठमहात्मा यत्किंचित् केव्हाहि आत्मभ्रांतीला वश होत नाहीं—त्याप्रमाणें यज्ञ करून शेष राहिलेल्या अन्नाचें सेवन करणारा केव्हाहि दोषाच्या तावडीत सापडत नाहीं २४. म्हणून स्वधर्मानें संपादन केलेलें द्रव्य स्वधर्मानेंच खर्चावें आणि मग बाकी उर्वरित राहील त्याचा संतोषानें उपभोग घ्यावा " २५. भगवान् श्रीकृष्ण सांगतातः—पार्था अशी ही सृष्टीच्या आरंभाची कथा आहे; ह्या रीतीनें वागण्याशिवाय मनुष्यानें अन्य मार्गानें वागूं नये २६. [ याच्या उलट पक्षीं ] जे पुरुष आपल्या शरीरासच आत्मा असें मानतात विषय हे सेवनार्ह भोग्यवस्तु आहेत असें मानतात, त्याशिवाय ज्यांच्या बुद्धीत दुसरें कांहींच स्मरण होत नाहीं २७. हें संपत्ति वगैरे सर्व साहित्य यज्ञसंबंधीं सामुग्री आहे, हें न जाणता जे भ्रांतींत असतात आणि केवळ अहंकारबुद्धीनें फक्त विषयोपभोग भोगण्यावरच ज्यांची दृष्टि असते २८. जे आपल्या इंद्रियास आवडणारीं अशी नाना तऱ्हेचीं उत्तम पक्वान्नें तयार करून आपणच त्यांचें सेवन करतात, ते पापी लोक केवळ पातकांचेंच सेवन करतात असें जाण २९. वास्तविक पाहाता जेवढी म्हणून संपत्ति आहे ती सर्व संपत्ति स्वधर्मरूप यज्ञोपयोगी सामग्री हवनद्रव्य आहे, असें समजावें मग ती स्वधर्मरूपीयज्ञानेंच परमेश्वरास अर्पण करावी १३०. हें सर्व सोडून, पहा ते मूर्ख लोक आपल्या स्वतः करितांच नानाप्रकारचे पदार्थ तयार करवितात ३१. ज्या अन्नापासून यज्ञ सिद्धीस जातो आणि परमेश्वर संतुष्ट होतो, ते हें अन्न सामान्य योग्यतेचे नाहीं; हो ! म्हणून ३२. ह्या अन्नाला साधारण असें समजू नये तर अन्न हें ब्रह्मरूप आहे, असें समज. कारण अन्न हे सर्व जगाचें जीवित हेतु म्ह. जगण्याचे साधन होय ३३.

**अन्वयार्थ**—**अन्नात्**—खाल्लेल्या अन्नापासून—**भूतानि**-प्राण्यांचीं शरीरें—**भवन्ति**—होतात. **पर्जन्यात्**—पर्जन्यापासून—**अन्नसम्भवः**—तांदूळ, गहूं इत्यादि अन्नांची उत्पत्ति होते.—**यज्ञात्**-यज्ञापासून-**पर्जन्यः**—पाऊस—**भवति** होतो.—**यज्ञः**—तो धर्म—'अपूर्व' नांवाचा यज्ञ—**कर्मसमुद्भवः**—यजमान, ऋत्विज इत्यादिकांच्या कर्मापासून, त्यांच्या हालचालींनें होणारा आहे १४.—**कर्म**—यजमानादिकांचें तें कर्म—**ब्रह्मोद्भवम्**—वेदापासून उद्भवलेलें आहे, वेद हें कर्माचें कारण—प्रमाण आहे, असें **विद्धि**—तूं जाण—**ब्रह्म**—तो वेद—**अक्षरसमुद्भवम्**—परमात्म्यापासून श्वासोच्छ्वासाप्रमाणें प्रकट झालेला आहे—**तस्मात्**—परमात्म्यापासून प्रकट झालेला असल्यामुळें **ब्रह्म**—वेद—**सर्वगतम्**—सर्व प्रकाशक असूनहि—**नित्यम्**-सर्वदा—**यज्ञे**—यज्ञांत—**प्रतिष्ठितम्** —प्रतिष्ठित आहे १५.

हे यज्ञसंस्थेचे चक्र कसे आहे ते पहा. प्रथम अन्नापासून प्राणिमात्राची उत्पत्ति होते, आणि पर्जन्यापासून सर्व ठिकाणीं अन्न उत्पन्न होतें; ३४. त्या पर्जन्याची उत्पत्ति यज्ञापासून होते आणि यज्ञाची प्रगटता कर्मापासून होते. कर्माचे मूळकारण वेदरूप शब्द ब्रह्म आहे ३५. आणि त्या वेदाची उत्पत्ति [ अभिव्यक्ति ] सर्वश्रेष्ठ परमात्म्यापासून होते; म्हणून हें सर्व चराचरात्मक जगत् ब्रह्माधीन आहे ३६. पण हे सुभद्रापते, ऐक; कर्माची केवळ मूर्ति जो यज्ञ, त्यांत वेदरूपी ब्रह्म निरंतर वास करितें ३७.

**अन्वयार्थ**—**हे पार्थ**—हे अर्जुना ! **एवम्**—वर वर्णन केल्याप्रमाणें ईश्वरानें **प्रवर्तितम्**—प्रवृत्त केलेलें—**चक्रम्**—जगच्चक्र—**इह**—या लोकीं—**यः**—जो कर्माधिकारी—**न**—**अनुवर्तयति**—तसेंच पुढें चालवित नाहीं—**सः** —तो-**अघायुः** पापी आहे, त्याचें जिणें पापरूप आहे.-**इंद्रियारामः**-त्याची सर्व क्रीडा इंद्रियाच्या योगानें विषयामध्यें होते तो—**मोघम्** वृथा—फुकट—**जीवति**—जिवंत राहतो १६.

अर्जुना ह्याप्रमाणें ह्या स्वधर्मरूप यज्ञाकरितां त्याची मूळ पीठिका, परंपरा तुला संक्षेपानें सांगितली ३८. म्हणून जो उन्मत्त पुरुष सर्व प्रकारें उचित अशा ह्या

॥ ३९ ॥ तो पातकांची राशी । जाण भार भूमीसी । जो कुकर्मे इंद्रियांसी । उपेगा गेला ॥ १४० ॥ तें जन्मकर्म सकळ । अर्जुना अति निष्फळ । जैसें कां अभ्रपटल । अकाळींचें ॥ ४१ ॥ कां गळां स्तन अजेचे । तैसें जियालें देखैं तयाचें । जया अनुष्ठान स्वधर्माचें । घडेचिना ॥ ४२ ॥ म्हणौनि ऐकें पांडवा । हा स्वधर्मु कवणें न संडावा । सर्वभावें भजावा । हाचि एकु ॥ ४३ ॥ हां गा शरीर जरी जाहलें । तरी कर्तव्य वोघें आलें । मग उचित कां आपुलें । ओसंडावें ? ॥४४॥ परिस पां सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची । खंती करिती कर्माची । ते गांवढे गा ॥ ४५ ॥

यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः । आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥

देखैं असतेनि देहधर्मे । एथ तोचि एकु न लिंपे कर्मे । जो अखंडित रमे । आपणपांचि ॥ ४६ ॥ जे तो आत्मबोधें तोषला । तरी कृतकार्यु देखैं जाहला । म्हणौनि सहजें सांडवला । कर्मसंगु ॥ ४७ ॥

नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन । न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥

तृप्ति जालिया जैसी । साधनें सरती आपैसीं । देखैं आत्मतुष्टीं तैसीं । कर्मे नाहीं ॥४८॥ जंववरी अर्जुना । तो बोधु भेटेना मना । तंवचि यया साधना । भजावें लागे॥४९॥

तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर । असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥

म्हणौनि तूं नियतु । सकळ कामरहितु । होऊनियां उचितु । स्वधर्मे रहाटें ॥१५०॥ जे स्वधर्मे निष्कामता । अनुसरले पार्था । ते कैवल्यपद तत्त्वतां । पातले जगीं ॥५१॥

कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः । लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥

देख पां जनकादिक । कर्मजात अशेख । न सांडितां मोक्षसुख । पावते जाहले । ॥५२॥ याकारणें पार्था । होआवी कर्मी आस्था । हे आणिकाही एका अर्था । उपकारैल[3] ॥ ५३ ॥ जे आचरतां आपणपयां[4] । देखीं लागेल लोका यया । तरी चुकेल अपाया । प्रसंगेंचि ॥ ५४ ॥ देखैं प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले । तयाही कर्तव्य असे उरलें । लोकांलागीं ॥ ५५ ॥ मार्गी अंधासरिसा । पुढें देखणांही चाले जैसा । अज्ञाना प्रगटावा धर्मु तैसा । आचरोनी ॥५६॥ हां गा ऐसें जरी न कीजे । तरी अज्ञाना काय उमजे ? । तिहीं कवणे परी जाणिजे । मार्गातें या ? ॥ ५७ ॥

---

१ अडाणी, २ सदोषित. ३ उपयोगी पडेल. ४ स्वतः. ५ मार्ग, वळण, चाल. ६ कृतार्थ. ७ डोळसहि.

स्वधर्मरूप यज्ञाचें ह्या लोकीं आचरण करीत नाही, ३९. तसेंच जो दुराचरण करून इंद्रियांना आवडणारे विषय पुरविण्यांत काळ घालवितो, तो केवळ पापराशी असून भूमीला केवळ भारभूत आहे, असें समज १४०. ज्याप्रमाणें अकालीं आकाशांत आलेले ढग निरुपयोगी असतात–त्याप्रमाणें अर्जुना, त्या उन्मत्त मनुष्याचीं सर्व जन्म व साऱ्या जन्मांतील कर्मेंहि निष्फल होत ४१. ज्याला आपल्या स्वधर्माचें अनुष्ठान घडत नाहीं, त्याचें जीवन–जिणें–शेळीच्या गळ्यांतील स्तनाप्रमाणें व्यर्थ होय ४२. म्हणून पांडवा ऐक–हा स्वधर्म कोणीहि सोडूं नये तर सर्व भावानें एकमेव ह्याचेंच आचरण करावें ४३. पहा कीं; जर पूर्व कर्माने प्रस्तुत शरीर प्राप्त झालें आहे, पूर्व कर्माच्या संस्काराने कर्म करणे हे कर्तव्यहि ओघानें आले असें जर आहे तर आपलें उचित कर्तव्य कर्म कां सोडावें ? ४४. अरे अर्जुना ! हा मनुष्यदेह प्राप्त झाला असतां उचित कर्म करण्याची ज्यांना खंती वाटते ते मूर्ख गावंढळ आहेत असें समज ४५.

**अन्वयार्थ**—**तु**–पण याच्या उलट–**यः मानवः**–जो मनुष्य, अर्थात् सांख्य–आत्मज्ञाननिष्ठ–**आत्मरतिः एव स्यात्**–[ आत्मरतिच असतो म्ह० त्याची रति ] आत्म्यामध्येंच असतें,–**च**–व – **आत्मतृप्तः** – आत्मस्वरूपांतच तृप्त असतो–**च**–आणि–**आत्मनि एव संतुष्टः**-आत्म्यामध्येंच संतुष्ट असतो–**तस्य**–त्याला–**कार्यं**–कांहीं शास्त्रविहित कर्तव्य–**न विद्यते**–नसतें १७.

हें पहा, जो पुरुष आत्मस्वरूपामध्यें निरंतरचा निमग्न असतो तो एक मात्र देहांत व देहधर्मांत वावरत असूनहि कर्मानें लिप्त होत नाहीं, ४६. कारण, तो आत्मबोधानें संतोष पावलेला असल्यामुळें कृतकार्यच झालेला असतो, असें समज. म्हणून सहजींच कर्मप्रसंगापासून मुक्त असतो [ कर्मातील आसक्ति सुटलेली असते ] ४७.

**अन्वयार्थ**—**इह**–या लोकीं–**तस्य**–त्याच्या – **कृतेन**–केलेल्या कर्मानें–**अर्थः**–कांहीं फल–**न एव** [ **अस्ति** ] नाहींच त्याचप्रमाणें त्याच्या–**अकृतेन**–न केलेल्या कर्मानें–**कश्चन**–कोणत्याहि प्रकारचा–[ **अर्थः** ]–प्रत्यवाय–**न**–नाहीं –**च** – आणि–**अस्य** – या सांख्याचा–**सर्वभूतेषु**–ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्वभूतांतील–**कश्चित्**–कोणीहि–**अर्थव्यपाश्रयः**–प्रयोजनाचा आश्रय–**न** [**अस्ति**] नाहीं १८.

– ज्याप्रमाणें पोट भरून तृप्ति झाल्यावर स्वयंपाक करण्याचीं साधनेंहि आपोआप संपतात, त्याप्रमाणे स्वस्वरूपानंदांत निमग्न झाल्यावर त्या निरंकुश तृप्तीनें कर्मेंहि उरतच नाहींत ४८. अर्जुना ! जोंपर्यंत अशा प्रकारचें आत्मज्ञान अंतःकरणांत अभिव्यक्त झालें नाहीं, तोंपर्यंतच ह्या कर्मयोगाचे साधन म्हणून आचरण करणे अवश्य आहे ४९.

**अन्वयार्थ**—**तस्मात्**–त्याअर्थी–**असक्तः**–आसक्ति–रहित होऊन–**सततम्**–सर्वदा–नेहमीं–**कार्यं कर्म**–अवश्य कर्तव्य असलेलें जें वर्णाश्रमविहित नित्यकर्म–तें–**समाचर** –तूं कर – **हि**–कारण–**आसक्तः**–फलामध्यें आसक्त न होतां–**कर्म**–कर्म–**आचरन्**–करणारा-ईश्वरार्पणबुद्धीनें कर्म करणारा–**पूरुषः**– पुरुष [ चित्तशुद्धीच्या द्वारा ]–**परम्**–मोक्षास–**आप्नोति**–प्राप्त होतो १९.

म्हणून नेहमीं सर्व फलाची आशा सोडून देऊन तू निरंतर उचित अशा स्वधर्माचें आचरण करीत रहा १५०. पार्था, ज्यांनीं स्वधर्माचें आचरण निष्कामबुद्धीनें केलें, तेच या जगांत खरोखर उच्चतम मोक्षपदास प्राप्त झाले ५१.

**अन्वयार्थ**—**हि**–करण–**जनकादयः**-जनक-अश्वपति-वगैरे विद्वान् क्षत्रिय–**कर्मणा एव**–कर्माचरणानेंच–कर्मानुष्टान करूनच–**संसिद्धि**-मोक्षास–**आस्थिताः**–प्राप्त होण्यास तयार झाले–कर्मानुष्टानानेंच मोक्ष मिळविण्याचा यत्न करूं लागले.–**लोकसंग्रहम् एव अपि**–लोकांनीं उन्मार्गी होऊं नये, याच गोष्टीकडेहि–**संपश्यन्–**[ **त्वम्** ] –लक्ष ठेवणारा तूं – **कर्तुं अर्हसि** – कर्म करण्यासच योग्य आहेस २०.

हें पहा–कर्ममात्राचा मुळींच त्याग न करितां जनकादिक [ चित्तशुद्धि–ज्ञान द्वारां ] मोक्षसुखास प्राप्त झाले; ५२. ह्याकरितां पार्था, कर्माचे ठिकाणीं तू आस्था ठेवणें जरूर आहे. कारण त्या आस्थेपासून आणखीहि एक सहजासहजी उपयोग होणार आहे; ५३. तो असा आहे कारण कर्माचें आपल्याकडून आचरण झालें असता अज्ञ लोकांना सहज कित्ता गिरविता येईल व वळण लागेल आणि त्यामुळें त्यांचीं [ कर्म लोपामुळें होणारी ] दुःखे अनायासें नाहींतशीं होतील ५४. असें पहा कीं, जे कृतार्थ झाल्यामुळें सहजच निष्काम झाले आहेत त्यांनाहि लोकांवर त्यास वळण लावण्याचे उपकार करण्याचें कर्तव्य लोकदृष्ट्या राहिलेच आहे ५५. जसा आंधळ्यांच्या रांगेंतील पुढारी डोळस मनुष्य आंधळ्यास सांभाळून त्यांच्या चालीप्रमाणेंच मार्ग चालतो, त्याचप्रमाणें ज्ञान्यांनीं स्वतः धर्माचें आचरण करून अज्ञानी जनांस धर्माचें स्वरूप स्पष्ट करून योग्य मार्गास लावावें ५६. अरे ! जर ज्ञान्यांनीं अशा प्रकारचें वर्तन केलें नाहीं, तर अज्ञानीं लोकांस काय कळेल ! धर्माचरणाचे वळण कसे लागणार ? आणि त्यांना योग्य असा हा मार्ग तरी कोणत्या उपायानें समजेल ? ५७.

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः । स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥

एथ वडील[1] जें जें करिती । तया नाम धर्मु ठेविती । तेंचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ॥ ५८ ॥ हें ऐसें असे स्वभावें । म्हणौनि कर्म न संडावें । विशेषें[2] आचरावें । लागे संतीं ॥ ५९ ॥

न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन । नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥

आतां आणिकांचियाँ[3] गोठी[4] । कायशा सांगों किरीटी । देखैं मीच इये राहाटी । वर्तत असें ॥ १६० ॥ काय सांकडें[5] कांहीं मातें । कीं कवणें एकें आंतें[6] । आचरें मी धर्मातें । म्हणसी जरी ॥ ६१ ॥ तरी पुरतेपणालागीं[7] । आणिकु दुसरा नाहीं जगीं । ऐसी सामुग्री[8] माझ्या अंगीं । जाणसी तूं ॥ ६२ ॥ मृत गुरुपुत्र[9] आणिला । तो तुवां पवाडा[10] देखिला । तोही मी उगलो[11] । कर्मीं वर्तें ॥ ६३ ॥

यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रितः । मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥

परी स्वधर्मीं वर्तें कैसा । साकांक्षु[12] कां होय जैसा । तयाची एका उद्देशा[13]- । लागोनियां ॥ ६४ ॥ जे भूतजात सकळ । असे आम्हांचि आधीन केवळ । तरी न व्हावें बरळ[14] । म्हणौनियां ॥ ६५ ॥

उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् । संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥ २४ ॥

आम्ही पूर्णकाम[15] होउनी । जरी आत्मस्थिति[16] राहुनी । तरी प्रजा हे कैसेनि । निस्तरेल[17] ? ॥ ६६ ॥ इहीं आमुची वास[18] पाहावी । मग वर्ततीपरी[19] जाणावी । ते लोकस्थिति[20] आघवी । नासिली होईल ॥ ६७ ॥ म्हणौनि समर्थु जो येथें । आथिला[21] । सर्वज्ञते । तेणें सविशेषें कर्मातें । त्यजावें ना ॥ ६८ ॥

सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत । कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥

देखैं फळाचिया आशा । आचरे कामकु[22] जैसा । कर्मीं भरु[23] होआवा तैसा । निराशाही[24] ॥ ६९ ॥ जे पुढतपुढतीं[25] पार्था । हे सकळ लोकसंस्था । रक्षणीय[26] सर्वथा । म्हणौनियां ॥ १७० ॥ मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरें[27] लावावें । अलौकिक नोहावें । लोकांप्रति ॥ ७१ ॥

---

१ वडील, वृद्ध. २ मुख्यत्वेंकरून ३ दुसऱ्याच्या. ४ गोष्टी. ५ संकट. ६ इच्छेने. ७ पूर्णपणाने. ८ सामर्थ्य, साहित्य. ९ सांदीपनीचा पुत्र. १० पराक्रम, महत्त्व, थोरपण. ११ उगाच, निरिच्छपणें. १२ साभिलाष. १३ हेतूकरतां. १४ अमर्याद, भ्रष्ट. १५ वासनातृप्त. १६ ब्रह्मस्थितीनें. १७ पार पडेल. १८ वर्तन वाट. १९ वर्तनक्रम. २० जनरहाटी. २१ संपन्न. २२ फलेच्छु. २३ आवड. २४ निरिच्छ पुरुषास देखील. २५ वारंवार. २६ पाळला पाहिजे. २७ योग्य मार्गास.

**अन्वयार्थ**—**श्रेष्ठः**–प्रधान–मुख्य पुरुष–**यत् यत्**–जें जें–**आचरति**–करतो–**तत् तत् एव**–तें तेंच कर्म–**इतरः जनः**–इतर जन–अनुयायिवर्ग करतो–**सः**–तो श्रेष्ठ पुरुष–**यत्**–ज्या लौकिक किंवा वैदिक वगैरे कर्माला–**प्रमाणम्**–प्रमाण–**कुरुते**–करतो–**लोकः**–लोक–**तत्**–त्यालाच–**अनुवर्तते**–अनुसरतो २१.

लोकांत सामान्य नियम असा आहे कीं, श्रेष्ठ लोक धर्मबुद्धीनें जें आचरण करितात, त्यालाच धर्म असें नांव ठेवून इतर सर्व सामान्य लोक धर्मबुद्धीनें त्या कर्माचे आचरण करितात ५८. असें हें वळण स्वभावतःच आहे, म्हणून थोरांनीं कर्माचा त्याग करूं नये; आणि साधुसंतांना तर सत्कर्माचें आचरण विशेष काळजीनें करणें अवश्य आहे ५९.

**अन्वयार्थ**—**हे पार्थ**–हे अर्जुना!–**मे**–मला–**त्रिषु लोकेषु**–या तीन लोकांत–**किंचन**–कांहींहि–**कर्तव्यम्**–कर्तव्य-कर्म–**न अस्ति**–नाहीं,–**च**–आणि–**अनवाप्तम्**–मला मिळालेलें असें कांहीं नसून–**अवाप्तव्यम्**–मिळवावयास योग्य असें कांहीं–**न**–[ **अस्ति** ]–नाहीं. तरीसुद्धां मी–**कर्मणि**–कर्मामध्यें–**वर्ते**–**एव**–राहतोंच म्ह० कर्म करतोंच २२.

अर्जुना! आतां फार लांब अशा दुसऱ्याच्या गोष्टी तुला कशाला सांगत बसूं? मीच स्वतः या धर्माचरणाच्या मार्गानें वागत आहे हें पहात नाहींस कां तूं? १६०. बरें! आतां, मला कांहींतरी संकट पडलें असेल म्हणून किंवा मी कसली तरी इच्छा धरली आहे म्हणून मी स्वधर्माचें आचरण करितों असें जर तूं म्हणशील ६१. तर या जगांत माझ्याइतका गुण व ऐश्वर्य यांनीं संपन्न असा दुसरा माझ्या तोडीचा कोणीहि नाहीं, असें हें सामर्थ्य माझें अंगांत असल्याचें तुला माहीत आहेच ६२. अरे! सांदिपनी गुरूचा मेलेलाहि मुलगा आणून दिला नाहीं कां? तो माझा पराक्रम तूं पाहिलाच आहेस; पण असाहि जो मी, निरिच्छ नित्यसंतुष्ट तोसुद्धां मुकाट्यानें कर्ममार्गाचें आचरण करीत आहें ६३.

**अन्वयार्थ**—**हि**–कारण–**यदि**–जर–**अहम्**–मी–**अतन्द्रितः सन्**–तन्द्री सोडलेला असा होऊन, आळस-सोडून–**कर्मणि**–कर्मामध्यें–सदाचरणांत–**जातु**–कदाचित्–**न वर्तेयम्**–न वागलों तर–**पार्थ**–हे अर्जुना!–**मनुष्याः**–मनुष्य–**सर्वशः**–सर्व प्रकारें–**मम**–माझ्या–**वर्त्म**–मार्गास–**अनुवर्तन्ते**–अनुसरतील २३.

परंतु तीं कर्में मी कशी करतो म्हणशील तर एका लोककल्याणाच्या उद्देशानेंच एखादा सकाम पुरुषानें केवळ फलाच्या इच्छेनें जसें काळजीपूर्वक, दक्षतेनें धर्माचरण करावें तसेंच मी स्वधर्माचें दक्षतेनें आचरण करितों ६४. कारण, सर्व प्राणी आमच्यासारख्याच्या तंत्रावरच अवलंबून राहून चालणारे आहेत, तेव्हां त्यांनीं भलतीकडे जाऊन केव्हांहि कर्मभ्रष्ट होऊ नये. म्हणून ६५.

**अन्वयार्थ**—**अहम्**–मी–**कर्म**–कर्म–सदाचरण–**न कुर्यां चेत्**–जर न करीन तर–**इमे लोकाः**–हे सर्व लोक–**उत्सीदेयुः**–नाश पावतील–**च**–व मी–**संकरस्य**–वर्णसंकराचा–**कर्ता स्याम्**–कर्ता–वर्णसंकाराचें निमित्त व त्यामुळें–**इमाः प्रजाः**–या सर्व लोकांना–**उपहन्याम्**–मी मारीन–त्यांचा जणुं काय घातच करीन २४.

जर आम्ही निरिच्छ होऊन आत्मानंद स्थितीमध्येंच निमग्न राहिलों [ आणि धर्माचरण मुळींच केलें नाहीं ] तर प्रजा भवसागरांतून कोणत्या तरणोपायानें पार पडेल? ६६. वास्तविक संप्रदाय असा आहे कीं, या लोकांनीं आमच्या वर्तनाकडे पहावें व मग धर्माच्या वागणुकीचे प्रकार समजून घ्यावें, ही जी लोकांची रहाटी आहे, ती [ आम्ही धर्माचरण केलें नाहीं तर ] सर्वच बिघडून जाईल ६७. म्हणून जो या लोकांत समर्थ व सर्वज्ञानसंपन्न असेल त्यानें तर विशेषेंकरून कर्माचा त्याग कधींहि करूं नये ६८.

**अन्वयार्थ**—**हे भारत**–हे अर्जुना! **कर्मणि सक्ताः**–या कर्माचा मी कर्ता आहें, मला याचें फल अवश्य मिळेल, अशा अभिमानानें कर्मामध्यें आसक्त झालेले–**अविद्वांसः**–अविद्वान्–आत्मज्ञानशून्य लोक–**यथा**–जसे–**कुर्वन्ति**–कर्म करितात–**तथा**–त्याप्रमाणें–**लोकसंग्रहम्**–लोकसंग्रह–लोकानुग्रह–**चिकीर्षुः**–करण्याची इच्छा करणाऱ्या–**विद्वान्**–विद्वानानें–**असक्तः सन्**–आसक्त न राहून–मी याचा कर्ता व भोक्ता असा अभिनिवेश न करतां कर्म–**कुर्यात्**–करावें २५.

हे पहा! फलाची इच्छा करणारा पुरुष फलाशेने, जितक्या दक्षतेनें कर्माचरण करितो, त्याप्रमाणें निरिच्छ ज्ञानवानानेंहि तितक्याच दक्षतेनें कर्माचरणावर विशेष भर दिला पाहिजे ६९. कारण, अर्जुना! "लोकसंस्था" म्ह. पुढें होणाऱ्या व्यवस्थित लोकसमुदायाचें पुनः पुनः सर्व रीतीनें संरक्षण करणें अवश्यक आहे. म्हणून १७०. थोरांनीं स्वतः सन्मार्गानें वागून लोकांनाहि धर्माच्या वैदिक सरळ मार्गास लावावें, परंतु सामान्य जनाला लोकबाह्य वागण्यानें आपण कोणी अलौकिक लोकांपेक्षां वेगळे, श्रेष्ठ पुरुष आहोंत असें भासून देऊं नये ७१.

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् । जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६ ॥

जें सायासें स्तन्य सेवी । तें पक्वान्नें केवीं जेवी । म्हणौनि बाळका जैशीं नेदावीं । धनुर्धरा ॥ ७२ ॥ तैशी कर्मीं जयां अयोग्यता । तयांप्रति नैष्कर्म्यता । न प्रगटावी खेळतां । आदिकरुनी ॥ ७३ ॥ तेथें सत्क्रियाचि लावावी । तेचि एकी प्रशंसावी । नैष्कर्मीही दावावी । आचरोनी ॥ ७४ ॥ तया लोकसंग्रहालागीं । वर्ततां कर्मसंगीं । तो कर्मबंधु आंगीं । वाजैल नां ॥ ७५ ॥ जैसी बहुरुपियांचीं रावो राणी । स्त्रीपुरुषभावो नाहीं मनीं । परी लोकसंपादणी । तैशीच करिती ॥ ७६ ॥

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः । अहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते ॥ २७ ॥

देखें पुढिलाचें वोझें । जरी आपुला माथां घेइजे । तरी सांगें कां न दटिजे । धनुर्धरा ? ॥ ७७ ॥ तैशीं शुभाशुभें कर्में । जियें निपजती प्रकृतिधर्में । तियें मूर्ख मतिभ्रमें । मी कर्ता म्हणे ॥ ७८ ॥ ऐसा अहंकारादि रूढ । एकदेशी मूढ । तया हा परमार्थ गूढ । प्रगटावा ना ॥ ७९ ॥ हें असो प्रस्तुत । सांगिजैल तुज हित । तें अर्जुना देऊनि चित्त । अवधारीं पां ॥ १८० ॥

तत्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः । गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥

जें तत्त्वज्ञानियांच्या ठायीं । प्रकृतिभावो नाहीं । जेथ कर्मजात पाहीं । निपजत असे ॥ ८१ ॥ ते देहाभिमानु सांडुनी । गुणकर्में वोलांडुनि । साक्षिभूत होऊनी । वर्तती देहीं ॥ ८२ ॥ म्हणौनि शरीरी जरी होती । तरी कर्मबंधा नातळती । जैसा कां भूतचेष्टा गभस्ती । घेपवेना ॥ ८३ ॥

प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जन्ते गुणकर्मसु । तानकृत्स्नविदो मंदान्कृत्स्न विन्न विचालयेत् ॥ २९ ॥

एथ कर्मीं तोचि लिंपे । जो गुणसंभ्रमें घेपे । प्रकृतीचेनि आटोपें । वर्ततु असे ॥ ८४ ॥ इंद्रियें गुणाधारें । राहाटती निजव्यापारें । तें परकर्म बलात्कारें । आपादी जो ॥ ८५ ॥

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा । निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥

---

१ देऊं नयेत. २ अनधिकार. ३ कर्माचा त्याग. ४ थट्टेने. ५ देखील. ६ सदाचरण. ७ वाखाणावी. ८ आढळणार नाहीं. ९ राजा. १० लोकांची समजूत. ११ दुसऱ्याचे. १२ ओझ्याखाली दबून जाणें. १३ उत्पन्न होतात. १४ मायेचे गुणामुळे १५ गहन. १६ सांप्रत. १७ देहभाव. १८ कर्मसमुह. १९ देहबुद्धि टाकून. २० त्रिगुण व त्यांची कर्में. २१ सांपडत नाहीं. २२ प्राणिमात्रांची कर्में. २३ घेत नाहीं. २४ गुणांचे सपाटयांत सांपडतो. २५ संघाताने, तंत्रानें.

**अन्वयार्थ—कर्मसंगिनाम् अज्ञानाम्**–कर्म व त्याचें फल यांत आसक्ति ठेवणाऱ्या अज्ञांचा–**बुद्धिभेदम्**–बुद्धि भेद–**न–जनयेत्**–करूं नये. त्यांची कर्मावरील श्रद्धा ढळवूं नये, तर–**विद्वान्**–विद्वानानें–आत्मज्ञानी श्रेष्ठ पुरुषानें–**युक्तः**–समाहितचित्त राहून – **समाचरन्**–कर्मानुष्ठान करीत त्यांच्याकडून–**सर्वकर्माणि**–सर्व कर्में–**जोषयेत्** करवावीं २६.

[ त्याचप्रमाणें कर्माचरणें करून चित्तशुद्धि होण्याचे पूर्वी त्यांना नैष्कर्म्य ब्रह्मस्थितीचेंहि ज्ञान सांगूं नये. ] जसें जें लहान मूल स्तनपानदेखील मोठ्या आयासानें करितें, तें पक्वान्नें कसें बरें खाणार ? म्हणून अर्जुना ! त्या तान्ह्या मुलाला तीं देऊंच नयेत ७२. तसें यथाशास्त्र कर्माचरण करण्यास जो अनधिकारी आहे, त्याला ज्ञानमार्गाची थोरवी नैष्कर्म्यता थट्टेनेंसुद्धां सांगून प्रगट करूं नये ७३. त्याला सत्कर्माचेंच आचरण करण्यास लावावें. त्या सत्कर्माचीच प्रशंसा करावी आणि निष्काम झालेल्या पुरुषांनींहि सत्कर्माचेच आचरण करून दाखवावें ७४. केवळ लोकल्याणाकरितां [ सिद्ध पुरुषानें ] कर्मयोगाचें आचरण केलें असतां त्यांना कर्मबंध भोगावा लागणार नाहीं. हे मात्र लक्षांत ठेवावे ७५. बहुरुप्यांनीं जरी राजाराणींचीं सोंगें घेतलीं, तरीहि त्यांच्या मनांत स्त्रीपुरुषभाव मुळींच नसतो. –पण लोकांना घेतलेल्या सोंगाची बतावणी योग्य आहे असे दाखविण्याकरितां ते तसेच वागतात ७६.

**अन्वयार्थ—अहंकारविमूढात्मा** – ज्याचा – आत्मा-चित्त अहंकारानें–शरिरालाच मी–असें मानल्यानें विमूढ-विवेकहीन झालें आहे असा अज्ञ–**प्रकृतेः**–प्रकृतीच्या–**गुणैः**–विकारांनीं शरीर-इंद्रियरूप परिणामाकडून–**सर्वशः**–सर्व प्रकारें–**क्रियमाणानि**–केलीं जाणारीं–**कर्माणि**–कर्में–**अहम् कर्ता**–मीच करतो–**इति**-असें–**मन्यते**-मानतो २७.

[ आतां तींच कर्में कशीं बाधक होतात असें म्हणशील तर ] अर्जुना, असें पहा कीं, दुसऱ्याचें ओझें आपण आपल्या डोक्यावर जर घेतलें तर आपली मान त्या भारानें दडपून जाऊन अवघडणार नाहीं का–सांग बरें ? ७७. त्याचप्रमाणें प्रकृतीच्या गुणामुळें जीं बरीं वाईट कर्में होतात, त्यांचा कर्ता मींच आहें, असें अज्ञ मनुष्य बुद्धिभ्रमानें म्हणतो ७८. अशा रीतीनें देहाहंकार धारण करणारा [ देहात्मत्व भ्रांतीस पावलेला ] व स्वतःस मर्यादित समजणारा [ परिच्छिन्नतेच्या भ्रांतीस पावलेला ] जो मूर्ख, त्यास हा नैष्कर्म्य स्थितीचा, गूढतत्त्वज्ञानरूप परमार्थ केव्हांहि उघड करूं नये ७९. [ कारण त्याला अनाधिकारामुळें परमार्थ तत्त्व कळणार नाहीं, आणि तो कर्मापासून भ्रष्ट मात्र होईल ] हें राहूं दे. प्रस्तुत तुझें हित कशांत आहे, तें सांगतों, तूं लक्ष देऊन ऐक १८०.

**अन्वयार्थ—तु**–पण याच्या उलट–**हे महाबाहो**–हे महापराक्रमी अर्जुना ! **गुणकर्मविभागयोः**–गुणविभाग व कर्मविभाग यांचें–**तत्त्ववित्**–तत्त्व जाणणारा–**गुणाः**–इंद्रियात्मक गुण–**गुणेषु**–विषयात्मक गुणांमध्यें–**वर्तन्ते**–प्रवृत्त होतात–**इति**–असें–**मत्वा**–मानून–**न सज्जते**–आसक्त होत नाहीं २८.

तें असें कीं, ज्यामुळें ही सर्व कर्में उत्पन्न होतात तो प्रकृतिभाव–देहाभिमान तत्त्वज्ञान्यांचे ठिकाणीं मुळींच नसतो ८१. ते ज्ञानी देहाचा अभिमान सोडून, [ गुण व गुणापासून होणारी कर्में याचे उलंघन करून देहांत फक्त साक्षित्वानें राहून वागतात ८२. म्हणून-सूर्य प्रकाशामुळें जरी प्राणिमात्रांचे सर्व व्यवहार होत असले तरीहि त्या जगाच्या कर्मांनीं सूर्य जसा लिप्त होत नाहीं. त्याप्रमाणें ते जरी देह धारण करीत असले तरी कोणत्याहि देहकर्मांनें बद्ध होत नाहींत ८३.

**अन्वयार्थ—प्रकृतेः**–मायेच्या–**गुणसंमूढाः**– शरीरेंद्रियविकारांनीं अत्यंत मूढ झालेले अज्ञ–**गुणकर्मसु**-शरीरेंद्रियांच्या कर्मांमध्यें-हालचालीमध्यें-**सज्जन्ते**-आसक्त होतात. ती हालचाल–चेष्टा आम्हींच फलासाठीं करतों, असा अभिनिवेश धरितात–**कृत्स्नवित्**–सर्वज्ञ–[ **आत्मवित्**–आत्मज्ञानी पुरुषानें ]–**तान्** त्या–**अकृत्स्नविदः**–असर्वज्ञ-अनात्मज्ञ–**मंदान्**–मंद पुरुषांस–**न विचालयेत्**–श्रद्धेपासून ढळवूं नये. २९.

या लोकीं प्रकृतीच्या आधीन होऊन जो वागतो, व गुणांच्या सपाट्यांत सांपडतो, तोच कर्मानें लिप्त होतो ८४. इंद्रियें गुणांच्या आधीन होऊन आपापल्या व्यापारांत वर्तत असतां तें दुसऱ्याचें कर्म 'मीच करितों' असें तो भ्रमानें बळेंच मुद्दाम आपल्या अंगावर घेतो. तो कर्मानें बद्ध होतो ८५.

**अन्वयार्थ—सर्वाणि–कर्माणि**–नित्य– नैमित्तिकादि सर्व कर्में–**अध्यात्मचेतसा**–विवेकबुद्धीनें– मी कर्ता–जीव अन्तर्यामीसाठीं चाकराप्रमाणें ही करीत आहें–अशा भावनेनें–**मयि**–माझ्या ठिकाणीं मज सर्वज्ञ परमेश्वराचे ठिकाणी–**संन्यस्य**–टाकून–मला अर्पण करून त्याचप्रमाणें– **निराशीः** – फलाशारहित व–**निर्ममः** – **देह**–पुत्रादिकांविषयींच्या ममतेनें रहित–**भूत्वा**–होऊन-आशारहित व ममतारहित होऊन–**विगतज्वरः**–शोकरहित होऊन–**युद्धयस्व**–युद्ध कर ३०.

तरी उचितें कर्मे आघवीं । तुवां आचरोनि मज अर्पावीं । परी चित्तवृत्ति न्यासावी । आत्मरूपीं ॥ ८६ ॥ आणि हें कर्म मी कर्ता । कां आचरैन यो अर्था । ऐसा अभिमानु झणें चित्ता । रिगों देसीं ॥ ८७ ॥ तुवां शरीरपरा नोहावें । कामनाजात सांडावें । मग अवसरोचितें भोगावे । भोग सकळ ॥ ८८ ॥ आतां कोदंडँ घेऊनि हातीं । आरूढ पां इयें रथीं । देईं आलिंगन वीरवृत्ती । समाधानें ॥ ८९ ॥ जगीं कीर्ति रूढवीं । स्वधर्माचा मानु वाढवीं । इयां भारापासोनि सोडवीं । मेदिनी हे ॥ १९० ॥ आतां पार्था निःशंकु होईं । या संग्रामा चित्त देईं । एथ हें वांचूनि कांहीं । बोलों नये ॥ ९१ ॥

ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः । श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः ॥ ३१ ॥

हें अनुपरोध मत माझें । जिहीं परमादरें स्वीकारिजे । श्रद्धापूर्वक अनुष्ठिजे । धनुर्धरा ॥ ९२ ॥ तेही सकळ कर्मी वर्ततु । जाण पां कर्मरहितु । म्हणौनि हें निश्चितु । करणीय गा ॥ ९३ ॥

ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम् । सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥

नातरी प्रकृतिमंतु होउनी । इंद्रियां लळों देउनी । जें हें माझें मत अव्हेरुनी । ओसंडिती ॥ ९४ ॥ जे सामान्यत्वें लेखिती । अवज्ञा करूनि देखती । कां हा अर्थवादु म्हणती । वाचाळपणें ॥ ९५ ॥ ते मोहमदिरा भुलले । विषयाविखें घारले । अज्ञानपंकीं बुडाले । निभ्रांत मानीं ॥ ९६ ॥ देखें शवाच्या हातीं दिधलें । जैसें रत्न कां वायां गेलें । नातरी जात्यंधा पाहलें । प्रमाण नोहे ॥ ९७ ॥ कां चंद्राचा उदयो जैसा । उपयोगा न वचे वायसा । मूर्खा विवेकु हा तैसा । रुचेल ना ॥९८॥ तैसे जे पार्था । विमुख या परमार्था । तयांसी संभाषण सर्वथा । करावेना ॥ ९९ ॥ म्हणौनि ते न मानिती । आणि निंदाही करूं लागती । सांगें पतंगु काय साहती । प्रकाशातें? ॥ २०० ॥ पतंगा दीपीं आलिंगन । तेथ त्यासी अचुक मरण । तेंवीं विषयाचरण । आत्मघाता ॥ १ ॥

सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि । प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ३३ ॥

म्हणौनि इंद्रियें एकें । जाणतेनी पुरुखें । लाळावीं ना कौतुकें । आदिकरूनी ॥ २ ॥ हां गा सर्पेसीं खेळों येईल? । कीं व्याघ्रसंसर्ग सिद्धि जाईल? । सांगें हाळाहाळ जिरेल । सेविलिया काई ? ॥ ३ ॥ देखें खेळतां अग्नि लागला । मग तो न सांवरे जैसा उधवला । तैसा इंद्रियां लळा दिधला । भला नोहे ॥ ४ ॥ एऱ्हवीं तरी अर्जुना । या शरीरा पराधीना । कां नाना भोगरचना । मेळवावी?

म्हणून, सर्व विहित कर्मांचें आचरण करून तूं तीं मला अर्पण करावीं; पण चित्तवृत्ति मात्र सदैव आत्मस्वरूपीं स्थिर ठेवावीं ८६. हे विहित कर्म ह्या कर्मांचा मी कर्ता आहे आणि अमुक फलासाठीं हें कर्म मी करीत आहें, असा अभिमान तूं आपल्या चित्तांत कदाचित उत्पन्न होऊं देशील पण तो निर्माण होऊ देऊं नकोस हो, ८७. तूं शरीराच्या स्वाधीन देहासक्त होऊ नकोस व सर्व इच्छा सोडून दे आणि मग सकल [धर्म्य] भोगांचा यथाकालीं उपभोग घे ८८. हे वर्म लक्षांत ठेऊन आतां हातांत धनुष्य घेऊन ह्या रथावर चढ आणि आनंदानें वीरवृत्तीचा स्वीकार कर ८९. जगांत तूं आपली कीर्ति वाढीव स्वधर्माचा महिमा वाढीव आणि या दुर्योधनादि दुष्टांच्या भारापासून ह्या पृथ्वीला सोडीव. १९०. पार्था आतां तूं निःशंक होऊ आणि ह्या युद्धाकडे लक्ष दे. या प्रसंगीं युद्धाशिवाय दुसरें कांहींहि बोलूं नकोस ९१.

**अन्वयार्थ**—**ये**—जे **श्रद्धावन्तः**-श्रद्धाळू व **अनसूयन्तः**-असूया न करणारे—**मानवाः**—मनुष्य—**मे**—माझें—**इदम्**—**हें मतम्**—मत—**नित्यम्**—नित्य—**अनुतिष्ठन्ति**—अनुष्ठितात—माझ्या सांगण्याप्रमाणें आचरण करितात—**ते**—ते—**अपि**—सुद्धां—**कर्मभिः**—पुण्य पापांकडून—**मुच्यन्ते**—मुक्त केले जातात. ३१.

अर्जुना! हे माझे अबाधित वादातीत मत आहे त्या मतोपदेशाचा जे मोठ्या आदरानें स्वीकार करतात आणि त्याचें श्रद्धापूर्वक आचरणहि करतात ९२. ते सकळ कर्मांचें आचरण करीत असले तरीहि कर्मरहित आहेत, असें तूं जाण. म्हणून हें माझें मत हें कर्म निश्चयानें आचरण्यास योग्य आहे ९३.

**अन्वयार्थ**—**तु**—पण याच्या उलट—**ये**—जे—**अभ्यसूयन्तः**—असूया करणारे—**एतत्**—हें—**मे मतम्**—माझें मत—**न अनुतिष्ठन्ति**—आचरीत नाहींत—त्याप्रमाणें आचरण करीत नाहींत—**तान्** — त्यांना — **सर्वज्ञानविमूढान्** —सर्व ज्ञानाविषयीं अनेक प्रकारें मूढ—**अचेतसः**—अविवेकी व —**नष्टान्**—नष्ट झालेले—**विध्दि**—समज ३२.

नाहीं तर [ देहात्मत्व भ्रांतीनें ] देहाचे पाशांत गुंतून इन्द्रियांचे लाड पुरवून जे या माझ्या मताचा तिरस्कार करून ते टाकून देतात ९४. किंवा जे त्याला अगदी सामान्य दर्जाचा समजतात, व त्याला तुच्छतेने पाहतात, किंवा वाचाळपणें ती व्याजस्तुति प्रशंसात्मक आहे असें म्हणतात ९५. ते मोह-अविवेकरूपी मद्यपानानें [ झिंगलेले ] भुललेले आहेत व विषयरूपी विष अंगीं भिनल्यामुळें त्या विषानें पूर्ण व्यापलेले आणि अज्ञानरूपी चिखलांत रुतलेले आहेत असें निःसंशय समज ९६. पहा कीं, प्रेताच्या हातीं दिलेलें रत्न जसें वाया जातें, किंवा जन्मांधाला उजाडलें तरी त्या प्रकाशाचा त्याला जसा कांहींएक उपयोग होत नाहीं ९७. अथवा चंद्रोदय किंवा चंद्रप्रकाश ज्याप्रमाणें कावळ्याच्या उपयोगी पडत नाहीं, त्याप्रमाणें जे मूर्ख आहेत त्यांना हा [ निष्काम कर्मयोगाचा ] विचार रुचणार नाहीं ९८. तसेंच अर्जुना! जे ह्या परमार्थापासून पराङ्मुख आहेत, त्यांच्याशीं तूं मुळींहि भाषणसुद्धां करूं नकोस हो! ९९. त्याप्रमाणें ते माझ्या या उपदेशाला मानीत नाहींत तेच या विचारावर भरंवसा न ठेवतां उलट त्याची निंदा मात्र करतात. म्हणून सांग बरें! पतंग दीपप्रकाश सहन करतील काय? २००. पतंगानें दिव्याला आलिंगन दिलें असतां तेथेंच त्याचें जसें अचूकपणें मरण आहेच तसें विषयाचरण करण्यांतच मूर्खजीवांचा अचूक आत्मघात आहे १.

**अन्वयार्थ**—**ज्ञानवान् अपि** — शहाणा मनुष्यहि—**स्वस्याः**—आपल्या—**प्रकृतेः**—**सदृशम्** —प्रारब्धकर्माप्रमाणें—स्वभावाप्रमाणें—**चेष्टते**—व्यवहार करतो.—**भूतानि**—सर्व प्राणी—**प्रकृतिं**—आपल्या स्वभावावर— **यान्ति** —जातात—**निग्रहः**—त्याला माझा किंवा दुसऱ्या कोणा राजादिकांचा निग्रह—**किं**—काय—**करिष्यति**—करणार ३३.

म्हणून कोणीहि विचारवान् मनुष्यानें ह्या इन्द्रियांचे कौतुकानें देखील लाड पुरवूं नयेत २. अरे! असें पहा सर्पाबरोबर खेळतां येईल काय? किंवा वाघाचा सहवास सुखरूपपणें सिद्धीस [ शेवटास ] जाईल काय? अरे! हालाहल विष प्राशन केलें तर तें पचेल काय? सांग पाहूं ३. हें पहा—बुद्धिपूर्वक नव्हे, परंतु सहज खेळतां खेळतां जरी अग्नि लागला आणि तो जर भडकला तर जसा आवरत नाहीं, तसें कौतुकानें इन्द्रियांचे लाड पुरविलें तरी मोक्षेच्छूला ते चांगलें नाहीं ४. अर्जुना! वास्तविक विचार करून पाहिलें असतां हें शरीर परतंत्र [ गुणाधीन ] जर आहे, तर त्यांच्याकरितां यत्नानें नाना

१ विहित, योग्य. २ ठेवावी, योजावी. ३ या फलासाठीं. ४ देहाधीन. ५ सर्व हेतु. ६ समयोचित. ७ धनुष्य. ८ शौर्य. ९ वाढीव. १० या दुर्योधनादिकांच्या. ११ पृथ्वी. १२ निश्चित, अबाधित. १३ आचरावे. १४ करण्यास योग्य. १५ लाड. १६ तिरस्कार करून. १७ टाकून देतात. १८ व्याजस्तुति. १९ व्यापले, घेरले.

॥ ५ ॥ आपण सायासेंकरुनि बहुतें । सकळही समृद्धिजातें । उदोअस्तु या देहातें । प्रतिपाळावें कां ? ॥ ६ ॥ सर्वस्वें शिणोनि एथें । अर्जवावीं संपत्तिजातें । तेणें स्वधर्मु सांडुनि देहातें । पोखावें काई ॥ ७ ॥ मग हे तंव पांचमेळावा । शेखीं अनुसरेल पंचत्वा । ते वेळीं केला कें गिंवसावा । शीणु आपुला ॥ ८ ॥ म्हणौनि केवळ देहभरण । ते जाणें उघडी नागवण । यालागीं एथ अंतःकरण । देयावेंना ॥ ९॥

इंद्रियस्येंन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ । तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपंथिनौ ॥ ३४ ॥

एऱ्हवीं इंद्रियांचिया अर्था- । सारिखा विषो पोखितां । संतोषु कीर चित्ता । आपजेल ॥२१०॥ परी तो संवचोराचा सांगातु । जैसा नावेक स्वस्थु । जंव नगराचा प्रांतु । सांडिजेना ॥११॥ बापा विषाची मधुरता । झणें आवडी उपजे चित्ता । परी तो परिणामु विचारितां । प्राणु हरी ॥१२॥ देखैं इंद्रियीं कामु असे । तो लावी सुख-दुराशे । जैसा गळीं मीनु आमिषें । भुलविजे गा ॥ १३ ॥ परी तयामाजीं गळु आहे । जो प्राणातें घेऊनि जाये । तो जैसा ठाउवा नोहे । झांकलेपणें ॥ १४ ॥ तैसें अभिलाषें येणें कीजेल । विषयांची आशा धरिजेल । तरी वरपडा होईजेल । क्रोधानळा ॥ १५ ॥ जैसा कवळोनियां पारधी । घातोचिये संधी । आणी मृगातें बुद्धि । साधावया ॥ १६ ॥ एथ तैसीचि परी आहे । म्हणौनि संगु हा तुज नोहे । पार्था दोन्ही कामक्रोध हे । घातुक जाणें ॥ १७ ॥ म्हणौनि हा आश्रोचि न करावा । मनेंहि आठवो न धरावा । एकु निजवृत्तीचा वोलावा । नासों नेदी ॥ १८ ॥

श्रेयान्स्वधर्मोविगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् । स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥

अगा स्वधर्मु हा आपुला । जरी कां कठिणु जाहला । तरी हाचि अनुष्ठिला । भला देखैं ॥ १९ ॥ येरु आचारु जो परावा । तो देखतां कीर बरवा । परी आचरतेनि आचरावा । आपुलाचि ॥ २२० ॥ सांत्रें शूद्र घरीं आघवीं । पक्कान्नें आहाति बरवीं । तीं द्विजें केवीं सेवावीं । दुर्बळु जरी जाहला ॥ २१ ॥ हें अनुचित कैसेनि कीजे । अग्राह्य केवीं इच्छिजे । अथवा इच्छिलेंही पाविजे । विचारीं पां ॥ २२ ॥ तरी लोकांचीं धवळारें । देखोनियां मनोहरें । असतीं आपुलीं तणारें । मोडावीं केवीं ? ॥ २३ ॥ हें असो वनिता आपुली । कुरूप जरी जाहली । तऱ्ही भोगितां तोचि भली । जियापरी ॥ २४ ॥ तेवीं आवडे तैसा सांकडु । आचरतां जरी दुवाडु । तऱ्ही स्वधर्मुचि सुरवाडु । परत्रींचा ॥२५॥ हां गा साकर आणि दूध । हें गौल्य कीर प्रसिद्ध । परी कृमिदोषीं विरुद्ध । घेपे केवीं ? ॥२६॥ ऐसेनिही जरी सेविजेल । तरी ते अळुकीचि उरेल । जे तें परिणामीं पथ्य नव्हेल । धनुर्धरा ॥ २७ ॥ म्हणौनि

प्रकारचे विषयभोग मिळविण्याची खटपट कां बरें करावी? ५. आपण पुष्कळ यत्न करून जेवढी म्हणून संपादलेली संपत्ति आहे ती सर्वच्या सर्व खर्च करून या देहाचें अहोरात्र लालन पालन कां करावें? ६. ह्या लोकांत सर्व परिश्रम करून, पुष्कळ संपत्ति मिळवावी व मग स्वधर्माचा त्याग करून त्या संपत्तीनें केवळ देहाचें पोषण करावें हे उचित आहे कां? ७. मग हें शरीर तर पंचतत्वांचें झालेलें आहे ते शरीर शेवटीं पंचतत्त्वांतच जाऊन मिळणार त्या वेळीं आपण केलेली विषयसंपादनाची खटपट कोठें शोधीत बसावें? [ती फुकट नाहीं कां जाणार?] ८. म्हणून [पशूसारखें] केवळ शरीरपोषण करणें म्हणजे उघड उघड प्रत्यक्ष आपलीच हानि करून घेण्यासारखें आहे, असें समज. ह्याकरितां, विषयभोगाच्या व देह पोषणाच्या विचारांत मुमुक्षूनें लक्ष ठेवूं नये ९.

**अन्वयार्थ**—**इंद्रियस्य इंद्रियस्य**–प्रत्येक इन्द्रियाच्या –**अर्थे**–शब्दादि विषयांत–**रागद्वेषौ**–राग व द्वेष–**व्यवस्थितौ**–अवश्य होणारे आहेत,–**तयोः**–त्या रागद्वेषांच्या –**वशम्**–आधीन–**न आगच्छेत्**–होऊं नये. त्यांच्या ताब्यांत जाऊं नये.–**हि**–कारण–**तौ**–ते दोन राग द्वेष–**अस्य**–या पुरुषाला-**परिपन्थिनौ**-विघ्न करणारे आहेत ३४.

[विषयसेवनापासून प्रत्यक्ष सुख प्राप्त होत असतां त्यांत सुख नाहीं, हें म्हणणें सयुक्तिक नाहीं असें तुला वाटल्यास,] सहज विचार केला असतां, इंद्रियांना आवडेल त्याच विषयांचे सेवन केलें तर चित्ताला क्षणभर समाधान प्राप्त होईल, हें खरें; २१०. परंतु तें समाधान म्हणजे बाह्यतः संभावित दिसणाऱ्या चोराच्या संगतीप्रमाणें आहे. तो चोर जसा गांवाची सीमा ओलांडली नाही तोपर्यंत क्षणभर स्वस्थ असतो, [आणि मग घोर वनांत गेल्यावर तोच जसा सर्वस्वी नाश करितो], तसें [ते क्षणभरच विषय सुख आहे] ११. बाबारे बचनागादि विषाची मधुरता प्रथम खातांना गोड लागते खरी, परंतु त्याच्या परिणामाचा विचार केला असता ते प्राणनाशक असते त्याप्रमाणें १२. पहा! इंद्रियांचे ठिकाणीं असणारा जो विषय काम तो प्रथम खोट्या विषयसुखाच्या दुराशेला लागतो, जसे गळाला लावलेले आमिष माशाला भुलविते १३. परंतु आमिषाचे आंत एक गळ आहे कीं जो आपला प्राण घेईल, पण हे तो गळ झाकल्यामुळें जसा त्याला कळत नाहीं, १४. तशीच स्थिती या विषयसुखाच्या अभिलाषानें होईल. जर विषयाची इच्छा करील, तर तो क्रोधाग्नींत पडेल १५. ज्याप्रमाणे पारधी मारण्याच्या हेतूने हरिणाला चारी बाजूंनीं मारण्याची संधी साधून वळवून आणितो १६. त्याप्रमाणें ह्या विषयसुखाची तऱ्हा आहे; म्हणून पार्था कामक्रोध हे घातक आहेत असे समजून त्या विषयांचा संग तूं करूं नकोस १७. आणि ह्या [विषय व विषय इच्छा यास] थाराच देऊं नकोस; मनाला त्याची आठवण देखील होऊं देऊं नकोस तसेंच स्वधर्माचा वा [आत्मज्ञानाचा] ओलावा नाहींसा होऊं देऊं नकोस १८.

**अन्वयार्थ**-**स्वनुष्ठितात्**–[**सु**–**अनुष्ठितात्**] उत्तमप्रकारें अनुष्ठान केलेल्या–सर्वगुणसंपन्न–**परधर्मात्**–परधर्माहून–**विगुणः**–गुणरहित–दोषयुक्त-**स्वधर्मः**–स्वधर्म-**श्रेयान्**–अधिक चांगला–**स्वधर्मे**–स्वधर्मात राहिलेल्या पुरुषाला–**निधनम्**–मरण जरी आलें तरी तें-**श्रेयः**–श्रेयस्कर आहे. कारण–**परधर्मः**–दुसऱ्या वर्णाचा किंवा आश्रमाचा धर्म–**भयावहः**–नरकादि भय देणारा आहे ३५.

अरे! असे पहा कीं, आपला स्वतःचा धर्म जरी आचरण्यास कठीण असला, तरी त्याचेंच आचरण करणें चांगले होय, १९. याहून दुसऱ्याचा आचार धर्म खरोखर दिसण्यांत जरी चांगला दिसला तरी आचरण करणारांनीं आपल्या वेदविहित असलेल्या धर्माचेंच आचरण केलें पाहिजे २२०. अरे! ब्राह्मण जरी दरिद्री असला त्यानें शूद्राच्या घरचीं पक्वान्नें उत्तम असली तरी कशी सेवन करावीत सांग बरें? २१. त्याने असें हें अनुचित कर्म कसें करावें? आणि जी गोष्ट प्राप्त करून घेण्यास योग्य नाहीं, तिची इच्छा कशी करावी? अथवा जरी इच्छेप्रमाणें तसे विषय प्राप्त झालें तरी ते त्याने घ्यावेंत का? ह्याचा तूंच विचार कर २२. तसेंच लोकांचे मोठमोठे सुंदर वाडे पाहून गरीबानें आपल्या असलेल्या गवती झोंपड्या कशा मोडून टाकाव्यात? २३. हें असो. आपली धर्मपत्नी जरी कुरूप असली तरी तीच जशी आपल्यास भोगण्यास योग्य होय २४. त्याप्रमाणें, वाटेल तेवढा कठिण आणि आचरण्यास दुर्घट असा स्वधर्म असला, तरी तोच परलोकींचे सुख देणारा आहे २५. असें पहा कीं, साखर आणि दूध हे दोन पदार्थ गोड आहेत. सर्वांनुभव सिद्ध आहे पण ज्यांना जंत झाले आहेत, त्यांना ते कुपथ्य वाईट परिणाम करणारे आहे. त्यांनीं ते पदार्थ कसे सेवन करावेत २६. अर्जुना! असें असतांहि जर रोग्यानें ते सेवन केलें तर त्याचा तो हटवादीपणाच नाहीं का ठरणार? तर होय. कारण, परिणामी त्याचे करणे त्यास हितकारक होणार नाहीं. २७. म्हणून आपापल्या हिताचा विचार करून पाहिले तर जें दुसऱ्यास

आणिकांसी जे विहित । आणि आपणपेयां अनुचित । तें नाचरावें जरी हित । विचारिजे ॥२८॥ या स्वधर्मातें अनुष्ठितां । वेचु होईल जीविता । तोहि निका वैर उभयतां । दिसत असे ॥२९॥ ऐसें समस्तसुरशिरोमणी । बोलिले जेथ शार्ङ्गपाणी । तेथ अर्जुन म्हणे विनवणी । असे देवा ॥२३०॥ हें जें तुम्हीं सांगितलें । तें सकळ कीर म्यां परिसिलें । तरी आतां पुसेन कांहीं आपुलें । अपेक्षित ॥ ३१ ॥

अर्जुन उवाच :--

**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः । अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ३६ ॥**

तरी देवा हें ऐसें कैसें । जे ज्ञानियांही स्थिति भ्रंशे । मार्गु सांडुनी अनारिसे । चालत देखों ॥ ३२ ॥ सर्वज्ञुही जे होती । हेयोपादेयही जाणती । तेही परधर्मे व्यभिचरति । कवणें गुणें ? ॥ ३३ ॥ बीजा आणि भूसा । अंधु निवाडू नेणें जैसा । नावेक देखणाही तैसा । बैरळे कां पां ? ॥ ३४ ॥ जे असता संगु सांडिती । तेचि संसर्गु करितां न धाती । वनवासीही सेविती । जनपदातें ॥ ३५ ॥ आपण तरी लपती । सर्वस्वें पाप चुकविती । परी बळात्कारें सुईजती । तयाचि माजीं ॥ ३६ ॥ जयाची जीवें घेती विवंसी । तेचि जडोनि ठाके जीवेंसीं । चुकवितां ते गिंवसी । तयातेंचि ॥ ३७ ॥ ऐसा बलात्कारु एकु दिसे । तो कवणाचा एथ आग्रहो असे । हें बोलावें हृषीकेशें । पार्थु म्हणे ॥ ३८ ॥

श्रीभगवान् उवाच :—

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः । महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ३७ ॥**

तंव हृदयकमळआरामु । जो योगियांचा निष्कामकामु । तो म्हणतसे पुरुषोत्तमु । सांगेन आइक ॥ ३९ ॥ तरी हे काम क्रोधु पाहीं । जयांतें कृपेची सांठवण नाहीं । हें कृतांताच्या ठायीं । मानिजती ॥ २४० ॥ हे ज्ञाननिधीचे भुजंग । विषयदरीचे वाघ । भजनमार्गींचे मांग । मारक जे ॥ ४१ ॥ हे देहदुर्गींचे धोंडे । इंद्रियग्रामींचें कोंडें । यांचें व्यामोहादिकें दवड । जगावरी ॥ ४२ ॥ हे रजोगुण मानसींचे । समूळ आसुरियेचे । धालेपण ययांचें । अविद्या केलें ॥ ४३ ॥ हे रजाचे कीर जाहले । परी तमासी पढियंते भले । तेणें निजपद यां दिधलें । प्रमादमोहो ॥ ४४ ॥ हे मृत्यूच्या नगरीं । मानिजती निकियापरि । जे जीविताचे वैरी । म्हणोनियां ॥ ४५ ॥ जयांसि भुकेलिया आमिषा । हें विश्व न पुरेचि घांसा । कुळवाडियांचिया आशा ।

उचित असून आपल्यास अनुचित आहे, त्याचें आचरण स्वहितदृष्ट्या कोणीहि करूं नये २८. किंबहुना! स्वधर्मानें आचरण करीत असतांना जरी आपले प्राण-जीवित खर्ची पडले तरीहि तो इहपर अशा दोन्ही लोकीं खरोखर श्रेष्ठ असाच मानला जातो २९. देवाधिदेव श्रीशारङ्गपाणी असे बोलले. हे भाषण ऐकून त्यावेळी अर्जुन म्हणतो देवा माझी एक विनंति आहे २३०. आपण जें मला आतां सांगितलें, तें मीं सर्व खरोखर नीट ऐकिलें आहे. परंतु आतां मला जें कांहीं पाहिजे आहे, तें मी विचारितों ३१.

**अन्वयार्थ—हे वार्ष्णेय**—हे कृष्णा!—**अथ**—आतां—**केन**—कोणाकडून—**प्रयुक्तः**—प्रेरणा केला गेलेला—**अयम् पूरुषः**—हा पुरुष—**अनिच्छन् अपि**—पाप करण्याची इच्छा करीत नसतांनाहि—**बलात्**—बलात्कारानें — **नियोजितः इव**—करावयास लावल्याप्रमाणेंच जणूं काय-**पापम्**—पाप-**चरति**—करतो ३६.

देवा! हे असें कसें होते कीं, ज्ञान्यांचीसुद्धां स्थिति भ्रष्ट होऊन ते सन्मार्ग सोडून भलत्याच मार्गानें जातात, असें दिसून येतें असें कां व्हावें? ३२. जे सर्वज्ञहि असतात व त्यांना त्याज्य काय व ग्राह्य काय हें माहीतहि असतें; तथापि ते देखील स्वधर्म सोडून परधर्माचें आचरण, कोणत्या कारणानें करितात? ३३. जसें आंधळा मनुष्य धान्य आणि कोंडा याची निवड करून निराळें करण्याचें जाणत नाहीं, तसें कधी कधी क्षणभर डोळसास कळत नाहीं असें कां व्हावें? ३४. जे असलेला सर्व संग सोडतात, तेंच पुनः कितीहि संग केला तरी तृप्त होत नाहींत, व सर्व सोडून वनवासांत असलेलेंहि पुनः व्यावहारिक लोकांत येऊन राहतात ३५. वास्तविक आपण पापापासून अलिप्त असावें म्हणून भीतीनें लपून बसतात व पाप आपल्या हातून होऊं नये. अशी इच्छा व प्रयत्नहि करितात; परंतु त्यांना पुनः बलात्कारानें त्या पापांतच कोणीतरी वातल्याची प्रतीति येते ३६. ज्या विषयांची ते मनापासून किळस बाळगतात, तेच विषय त्यांच्या जिवाशीं येऊन जडून—चिकटून राहिलेले दिसतात. ते चुकवावयाचा प्रयत्न केला तरी उलट ते पुनः बेऊन त्यांनाच घेरतात ३७. अशा रीतीने [ ज्ञानावानांच्या विषयसेवनांत ] एक बलात्कार दिसतो. तो येथें बलात्कार म्ह. बलजबरी करण्याचा आग्रह कोणाचा आहे? हे देवांनी कृपा करून मला सांगावें, असें अर्जुन म्हणाला ३८.

**अन्वयार्थ—एषः कामः**—पुरुषाला पापांत प्रवृत्त करणारा हा काम आहे—**एषः क्रोधः**—हाच क्रोध आहे—**रजोगुणसमुद्भवः**—तो काम रजोगुणापासून उत्पन्न होतो—**महाशनः**—मोठा खादाड आहे म्हणूनच तो—**महापाप्मा**—महापापी आहे—**इह**—या संसारांत—**एनम्**—या कामाला—**वैरिणम्**—वैरी—**विद्धि**—समज ३७.

तेव्हां हृदयरूपी कमलांत वास्तव्य करणारा आणि योगिजन ज्यांची निष्कामबुद्धीनें इच्छा करतात; असा जो पुरुषोत्तम तो अर्जुनास म्हणालाः—सांगतों ऐक ३९. अरे! हृदयामध्येंच वास करणारें हे प्रत्यक्ष काम आणि क्रोध हेंच पुरुषास पापामध्यें [ बलात्कारानें ] प्रवृत्त करणारे आहेत; हे असें आहेत कीं, त्या कामक्रोधांच्या ठिकाणीं दयेचा सांठा असा बिलकुल नाहीं, फार काय सांगावें!! दुसऱ्याचा नाश करण्याविषयीं हे कामक्रोध साक्षात् यमाप्रमाणें सामर्थ्यवान मानले जातात २४०. हे कामक्रोध ज्ञानरूप धनाच्या ठेवीवरचे नाग होत व विषयरूपी दऱ्याखोऱ्यांतील वाघ होत आणि भजनमार्गीचे वाटमारे मांग आहेत असें समज ४१. देहरूप डोंगरी किल्ल्यावरील मोठे दगड आहेत व इन्द्रियरूप गांवांतील कोंडवाडे-गांवकूस आहेत आणि अविवेकात्मक भ्रांति वगैरे उत्पन्न करण्याच्यारूपाने ह्यांचा जगावर धाक दपटशहा आहे ४२. हे मनांत असलेल्या रजोगुणाचें वळलेले आहेत व हे मुळापासूनच आसुरी संपत्तींतील आहेत. ह्यांचे भरणपोषण व तृप्ति अविद्येनेंच केलेले आहे ४३. हे वास्तविक रजोगुणापासून तयार झालेले आहेत खरें; तरीपण तमोगुणाचे फार आवडते होऊन राहिले आहेत; म्हणून तमोगुणानें आपलें सर्वस्वपद अर्थात् अनवधानता व अविवेक ह्यांस दिले आहेत ४४. म्हणून मृत्यूचे नगरांत ह्यांना चांगल्या प्रकारचा मान मिळतो.कारण हे जीविताचे शत्रु आहेत ४५. काय चमत्कार सांगावा! ह्यांच्या नुसत्या भुकेच्या इच्छेला, हें विश्व एका घांसाला देखील पुरें पडत नाहीं, आणि 'आशा' ही ह्यांच्या

१ दुसऱ्यांस. २ आपणाला. ३ खर्चे. ४ खरोखर. ५ श्रेष्ठ. ६ दोन्ही लोकी. ७ इच्छित. ८ बिघडते. ९ वेगळे. १० जाणतें. ११ स्वकीय धर्म सोडून परकीय धर्म आचरतात. १२ पृथकपणा, वेगळे करणें. १३ एखादे वेळीं, क्षणभर. १४ डोळस, चांगल्या दृष्टीचा. १५ चुकतो. १६ तृप्त होत नाहींत. १७ गांवातील लोकांत —वस्तींत मिसळतात. १८ घातले जातात. १९ किळस. २० शोधिते, धरते. २१ हृदयाला रमविणारा २२ लवलेश. २३ काळाच्या. २४ ज्ञानरूप ठेव्यावरचे. २५ विषयरूपी खोऱ्यांतील. २६ मारेकरी. २७ दगड २८ गांवकुस. २९ आज्ञानादिक.

चाळीत असे ॥ ४६ ॥ कौतुकें कवळितां मुठीं । जिये चवदा भुवनें थेंकुटी । तिये भ्रांतिही धाकुटी । वाल्हीदुल्ही ॥ ४७ ॥ जें लोकत्रयाचें भातुकें । खेळतांचि खाय कवंतिकें । तिच्या दासीपणाचेनि बिकें । तृष्णा जिंये ॥ ४८ ॥ हें असो मोहें मानिजे । यांतें अहंकारें घेपे दीजे । जेणें जग आपुलेनि भोजें । नाचवीत असे ॥ ४९ ॥ जेणें सत्याचा भोंकसा काढिला । मग अकृत्य तृणकुटा भरिला । तो दंभु रूढविला । जगीं इहीं ॥ २५० ॥ साध्वी शांति नागविली । मग माया मांगी शृंगारिली । तियेकरवीं विटाळविलीं । सांधुवृंदें ॥ ५१ ॥ इहीं विवेकाची त्रांय फेडिली । वैराग्याची खाल काढिली । जितयां मान मोडिली । उपशमाची ॥५२॥ इहीं संतोषवन खांडिलें । धैर्यदुर्ग पाडिले । आनंदरोप सांडिले । उपडूनियां ॥५३॥ इहीं बोधाचीं रोपें लुंचिलीं । सुखाची लिपी पुसिली । जिव्हारीं आगी सूंदली । तापत्रयाची ॥५४॥ हे आंगा तंव घडले । जीवींची आंथी जडले । परी नातुडती गिंवसिले । ब्रह्मादिकां ॥५५॥ हे चैतन्याचे शेजारीं । वसती ज्ञानाच्या एका हारीं । म्हणौनि प्रवर्तले महामारी । सांवरती ना ॥ ५६ ॥ हे जळेंविण बुडविती । आगीवीण जाळिती । न बोलतां कवळिती । प्राणियांतें ॥ ५७ ॥ हे शस्त्रेंवीण साधिती । दोरेंवीण बांधिती । ज्ञानियासी तरी वधिती । पैज घेउनि ॥ ५८ ॥ हे चिखलेंवीण रोंविती । पाशिकेंवीणें गोंविती । हे कवणाजोगें न होती । आंतौटेपणें ॥ ५९ ॥

धूमेनाऽऽव्रियते वन्हिर्यथाऽऽदर्शो मलेन च । यथोल्बेनाऽऽवृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥

जैसी चंदनाची मुळी । गिंवसोनि घेपे व्याळीं । नातरी उल्बाची खोळी । गर्भस्थासी ॥ २६० ॥ कां प्रभावीण भानु । धूमेवीण हुताशनु । जैसा दर्पण मळहीनु । कहींच नसे ॥ ६१ ॥ तैसें इहींवीण एकलें । आम्हीं ज्ञान नाहीं देखिलें । जैसें कोंडेनि पां गुंतलें । बीज निपजे ॥ ६२ ॥

आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा । कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥

तैसें ज्ञान तरी शुद्ध । परी इहीं असे प्ररुद्ध । म्हणौनि तें अगाध । होऊनि ठेलें ॥ ६३ ॥ आधीं यांतें जिणावें । मग तें ज्ञान पावावें । तंव पराभवो न संभवे । रागद्वेषां ॥ ६४ ॥ यांतें साधावयालागीं । जें बळ आणिजे आंगीं । तें इंधनें जैसीं आगी । सावावो होय ॥ ६५ ॥

व्यापाराची देखरेख व वृद्धि करते ४६. जिनें सहज लीलेने आपल्या मुठी मिटल्या असतां त्यांत मावण्याला चौदा भुवनेंहि कमीच आहेत; अशा तऱ्हेची जी भ्रांति ती आशेची अतीव लाडकी धाकटी बहीण आहे ४७. भ्रांति केवळ भातुकली खेळतां खेळतां सहज तिन्ही लोकरूपी खाऊं खाऊन टाकते, आणि त्या भ्रांतीच्या दासीपणाचे बळावरच तृष्णा जगली, व पुष्ट झाली आहे ४८. हें असो, ह्या कामक्रोधांना मोहाच्या घरीं मान, प्रतिष्ठा आहे, आणि जो अहंकार आपल्या करामतीने सर्व जगाला नाचवितो तो अहंकार ह्यांच्याशीं देवघेव करीत असतो ४९. ज्याने [ दंभानें ] पोटी असलेला सत्याचा कोथळा फोडून काढला व त्यांत सत्याऐवजी दुष्ट कृत्यांचा पेंढा भरला, असा जो दंभ त्यास ह्यांनींच [ कामक्रोधांनीच ] जगांत पुढे प्रसिद्धीला आणलें २५०. या कामक्रोधांनी प्रतिव्रतारूप शांतीला लुबाडून वस्त्र विहिन केले व त्याच वस्त्रालंकारांनी मायारूप मांगिणीला सजविलें, आणि तिच्याकडून साधूंचे समुदाय भ्रष्ट करविले ! ५१. त्या कामक्रोधांनीं विवेकाचे आश्रयस्थानच नाहींसे केले; वैराग्याची कातडी काढली आणि इंद्रियनिग्रहाची जीवंतपणीच मान मुरगळून टाकली ५२. ह्यांनीं संतोषरूपी वन तोडून टाकिलें, धैर्यरूपी किल्ले पाडून जमीनदोस्त केले, आणि आनंदरूपी लहान रोपटें उपटून टाकिलें ५३. ह्यांनीं ज्ञानाचीं रोपें खुडून टाकिलीं, सुखाचें नांवसुद्धां, भाषाहि पुसून टाकली आणि प्राणिमात्रांच्या हृदयांत त्रिविध तापांचे निखारे पसरून टाकले ५४. हे शरीराबरोबरच उत्पन्न झालेले असून अंतःकरणाशीच सारखे जडून राहिले आहेत; परंतु शोध करायला गेलें असतां ब्रह्मादिकांसहि ते सांपडत नाहींत ५५. हे काम क्रोध आत्मस्वरूपाच्या अगदी शेजारीं आणि वृत्तिज्ञानाच्या पंक्तीला बसतात; म्हणून हे महाप्रलय करण्यास उसळून प्रवृत्त झाले तर कोणाला आवरत नाहींत ५६. यांचा काय पराक्रम सांगावा ! हे कामक्रोध जीवाला पाण्याशिवाय बुडवितात, अग्निशिवाय जाळतात आणि प्राण्याला न कळतां एकदम धरतात ५७. हे शस्त्राशिवाय ठार मारतात, दोराशिवाय बंधन करतात, आणि तत्त्ववेत्त्यांना तर प्रतिज्ञापूर्वक पैजेनें ठार मारून टाकतात ५८. हे चिखलाशिवाय रोवतात, जाळ्याच्या पाशाशिवाय लोकांना बांधून ठेवितात आणि शरीराच्या इतक्या अंतर्यामीं घुसून पोहोंचल्यामुळें ह्यांच्या बरोबरीचे सामर्थ्यवान् दुसरें कोणी नाहींत. [ हे कोणासहि आटोक्यांत आणतां येत नाहींत व हे कोणासारखे आहेत हे सांगता येत नाहीं ] ५९.

**अन्वयार्थ**—**यथा**–ज्याप्रमाणें–**धूमेन** – धुराकडून – **वन्हिः**–अग्नि–**आव्रियते**–आच्छादित केला जातो–**च**–व–**मलेन**–मळानें **आदर्शः**–आरसा–[ **आव्रियते**-झांकला जातो. ] **यथा**–ज्याप्रमाणें–**उल्बेन**–वारेने–**गर्भः**–गर्भ–**आवृतः**–आच्छादित झालेला असतो–**तथा**–त्याप्रमाणें **तेन**–त्या कामानें–**इदम्**–हें **आवृतम्**–झांकलेलें आहे ३८.

[ अर्जुना ! फार काय सांगावें !! जेथें ज्ञान आहे तेथें कामक्रोध हे आहेतच ] जसा साप चंदनाच्या मुळाला वेढे घालून राहातो, किंवा पोटांतील गर्भ गर्भवेष्टनाच्या खोळीने जसा आच्छादित असतो, २६०. अथवा प्रभेशिवाय सूर्य, धुराशिवाय अग्नि किंवा मळहीन म्ह. पाऱ्याशिवाय आरसा हीं ज्याप्रमाणें कधीच सांपडायचीं नाहींत ६१. किंवा बीज जसें कोंड्यानें आच्छादिलेलेंच उत्पन्न होतें, त्याप्रमाणें कामक्रोधाशिवाय एकटे असलेलें शुद्धज्ञान आमच्या दृष्टीस कधींच पडलें नाहीं. ६२.

**अन्वयार्थ**—**हे कौंतेय**–हे अर्जुना ! **ज्ञानिनः**–ज्ञानी–पुरुषाचा–**नित्यवरिणा**–नित्यवैरी–**दुष्पूरेण**–ज्याची भरती कधींच होत नाहीं,–**च**–व–**अनलेन**–ज्याला 'पुरे' असें कधीं वाटत नाहीं अशा–**एतेन कामरूपेण**–या इच्छारूप शत्रूनें–**ज्ञानम्**–ज्ञान–**आवृतम्**–आच्छादित केलें आहे ३९.

अरे ! ज्ञान हें स्वभावतः जरी शुद्ध आहे, तरी कामक्रोधांनीं विशेष रूपानें आच्छादित असतें, म्हणूनच तें गहन [ प्राप्त होण्यास अवघड ] होऊन बसलें आहे ६३. अगोदर कामक्रोधांस जिंकावें व मग ज्ञान प्राप्त करून घ्यावें. पण त्या कामक्रोधांचा पराभव होऊ शकत नाहीं म्हणून त्यास जिंकणें अगोदर कठीण ! ६४. कारण, ह्यांना जिंकण्याकरितां जें जें अवसान अंगात आणावें तें तें उलट त्यांनाच साह्यकारी होतें—जसें अग्नि विझविण्याकरितां लांकडें टाकिलीं असतां, तीं त्यालाच प्रज्वलित करण्यास साह्य करितात ६५.

१ कौतुकानें. २ बळ. ३ वासना. ४ जिंवत राहते. ५ देवघेव होते. ६ हौसेनें. ७ पोंटळा. ८ गवताचा पेंढा. ९ प्रतिव्रता. १० साधूंचे समूह. ११ आश्रय. १२ फोड. १३ जिवंत. १४ इंद्रियनिग्रहाची. १५ तोडिलें. १६ उपटलीं. १७ नांव, लेख. १८ अंतःकरणांत. १९ घातली. २० त्रिविध तापांची. २१ आहेत. २२ सांपडत नाहीत. २३ ब्रह्मरूपाचें २४ मारितात. २५ पाशावांचून. २६ आंत असल्यामुळे. २७ शोधून. २८ घेतली जाते. २९ सर्पांनीं ३० गर्भवेष्टनाची.

इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते । एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥

तैसे उपाय कीजती जे जे । ते ते यांसीचि होती विरजे । म्हणौनि हटियेंतें जिणिजे । इहींचि जगीं ॥ ६६ ॥ ऐसियांही सांकडां बोला । एक उपायो आहे भला । तो करितां जरी आंगवला । तरी सांगेन तुज ॥ ६७ ॥

तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ । पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥

यांचा पहिला कुरुंठा इंद्रियें । एथूनि प्रवृत्ति कर्मातें विये । आधीं निर्दळूनि घाली तियें । सर्वथैव ॥ ६८ ॥

इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः । मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥

मग मनाची धांव पारुषेल । आणि बुद्धीची सोडवण होईल । इतुकेन थारा मोडेल । या पापियांचा ॥ ६९ ॥

एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्याऽऽत्मानमात्मना । जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

हे अंतरींहूनि जरी फिटले । तरी निभ्रांत जाण निवटले । जैसें रश्मीवीण उरलें । मृगजळ नाहीं ॥ २७० ॥ तैसे रागद्वेष जरी निमाले । तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें । मग तो भोगी सुख आपुलें । आपणचि ॥ ७१ ॥ ते गुरुशिष्याची गोठी । पद-पिंडांची गांठी । तेथ स्थिर राहोनि नुठी । कवणे काळीं ॥ ७२ ॥ ऐसें सकळ सिद्धांचा रावो । देवी लक्ष्मीयेचा नाहो । राया ऐकें देवदेवो । बोलता जाहला ॥ ७३ ॥ आतां पुनरपि तो अनंतु । आद्य एकी मातु । सांगैल तेथ पंडुसुतु । प्रश्नु करील ॥ ७४ ॥ तया बोलाचा हन पाड । कीं रसवृत्तीचा निवाड । येणें श्रोतयां होईल सुरवाडु । श्रवणसुखाचा ॥ ७५ ॥ ज्ञानदेवो म्हणे निवृत्तीचा । चांग उठावा करूनि उन्मेषाचा । मग संवादु श्रीहरिपार्थाचा । भोगावा बापा ॥ २७६ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥ श्लोक ४३, ओव्या २७६.

★

**अन्वयार्थ—इंद्रियाणि**–इंद्रियें–**मनः**–मन–**बुध्दिः**–व बुद्धि हे–**अस्य**–या कामाचें–**अधिष्ठानम्**–आश्रय-स्थान–**उच्यते**–सांगितलें जातें–**एषः**–हा काम–**एतैः**–या इंद्रियादिकांच्या योगानें–**ज्ञानम्**–ज्ञानाला–**आवृत्य**–आच्छादित करून – **देहिनम्** – देहवान् – देहाभिमानी आत्म्याला–**विमोहयति**–नानाप्रकारें मोहित करतो ४०.

त्याप्रमाणें, जे जे उपाय करावेत. ते ते सर्व ह्यानांच साह्यकारी होतात, म्हणून या जगामध्यें हटयोग्यांना देखील हेच [ कामक्रोधादिक ] जिंकितात ६६. मग हे काम, क्रोध अजिंक्यच झाले असें तुला वाटेल, तर तसें मात्र नाहीं हो ! अर्जुना, असे हे कामक्रोध जिंकण्यास अवघड म्हटले तरीपण त्यास जिंकण्यास एक मात्र उत्तम उपाय आहे; तो जर तुला साधत असेल तर पहा मी तुला सांगतो ६७.

**अन्वयार्थ—हे भरतर्षभ** - हे अर्जुना ! –**तस्मात्**–म्हणून–**त्वम्**–तूं–**आदौ**–अगोदर – **इन्द्रियाणि** – आपली इंद्रियें– **नियम्य**–नियमित करून—इन्द्रियांचें नियमन करून – **ज्ञानविज्ञाननाशनम् एनम्** – शास्त्रज्ञान व आत्मसाक्षात्काररूप ज्ञान यांचा नाश करणाऱ्या या–**पाप्मानम्**–पाप्याला–**प्रजहिहि**–सोड. त्याचा परित्याग कर ४१.

**ह्यांचें मूळ वास्तव्य–आश्रयस्थान इंद्रियें ही आहेत. आणि इंद्रियांपासून कर्माची प्रवृत्ति होते म्हणून ह्या इंद्रियांनाच अगोदर सर्वथैव जिंकून ताब्यांत ठेव ६८.**

**अन्वयार्थ—इन्द्रियाणि**–श्रोत्रादि पांच इंद्रियें–बाह्य स्थूल देहाच्या अपेक्षेनें– **पराणि**–उत्कृष्ट आहेत, असें– **आहुः**–[ पंडित ] सांगतात.–**इन्द्रियेभ्यः**–इंद्रियांहून–**मनः परम्** श्रेष्ठ आहे–**तु**–व–**मनसः**–मनाहून–**बुद्धिः**–बुद्धि **परा**–श्रेष्ठ आहे. –**यः**–जो – **बुद्धेः**–बुद्धीहून –**परतः**–पलीकडे असलेला साक्षी–**सः**–**तु**–[ **सः** ]– तोच प्रसिद्ध आत्मा आहे ४२.

असें झालें म्हणजे मग मनाची धांव कुंठित होईल, बुद्धिची सोडवणूक होईल; आणि मग एवढ्यानेच ह्या दुष्टांचा राहण्याचा आश्रयच–नाहींसा होईल ६९.

**अन्वयार्थ—हे महाबाहो**–**एवम्** – याप्रमाणें – **बुद्धेः परम् आत्मानम्**–बुद्धीच्यापलीकडे असलेल्या आत्म्याला **बुद्ध्वा** – जाणून– **आत्मना**– स्वतः सुसंस्कृत मनानेंच त्याचें – **संस्तभ्य** – उत्तमप्रकारें स्तंभन करून – **दुरासदं**–जो हातीं लागणें फार कठिण आहे, अशा–**कामरूपं शत्रुम्** – या कामरूप शत्रूला – **जहि** – तूं टाक ४३.

ह्याप्रमाणें ह्यांची अंतःकरणांतून वस्ती पार मोडली म्हणजे हे खास निःसंशय मेले, असें समज. ज्याप्रमाणें सूर्यकिरणांशिवाय मृगजळ दृष्टीस पडावयाला उरतच नाहीं २७०. त्याप्रमाणें, राग आणि द्वेष जर पूर्णतया नाश पावले तर ब्रह्म प्राप्तीरूपी स्वराज्यच हातीं आलें असें समज. मग तो पुरुष स्वतःच निजसुख उपभोगतो ७१. हीच गुरुशिष्यांची गुह्य गोष्ट; हेच त्या संवादांत विचारानें लाभणारे जीवब्रह्माचें ऐक्य. तूं येथें स्थिर होऊन येथून कधींही हालूं नकोस ७२. संजय म्हणतो:- राजा धृतराष्ट्रा ऐक, सकलसिद्धमुकुटमणि देवी लक्ष्मीचे पति देवाधिदेव श्रीकृष्ण ह्याप्रमाणें बोलले ७३. आतां ह्यापुढें ते भगवान् श्रीकृष्ण एक पुरातन कथा पुनः सांगतील, ती ऐकून तेथे अर्जुन प्रश्न करील. ७४. त्या कथेची प्रतिपादन योग्यता व त्यांतील रसिकपणा हीं ऐकून श्रोत्यांना श्रवणसुखाचा सुकाळ होईल, ७५. श्रीनिवृत्तीनाथांचे दास जे श्रीज्ञानदेव; ते म्हणतात, बाबांनो, बुद्धीला चांगले जागे करून [ आत्मज्ञानप्राप्तीच्या चांगल्या तयारीनें ] मग तुम्ही कृष्णार्जुनसंवाद ऐका. संवादसुख भोगा २७६.

१ सहाय्य. २ हटयोग्यांना. ३ संकट. ४ मानवला, अनुकूल झाला. ५ घरटें. ६ प्रसवे. ७ जिंक, इंद्रियांचीद्वारे बंद कर. ८ कुंठित होईल. ९ आश्रय. १० मेले. ११ सूर्यकिरणाशिवाय. १२ नाश पावले. १ जीवब्रह्माची. १४ नाथ. १५ पहिली, पुरातन. १६ योग्यता. १७ रसिक भाषणाचा. १८ सुकाळ १९ ज्ञानाचा.

★

# अध्याय संगति व तिसऱ्या अध्यायाचें तात्पर्य

## साधनारंभु तो तृतीया- । ध्यायीं बोलिला ।। अ. १८-१४३७

दुसऱ्या अध्यायांत 'ज्ञानप्रधान गीताशास्त्राचें सूत्ररूपानें' कथन केलें व अज्ञानामुळें आत्मस्वरूपाचे ठिकाणीं 'कर्तृत्वबुद्धि' आणि धर्मरूप युद्धाचे ठिकाणीं 'अधर्मबुद्धि' असे दोन तऱ्हेचे भ्रम अर्जुनास झाले होते. भ्रमाची निवृत्ति अधिष्ठानज्ञानानें होतें, असा नियम आहे. म्हणून देवांनीं अर्जुनास आत्मज्ञान सांगून त्याचें फल म्ह. स्थित-प्रज्ञत्व किंवा जीवन्मुक्ति आहे, हेंहि सांगितलें. तथापि तें आत्मज्ञान होण्याकरितां अन्तःकरणाची शास्त्रीय विशिष्ट शुद्धता असावी लागतें. त्यासाठीं काम्य-निषिद्ध कर्मांचा त्याग करून नित्यनैमित्तिक कर्में निष्कामबुद्धीनें केली पाहि-जेत, असा गीताशास्त्रानें उपदेश केला आहे. त्या साधनांचा आरंभ वरीलप्रमाणें निष्काम कर्मापासून असून तें कर्म या तिसऱ्या अध्यायांत सांगण्यास आरंभ झाला आहे. म्हणूनच या अध्यायांत 'साधनारंभ आहे' म्हणून सांगितलें आहे. अर्थात् अर्जुनाच्या प्रश्नपूर्वक कर्माची आवश्यकता कशी आहे, हें सांगण्याकरितांच हा अध्याय आहे तो अर्जुनाचा प्रश्न असा :—

देवा ! आतांच ज्या स्थितींत आत्मस्वरूपाचें ठिकाणीं सर्व कर्मांचा तुम्हीच निषेध करतां आणि मला मात्र हिंसात्मक पापकर्म करण्यास सांगतां, हें योग्य कीं अयोग्य ? असा मला संदेह उत्पन्न होतो [ १० ते १९ ]. देवा ! हा तुमचा दुटप्पी उपदेश नको. कारण, त्यामुळें माझ्या मनाची स्थिरता जाऊन मी जास्तच घोटाळ्यांत मात्र पडलो. यांत खरें काय तेंच मला कळत नाहीं. म्हणून मला अडाण्याला समजेल असें सरळ, सोपें व निश्चयात्मक रीतीनें माझें खरें हित कशांत आहे तें सांगा. असें विचारण्याचा माझा अधिकारहि आहे. कारण, अनेक जन्म तुमची उपासना करतां करतां त्या पुण्यानें आज तुमची मला प्राप्ति झाली असून तुम्हीच माझी माता, पिता व गुरुहि आहांत मग मी आपलें मनोरथ पूर्ण कां करून घेऊं नये ? तरी देवा इहपरलोकीं हितकारक असें एक निश्चित काय तें मला सांगा [ १६ ते ३१ ]. श्रीभगवंत सांगतातः—निष्काम कर्ममार्ग आणि ज्ञानमार्ग हें दोन्ही मींच सांगितलें. त्या दोन्ही मार्गांचें प्राप्यस्थान किंवा फल एकच आहे; पण त्या मार्गाचें अधिकारी मात्र मंद व तीव्र या भेदानें भिन्न भिन्न आहेत. अर्थात् त्या भिन्न भिन्न अधिकाऱ्यांकरितां भिन्न भिन्न साधनें सांगितली. त्या दोन मार्गांत 'पिपिलिका' आणि 'विहंगम' यांच्या गती इतकें अंतर आहे. तसें या दोन्ही मार्गांचें शेवटीं प्राप्यस्थान एकच आहे. मंद अधिकाऱ्यास ज्ञानमार्गाचा अवलंब करण्याचा उपदेश करणें उचित ठरणार नाहीं. कारण, कर्म करणें न करणें आपल्या इच्छेनुसार आहे हे उगाच, व्यर्थ बोलणें होय; नैष्कर्म्यस्थिति प्राप्त व्हावी म्हणून 'प्राप्तकर्म' म्हणजे आपापल्या अधिकारा-नुरूप वेदबोधित कर्म सोडणें हा मूर्खपणा होय. नुसतें कर्म टाकल्यानें कर्माचा त्याग होत नाहीं असें निःसंशय समज. [ या सर्वांचे तात्पर्य असें आहे कीं, नैष्कर्म्य हें जीवाचें साध्य आहे आणि त्याचे साधन निष्कामकर्माचरण हेंच आहे. साध्य प्राप्तीनंतर मात्र त्याला कसलीच इच्छा नसल्यामुळें कर्माची आवश्यकताच रहात नाहीं, असें असतां देखील 'राहते' म्हणणें हा केवळ आग्रह आहे हें गीतेचें म्हणणें आहे. ] [ ३२ ते ५२ ]. तसेंच जोंपर्यंत शरीर धारण केलें आहे, जोंपर्यंत मायेचा व तिच्यापासून निर्माण झालेल्या देहेंद्रियांचा संबंध आहे तोंपर्यंत कधींहि कर्मत्याग घडणार नाहीं. इन्द्रियाचा कर्में करण्याचा स्वभाव नष्ट होत नाहीं. एवढेंच नव्हे तर ते कर्म सोडतो म्हणणें हाहि केवळ आग्रहच आहे. प्राप्तपुरुषासहि शारीरिक कर्म असतेंच. विषयासक्त पुरुषांविषयीं तर बोलण्याची जरूरीच नाहीं. मनांत कर्तव्यशेष असून किंवा विषयासक्ति असून वरवर बाह्यात्कारी कर्मेंद्रियांचा निरोध करून उचित कर्में सोडतात व कर्मातीत झाल्याचें दाखवितात तें निव्वळ ढोंग आहे, तो दांभिकपणा आहे, कर्मत्यागाचा नाटकीपणा आहे [ ५३ ते ६६ ]. आतां जो खरा निष्काम पुरुष आहे त्याची लक्षणें सांगतों. जो आत्मज्ञानानें निश्चल झालेला असतो.

बाह्यात्कारी लोकाचाराप्रमाणें इहलौकिक व्यवहारांत वागणारा असतो. इंद्रियें स्वाधीन असल्यामुळें इन्द्रियांना कर्मप्रवृत्तींत आज्ञाहि करीत नाहीं व ती आपापली कर्में करीत असतां, विषय बाधतील या भीतीनें त्यांना आवरीतहि नाहीं. तर सामान्य इतर जनांसारखा वागतांना दिसतो, तरीपण इन्द्रिय विकारांच्या आधीन किंवा वासनेनें आकळला न जातां, कमळाचें पान जसें पाण्यांत राहूनहि पाण्यानें भिजत नाहीं, तसा तो कर्मापासून मुळींच लिप्त होत नाहीं. कारण, तो आशापाशरहित असतो [ ६७ ते ७६ ]. देहाभिमान्यास कर्माचा त्याग होणें संभवनीय नाहीं. मग विषयासक्तानें कर्मरहित होण्याचा आग्रह तरी कां करावा ? याचा विचार कर. वर्णपरंपरेनें आश्रमधर्मानुसार–अधिकारानुसार निष्कामबुद्धीनें स्वकर्माचरण केल्यास ते निर्हेतुक कर्मच सर्व कर्म बंधापासून सोडविणारें व मोक्षाचें परंपरेनें निश्चित साधन आहे असा हा कर्मयोगांतील कौतुकास्पद लोकोत्तर विशेष आहे [ ७७ ते ८० ].

स्वधर्माचरण हाच आपला नित्य यज्ञ आहे. स्वधर्माचे आचरण करण्याचें जें टाकतात त्यांची कुकर्माकडे प्रवृत्ति होऊन ते जन्ममरण परंपरारूप अनर्थास प्राप्त होतात. ब्रह्मदेवानें ज्यावेळीं सृष्टीची उत्पत्ति केली त्याचवेळीं मनुष्य प्राण्याबरोबर नित्य आचरण्याचे धर्महि उत्पन्न केले व सर्व प्रजेस सांगितलें कीं, तुम्ही नित्य स्वधर्माचे आचरण करण्यांतच तुमचे सर्व हेतु सहज पूर्ण होऊन तुमचे कल्याण होईल. या व्यतिरिक्त व्रतवैकल्यें, तीर्थयात्रा, कामनिक आराधनें, उपासतापास, मंत्रतंत्रादि कांहीं करूं नका. केवळ स्वधर्माचरणानेंच तुमचे हित होईल. [ व्रतवैकल्य, उपासतापास, तीर्थयात्रा, योग याग, कामनापूर्तीकरितां देवताराधना आणि मंत्र-तंत्र-यंत्रादि [ शक्ति-उपासना ] अनुष्ठानें करूं नका असें सांगितलें आहे. ते केवळ मुमुक्षूला सांगितले असून धर्माच्या नांवाखाली सकाम उपासना करणे म्हणजे धर्माचरण नव्हे असें मुमुक्षूंस सुचविलें आहे, पण विषयप्राप्तीची इच्छा करणाऱ्या मंदबुद्धि मनुष्यास पुराणकारांच्या दृष्टीनें त्याची आवश्यकता आहे असें समजावे. ] इंद्रियाधीन होऊन स्वधर्माचरण टाकून देईल. अर्थात् अग्नि मुखीं हवन, देवतापूजन, ब्राह्मणभोजन, गुरुभक्ति, अतिथीचा आदर, ज्ञातिसंतोष इत्यादि स्वधर्माचे आचरण करणारं नाहीं. त्याला काळ शिक्षा करील, त्रिभुवनांतील सर्व दुःखें भोगावीं लागतील व हजारों प्रकारचीं पातकें त्याचे ठिकाणीं वास करतील. म्हणून तुम्ही स्वधर्म केव्हांहि विसरूं नका. इन्द्रियांना विषयापासून परावृत्त करा, तुम्हांला सुख हवें असेल तर सर्वांनीं स्वधर्माची कांस धरून आपापले उचित कर्म करण्याचे बाबतींत नेहमीं तत्पर असावें [ ८१ ते ११८ ]. विहित मार्गानें मिळविलेली सर्व संपत्ति भोगसाधन न समजतां हवनद्रव्य आहे, असें समजून निष्कामबुद्धीनें स्वधर्मरूप यज्ञद्वारां ईश्वरांस अर्पण करावीं मग बाकी राहील तो प्रसाद संतोषपूर्वक सेवन करावा. ज्या अन्नापासून यज्ञसिद्धि होते, ईश्वर संतुष्ट होतो ते अन्न सामान्य नव्हे हो ! अखिल जगाला जीवनहेतु असणारें अन्न ब्रह्मरूप आहे, असें समज [ ११९ ते १३७ ]. जो उन्मत्त पुरुष उचित स्वधर्माचे आचरण करीत नाहीं त्याची सर्व कर्में निष्फल आहेत. म्हणून यथाविधि सर्वभावानें स्वधर्माचरण करावें. जें हा मनुष्यदेह प्राप्त होऊनहि उचित कर्म करण्याची खंती करतात तें मूर्ख अडाणी आहेत, असें समज. अशी प्राप्त कर्तव्यकर्माची आवश्यकता व अटळता आहे हे तात्पर्य [ १३८ ते १४५ ].

जो यथार्थ बोधसंपन्न पुरुष आत्मस्वरूपामध्यें निमग्न झालेला असतो तो कर्मबंधानें लिप्त होत नाहीं. तो आत्मबोधानें कृतकृत्य झाला असल्यामुळें त्यास कांहींहि कर्तव्य उरत नाहीं. तोच कर्मसंबंधापासून मुक्त असतो, जोपर्यंत ही स्थिति प्राप्त होत नाहीं तोपर्यंत या कर्माचरणरूपी साधनाचें अनुष्ठान केलेच पाहिजे [ १४६ ते १४९ ]. त्या उचित स्वधर्माचरणानें त्यांत बाधक असें मुळींच नाहीं; उलट मोक्षपदास जाता येतें. मागे जनकादिकहि कर्मत्याग न करतांच उचित कर्माचरणानेंच मोक्षपदास प्राप्त झालें. याशिवाय त्यापासून आणखीहि एक उपयोग आहे, तो म्हणजे त्या ज्ञानी पुरुषाच्या निरहंकार कर्माचरणामुळें अज्ञानी पुरुषांना कर्म कसें करावें, हें कळेल व त्यांसहि योग्य वळण लागेल. कारण, प्रायः अज्ञानी लोक, श्रेष्ठ लोकांचे आचरण पाहून त्यालाच 'धर्म' असें नांव ठेवून त्याप्रमाणें आपणहि आचरण करीत असतात. असें असल्यामुळेंच प्राप्त पुरुषांनी–साधुसतांनीं स्वतः कर्मत्याग करूं नये; उलट

स्वतःला आवश्यक म्हणून नसलें तरीहि अज्ञानी जीवांना वळण लागण्यासाठीं म्हणून कर्माचे आचरण विशेषेंकरून करावें लागते [ १५० ते १५९ ]. जनकादिकांचेंच उदाहरण काय, पण मी स्वतः पूर्णकाम, निरिच्छ, नित्यतृप्त असूनसुद्धां सर्व प्राणिमात्र माझ्या आचरणाप्रमाणें वागतात म्हणून सकाम पुरुषानें जसें धर्माचरण करावें तसाच मीहि कर्ममार्गाचें आचरण मुकाट्यानें करीत आहे. आम्ही पूर्णकाम होऊन आपल्या आत्मस्थितींतच राहिलो व कर्माचरण केलें नाहीं, तर प्रजेचा तरणोपाय तरी कसा होईल ? त्यांनी कर्मभ्रष्ट होऊं नये एवढ्याचकरितां समर्थ व ज्ञानसंपन्न पुरुषांनीं विशेषेंकरून कर्मांचा त्याग कधींहि करूं नये. अर्थात् थोरांनीं अज्ञान्यांचा बुद्धिभेद करूं नये तर स्वतः निरहंकारवृत्तीनें स्वधर्माचरण करून सर्व लोकांसहि सन्मार्गाला लावावें [ १६० ते १७१ ]. किंबहुना पूर्णकाम पुरुषांनीं अज्ञानी अनधिकारी जीवांस चुकूनहि, कौतुकानेंसुद्धां नैष्कर्म्यतेचा बोध प्रगटरूपानें सांगूं नये; याच्या उलट ज्याप्रमाणें बहुरूपी एखादे सोंग घेऊन त्या सोंगाची लोकसंपादणीसाठीं यथायोग्य बतावणी करतो, त्याप्रमाणें प्राप्तपुरुषांनी अज्ञानी लोकांना वळण लावण्यासाठीं स्वधर्माचरण करून दाखवावें [ १७२ ते १७६ ]. त्या स्वधर्माचरणांत कर्में हीं प्रकृतीच्या गुणधर्मानुसार देहेंद्रियादि उपाधीकडून होत असतात. त्यांचा आपल्याशीं यत्किंचितहि संबंध नाहीं. आपण अकर्ते आहोत, असा ब्रह्मनिष्ठ तत्त्ववेत्त्यांचा अंतरांत दृढनिश्चय असतो. त्यामुळें देहेंद्रियादि संघातद्वारां लोकसंग्रहासाठीं त्यांनीं कर्में केली तरीहि तो ज्ञानी देहतादात्म्यरहित असल्यामुळें देहेंद्रियादि उपाधीकडून होणाऱ्या कर्मांपासून त्यास बंधप्राप्ति होऊ शकत नाहीं आणि अज्ञानी जीव अविचारानें देहाशीं तादात्म्य ठेवून उपाधीकडून होणाऱ्या कर्मांचा 'मीच कर्ता आहे' असें समजतो. देहासक्तींतच कर्तव्यच्युतीचे मूळ बीज सांठविलेलें आहे. स्वभिन्न अशा उपाधीकडून होणाऱ्या कर्मांच्या कर्तृत्वाचें ओझें आपल्या शिरावर घेतलें तर मग त्या भारानें आपण दडपले जाणार नाहीं कां ? होय अवश्य दडपले जाऊं; म्हणजे अज्ञानी उपाधीशीं तादात्म्य ठेवून भ्रांत समजुतीनें बंधांत सांपडतो. म्हणजे गुणामुळें इंद्रियें आपापल्या व्यापारांत प्रवृत्त होतात; पण अज्ञानी प्रकृतीच्या गुणांना वश होऊन त्या कर्मांचा कर्तेपणा आपणाकडे बळेंच घेतो व बळेंच स्वतःस बद्ध समजतो. यांत आत्म्याच्या अकर्तृत्वाचा व असंसारित्वाचा विसर पडूं देऊं नये व प्रकृतीकडून कर्में घडतात अशी जाणीव असल्यावर ती कर्में बंधक होत नाहींत [ १७७ ते १८५ ].

**म्हणून अर्जुना ! प्रस्तुत तुला क्षत्रियांचे लढण्याचे उचित स्वकर्म प्राप्त झालें आहे. तें कर्म निरहंकार वृत्तीनें तूंहि कर; हातांत धनुष्यबाण घेऊन निःशंकपणें लढ; वीरवृत्तीस आतां जवळ कर या पृथ्वीस समाजकंटकांच्या पापी-अन्यायी लोकांच्या ओझ्यापासून सोडव. जगांत कीर्ति रूढ कर आणि आपल्या स्वधर्माचा मान वाढव. या प्रसंगीं या युद्धाशिवाय दुसरी गोष्टहि बोलूं नकोस. मी सांगितलेल्या हातवटीनें विश्वासपूर्वक जर तूंहि युद्ध केलेस तर तूंहि कर्माचरणापासून कर्मबंधास प्राप्त होणार नाहींस. जर प्रकृतिआधीन होऊन राहशील** त्यांत खचितच आत्मनाश होईल. म्हणून प्रकृतितंत्र होऊन जो माझ्या या मताचा अव्हेर, तिरस्कार करील तो अज्ञानरूपीं चिखलांत फसलेला आहे, असें निःसंशय समज. तसेंच परमार्थ विन्मुख असणाऱ्या मूर्खांस ह्या विचार रुचणार नाहीं. त्यांच्याशीं मुळींहि संभाषण करूं नये. प्रकृतितंत्र होऊन केल्या जाणाऱ्या विषयाचरणांत अचूक आत्मनाश आहे. म्हणून ज्ञानी असलें तरीसुद्धां त्यांनींहि ह्या इंद्रियांचे कौतुकानें देखील, चुकूनहि लाड पुरवूं नयेत. प्रकृतीच्या आधीन असणाऱ्या शरीराकरितां अनेक प्रकारचें भोग, अतिशय कष्ट करून मिळविलें व स्वच्छंद विषयाचरणांत घटकाभर सुख वाटलें तरीहि तें तेवढेंच. कारण, सरतेशेवटीं भौतिक शरीर पांच भूतांतच मिळून जाणार. त्यावेळीं आपण केलेलें श्रम सर्व व्यर्थ जातील म्हणून केवळ देहाचें पोषण करणें, हा उघड उघड घात असल्यामुळें त्यांत तूं लक्ष घालूं नकोस [ १८६ ते २०९ ]. जर इंद्रियांना आवडीनुरूप विषय देत गेलें, तर मनाला त्यापासून क्षणभर संतोष प्राप्त होईल खरें; पण त्या विषय सेवनाचा परिणाम पाहिला तर घातकच आहे. म्हणून तूं मनांमध्यें विषयवासनेस मुळींहि थारा देऊं नकोस व विषयांची मनांत आठवणहि आणूं नकोस; व

फक्त आपल्या उचित स्वधर्माचरणाविषयींचा जिव्हाळा मात्र चित्तांतून नाहींसा होऊं देऊं नकोस. रागद्वेषाच्या आधीन होणाऱ्या जीवांचें पतन होते. म्हणून प्रत्येक जाणत्या पुरुषानें वर्णाश्रमानुरूप आपापल्या वाट्यांस आलेली उचित कर्में ईश्वरार्पण बुद्धीनें करावीत, म्हणजे प्रकृतिगत धर्माधर्म संस्कारानुरूप कर्में होत असली तरीहि त्यास शास्त्रीय वळण देऊन निरहंकार बुद्धीनें व रागद्वेषांच्या आधीन न होतां ती कर्में करावीत व मनांत स्वधर्माचरणाविषयीं आदर कायम ठेवावा. असें पहा कीं, स्वधर्म आचरण करण्यास जरी कठीण असला व दुसऱ्याचा धर्म, आचरण करण्यास सोपा व चांगला दिसला तरीहि स्वधर्माचरण सोडून परधर्माचरण करूं नये. एवढेंच नव्हे तर आपल्या उचित धर्माचे आचरण करीत असतां जरी आपलें प्राण खर्ची पडलें तरीहि तें ऐहिक पारत्रिक हिताच्या दृष्टीनें विचार केल्यास उचितच होय असें समज [ २१० ते २२९ ].

यावर भगवंतास अर्जुनानें शंका विचारली ती अशी कीं :--देवा ! अज्ञानी लोकांस आपण सांगितलेला हिताहिताचा विचार माहीत नसल्यामुळें स्वधर्माचरण त्यांनीं न केले किंवा त्यांचेकडून उचित स्वधर्मानुष्ठान होत नसले तरी ते क्षणभर क्षम्य म्हणतां येईल; पण जें ज्ञानी आहेत, त्यांना उपर्युक्त स्वधर्म विचार कळत असूनहि त्यांच्याकडून स्वधर्मानुष्ठान न होतां मार्ग सोडून नको त्या भलत्याच चुकीच्या वाटेनें चालत असलेलें नजरेस येते. अर्थात् ज्यांना सर्व कळते व जे विषयसंग टाकण्याचा प्रयत्नहि करतात, असें असूनहि पुनः त्यांना बळजबरीनें कोणीतरी त्यांतच लोटत असल्याचे दिसून येते ते कां ? [ २३० ते २३८ ]. या शंकेचे समाधान सांगतांना भगवंत म्हणतात. ज्ञानी पुरुषांचेंहि ज्यांच्यापुढें कांहींएक चालत नाहीं, असें बलात्कार करणारें जर कोणी असतील, तर ते म्हणजे ' काम क्रोध ' हें होत. काम क्रोध हें ज्ञानरूप ठेव्यावरील जणुं सर्पच होत. विषयरूपी दरींतील हे वाघच होत; किंबहुना भजन मार्गांतील वाटमारे मांगच होत. या कामक्रोधांनी मायेकडून साधूंचे समुदाय भ्रष्ट करविले व विवेक, वैराग्य, संतोष, धैर्य आणि सुख इत्यादि दैवीसंपत्तीचा पूर्णतया नाश केला. हे काम क्रोध चित्तांत जीवात्म्याच्या अत्यंत समीप असतात. त्यामुळें त्यास निवृत्त करण्याचा प्रयत्न केला तरीहि हे आटोपत नाहींत. म्हणूनच जाणत्यांनाहि कळतें; पण वळत नाहीं. अरे ! बिचाऱ्या अज्ञानी सामान्य जनांची काय कथा ? पण ज्ञान्यांसहि प्रतिज्ञापूर्वक ठार करतात इतके हें कामक्रोधादिक कोणालाहि आटोक्यांत आणण्याजोगे नाहींत [ २४९ ते २५९ ].

**ज्ञान हें स्वभावतः अत्यंत निर्लेप आहे, शुद्ध आहे; तरीपण तें या कामक्रोधादिकांकडून आच्छादिलेलें असतें. म्हणून तें परमकल्याणकारक ज्ञान प्राप्त होण्यास कठीण होऊन बसलें आहे; किंबहुना यांच्या निवृत्तीसाठीं जें जें उपाय म्हणून योजावेत तें तें या कामक्रोधासच सहाय्यक ठरतात. असें हें कामक्रोध जिंकण्यास अवघड म्हटलें; तरीपण अशक्य नाहीं. कारण, त्यास जिंकण्याचा एकमेव उत्तम उपाय आहे, तो सांगतों. जर तो तुझ्याकडून करतां येत असेल तर पहा [ २६० ते २६७ ].** तो उपाय म्हणजे या कामक्रोधाचें आश्रयस्थान असणारी जीं इंद्रीयें कीं, ज्यांच्यापासून कर्म प्रवृत्ति होते, त्या इंद्रियांचेच अगोदर परिपूर्णतया दमन करणें, हा होय. मग मात्र मनाची धांव थांबेल व या कामक्रोधांचा आश्रय नाहींसा झाल्यामुळें बुद्धीचीहि सोडवणूक होईल. हें कामक्रोध अंतःकरणांतून परिपूर्णतया निवृत्त झालें कीं, जीवास ब्रह्मस्थितिरूप स्वराज्य मिळून तो नित्यनिरतिशय अशा आत्मसुखांत चिरप्रतिष्ठित होतो, असें समज. अशी श्रीगुरुशिष्यांच्या संवादांतील विचारानें प्राप्त होणारी जी ब्रह्मात्मैक्य स्थिति, तिच्या ठिकाणीं स्थिर होऊन कधींहि व्युत्थानास पावूं नकोस [ २६८ ते २७२ ]. आतां पुढील अध्यायांत भगवान् श्रीकृष्ण परमात्मा आणखी एक प्राचीन कथा सांगणार आहेत; तिचा अनुवाद शांतादि रसभरित करून तुम्हा श्रोत्यासहि श्रवणसुखाचा सुकाळ करीन तो ऐका, असें श्रीनिवृत्तीनाथांचे शिष्य श्रीज्ञानदेव म्हणतात [ २७३ तो २७६ ].

[ या संपूर्ण तिसऱ्या अध्यायांतील नकाशे क्रमांक २ व ३ पहावेत ]



# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय चवथा

आजि श्रवणेंद्रियां पाहेलें । जें येणें गीतानिधान देखिलें । आतां स्वप्नचि हें तुकलें । साचासरिसें ॥ १ ॥ आधींचि विवेकाची गोठी । वरी प्रतिपादी श्रीकृष्ण जगजेठी । आणि भक्तराजु किरिटी । परिसत असे ॥ २ ॥ जैसा पंचमालापु सुगंधु । कीं परिमळु आणि सुस्वादु । तैसा भला जाहला विनोदु । कथेचा इये ॥ ३ ॥ कैसी आगळिक दैवाची । जे गंगा जोडली अमृताची । हो कां जपतपें श्रोतयांचीं । फळा आलीं ॥ ४ ॥ आतां इंद्रियजात आघवें । तिहीं श्रवणाचें घर रिघावें । मग संवादसुख भोगावें । गीताख्य हें ॥ ५ ॥ हा अतिसो अतिप्रसंगें । सांडूनि कथाचि ते सांगें । जे कृष्णार्जुन दोघे । बोलत होते ॥ ६ ॥ ते वेळीं संजयो रायातें म्हणे । अर्जुनु अधिष्ठिला दैवगुणें । जे अतिप्रीति श्रीनारायणें । बोलतु असे ॥ ७ ॥ जें न संगेचि पितया वासुदेवासी । जें न संगेचि माते देवकीसी । जें न संगेचि बंधु बळिभद्रासी । तें गुह्य अर्जुनेंशीं बोलत ॥ ८ ॥ देवी लक्ष्मीयेवढी जवळिक । परी तेही न देखे या प्रेमाचें सुख । आजि कृष्णस्नेहाचें बिक । यातेंचि आथी ॥ ९ ॥ सनकादिकांचिया आशा । वाढीनल्या होतिया कीर बहुवसा । परी त्याही येणें मानें यशा । येतीचिना ॥ १० ॥ या जगदीश्वराचें प्रेम । एथ दिसतसें निरुपम । कैसें पार्थें येणें सर्वोत्तम । पुण्य केलें ॥ ११ ॥ हो कां जयाचिया प्रीती । अमूर्त हा आला व्यक्ती । मज एकवंकी याची स्थिती । आवडतु असे ॥ १२ ॥ एऱ्हवीं हा योगियां नाडळे । वेदार्थासी नाकळे । जेथ ध्यानाचेही डोळे । पावतीना ॥ १३ ॥ तो हा निजस्वरूप । अनादि निष्कंप । परी कवणें मानें सकृप । जाहला आहे ॥ १४ ॥ हा त्रैलोक्यपटाची घडी । आकारची पैलथडी । कैसा याचिये आवडी । आवरला असे ॥ १५ ॥

श्रीभगवानुवाच :—

इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् । विवस्वान् मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ १ ॥

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय चवथा

[ गीताशास्त्राच्या प्रथम तीन अध्यायांचें व्याख्यान केल्या-नंतर आपल्या श्रोत्रेंद्रियांचें भाग्य वर्णन करण्याचे मिषानें मुमुक्षूंस ग्रंथामध्यें रुची उत्पन्न होण्याकरितां व अवतरण देण्यासाठीं महाराज म्हणतात, काय सांगावें ! ]

आज कानांना उजाडलें म्हणजे त्यांचा भाग्योदय झाला; कारण, यथार्थ गीताश्रवण होणें बहुतेक स्वप्नवत् आहे. असा गीतेसारखा ठेवा आज कानांनींच पाहिला. ते कसे झाले म्हणाल तर जागृत झाल्यावर स्वप्नांतील गोष्ट खोटीच असते; पण तीहि आज खरी व्हावी असे झाले आहे ! १. आधींच आत्मानात्मविचाराची गोष्ट, त्यांत जगज्येष्ठ भगवान् श्रीकृष्ण तिचे प्रतिपादन करणारे आहेत आणि भक्तशिरोमणि अर्जुनासारखा श्रोता ऐकत आहे २. जसा पंचमस्वर आणि त्यांतच उत्तम सुवास व माधुर्य या तिहींचा अपूर्व ऐक्यभाव झाला असतां आनंद होतो. तसाच प्रकार या गीतारूपी कथामृताचा लाभ होऊन झाला आहे; म्हणजे यांत सर्व इंद्रियांना आनंद होईल, अशी गोडी आहे ३. आज श्रोत्यांच्या दैवाची थोरवी काय वर्णावी ! कीं जिच्यामुळें श्रोत्यांचीं पूर्वजन्मींची जपतपें या गीता श्रवणाच्या रूपानें फळास आलीं किंवा गीता ही अमृतरूप गंगाच त्यांना प्राप्त झाली म्हणावयाची ४. म्हणून. सर्वच्या सर्व इंद्रियांनीं आपापलीं कामें सोडून आतां श्रवणेंद्रियांचे ठिकाणीं वास करावा आणि मग गीतानामक या श्रीकृष्णार्जुनसंवादाचें सुख उपभोगावें ५. तेव्हां संतमंडळी श्रीज्ञानदेवांस म्हणाली कीं, " आतां तूं ही अप्रासंगिक पाल्हाळ पुरे कर व श्रीकृष्ण व अर्जुन हे दोघे काय बोलत होते ती कथाच आम्हांला सांग. ६. श्रीज्ञानदेव म्हणतात, त्यावेळेस संजय धृतराष्ट्रास म्हणाला:-दैवीसंपत्तीनेंच अर्जुनाचा आश्रय केला. कारण साक्षात् श्रीकृष्णच त्याच्याशीं अतिप्रेमाने बोलत आहेत ७. [ अतिप्रेमाने कशावरून म्हणशील तर ] जें गुह्य श्रीकृष्णांनीं आपला पिता वसुदेव, याला सांगितलेंच नाहीं, तसेंच जें गुह्यज्ञान माता देवकी, हिला सांगितलेंच नाहीं व जें बंधु बलराम ह्यांसहि सांगितलेंच नाहीं, तें गुह्य आज अर्जुनास सांगत आहे ८. देवी लक्ष्मी नेहमीं इतकी सन्निध असणारी खरी; पण तिलाहि त्या प्रेमसुखाचा अनुभव कधीं लाभला नाहीं, त्या कृष्णाच्या प्रेमाचें सर्व फल या अर्जुनासच मिळत आहे. काय चमत्कार सांगावा ! ९. सनकादिकांच्याहि त्या प्रेमसुखाविषयींच्या आशा खरोखर बहुत दिवसांपासून अतिशय बळावल्या होत्या; पण त्याहि इतक्या यशास आल्या नाहींत. त्यांनाहि इतक्या योग्यतेचें तें प्रेमसुख प्राप्त झालें नाहीं १०. अर्जुनाचे ठिकाणीं या जगदीश्वराचें येथें अगदीं अनुपमेय प्रेम दृष्टीस पडतें, यावरून या अर्जुनानें किती सर्वोत्कृष्ट पुण्य केलें असावें बरें ! ११. पहा कीं, ज्या अर्जुनाच्या प्रीतीकरितां [ हा देव तत्त्वतः ] निराकार असूनहि साकार झाला, ह्यावरून मला त्यांची एकरूपता चांगली समजून येते. कारण [ मला तर असें वाटतें कीं, ह्या दोघांची स्थिति [ देह ] जरी भिन्न आहे, तरी दोघे एकरूपच आहेत ] १२. नाहींतर-एऱ्हवीं हा भगवान् योग्यांना आढळत नाहीं, वेदार्थालाहि ज्याचें आकलन होत नाहीं व ज्याच्यापर्यंत ध्यानाचीहि दृष्टि पोहोंचत नाहीं १३. असा जो आत्मस्वरूप, अनादि, अविक्रिय अचल भगवान् पण तो अर्जुनावर किती कृपावंत झाला आहे पहा ! १४. हा कृष्णच त्रैलोक्यरूप वस्त्राची घडी आहे. आणि वास्तविक हा आकाराच्या पलीकडला म्हणजे निराकार असून आज हा अर्जुनाच्या मोठ्या प्रेमानें आटोक्यांत येऊन त्याच्या कसा स्वाधीन झाला आहे नकळे ! १५.

**अन्वयार्थ—अहम्**-मी-**इमम् अव्ययम् योगम्**-हा अक्षय फल देणारा ज्ञानयोग-**विवस्वते**-आदित्याला-**प्रोक्तवान्**-सांगता झालों.-**विवस्वान्**-आदित्य-**मनवे**-मनूला-**प्राह**-सांगता झाला- **मनुः**-मनु-**इक्ष्वाकवे**-इक्ष्वाकु नांवाच्या आदिराजाला-आपल्या पुत्राला-**अब्रवीत्**-सांगता झाला १.

१ कानाला. २ उजाडले. ३ गीतारूप ठेवा. ४ आभास. ५ भासले. ६ खरें पटल्याबरोबर. ७ आत्मानात्म विचाराची.

मग देव म्हणे अगा पंडुसुता । हाचि योगु आम्हीं विवस्वता । कथिला परी ते वार्ता । बहुतां दिवसांची ॥१६॥ मग तेणें विवस्वतें रवी । हे योगस्थिति आघवी । निरूपिली बरवी । मनूप्रती ॥ १७ ॥ मनूनें आपण अनुष्ठिली । मग इक्ष्वाकुवा उपदेशिली । ऐसी परंपरा विस्तारिली । आद्य हे गा ॥ १८ ॥

एवं परंपरा प्राप्तमिमं राजर्षयो विदुः । स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥

मग आणिकही या योगातें । राजर्षि जाहले जाणते । परी तेथोनि आतां सांप्रतें । नेणिजे कोण्ही ॥ १९ ॥ जे प्राणियां कामीं भरु । देहाचिवरी आदरु । म्हणौनि पडिला विसरु । आत्मबोधाचा ॥ २० ॥ अव्हांटलिया आस्थाबुद्धि । विषयसुखची परमावधि । जीवु तैसा उपाधि । आवडे लोकां ॥ २१ ॥ एऱ्हवीं तरी खंवणेयांच्या गांवीं । पाटाउवें काय करावीं । सांगें जात्यंधा रवी । काय आथी ? ॥२२॥ कां बहिरयांच्या आस्थानीं । कवण गीतातें मानी । कीं कोल्हेया चांदणीं । आवडी उपजे ? ॥२३॥ पैं चंद्रोदया आरौतें । जयांचे डोळे फुटती असते । ते काउळे केवीं चंद्रातें । वोळखती ? ॥२४॥ तैसी वैराग्याची शिंव न देखती । जे विवेकाची भाष नेणती ? । ते मूर्ख केवीं पावती । मज ईश्वरातें ? ॥ २५ ॥ कैसा नेणों मोहो वाढीनला । तेणें बहुतेक काळु व्यर्थ गेला । म्हणौनि योगु हा लोपला । लोकीं इये ॥ २६ ॥

स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः । भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥

तोचि हा आजि आतां । तुजप्रती कुंतीसुता । सांगितला आम्हीं तत्वतां । भ्रांति न करीं ॥ २७ ॥ हें जीवींचें निज गुज । परी केवीं राखों तुज । जे पोढियेसि तूं मज । म्हणौनियां ॥ २८ ॥ तूं प्रेमाचा पुतळा । भक्तीचा जिव्हाळा । मैत्रियेचि चित्कळा । धनुर्धरा ॥ २९ ॥ तूं अनुसंगाचा ठावो । आतां तुज काय वंचूं जावों ? । जऱ्ही संग्रामारूढ आहों । जाहलों आम्ही ॥ ३० ॥ तरी नांवेक हें सहावें । गाजावाज्यही न धरावें । परी तुझें अज्ञानत्व हरावें । लागे आधीं ॥ ३१ ॥

अर्जुन उवाच :-

अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः । कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥

तंव अर्जुन म्हणे श्रीहरी । माय आपुलेयाचा स्नेहो करी । एथ विस्मयो काय अवधारीं । कृपानिधी ॥ ३२ ॥ तूं संसारश्रांतांची साउली । अनाथ जीवांची माउली । आमुतें कीर प्रसवली । तुझीच कृपा ॥३३॥ देवा पांगुळ एकादें विजे[२९] ।

मग श्रीकृष्ण अर्जुनास म्हणालेः–कर्मयोग ज्याचा उपाय आहे असा हा ज्ञानयोग आम्हीं पूर्वीं विवस्वानाला–सूर्याला सांगितला; परंतु त्या गोष्टीला पुष्कळ दिवस झाले १६. मग त्या विवस्वान सूर्यानें हा सर्व योग वैवस्वत मनूला उत्तम रीतीनें सांगितला १७. आणि मनूनें त्याचें स्वतः आचरण केलें आणि मग इक्ष्वाकु-नामक आपल्या पुत्रास त्याचा उपदेश केला. अशी ही परंपरा मुळापासून चालत आली आहे १८.

**अन्वयार्थ**—**एवम्**–याप्रमाणें–**परंपराप्राप्तम्**–क्षत्रियांच्या परंपरेनें प्राप्त झालेल्या–**इमम्**–या योगास–**राजर्षयः**–राजर्षी–**विदुः**-जाणते झाले. त्यांनीं या योगाचे अनुष्ठान केलें–**हे परंतप**–हे अर्जुना!–**महता कालेन**–पण मध्यें पुष्कळ काळ निघून गेल्यामुळें–**सः योगः**–तो योग–**इह**–या वेळीं–**नष्टः**-संप्रदायरहित झाला आहे २.

पुढें आणखीहि कांहीं राजर्षि ह्या निष्कामकर्म योगास जाणणारे होऊन गेले; परंतु तेव्हापासून आतां अलिकडे तो फारसा कोणी जाणत नाहीं १९. कारण, प्राणिमात्राच्या आवडीचा भर केवळ विषयसेवनांविषयीं असून देहावरच विशेष प्रेम असल्यामुळें त्यांना यथार्थ आत्मबोधाचा विसर पडला २०. [ आत्मबोधविषयक आस्था म्ह. ] आस्तिक्यबुद्धि आडमार्गानें गेल्यामुळें विषयसुख हेंच आत्यंतिक सुख असून त्यांतच इतिकर्तव्यता आहे असें लोकांना वाटून, ते जीवाइतकेंच प्रेम देहादिक व विषयरूप उपाधीवर करूं लागले! २१. असें पहा, नागड्या लोकांच्या गांवांत उंची वस्त्रें काय करावयाचीं? किंवा जन्मांधाला सूर्याचा काय उपयोग? सांग बरें! २२. किंवा बहिऱ्याच्या सभेंत गाण्याला कोण मान देईल? अथवा कोल्ह्याला चांदण्याविषयींची आवड-प्रीति कधीं उत्पन्न होईल काय! २३. तसेंच, चंद्रोदयापूर्वींच ज्यांचे असलेले डोळे फुटतात-मिटतात–ते कावळे चंद्रास कसें बरें ओळखतील! २४. त्याचप्रमाणें ज्यांनीं वैराग्यरूपी जीवाची शीवसुद्धां कधीं पाहिली नाहीं आणि ज्यांना विवेक म्हणजे काय याचें नांव देखील माहीत नाहीं, ते मूर्ख मज परमेश्वर स्वरूपास कसें बरें प्राप्त होतील? २५. हा मोह इतका कसा वाढला कोण जाणे; पण त्यामुळें बहुतेक काळ व्यर्थ गेला; आणि म्हणून ह्या लोकीं हा बुद्धियोग लोपला म्हणजे जवळ जवळ बुडाल्यासारखाच झाला आहे २६.

**अन्वयार्थ**—**सः एव अयम्**–तोच हा–**पुरातनः**–प्राचीन–**योगः**–योग–**मया**–मी–**ते**–तुला–**अद्य**–आज–**प्रोक्तः**–सांगितला, [ ते कां? तर ]–तूं–**मे**–माझा–**भक्तः**-भक्त-**असि**–आहेस–**च**–व–**सखा**–सखा [ **असि**-आहेस ]–**इति**–म्हणून सांगितला–**हि**–कारण–**एतत्**–हें–**उत्तमम्**–उत्तम–**रहस्यम्**–ज्ञान आहे ३.

हे कुंतीसुता! तोच हा योग तुला आज यथार्थपणें सांगितला आहे. यांत तूं कांहींसुद्धां शंका धरूं नकोस २७. हा योग म्हणजे माझा जीव कीं प्राण इतकी गुह्य गोष्ट आहे; परंतु तुजपासून तो लपवून कसा ठेवावा? कारण, तूं माझा अगदीं आवडता भक्त आहेस म्हणून २८. धनुर्धरा, तूं केवळ प्रेमाची प्रत्यक्ष मूर्ति असून भक्तीचा जिव्हाळा, जिवलग मित्रत्वाची तर केवळ जीवनकलाच आहेस २९. आणि तूं माझ्या अगदीं निकट संबंधाचा असून विश्वासाचें पात्र आहेस. तेव्हां यावेळीं तुझ्याशीं मी वंचना, प्रतारणा कशी करावी? म्हणून आम्ही जरी युद्धास सज्ज झालों आहों ३०. तरी युद्धाची गडबड चालली असतांहि ती क्षणभर एका बाजूस ठेवून तिचा विचार मनांत न आणतां–त्यास न जुमानतां पहिल्यानदां तुझें अज्ञान आम्हांस दूर केलें पाहिजे, असा प्रसंग आतां प्राप्त झाला आहे ३१.

**अन्वयार्थ**—**भवतः**–आपला–**जन्म**–जन्म–**अपरम्**–अलीकडचा–कांहीं वर्षापूर्वीं झालेला–**विवस्वतः जन्म**–सूर्याचा जन्म–**परम्**–सृष्टीच्या आरंभीं फार प्राचीनकाळीं झालेला. तेव्हां-**त्वम्**–तूं–**आदौ**-आरंभीं–**प्रोक्तवान्**–हा योग सूर्याला सांगितलास–**इति एतत्**–अशा प्रकारचें हें सांगणें-मी-**कथम्**–कसें-**विजानीयाम्**-खरें मानावें? ४.

त्यावेळेस अर्जुन म्हणतोः–"हे कृपानिधे श्रीहरि! पहा बरें! आई आपल्या लेंकरावर प्रेम करते त्यांत आश्चर्य तें कोणतें? ३२. तूं संसारतापानें पोळलेल्या, थकलेल्या लोकांचीं सावली आहेस, दीनजीवांची माउली आहेस; आणि खरोखर आम्हांला तर केवळ तुझ्या कृपेनेच जन्मास घातलें आहे ३३. देवा! आईने एखाद्या पांगळ्या मुलास जन्म दिला तर त्याचा जन्मापासूनच तिला त्रास सोसावा

१ सर्व. २ चौदा मनूंतील सातवा वैवस्वत मनू. ३ आचरण केले. ४ इक्ष्वाकु नामक पुत्राला. ५ पुरातन. ६ विषयसेवनाविषयीं आवड. ७ प्रीति. ८ आडमार्गानें गेल्यास. ९ सार्थक १० दिगंबराच्या. ११ उंची वस्त्रें. १२ जन्मांधाला. १३ उपयोगी आहे. १४ समेत. १५ अगोदर. १६ जिवलग आवडता. १७ जीव. १८ सख्याचा, विश्वासाचा. १९ युद्धाला सज्ज. २० क्षणभर. २१ गडबड. २२ बालकाचा. २३ संसारांत भ्रमलेल्यांची. २४ फळा आली. २५ व्यावे.

तरी जन्मौनि जोजारु साहिजे । हें बोलों काय तुझें । तुजाचि पुढां ॥ ३४ ॥ आतां पुसेन जें मी कांहीं । तेथ निकें चित्त देईं । तेवींचि देवें कोपावें ना कांहीं । बोला एका ॥ ३५ ॥ तरी मागील जे वार्ता । तुवां सांगितली होती अनंता । ते नावेक मज चित्ता । मानेचिना ॥ ३६ ॥ जे तो विवस्वतु म्हणजे कायी । ऐसें हें वडिलां ठाउवें नाहीं । तरी तुवांचि केवीं पाहीं । उपदेशिला ? ॥ ३७ ॥ तो तरी आइकिजे बहुतां काळांचा । आणि तूं तंव श्रीकृष्ण सांपेचा । म्हणौनि गा इये मातुचा । विसंवादु ॥ ३८ ॥ तेवींचि देवा चरित्र तुझें । आपण कांहींचि नेणिजे । हें लटिकें केवीं म्हणिजे । एकिहेळां ? ॥ ३९ ॥ परि हेचि मातु आघवी । मी परियेसें ऐशी सांगावी । जे तुवांचि रवी केवीं । पाही उपदेशु केला ॥ ४० ॥

श्रीभगवानुवाच :—

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन । तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥**

तंव श्रीकृष्ण म्हणे पंडुसुता । तो विस्वंतु जैं होता । तैं आम्हीं नसों ऐसी चित्ता । भ्रांति जरी तुज ॥ ४१ ॥ तरी तूं गा हें नेणसी । पैं जन्में आम्हां तुम्हासी । बहुतें गेलीं परी तियें न स्मरसी । आपुलीं तूं ॥ ४२ ॥ मी जेणें जेणें अवसरें । जें जें होऊनि अवतरें । तें समस्तही स्मरें । धनुर्धरा ॥ ४३ ॥

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् । प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥**

म्हणौनि हें आघवें । मागील मज आठवें । मी अजुंही परि संभवें । प्रकृतियोगें ॥४४॥ माझें अव्ययत्व तरी नें नसे । परी होणें जाणें एक दिसे । तें प्रतिबिंबें मायावशें । माझ्याचि ठायीं ॥ ४५ ॥ माझी स्वतंत्रता तरी न मोडे । परी कर्माधीनु ऐसा आवडे । तेही भ्रांतिबुद्धि तरी घडे । एऱ्हवीं नाहीं ॥ ४६ ॥ कीं एकचि दिसे दुसरें । तें दर्पणाचेनि आधारें । एऱ्हवीं काय वस्तुविचारें । दुजें आहे ? ॥ ४७ ॥ तैसा अमूर्तचि मी किरीटी । परी प्रकृति जैं अधिष्ठीं । तैं साकारपणें नट नटीं । कार्यालागीं ॥ ४८ ॥

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । अभ्युत्थानमधर्मस्य तदाऽऽत्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥**

जें धर्मजात आघवें । युगायुगीं म्यां रक्षावें । ऐसा ओघु हा स्वभावें । आद्यु असे ॥ ४९ ॥ म्हणौनि अजत्व परतें ठेवीं । मी अव्यक्तपणही नाठवीं । जे वेळीं धर्मातें अभिभवी । अधर्मु हा ॥ ५० ॥

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् । धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥**

लागतो, हें सर्व तुम्हीं जाणतां; तर आम्हीं तुमच्याचपुढें तुमचें महत्त्व काय बोलावें ? ३४. आतां मी जें कांहीं विचारणार आहे त्याकडे चांगलें लक्ष द्यावें. देवा एक विचारण्याचा–त्या गोष्टीचा राग मनांत आणूं नये ३५. हें अनंता ! तुम्हीं जी मागील पूर्वीची गोष्ट म्हणून मला सांगितली, क्षणभर माझ्या मनाला ती रुचतच नाहीं ३६. कारण असें पहा ! सूर्य म्हणजे कोण हें आमच्या वाडवडिलांनासुद्धां माहीत नाहीं.इतका तो प्राचीन त्याला आपण कधीं व कसा उपदेश केला ? ३७. कारण सूर्य तर फार प्राचीनतम–जुनाट, असें ऐकतों आणि आपण श्रीकृष्णा, तर आजच्या काळांतले, हल्लींचे ! म्हणून या गोष्टींत आम्हांला विरोध-विसंगतपणा दिसतो ३८. तशांतून देवा, तुमचें चरित्र काय सांगावें, अगाध आहे ! आम्हांस तर कांहीं कळत नाहीं. तेव्हां आपण म्हणतां तें खोटें आहे, असें तरी आम्हीं एकदम कसें म्हणावें ३९. तेव्हां मी सूर्याला उपदेश केला, हें आपण म्हणतां ती सर्वच्या सर्व हकीगत मला समजेल व पटेल अशा रीतीनें स्पष्ट सांगा ४०.

**अन्वयार्थ**—हे **अर्जुन**–हे अर्जुना !–**मे**–**च तव**–माझे व तुझे–**बहूनि जन्मानि**–अनेक जन्म–**व्यतीतानि**–होऊन गेले आहेत.–**अहम्**–मी–**तानि सर्वाणि**–या सर्व जन्मांस –**वेद**–जाणतो.–मला त्यांचें स्मरण आहे.–**हे परंतप**–हे अर्जुना !–**त्वम्**–तूं **न वेत्थ**–जाणत नाहींस, तुला त्यांचें स्मरण नाहीं ५.

तेव्हां श्रीकृष्ण म्हणालेः–अर्जुना ! ज्या वेळेस तो सूर्य होता, त्या वेळेस आम्हीं नव्हतों, अशी जरी तुझ्या चित्ताला शंका आली असेल ४१. तर अरे ! तुला हें माहीत नाहीं, कीं कल्पारंभापासून आजवर तुझे व माझे पुष्कळ जन्म होऊन गेले आहेत. परंतु तुझ्या जन्मांची तुला आठवण नाहीं ४२. अर्जुना ! मी ज्या ज्या वेळेस जे जे रूप धारण करून अवतार घेतले, त्या त्या सर्व अवतारांचें मला स्मरण आहे ४३.

**अन्वयार्थ**—[ **अहं** ]–मी–अन्तर्यामी – साक्षी – **अजः अपि सन्**–जन्मरहित असूनहि–**अव्ययात्मा** [ **अपि सन्** ] –माझें ज्ञानशक्तिस्वरूप कधींहि क्षीण न होणारें, असें असूनहि–**भूतानाम् ईश्वरः अपि सन्**–आब्रह्मस्तंबपर्यंत भूतांचा ईश्वर नियमन करणारा असूनहि–**स्वां- प्रकृतिम्** –आपल्या त्रिगुणात्मक मायाख्य प्रकृतीला–**अधिष्ठाय**–वश करून घेऊन–**आत्ममायया**–आपल्या अचिन्त्य सामर्थ्यानें –**संभवामि**–जन्म घेतों. मी जणुं काय देहवान् असल्यासारखा होतों ६.

म्हणून मला मागील या सर्वच्या सर्व गोष्टी आठवतात. वास्तविक मी जन्मरहित आहे तरीपण मायेच्या योगानें अवतार घेतों ४४ माझें अविनाशीत्व तर नाहींसें होत नाहीं; पण अवतार घेणें व तो संपविणें हें जें एक दिसतें, तें मायेच्या योगानें माझ्या आश्रयावरच भासतें ४५. माझी स्वतंत्रता तर मुळींच भंग पावत नाहीं; पण मी कर्माधीन आहे, असें जें [ लोकांस ] वाटतें, तें भ्रांतबुद्धि असेल तरच वाटतें; बाकी खरोखर पाहतां तसें कांहीं नाहीं ४६. किंवा एकाच वस्तूची दोन ठिकाणीं दोन रूपें दिसतात, पण तीं केवळ एका आरशाच्या उपाधीमुळें दिसतात. वस्तुतः विचार केला तर ती दोन का आहेत ? ४७. त्याचप्रमाणें, अर्जुना ! मी तर निराकारच आहे, पण जेव्हां मायेचा स्वीकार करतो तेव्हां भक्तानुग्रहादि विशेष कार्यासाठीं नटाप्रमाणें बाह्यतः मी सगुण साकार रूप धारण करून नटतो ४८.

**अन्वयार्थ**—**हे भारत**–हे अर्जुना !–**यदा यदा हि**–जेव्हां जेव्हां खरोखर–**धर्मस्य**–धर्माची–**ग्लानिः**–हानि–**भवति**–होते–[ **च**–व ] **अधर्मस्य**–अधर्माचा–**अभ्युत्थानम्**–उद्भव होतो–तदा–त्या वेळीं–**अहम्**–मी कूटस्थ आत्मा–**आत्मानम्**–स्वतःला–**सृजामि**–उत्पन्न करितों ७.

कारण, जेवढे धर्म म्हणून आहेत तेवढ्या सर्वांचें मी प्रत्येक युगायुगांचे ठायीं रक्षण करावें; असा हा क्रम स्वभावतः अगदीं मुळापासून चालत आलेला आहे ४९. म्हणून ज्या ज्या वेळीं अधर्म हा धर्माचा ऱ्हास, पराभव करतो, त्या त्या वेळीं मी आपला जन्मरहितपणा बाजूला ठेवतों व आपल्या निराकारपणाची आठवणहि मनांत आणित नाहीं ५०.

**अन्वयार्थ**—**साधूनाम्**–सन्मार्गस्थांचें–**परित्राणाय**–सर्व प्रकारें रक्षण करण्याकरितां–**च दुष्कृताम्**–व पाप्यांचा –**विनाशाय**–विनाश करण्याकरितां आणि–**धर्मसंस्थापनार्थाय**–धर्माची उत्तम प्रकारें स्थापना करण्याकरितां–मी–**युगे युगे**–दर युगांत–**संभवामि**–उत्पन्न होतों ८.

१ सांप्रतचा. २ गोष्टींचा. ३ विरोध. ४ एकदम. ५ सूर्य. ६ वेळीं. ७ जन्मरहित. ८ अवतार घेतो. ९ आत्ममाया अंगीकारून, प्रकृति धारण करून. १० अविनाशित्व. ११ बिघडत नाहीं. १२ दिसतें. १३ वाटतो. १४ अज्ञान. १५ आरशाच्या. १६ खरोखर पाहिले तर. १७ धारण करितों. १८ प्रत्येक युगांत. १९ क्रम. २० जन्मरहितपणा, २१ निराकारपण. २२ दडपून टाकितो, ऱ्हास करितो.

ते वेळीं आपुल्याचेनि कैवारें । मी साकारु होऊनि अवतरें । मग अज्ञानाचें आंधारें । गिळूनि घालीं ॥५१॥ अधर्माची अवधी तोडीं । दोषांचीं लिहिलीं फाडीं । सज्जनांकरवीं गुढी । सुखाची उभवीं ॥५२॥ दैत्यांचीं कुळें नाशीं । साधूंचा मानु गिंवशीं । धर्मासीं नीतीशीं । शेंस भरीं ॥ ५३ ॥ मी अविवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीप उजळीं । तैं योगियां पाहे दिवाळी । निरंतर ॥ ५४ ॥ स्वसुखें विश्व कोंदे । धर्मुचि जगीं नांदे । भक्तां निघती दोंदें । सात्त्विकांचीं ॥ ५५ ॥ तैं पापांचा अचळु फिटे । पुण्याची पहांट फुटे । जैं मूर्ति माझी प्रगटे । पंडुकुमरा ॥ ५६ ॥ ऐसेया काजालागीं । अवतरें मी युगीं युगीं । परि हेंचि वोळखे जो जगीं । तो विवेकिया ॥ ५७ ॥

जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः । त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९ ॥

माझें अजत्वें जन्मणें । अक्रियताचि कर्म करणें । हें अविकार जो जाणे । तो परममुक्त ॥ ५८ ॥ तो चालिला संगें न चळे । देहींचा देहा नाकळे । मग पंचत्वीं तंव मिळे । माझ्याचि रूपीं ॥ ५९ ॥

वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः । बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥

एऱ्हवीं परापर न शोचिती । जे कामनाशून्य होती । वाटा कें वेळीं न वचती । क्रोधाचिया ॥ ६० ॥ सदा मियांचि आथिले । माझिया सेवा जियाले । कीं आत्मबोधें तोषले । वीतराग जे ॥ ६१ ॥ जे तपोतेजाचिया राशी । कीं एकायतन ज्ञानासी । जे पवित्रता तीर्थांसी । तीर्थरूप ॥ ६२ ॥ ते मद्भावा सहजें आले । मी तेचि ते होऊनि ठेले । जे मज तयां उरले । पदर नाहीं ॥ ६३ ॥ सांगें पितळेची गंधिकाळिक । जैं फिटली होय निःशेख । तैं सुवर्ण काई आणिक । जोडूं जाइजे ? ॥ ६४ ॥ तैसे यमनियमीं कडसले । जे तपोज्ञानें चोखाळले । मी तेचि ते जाहले । एथ संशयो कायसा ? ॥ ६५ ॥

ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् । मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥

एऱ्हवीं तरी पाहीं । जे जैसे माझ्या ठायीं । भजती तयां मीही । तैसाचि भजें ॥ ६६ ॥ देखें मनुष्यजात सकळ । हें स्वभावता भजनशीळ । जाहलें असे केवळ । माझ्याचि ठायीं ॥ ६७ ॥ परी ज्ञानेंवीण नाशिले । जे बुद्धिभेदासी आले । तेणेंचि त्या कल्पिलें । अनेकत्व ॥ ६८ ॥ म्हणौनि अभेदीं भेदु देखती ।

त्या वेळीं भक्तांच्या कैवारासाठीं मी देह धारण करून अवतार घेतों, आणि मग अज्ञानरूप अंधकारास गिळून टाकितों ५१. अधर्माची सीमा–मर्यादा तोडितों, दोषांनीं लिहून ठेवलेल्या सनदा फाडून टाकितों. आणि जे साधु आहेत त्यांजकडून सुखाची ध्वजा उभारवितों ५२. दैत्यांच्या––[ अधर्मीयांच्या ] कुळांचा नाश करितों व साधूंचा योग्य मान [ पुनः प्रस्थापित करून ] देववितों, आणि धर्म व नीति ह्यांचीं ओटी भरतों [ सांगड वा गांठ घालतों ] ५३. विवेकदीपास आलेली अविचाररूप काजळी झाडून काढून तो विचाररूप दिवा प्रज्वलित करितों, त्या वेळीं योगी लोकांना निरंतर [ पुढती अस्तवेना अशा अद्वैतरुप ] आनंदाचा दिवाळीचा दिवस उगवतो ५४. मग सत्सुखानें सर्व विश्व भरून जातें, जिकडेतिकडे लोक फक्त धर्माचें आचरण करणारे होऊन जगांत धर्मच नांदू लागतो आणि भक्तजन सत्त्वगुणानें परिपूर्ण होतात ५५. अर्जुना ! ज्या वेळीं माझी अवतार मूर्ती प्रकट होते. त्या वेळीं पापांचे पर्वत नाहींतसे होतात व पुण्याचा उषःकाल होतो ५६. अशा या कामाकरितां मी प्रत्येक युगायुगांचे ठायीं अवतार धारण करितों. हेंच जो [ तत्त्वतः ] ओळखतो, तोच या जगांत खरा विचारवान होय ५७.

**अन्वयार्थ**––**यः**-जो-**मे**–माझा-**एवम्**-वर सांगितलेल्या प्रकारचा-**दिव्यम्**–अलौकिक-**जन्म च कर्म**-जन्म व कर्म -**तत्त्वतः**-अगदीं बरोबर- **वेत्ति** -जाणतो तो-**देहम्**–देहाला –**त्यक्त्वा**–टाकून–**पुनर्जन्म**–पुनर्जन्मास-**न एति** – प्राप्त होत नाहीं, तर–**हे अर्जुन**-हे अर्जुना ! **सः**–तो–**मां**-मला **एति**–प्राप्त होतो ९.

माझें अजत्व कायम असून जन्म घेणें व अकर्तृत्व कायम असून कर्म करणें, असें जें हें माझें निर्विकार स्वरूप व अलिप्तत्त्व जो निःशंक जाणतो, तोच परममुक्त होय ५८. असें जाणणारा देहाच्या संबंधानें जरी चालतोसा, व्यवहार करीत आहे असा दिसला तरी तो [ तत्त्वतः ] चालत नाहीं; [ कारण तो आसक्तिरहित झाला आहे ] आणि त्यानें देह धारण केला, तरी देहभावानें आकळिला जात नाहीं; मग मेल्यावर माझ्या स्वरूपांतच येऊन मिळतो ५९.

**अन्वयार्थ**––**वीतरागभयक्रोधाः**-विषयासक्ति, भय व क्रोध ज्यांच्यापासून निघून गेले आहेत असे-**मन्मया**-ईश्वरमय झालेले, ईश्वराहून मी भिन्न आहे, असें न समजणारे-**माम् उपाश्रिताः** माझाच पूर्ण आश्रय केलेले-केवळ ज्ञाननिष्ठ असे -**बहवः**-अनेक लोक आजवर-**ज्ञानतपसा**–ईश्वराचें ज्ञान याच तपानें-**पूताः**–पवित्र झालेले-**मद्भावम्**-माझ्या भावास-स्वरूपास–मोक्षास–**आगताः**–प्राप्त झाले आहेत १०.

एरव्हीं मागील व पुढील विषयांविषयीं जे शोक करीत नाहींत, आणि जे विषयवासनारहित झालेले असतात, ते कोणत्याहि वेळेस क्रोधाच्या मार्गाला जात नाहींत ६०. जे नेहमीं माझ्या स्वरूपाच्या प्राप्तीमुळें संपन्न व धन्य असतात. आणि माझ्याच सेवेसाठीं ज्यांचें जीवन जगणें आहे, किंवा जे आत्मज्ञानाच्या दृढ बोधानें संतोष पावलेलें, जे विषयप्रीति रहित आहेत ६१. जे तपाच्या तेजाच्या राशी असतात. किंवा ज्ञानाचें केवळ एकमेव आश्रय असतात. अथवा जे तीर्थालाहि पवित्र करणारे मूर्तिमंत तीर्थच असतात ६२. ते माझ्या स्वरूपास सहजच येऊन मिळतात, म्हणजे ते मद्रूपच होऊन राहतात त्यांच्यांत व माझ्यांत वस्तुतः भेदाचा पडदाच उरत नाहीं ६३. सांग बरें कीं,–पितळेचा गंज व कळकटपणा हे दोन दोष पूर्णतया नाहींसे झाले तर मग सोनें संपादन करण्यास दुसरीकडे गेलें पाहिजे काय ? तर नाहीं कारण तेंच सोनें ६४. त्याचप्रमाणें जे यमनियमादि अष्टांगयोगांत पारंगत होऊन निवाले आणि तपानें व ज्ञानानें शुद्ध झाले आहेत, ते मद्रूपच झाले त्याविषयीं तुला संशय कसला ? ६५.

**अन्वयार्थ**––**ये**–जे लोक–**मां**–मला–**यथा** ज्याप्रकारें **प्रपद्यते**–भजतात-**तान्**-त्यांत **तथा एव**–तसाच-**अहम्** मी **भजामि**-भजतों. तसाच त्यावर अनुग्रह करतों-[ हे ] **पार्थ**–हे अर्जुना ! **मनुष्याः**–मानव–**सर्वशः**- सर्व प्रकारें **मम**–माझ्या **वर्त्म**–मार्गास–**अनुवर्तन्ते**-अनुसरतात ११.

याशिवाय सहज विचार करून पाहिलें तर जे ज्या ज्या भक्तिभावानें मला भजतात, त्या त्या प्रमाणातच मीहि त्यांच्यावर प्रीति करतो ६६. हे पहा ! जेवढे म्हणून मनुष्यप्राणी आहेत त्या [ मनुष्य मात्राचाच मी आत्मा आहे; आणि ] सर्व जीवांची स्वाभाविक प्रवृत्ति ही आत्म्यावरच प्रेम करण्याकडे असते. अर्थात् सर्व जीव माझेच भक्त आहेत, हें खरें ६७. परंतु, त्यास ज्ञान नसल्यामुळें त्यांचें सर्व वाया जाते. ते असे कीं, आपण परमात्मारूपच आहोंत हेंच न समजल्यामुळें बुद्धीचे ठिकाणीं भेद उत्पन्न होऊन मी जो एक आहें, त्या माझे ठिकाणीं ते अनेकत्वाची कल्पना करतात ६८ म्हणून जेथे वास्त-

१ टाकितो. २ मर्यादा, सीमा. ३ सनद. ४ ध्वज, पताका. ५ उभारतो. ६ ओटी भरतों, लग्न लावितों. ७ उजाडते. ८ आत्मसुखानें. ९ भरे. १० सात्विक भावांची. ११ पर्वत. १२ उषःकाल. १३ ज्ञानी. १४ निःशंक.

यया अनाम्या नामें ठेविती । देवी देवो म्हणती । अचर्चातें ॥ ६९ ॥ जे सर्वत्र सदा सम । तेथ विभाग अधमोत्तम । मतिवशें संभ्रम । विवंचिती ॥ ७० ॥

काङ्क्षन्तः कर्मणां सिद्धिं यजंत इह देवताः । क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥

मग नानाहेतुप्रकारें । यथोचितें उपचारें । मानिलीं देवतांतरें । उपासिती ॥ ७१ ॥ तेथ जें जें अपेक्षित । तें तैसेंचि पावती समस्त । परी तें कर्मफळ निश्चित । वोळख तूं ॥ ७२ ॥ वांचून देतें घेतें आणिक । निभ्रांत नाहीं सम्यक । एथ कर्मचि फळसूचक । मनुष्यलोकीं ॥ ७३ ॥ जैसें क्षेत्रीं जें पेरिजे । तें वांचूनि आन न निपजे । कां पाहिजे तेंचि देखिजे । दर्पणाधारें ॥ ७४ ॥ नातरी कडेयातळवटीं । जैसा आपुलाचि बोलु किरीटी । पडिसादु होऊनि उठी । निमित्तयोगें ॥ ७५ ॥ तैसा समस्तां यां भजना । मी साक्षिभूतु पैं अर्जुना । एथ प्रतिफळे भावना । आपुलाली ॥ ७६ ॥

चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः । तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥

आतां याचिपरी जाण । चाऱ्ही हे वर्ण । सृजिले म्यां गुण- । कर्मविभागें ॥७७॥ जे प्रकृतीचेनि आधारें । गुणाचेनि व्यभिचारें । कर्में तदनुसारें । विवंचिली ॥ ७८ ॥ एथ एकचि हे धनुष्यपाणी । परी जाहले गा चहूं वर्णीं । ऐसी गुणकर्मकडसणी । केली सहजें ॥ ७९ ॥ म्हणौनि आइकें पार्था । हे वर्णभेदसंस्था । मीं कर्ता नव्हें सर्वथा । याचिलागीं ॥ ८० ॥

न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा । इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥ १४ ॥

हें मजचिस्तव जाहलें । परी म्यां नाहीं केलें । ऐसें जेणें जाणितलें । तो सुटला गा ॥ ८१ ॥

एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः । कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥

मागील मुमुक्षु जे होते । तिहीं ऐशिया जाणोनि मातें । कर्में केलीं समस्तें ॥ धनुर्धरा ॥ ८२ ॥ परि तें बीजें जैसीं दग्धलीं । नुगवतींचि पेरिलीं । तैशीं कर्मेंचि परि तयां जाहलीं । मोक्षहेतु ॥ ८३ ॥ एथ आणिकही एक अर्जुना । हे कर्माकर्मविवंचना । आपुलिये चाडें सज्ञाना । योग्यु नोहे ॥ ८४ ॥

किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः । तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १६ ॥

---

१. भ्रांत चित्तानें. २ मानितात. ३ खरें पाहतां. ४ फल देणारे. ५ डोंगराच्या कड्याखालीं, गिरिकंदरांत. ६ प्रतिध्वनी. ७ फलद्रूप होतें, सिद्धीस जातें. ८ उत्पन्न केलें. ९ मिश्रणानें. १० व्यवस्था केली. ११ गुणकर्मांचा विवेक, विचार.

विक अभेद आहे त्या सर्व भूतमात्रांशीं अभिन्न असलेल्या स्वरूपाच्या ठिकाणीं भेद पाहतात. मी जो नामरहित आहे त्या मला अनेक नांवें देतात, आणि तत्त्वतः मी शब्दातीत असतांना मला कोणी देव, कोणी देवी असें म्हणतात; ६९. जे सर्वत्र [ म्हणजे सर्वव्यापक, देशपरिच्छेदरहित ] सदा [ नेहमीं, सर्वकाल असणारे, कालपरिच्छेदरहित ] आणि सम [ सर्व वस्तूंत अधिष्ठान-रूपानें साधारण-समव्याप्त, वस्तुपरिच्छेदरहित ] आहे, त्या चैतन्याच्या ठिकाणीं भेदभ्रांतीनें युक्त असलेल्या बुद्धीला वश होऊन जे "श्रेष्ठकनिष्ठ, चांगला-वाईट" अशी निवड करतात ७०.

**अन्वयार्थ—कर्मणाम्**—कर्मांच्या—**सिद्धिं**—सिद्धीची—**कांक्षन्तः**—आकांक्षा—इच्छा—करणारे अधिकारी पुरुष—**इह**—या लोकीं—**देवताः**—इंद्र, अग्नि इत्यादि देवतांची—**यजन्ते**—पूजा करितात—**हि**—कारण—**मानुषे लोके**—या मनुष्य लोकांत—**कर्मजा सिद्धिः**—कर्मापासून होणारी सिद्धि—**क्षिप्रम्**—सत्वर—**भवति**—होते—कर्मफल सत्वर मिळतें १२.

एकदा भेद निश्चय झाला म्हणजे मग मनांत नाना हेतु धारण करून, त्यांनी मानलेल्या अनेक देवतांच्या यथाविधि, अनुरूप उपचारांनीं, उपासना करतात ७१. ज्या उपासनेंत, ज्याचें मनांत जें इच्छित असतें, तें सर्व त्यांना तसेंच प्राप्त होतें, परंतु तें सर्व त्यांच्या कर्माचेंच फळ आहे, असें तूं निश्चयानें समज ७२. खरोखर पाहतां, देणारा किंवा घेणाराहि [कर्माशिवाय] निःसंशय दुसरा कोणी नसून ह्या मनुष्यलोकीं केवळ कर्मच फलप्राप्ति करून देणारे आहे ७३. जसें शेतजमिनींत जें धान्य पेरावें त्यावांचून दुसरें उत्पन्नच व्हावयाचें नाहीं, किंवा आरशांत जें पाहावें तेंच त्यांत दृष्टीस पडतें ७४. किंवा अर्जुना! डोंगराच्या कड्याखालीं ज्याप्रमाणें आपलाच बोललेला शब्द कांहीं कारणवशात् प्रतिध्वनीच्या रूपानें उमटतो ७५. त्याचप्रमाणें अर्जुना! या सर्व उपासनांचा मी केवळ साक्षीभूत आहें. या उपासनेंत जशा ज्याच्या भावना असतील तशा त्या फलद्रूप होतात ७६.

**अन्वयार्थ—मया**—मी—**गुण—कर्म—विभागशः**—गुणांचा विभाग व कर्माचा विभाग करून, त्यांच्या अनुरोधानें—**चातुर्वर्ण्यं**—चार वर्ण—**सृष्टम्**—उत्पन्न केले आहेत.—**तस्य कर्तारम् अपि माम्**—मायिक व्यवहारदृष्ट्या मी जरी त्यांचा कर्ता आहे, तरी—**अकर्तारम्**—अकर्ता आहे व त्यामुळेंच—**अव्ययम्**—असंसारी आहें, असें—**विद्धि**—तूं जाण १३.

आतां ह्याचप्रमाणें असें तूं लक्षांत घे कीं, हे जे चार वर्ण आहेत, तेहि [ त्यांच्या गतकल्पीय ] गुण व कर्मांच्या संस्कार विभागानुरूप मीच उत्पन्न केले आहेत, असें तूं समज ७७. कारण, [ त्या चारहि वर्णांच्या प्रस्तुतच्या ] कर्मांची आपापल्या निरनिराळ्या प्रकृतिधर्मानें आणि गुणांच्या तारतम्यानें मी व्यवस्था केली आहे ७८. अर्जुना! हे सर्व लोक वस्तुतः येथें एकच खरें; पण चतुर्वर्णात्मक झाले. त्यांच्या गुणकर्मांच्या विचाराचे योगानें त्यांच्या वर्णाश्रमाची निवड व व्यवस्था स्वभावतःच केलेली आहे ७९. म्हणून अर्जुना ऐक गुणकर्मानुरूपच हीं वर्णभेदाची व्यवस्था असल्यामुळें वास्तविक पाहिले तर त्या चातुवर्ण्य संस्थेचा मीं मुळींच कर्ता नाहीं ८०.

**अन्वयार्थ—मां**—मला—**कर्माणि**—कर्में—**न लिम्पन्ति**—पुण्यपापानें लिप्त करीत नाहींत.—**कर्मफले**—कर्माच्या फलाविषयीं—**मे**—माझी—**स्पृहा**—इच्छा—**न** [**अस्ति**]—नाहीं. **इति**—याप्रमाणें—**मम**—मला—आत्म्याला—**यः**—जो—**अभिजानाति**—सर्व प्रकारें जाणतो—**सः**—तो—**कर्मभिः**—कर्मांनीं **न बध्यते**—बद्ध केला जात नाहीं १४.

ही वर्णभेद संस्था जरी माझ्यापासून झाली आहे, म्हणजे माझ्या सत्तेने झाली आहे, तरी ती मी केली नाहीं असें ज्यानें तत्त्वतः जाणले तोच [ कर्मबंधनांतून ] सुटला मुक्त झाला ८१.

**अन्वयार्थ—पूर्वैः अपि मुमुक्षुभिः**—पूर्वींच्याहि मुमुक्षूंनीं—**एवम्**—असें—**ज्ञात्वा**—जाणून—**कर्म**—कर्म—**कृतम्**—केलें—**तस्मात्**—म्हणून—**त्वम्**—तूं—**पूर्वैः**—पूर्वींच्या मुमुक्षूंनीं—**पूर्वतरम्**—त्याच्याहि—पूर्वींचें—**कृतम्**—केलेलें—**कर्म एव**—कर्मच—**कुरु**—कर—१५.

अर्जुना! पूर्वींचे जे मुमुक्षु झाले, त्यांनीं अशा प्रकारेंच मला जाणून सर्व कर्में केलीं ८२. परंतु, ज्याप्रमाणें भाजलेले बीज पेरलें तरीहि मुळींच उगवत नाहीं, त्याप्रमाणें त्यांचीं निष्काम कर्मेंच खरी; पण त्यांना मोक्षप्राप्तीस [ परंपरेने ] कारणीभूत झालीं ८३. आतां अर्जुना! त्यांत आणखी एक महत्त्वाची गोष्ट अशी आहे कीं, हें कर्म आहे कीं अकर्म आहे ह्याचा विचारआपल्याच मतानें बुद्धिमानासुद्धां ठरवितां येईल असा नाहीं ८४.

**अन्वयार्थ—कर्म किं**—कर्म काय व—**अकर्म किं**—अकर्म काय—**इति अत्र**—याविषयीं—**कवयः अपि**—मोठे मोठे बुद्धिमानहि—**मोहिताः**—मोहित झालेले आहेत—**तत्**—म्हणून—**ते**—तुला—**कर्म**—कर्म अकर्म वगैरे काय आहे तें—**प्रवक्ष्यामि**—मी सांगतो.—**यत्**—जें कर्माकर्मादि—**ज्ञात्वा**—जाणून—**अशुभात्**—संसारापासून—**मोक्ष्यसे**—मुक्त—केला जाशील—मुक्त होशील १६.

कर्म म्हणिपे तें कवण । अथवा अकर्मा काय लक्षण । ऐसें विचारितां विचक्षण । गुंफोनि ठेले ॥ ८५ ॥ जैसें कां कुडें नाणें । खऱ्याचेनि सारखेपणें । डोळ्यांचेंहि देखणें । संशयीं घाली ॥ ८६ ॥ तैसें नैष्कर्म्यतेचेनि भ्रमें । गिंवासिजत आहाती कर्में । जे दुजी सृष्टि मनोधर्में[१] । करूं सकती ॥८७॥ वांचूनि[२] मूर्खांची गोठी कायसी । एथ मोहले गा क्रांतदर्शी[३] । म्हणौनि आतां तेंचि परियेसीं । सांगेन तुज ॥ ८८ ॥

कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः । अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥

तरी कर्म म्हणजे स्वभावें । जेणें विश्वाकारु[४] संभवे । तें सम्यक्[५] आधीं जाणावें । लागे एथ ॥ ८९ ॥ मग वर्णाश्रमासि उचित । जें विशेष कर्म विहित । तेंही वोळखावें निश्चित । उपयोगेंसी[६] ॥ ९० ॥ पाठीं जें निषिद्ध म्हणिपे । तेंही बुझावें स्वरूपें । येतुलेनि कांहीं न गुंफे । आपैसेंचि ॥ ९१ ॥ एऱ्हवीं जग हें कर्माधीन । ऐसी याची व्याप्ती गहन । परी तें असो आइकें चिन्ह । प्राप्तांचें गा ॥ ९२ ॥

कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः । स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥

जो सकळकर्मीं वर्ततां । देखें आपुली नैष्कर्म्यता । कर्मसंगें निराशता । फळाचिया ॥ ९३ ॥ आणि कर्तव्यतेलागीं । जया दुसरें नाहीं जगीं । ऐसिया नैष्कर्म्यता तरी चांगीं । बोधला असे ॥ ९४ ॥ तरी क्रियाकलापु आघवा । आचरतु दिसे बरवा । तोचि तो ये चिन्हीं जाणावा । ज्ञानिया गा ॥९५॥ जैसा कां जळापाशीं उभा ठाके । तो जरी आपणपें जळमाजिं देखे । तरी तो निभ्रांत वोळखे । म्हणे मी वेगळा आहें ॥ ९६ ॥ अथवा नावें हन जो रिगे । तो थडियेचें रुख जातां देखे वेगें । तेचि साचोकारें जों पाहों लागे । तंव रुख म्हणे अचळ ॥९७॥ तैसें सर्व कर्मीं असणें । तें फुडें मानूनि वायाणें । मग आपणया जो जाणे । नैष्कर्म्यु ऐसा ॥९८॥ आणि उदोअस्तुचेनि प्रमाणें । जैसें न चालतां सूर्याचें चालणें । तैसें नैष्कर्म्यत्व जाणें । कर्मीचि असतां ॥ ९९ ॥ तो मनुष्यासारिखा तरी आवडे । परी मनुष्यत्व तया न घडे । जैसें जळामाजीं न बुडे । भानुबिंब ॥ १०० ॥ तेणें न पाहतां विश्व देखिलें । न करितां सर्व केलें । न भोगितां भोगिलें । भोग्यजात ॥ १ ॥ एकेचि ठायीं बैसला । परि सर्वत्र तोचि गेला । हें असो विश्व जाहला । आंगेंचि तो ॥ २ ॥

१ मनात आणले तर, संकल्पमात्रेंकरून. २ यापुढें, मग. ३ दूर दृष्टीचे, सर्वज्ञ. ४ विश्वरचना. ५. यथार्थ. ६ फलासह.

कर्म म्हणतात तें कोणतें व अकर्माचें लक्षण काय ? असा याचा विचार करितां करितां दूरदर्शी शहाणेदेखील घोटाळ्यांत पडतात ८५. जसें खोटें नाणें हुबेहुब खऱ्यासारखेंच दिसल्यामुळें चांगल्या परिक्षकांच्या डोळ्यांच्या नजरेलाहि संशयांत घालते ८६. तसें मनाच्या केवळ संकल्पमात्रें करून प्रतिसृष्टी निर्माण करण्याचें सामर्थ्य ज्यांचे अंगीं आहे, तेहि ज्याला 'आम्ही नैष्कर्म्य स्थितीस प्राप्त झालो' असें भ्रमानेच समजतात, त्यामुळे तें वास्तविक कर्म असल्यामुळें ते कर्माचे पाशांत सांपडतात ८७. कर्माकर्मविचाराचे बाबतींत मोठमोठे दूरदर्शी सर्वज्ञहि मोहित होतात, त्यांची त्रेधा उडते मग मूर्ख अज्ञान्यांची गोष्ट कशाला पाहिजे ? म्हणून, तीच गोष्ट तुला यथार्थ सांगतों ती ऐक ८८.

**अन्वयार्थ**—**हि**–कारण–**कर्मणः अपि**–शास्त्रविहित कर्माचेंहि तत्त्व–**बोद्धव्यं** [ **अस्ति** ]– जाणणें उचित आहे–**च**–व–**विकर्मणः**–प्रतिषिद्ध–शास्त्रनिषिद्ध कर्माचेंहि तत्त्व–**बोद्धव्यं** [ **अस्ति** ]– जाणण्यास योग्य आहे–**च**–आणि–**अकर्मणः**–सर्व कर्म टाकून मुकाट्यानें बसणें या अवस्थेचेंहि तत्त्व–**बोद्धव्यं** [ **अस्ति** ]–समजून घेण्यासारखें आहे. कारण–**कर्मणः**–कर्माचें–**गतिः**–यथार्थस्वरूप–**गहना**–गहन आहे १७.

तरी कर्म म्हणजे ज्याच्यामुळें हा विश्वात्मक आकार [ किंवा माया विशिष्ट परमेश्वरास विश्वाकार उत्पन्न करण्याचा संकल्प ] स्वभावतः आपोआप [ अगदी पहिल्यानुदां ] उत्पन्न होतो तेच [ कर्माचे लक्षण ] होय. या ठिकाणीं प्रथमतः त्याच कर्माचें यथार्थस्वरूप नीट जाणून घेतले पाहिजे ८९. मग जें विशेष कर्म वर्ण व आश्रमास योग्य–विहित म्हणून वेदांत सांगितलेलें आहे, त्याचीहि अनुष्ठान, प्रकार व फल यासह निश्चित स्वरूपाची ओळख करून घेतली पाहिजे ९०. याशिवाय ज्यास 'निषिद्ध' [ कर्म ] म्हणतात त्या [ शास्त्र ] निषिद्ध कर्माचेहि स्वरूप-ओळखणे आवश्यक आहे एवढयानें [ असें हे कर्माकर्माचे स्वरूप जाणल्याने ] सहजच [ तो कर्में करीत असला तरीहि ] कर्मपाशांत गुंतत नाहीं ९१. पण अशा विचाराचा जर अभाव असला तर तोच काय पण सर्व जग कर्माच्या आधीन आहे अशी कर्माची व्याप्ति फार दुर्बोध आहे. परंतु प्रस्तुत तें असो. आतां वर सांगितल्याप्रमाणें कर्माकर्मांचें यथार्थ ज्ञान झालेल्या कृतार्थ पुरुषांचें लक्षण सांगतों, ऐक ९२.

**अन्वयार्थ**—**यः**–जो विवेकी मनुष्य–**कर्माणि**–शरीर-इंद्रियें–प्राण यांच्या प्रत्येक व्यापारामध्यें–यांच्या प्रत्येक हालचालींत– **अकर्म**–अकर्म–आलस्याचें अकर्तृत्व-**पश्येत्**-पाहतो–**च**–व–**यः**–जो–**अकर्मणि**–अकर्मांत–मुकाट्यानें बसणें या अवस्थेंत– **कर्म**–कर्तृत्व–**पश्यत्**–पाहतो–**सः**–तो–**मनुष्येषु**–सर्व मनुष्यांमध्यें–**बुद्धिमान्**–मोठा बुद्धिमान्–ज्ञानी–**सः**–तो–**युक्तः**–योगी–[ आणि **सः**–तो ]–**कृत्स्नकर्मकृत्**–समस्त कर्म करणारा आहे १८.

जो सर्व कर्माचें आचरण करित असतांहि तें कर्म आपण करितों असें मानीत नाहीं, तत्वतः ते कर्म आपण करीत नाहीं असे जाणून आपले अकर्तृत्व पाहतो व कर्माबरोबर त्याच्या फलाची आशाहि बाळगीत नाही ९३. आणि त्याला अशा प्रकारें नैष्कर्म्यतेचा इतका चांगला बोध झालेला असतो कीं, त्याला आत्मस्वरूपाशिवाय जगांत दुसरें कांहीं प्रतीतच होत नाहीं म्हणून कर्तव्य असें कांहींच उरत नाही ९४. तरीपण लोकदृष्टया तो सगळीं कर्में नीट रीतीनें आचरीत आहे, असें दिसतें तोच या वरच्या लक्षणानेंयुक्त असा एक ज्ञानी आहे. असें जाणावें ९५. जसा एखादा मनुष्य नदीच्या कांठी उभा राहिल्यावर त्यानें आपणास प्रतिबिंब रूपाने पाण्यांत पाहिले तरीहि प्रतिबिंबाहून मी वेगळा आहे असें म्हणतो व तसे आपणास निःसंशय समजतो ९६. अथवा जो नावेंत बसून जातो त्या मनुष्यास नदीच्या कांठावरील झाडें वेगानें धांवत चालली आहेत असें दिसतें, परंतु तोच जेव्हां खरी वस्तुस्थिति विचारपूर्वक पाहूं लागतो तेव्हां ती झाडें स्थिर आहेत असेंच म्हणतो ९७. त्याप्रमाणें सर्व कर्माचे आचरण करीत असतां, पण आपल्या ठिकाणीं जे कर्म प्रतीतीला येते ते आभासात्मक, अगदीं खोटें आहे असें निश्चित समजून मग आपण तात्त्विक दृष्टीनें कर्मरहित आहो असें जो जाणतो; ९८. आणि तत्त्वतः सूर्य चालत नाहीं; पण सूर्य उगवतो व मावळतो एवढयाच एका प्रमाणावरून तो चालतो असें आपल्यास दिसतें-तसें कर्म आचरीत असतांहि तो आपली तात्त्विक नैष्कर्म्यस्थिति-तें आपण करीत नाहीं हे जाणतो; ९९. तो बाह्यतः मनुष्यासारखा [व्यवहारांत] जरी दिसतो,तरी पण तत्त्वतः परब्रह्मच आहे, असें समजावें. ज्याप्रमाणें सूर्याचें प्रतिबिंब पाण्यांत पडलेले दिसते तरी सूर्यबिंब त्यांत बुडालेले नसते १००. असा जो पुरुष, त्यानें कांहीं पाहिलें नाहीं तरीहि सर्व विश्व पाहिले असे होते, कांहीं त्यानें न करतांहि सर्व कांहीं केलें, असे होते, त्याने कांहीं न भोगताही हे यच्चयावत् भोग भोगिले असें होते १. तो एकाच ठिकाणीं बसून असलेला दिसला तरी त्यानेंच सर्वत्र गमन केलें असे होते. हें असो, तो स्वतः अंगानेच विश्वरूप झालेला असतो २.

यस्य सर्वे समारम्भाः कामसंकल्पवर्जिताः । ज्ञानाग्निदग्धकर्माणम् तमाहुः पंडितं बुधाः ।। १९ ।।

जया पुरुषाच्या ठायीं । कर्माचा तरी खेदु नाहीं । परी फलापेक्षा कहीं । संचरेना ।। ३ ।। आणि हें कर्म मी करीन । अथवा आदरिलें सिद्धी नेईन । येणें संकल्पेंहीं जयाचें मन । विटाळेना ।। ४ ।। ज्ञानाग्नीचेनि मुखें । जेणें जाळिलीं कर्में अशेखें । तो परब्रह्मचि मनुष्यवेखें । वोळख तूं ।। ५ ।।

त्यक्त्वा कर्मफलासङ्गं नित्यतृप्तो निराश्रयः । कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ।। २० ।।

जो शरीरीं उदासु । फळभोगीं निरासु । नित्यता उल्हासु । होऊनि असे ।। ६ ।। जो संतोषाचा गाभोरा । आत्मबोधाचिये वोगरां । पुरे न म्हणेचि धनुर्धरा । आरोगितां ।। ७ ।।

निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः । शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ।। २१ ।।

यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः । समः सिद्धावसिद्धौ च कृत्वाऽपि न निबध्यते ।। २२ ।।

कैसी अधिकाधिक आवडी । घेत महासुखाची गोडी । सांडोनियां आशा कुरोंडी । अहंभावेंसीं ।। ८ ।। म्हणौनि अवसरें जें जें पावे । कीं तेणेंचि तो सुखावे । जया आपुलें आणि परावें । दोन्ही नाहीं ।। ९ ।। तो दिठीं जें पाहे । तें आपणचि होऊनि जाये । आईके तें आहे । तोचि जाहला ।। ११० ।। चरणीं हन चाले । मुखें जें जें बोले । ऐसें चेष्टाजात तेतुलें । आपणचि जो ।। ११ ।। हें असो विश्व पाहीं । जयासि आपणपेंवांचूनि नाहीं । आतां कवण तें कर्म कायी । बाधी तयातें ।। १२ ।। हा मत्सरु जेथ उपजे । तेतुलें नुरेचि जया दुजें । तो निर्मत्सरु काइ म्हाणिजे । बोलेंवरी ? ।। १३ ।। म्हणौनि सर्वांपरी मुक्तु । तो सकर्मुचि कर्मरहितु । सगुण परि गुणातीतु । एथ भ्रांति नाहीं ।। १४ ।।

गतसङ्गस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः । यज्ञायाऽऽचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ।। २३ ।।

तो देहसंगें तरी असे । परी चैतन्यासारिखा दिसे । पाहतां परब्रह्माचेनि कसें । चोखाळु भला ।। १५ ।। ऐसाहि परी कौतुकें । जरी कर्में करी यज्ञादिकें । तरी तियें लया जाती निःशेखें । तयाच्याचि ठायीं ।। १६ ।। अकाळींचीं अभ्रें जैशीं । उर्मीवीण आकाशीं । हारपती आपैशीं । उदयलीं सांतीं ।। १७ ।। तैशीं विधिविधानें

१ निरिच्छ. २ मध्यगृहांत. ३ वाढप, जेवण वाढण्याला. ४ भोजन करितांना. ५ ओवाळणी. ६ अहंकारासह. ७ समयानुसार. ८ दुसऱ्याचे. ९ सर्व क्रिया, व्यापार. १० शब्दांनीं, बोलून. ११ गुणापलीकडचा, ब्रम्हस्वरूपी. १२ शरीरधारी.

**अन्वयार्थ**—**यस्य**–ज्या पूर्वोक्त विवेकी पुरुषाचें–**सर्वे**–समस्त–**समारंभाः**–कर्मे–**कामसंकल्पवर्जिताः**– कामविषयेच्छा व त्याचें कारण संकल्प यांनीं रहित असतात–**तम्**–त्या–**ज्ञानाग्निदग्धकर्माणम्**–वरील ज्ञानरूप अग्नीनें ज्यांचीं कर्मे जळालीं आहेत, अशा त्याला–**बुधाः**–ब्रह्मवेत्ते–**पंडितम्**–खरा पंडित–**आहुः**–म्हणतात. १९.

√ ज्या पुरुषाला कर्माचरणाविषयीं ‘ खेद ’ वाटत नाहीं, तरीपण कर्मफलाची इच्छा ज्याचे मनात केव्हाहि व मुळींहि उद्भवत नाहीं; ३. आणि हे अमुक एक कर्म मी करीन, अथवा अमुक कर्म सुरू केलेलें शेवटास नेईन, अशा संकल्पाने देखील ज्याचे मन विटाळत नाहीं, ४. कां ? तर–ज्ञानरूप अग्नीचे द्वारां ज्यानें आपलीं सर्व कर्मे जाळून टाकिलीं आहेत,–असा तो पुरुष म्हणजे मनुष्यरूपानें परब्रह्म [ अवतरला ] आहे, असें समज ५.

**अन्वयार्थ**—[ **यः** जो ]–**कर्मफलासङ्गं**–कर्माविषयीं अभिमान व फलाविषयीं आसक्ति–**त्यक्त्वा**–सोडून–**नित्य तृप्तः**–सतत तृप्त- विषयाविषयीं आकांक्षा न करणारा व- **निराश्रयः**–आश्रयरहित असतो -**सः**–तो-**कर्मणि**–कर्मामध्यें–**अभिप्रवृत्तः अपि**–सर्वप्रकारें जरी प्रवृत्त झाला असला तरी–**किंचित्**–कांहीं–**न करोति एव**–करीत नाहींच २०.

जो [ स्वतःच्या ] शरीराविषयीं उदासीन असतो, आणि कर्मापासून होणाऱ्या फलाच्या उपभोगाविषयीं निरिच्छ असतो व जो नेहमीं नित्यनिरतिशय आनंदस्वरूप होऊन राहिलेला असतो ६. जो संतोषाच्या गाभाऱ्यामध्यें बसून आत्मबोधाचें पक्वान्न जेवीत असतां तो ते पुरे असें कधी म्हणतच नाहींत ७.

**अन्वयार्थ**—**निराशीः**–तृष्णाशून्य–**यतचित्तात्मा**–चित्त व बाह्य शरीरेंद्रियसंघात यांचा ज्यानें निग्रह केला आहे असा–**त्यक्तसर्वपरिग्रहः**–ज्यानें सर्व परिग्रहांचा त्याग केला आहे असा ज्ञाननिष्ठ यति–**केवलं शारीरं कर्म**–नुसतें शरीर स्थितीला कारण होणारें कर्म–**कुर्वन्** [ **अपि** ]–जरी करीत असला [तरी]–**किल्बिषम्**–पापाला-दोषाला–**न आप्नोति**–प्राप्त होत नाहीं, त्याला दोष लागत नाहीं २१.

**अन्वयार्थ**—**यदृच्छालाभसंतुष्टः**–यदृच्छेनें न मागतां जें मिळेल त्यांत संतुष्ट राहणारा,–**द्वन्द्वातीतः**–शीत-उष्ण, सुख-दुःख इत्यादि द्वंद्वांनीं हर्ष - विषादयुक्त न होणारा,–**विमत्सरः**–कोणाचाहि मत्सर न करणारा–निर्वैरबुद्धि,–**च**–व–**सिद्धौ**–शरीरस्थितीला अवश्य असलेल्या अन्नादिकांचा लाभ झाला असतां–**असिद्धौ**–त्यांचा लाभ न झाला असतांहि–**समः**–एकसारखा राहणारा–हर्षविषाद न मानणारा असा संन्यासी–**कृत्वा अपि**–शरीरस्थितीला अवश्य तेवढेच भिक्षाटनादि कर्म करूनहि–**न निबध्यते**–बद्ध होत नाहीं २२.

अहंकारात्मक वृत्तीसह आशेची ओंवाळणी करून टाकून अधिकाधिक वाढत्या प्रेमानें तो ब्रह्मसुखाची गोडी किती तरी घेत असतो ८. म्हणून ज्या ज्या वेळेस जें जें मिळेल त्यांतच तो संतुष्ट असतो आणि ज्याला आपलें आणि परकें ही दोन्ही नसतात ९. तो आपल्या दृष्टीनें जें पाहतो तें तो आपणच होतो, आणि जें कानानें ऐकतो तेंहि तोच झालेला असतो ११०. पायानें जे चालतो, तोंडानें जे कांहीं बोलतो, त्या शरीरानें जितके म्हणून व्यापार करितो, ते सर्व आपणच अंगानें झालेला असतो. तात्पर्य सर्व जग आत्मरूपच पाहतो ११. हें असो; पहा फार काय सांगावें ! हें अखिल विश्वच ज्याला आपल्या आत्मस्वरूपावांचून वेगळें कांहीं आहे असें दिसतच नाहीं, अशा अवस्थेंत कर्म ते कोणतें व ते त्याला कशी काय बाधा करणार ? १२. मत्सर ज्या द्वैतापासून उत्पन्न होतो, इतकें सुद्धां द्वैत ज्याचे ठिकाणीं उरलेले नाहीं तो निर्मत्सर आहे, हें काय शब्दांनीं बोलून दाखविले पाहिजे ? १३. तो सर्व प्रकारें मुक्त आहे, तो सर्व कर्मै करीत असतांहि कर्मरहित आहे, तो सगुण म्हणजे गुणांत वावरत असलेला दिसतो तरी पण गुणातीत असतो, यांत संशय नाहीं १४.

**अन्वयार्थ**—**गतसङ्गस्य**–ज्याचीं कर्मै व फल याविषयींची आसक्ति निवृत्त झाली आहे, ज्याची त्यांत आसक्ति राहिलेली नाहीं,–**मुक्तस्य**–त्यामुळेंच जो धर्माधर्मादि बंधनापासून सुटला आहे,–**ज्ञानावस्थितचेतसः**–ज्याचें चित्त ज्ञानांतच अवस्थित आहे, अशा–**यज्ञाय**–यज्ञासाठींच–**आचरतः**–कर्म करणाऱ्या पुरुषांचें–**कर्म**–तें कर्म–**समग्रम्**–फलासह–**प्रविलीयते**–विनाश पावतें २३.

तो देहधारी तर असतो खरा; पण विचारदृष्ट्या चैतन्यासारखा [ असंग ] दिसतो. कारण, ब्रह्माच्या कसाला लावून पाहिला तर तो ब्रह्माइतकाच अत्यंत शुद्ध दिसतो १५. असा जरी तो केवळ मुक्त आहे, तरीपण एखादे वेळेस कौतुकानें यथाविधि यज्ञादिक कर्माचें आचरण करितो, तरी तीं संपूर्ण कर्मै त्याच्याच ठिकाणीं [ आत्मस्वरूपाचे ठिकाणीं ] लयाला जातात १६. ज्याप्रमाणें, आकाशांत अकालीं उत्पन्न झालेले पोकळ ढग, वृष्टि केल्यावांचून लागलीच आली तशी आपोआप लयाला जातात १७. त्याप्रमाणें, तो जरी वेदविहित कर्माचे

विहितें । जरी आचरे तो समस्तें । तरी तियें ऐक्यभावें ऐक्यातें । पावतीचि गा ॥ १८ ॥

ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् । ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥

हें हवन मी होता । कां इयें यज्ञीं हा भोक्ता । ऐसिया बुद्धिसि नाहीं भिन्नता । म्हणौनियां ॥ १९ ॥ जे इष्टयज्ञ यजावे । तें हविर्मंत्रादि आघवें । तो देखतसे अविनाशभावें । आत्मबुद्धि ॥ १२० ॥ म्हणौनि ब्रह्म तेंचि कर्म । ऐसें बोधा आलें जया सम । तया कर्तव्य तें नैष्कर्म्य । धनुर्धरा ॥ २१ ॥ आतां अविवेकु कुमारत्वा मुकले । जयां विरक्तीचें पाणिग्रहण जाहलें । मग उपासन जिहीं आणिलें । योगाग्नीचें ॥ २२ ॥

दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते । ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥

जे यजनशील अहर्निशीं । जिहीं अविद्या हविली मनेंसीं । गुरुवाक्य हुताशीं । हवन केलें ॥ २३ ॥ तिहीं योगाग्निकीं यजिजे । तो दैवयज्ञु म्हणिजे । जेणें आत्मसुख कामिजे । पंडुकुमरा ॥ २४ ॥ आतां अवधारी सांगेन आणिक । जे ब्रह्माग्नी साग्निक । तयांतें यज्ञाचि यज्ञु देख । उपासिजे ॥ २५ ॥

श्रोत्रादिनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति । शब्दादीन्विषयानन्ये इंद्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥

एक संयमाग्निहोत्री । ते युक्तित्रयाच्या मंत्रीं । यजन करिती पवित्रीं । इंद्रियद्रव्यीं ॥ २६ ॥ एकां वैराग्य रवि विवळे । तंव संयती विहार केले । तेथ अपावृत जाहले । इंद्रियानळ ॥ २७ ॥ तिहीं विरक्तीची ज्वाळा घेतली । तंव विकारांचीं इंधनें पळिपली । तेथ आशाधूमें सांडिलीं । पांचही कुंडें ॥ २८ ॥ मग वाक्यविधीचिया निरवडी । विषय आहुती उदंडीं । हवन केलें कुंडीं । इंद्रियाग्नीच्या ॥ २९ ॥

सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे । आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥

एकीं ययापरी पार्था । दोषु क्षाळिले सर्वथा । आणिकीं हृदयारणीं मंथा । विवेकु केला ॥ १३० ॥ तो उपशमें निहटिला । धैर्येंवरी दाटिला । गुरुवाक्यें काढिला । बळकटपणें ॥ ३१ ॥ ऐसें समरसें मंथन केलें । तेथ झडकरी काजा आलें । जें उज्जीवन जाहलें । ज्ञानाग्नीचें ॥ ३२ ॥ पहिला ऋद्धिसिद्धींचा संभ्रमु । तो निवर्तोनि गेला धूमु । मग प्रगटला सूक्ष्मु । विस्फुलिंगु ॥ ३३ ॥ तया मनाचें मोकळें । तेंचि

यथाविधि–यथासांग आचरण करीत असला, तरीहि ती त्याच्या एकत्र निश्चयामुळें ऐक्यासच येतात, कर्मांच्या ठिकाणीं त्याचा आत्मदृष्ट्या दुजाभाव नसल्यामुळें ती त्याच्या आत्मस्वरूपाचे ठिकाणीं लय पावतात ११८.

**अन्वयार्थ—अर्पणम्**–ज्या मंत्रानें किंवा–जुहु–स्रुक–इत्यादि साधनानें ब्रह्मविद् हवि अग्नींत अर्पण करितो, तो मंत्र किंवा 'जुहु' वगैरे साधन–**ब्रह्म** –ब्रह्म–**हविःब्रह्म** –तूप, भात वगैरे अग्नींत होमावयाचा पदार्थहि ब्रह्म,–**ब्रह्माग्नौ**–ज्यांत होम करावयाचा तो अग्नि ब्रह्म–**ब्रह्मणा**–हवन करणारा यजमान ब्रह्म व–**हुतम्**–प्रत्यक्ष होमक्रियाहि ब्रह्मच–ब्रह्मरूप अग्नींत ब्रह्मरूप यजमानाकडून ब्रह्मरूप होम केला जातो –**ब्रह्मकर्मसमाधिना**–ब्रह्मच कर्म, त्यांत ज्याच्या चित्ताची समाधि-स्थिरता आहे अशा–**तेन**–त्या ज्ञानी पुरुषाकडून–**ब्रह्म एव**–ब्रह्मच–**गन्तव्यम्**–प्राप्तव्य फल आहे. त्याला इष्ट असलेलें फलहि ब्रह्मच आहे २४.

कर्माचरणांत त्याची दृष्टि कशी असते पहा–हें एक हवनकर्म, मी हवनकर्ता, या यज्ञांत हा अमुक भोक्ता, अशा प्रकारें त्याच्या बुद्धीत भिन्नभाव नाहींच; म्हणून ११९. तो जे जे इष्ट यज्ञ करितो, त्यांतील होमद्रव्यें व मंत्र इत्यादि सर्व तो आत्मस्वरूपाचे ठिकाणीं स्थिरबुद्धि असलेला अविनाश भावरूप अर्थात् ब्रह्मस्वरूपच आहेत असें तो पाहतो १२०. म्हणून अर्जुना! तें कर्म ब्रह्मरूपच आहे अशी समबुद्धि ज्याच्या अंतःकरणांत बाणली, त्यानें प्राप्त कर्तव्य कर्म केलें तरी तें नैष्कर्म्यच होय १२१. आतां ज्याची अविचाररूप बाल्यावस्था गेलेली आहे [ अर्थात् विवेकरूप तारुण्यांत ] ज्यांनीं विरक्तीशीं लग्न लाविलें [ कारण लग्न झाल्यावांचून अग्निसेवा करितां येत नाहीं ] मग ज्यांनीं [जीवब्रह्मैक्यरूप] जो योगाग्नि, त्याची उपासना ज्यांनीं आरंभिली १२२.

**अन्वयार्थ—अपरे**–कांहीं–**योगिनः**–योगी म्ह० कर्मठ लोक–**दैवम् एव यज्ञम्**–दैवच यज्ञ–इंद्र–अग्नि इत्यादि देव ज्यांत पूजिले जातात असा यज्ञ–**पर्युपासते**–करितात **अपरे** दुसरे कांहीं ब्रह्मवेत्ते–ज्ञाननिष्ठ–**यज्ञम्**–आत्म्याला–बुद्धयादि उपाधियुक्त जीवाला–**ब्रह्माग्नौ**–ब्रह्मरूप अग्नींत–**यज्ञेन एव** निरुपाधिक परब्रह्मस्वरूपानेंच–**उपजुह्वति**–हवन करितात २५.

असे जे रात्रंदिवस यज्ञ करणारे आहेत ज्यांनीं गुरुवाक्यरूप अग्नींत मनासहवर्तमान अविद्येचे हवन केलें आहे १२३. अर्जुना! ज्या यज्ञद्वारा आत्मसुखाची इच्छा केली जाते असा यज्ञ त्या योगरूपी अग्नीचे ग्रहण केलेले जे अग्निहोत्री ते करतात व ह्यालाच दैवयज्ञ असें म्हणतात १२४. आता जे ब्रह्माग्नीचे अग्निहोत्री [ ब्रह्मप्राप्तीची इच्छा करणारे ] आहेत ते स्वधर्म यज्ञानेंच यज्ञपुरुषाची उपासना करतात त्याजविषयीं वर्णन सांगतो ते ऐक १२५.

**अन्वयार्थ—अन्ये**–दुसरे योगी–श्रेयःसाधनांचें अनुष्ठान करणारे–**श्रोत्रादीनि इन्द्रियाणि**–श्रोत्रादिक इंद्रियें–**संयमाग्निषु**–पांच इंद्रियांचा पांच प्रकारचा संयम–निग्रह हेच अग्नि त्यांत–**जुह्वति** –होमितात. इंद्रियांचा संयमाग्नीत होम करितात. –**अन्ये**–दुसरे कांहीं योगी–**शब्दादीन्विषयान्**–शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पूर्वोक्त श्रोत्रादि ज्ञानेंद्रियांच्या विषयांस–**इन्द्रियाग्निषु**–इंद्रियरूप अग्नींत–**जुह्वति**–होमितात २६.

कोणी आत्मसंयमरूप अग्नीमध्यें होम करणारे ते कायिक, वाचिक व मानसिक [ निग्रहरूपी ] या तीन युक्तिमंत्रांनीं पवित्र अशा इंद्रियरूप द्रव्याचे हवन करितात; १२६. दुसरे कोणी वैराग्यरूपी सूर्य उगवल्यावर बरोबर संयमरूपी कुंडाची रचना करून त्या कुंडामध्यें इंद्रियरूप अग्नि [ ज्ञानानें ] पेटवून तो प्रज्वलित करितात १२७. त्या इंद्रियाग्नीनें वैराग्यरूप ज्वाला घेतली तेव्हां लागलींच कामक्रोधादि विकाररूप लांकडें पेटलीं; पंचज्ञानेंद्रियरूपी पांच कुंडांतून विषय आशारूपी धूर निघून जातो १२८. मग वेदांत सांगितलेल्या विधिवाक्याच्या कुशलतेच्या साह्यानें इंद्रियरूप अग्नि असलेल्या कुंडांत विषयरूपी आहुति देऊन यज्ञ करतात १२९.

**अन्वयार्थ — अपरे**–दुसरे कांहीं साधक–**सर्वाणि इन्द्रियकर्माणि**–सर्व इंद्रियांचीं कर्में–**च**–व **प्राणकर्माणि** प्राणापानादि वायूंचीं कर्में–**ज्ञानदीपिते**–विवेकज्ञानानें प्रदीप्त झालेल्या–**आत्मसंयमयोगाग्नौ**–आत्मसंयमरूप योगाग्नींत–**जुह्वति**–होमितात २७.

अर्जुना! अशा प्रकारें कोणी आपल्या सर्व दोषांचें क्षालन केलें; दुसरे कोणी हृदयरूप अरणीवर विचाररूप मंथा केला व १३०. तो [ मंथा ] धैर्यरूप भारानें वरून दाबून धरला आणि शांतिरूप रज्जूनें बळकट बांधला व गुरुवाक्यरूप मंत्राच्या साह्यानें जोराने मंथन केला, घुसळला १३१. अशा प्रकारें समरसतेनें सर्व वृत्तींचें ऐक्य करून मंथन केल्यानें तेथें ते तत्काळ उपयोगास आलें त्याचे कारण असे कीं ज्ञानाग्नि प्रकट झाला! १३२. तेव्हां प्रथम ऋद्धिसिद्धींचा मोह हाच कोणी उत्पन्न झालेला धूर तो नाहींसा होऊन गेला कीं, मग सूक्ष्म अशा ज्ञानाग्नीची ठिणगी उत्पन्न झाली १३३. यमदमांनीं अगोदरच वाळून हलके झालेलें जें निर्दोष मन, हेंच त्या ज्ञाना-

पेटवण घातलें । जें यमनियमीं हळुवारलें । आइतें होतें ॥ ३४ ॥ तेणें साद्रुकुपणे ज्वाळा समृद्धा । मग वासनांतराचिया समिधा । स्नेहेंसीं नानाविधा । जाळिलिया ॥ ३५ ॥ तेथ सोहंमंत्रें दीक्षितीं । इंद्रियकर्मांच्या आहुती । तियें ज्ञानानळीं प्रदीप्तीं । दिधलिया ॥ ३६ ॥ पाठीं प्राणक्रियेचिये स्रुवेनिशीं । पूर्णाहुती पडली हुताशीं । तेथ अवभृत समरसीं । सहजें जहालें ॥ ३७ ॥ मग आत्मबोधींचें सुख । जें संयमाग्नीचें हुतशेष । तोचि पुरोडाशु देख । घेतला तिहीं ॥ ३८ ॥ एक ऐशिया इहीं यजनीं । मुक्त ते जाहले त्रिभुवनीं । या यज्ञक्रिया तरी आनानीं । परि प्राप्य तें एक ॥ ३९ ॥

द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथाऽपरे । स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥

एक द्रव्युयज्ञु म्हणिपती । एक तपसामग्रीया[1] निपजविति । एक योगयागुही[2] आहाती । जे सांगितलें ॥ १४० ॥ एकीं शब्दीं शब्दु यजिजे[3] । तो वाग्यज्ञु म्हणिजे । ज्ञानें ज्ञेयँ[4] गमिजे[5] । तो ज्ञानयज्ञु ॥४१॥ हें अर्जुना सकळ कुवाडें[6] । जे अनुष्ठितां अति- सांकडें । परी जितेंद्रियासीचि घडे । योग्यतावशें ॥ ४२ ॥ ते प्रवीण तेथ भले । आणि योगसमृद्धि आथिले । म्हणौनि आपणपां तिहीं केलें । आत्महवन ॥ ४३ ॥

अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथाऽपरे । प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥

मग अपानाग्नीचेनि मुखीं । प्राणद्रव्यें देखीं । हवन केलें एकीं । अभ्यासयोगें ॥ ४४ ॥ एक अपानु प्राणीं अर्पिती । एक दोहींतेंही निरुंधिती । ते प्राणायामी म्हणिपति । पंडुकुमरा ॥ ४५ ॥

अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति । सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥

एक वज्रयोगक्रमें । सर्वाहारसंयमें । प्राणीं प्राणु संभ्रमें । हवन करिती ॥ ४६ ॥ ऐसें मोक्षकाम सकळ । समस्त हे यजनशीळ । जिहीं यज्ञद्वारां मनोमळ । क्षाळण केले ॥ ४७ ॥ जया अविद्याजात जाळितां । जें उरलें निजस्वभावता । जेथ अग्नि आणि होता । उरेचिना ॥ ४८ ॥ जेथ यजितयाचा कामु पुरे । यज्ञींचें विधान सरे । मागुतें जेथूनि वोसरें । क्रियाजात ॥ ४९ ॥ विचार जेथ न रिगे । हेतु जेथ न निगे । जें द्वैतदोषसंगें । सिंपेचिना ॥ १५० ॥

यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् । नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥

ऐसें अनादिसिद्ध चोखट । जें ज्ञान यज्ञावशिष्ट । तें सेविती ब्रह्मनिष्ठ ।

१ तपसाहित्य. २ अष्टांग योगरूप यज्ञ. ३ होम करितात. ४ जाणण्याची वस्तु ब्रम्ह. ५ पाविजे. ६ बिकट.

ग्नीच्या ठिणगीला पेटवण घातलें ३४. त्याच्या साह्यानें ज्वाला अतीव प्रदीप्त झाल्यानंतर त्यांत अनेक प्रकारच्या वासनारूपी समिधांना अनेक प्रकारचा स्नेह हेंच कोणी तूप, ते लावून त्या जाळल्या; ३५. नंतर यज्ञ करणाऱ्या जीवरूप दीक्षितानें 'सोऽहम्' या मंत्रानें त्या प्रदीप्त केलेल्या ज्ञानरूपी अग्नींत, इंद्रियकर्मांची आहुति दिली ३६. शेवटीं प्राणक्रियारूपी स्त्रुवा नांवाच्या यज्ञपात्रासह ज्ञानाग्नींमध्यें पूर्ण-आहुति दिली म्हणून ब्रह्मात्मैक्यरूपी बोध [ यज्ञाच्या शेवटचें ] अवभृथस्नान सहजच घडलें, ३७. मग संयमाग्नींत इंद्रियादिक होमद्रव्यांचें हवन करून बाकी उर्वरित राहिलेलें जें आत्मज्ञानाचे सुख, तेंच पुरोडाश म्हणून त्यांनीं घेतलें ३८. कोणीं अशा रीतीनें या यज्ञांनीं त्रिभुवनांत मुक्त झाले; म्हणून या यज्ञक्रिया जरी भिन्नभिन्न प्रकारच्या आहेत, तरी त्या सर्वांची अखेर फलप्राप्ति, प्राप्य स्थान एकच आहे ३९.

**अन्वयार्थ—द्रव्ययज्ञाः**–सत्पात्रीं द्रव्याचा विनियोग यज्ञाच्या भावनेनें जे करितात. ते द्रव्ययज्ञ होत,–**तपोयज्ञाः**–जे तपश्चर्या करितात. ते तपोयज्ञ,–**तथा अपरे योगयज्ञाः**–तसेंच जे दुसरे योगांगांचा अभ्यास करितात, ते योगयज्ञ, –**स्वाध्यायज्ञानयज्ञाः**–जे ऋग्वेदादिकांचें यथाविधि अध्ययन–अभ्यास–आवृत्ति करितात, ते स्वाध्याययज्ञ [व] जे शास्त्रार्थाचा अभ्यास करून शास्त्रार्थ-ज्ञान संपादन करितात, ते ज्ञानयज्ञ,–**च**–आणि **संशितव्रताः यतयः**–ज्यांनीं व्रतें अतिशय तीक्ष्ण केली आहेत असे–यती संन्यासी हे ब्रह्मज्ञ होत २८.

हे जे यज्ञ सांगितले, त्यापैकीं एकाला 'द्रव्ययज्ञ' असें म्हणतात, एकाला म्ह. तपरूपसामग्रीने साध्य केलेल्या [ यज्ञाला ] 'तपोयज्ञ' म्हणतात, एकाला [ अष्टांग साधनाने साधलेला ] 'योगयज्ञ' म्हणतात १४०. कित्येक यज्ञांत शब्दांनीं शब्दांचे यजन करतात [ वेद वाङ्मयाचें उच्चारण करतात ] त्याला 'वाग्यज्ञ' म्हणतात, आणि ज्या यज्ञांत ज्ञानानें ज्ञेय [ब्रह्म मिळतें,] आत्मत्वाने जाणले जाते त्याला 'ज्ञानयज्ञ' म्हणतात. ४१. अर्जुना ! हे सर्व यज्ञ फार सूक्ष्म व अवघड आहेत. कारण यांचे आचरण करणें अतीव कष्टकर, दुर्घट आहे; परंतु ज्यानें इंद्रियें जिंकिलीं आहेत, त्यास मात्र ते अधिकारपरत्वें करितां येतील ४२. ते त्या बाबतीत चांगले निपुण असतात व योगसमृद्धीनें सुसंपन्न असतात म्हणूनच ते हे यज्ञ करूं शकतील, कारण, त्यांनीं आपल्या जीवबुद्धीचें आत्मस्वरूपाचे ठिकाणीं हवन केलेलें असतें ४३.

**अन्वयार्थ–अपरे**–दुसरे कांहीं मुमुक्षु–**अपाने**–अपान वायूंत–**प्राणं**–प्राणाला–**तथा**–त्याचप्रमाणें –**प्राणे** –प्राणवायूंत–**अपानम्**–अपानाला–**जुह्वति** होमितात– [ व ] **प्राणापान गती**–प्राण व अपान यांच्या गती – **रुद्ध्वा** –बंद करून–**प्राणायामपरायणाः**–प्राणायामांत परायण होतात २९.

याशिवाय असें पहा कीं, कोणी अभ्यासाने अपानवायुरूप अग्नींचें मुखांत प्राणवायुरूप, द्रव्याचें हवन करितात; ४४. तसेच कोणी अपानवायु, प्राणवायूच्या ठिकाणी समर्पित करतात आणि कोणी तर प्राण व अपान या दोनहि वायूंचा निरोध करितात; त्यांना अर्जुना ! 'प्राणायामी' [ यज्ञ करणारे ] असें म्हणतात. ४५.

**अन्वयार्थ—अपरे**–दुसरे कित्येक–**नियताहाराः**–परिमित आहार करणारे–**प्राणान्**–वायुभेदांस-प्राणापानादिकांस–**प्राणेषु** [ **एव** ] -प्राणामध्येंच-**जुह्वति**--होमितात-**एते सर्वे अपि**--हे सर्वहि–**यज्ञविदः**--यज्ञाला जाणणारे व करणारे--आपापल्या साधनाला यज्ञ समजून त्यांचें अनुष्ठान करणारे–**यज्ञक्षपित कल्मषाः**--यज्ञानें पापाचा क्षय केलेले, असे होतात, यज्ञानें निष्पाप होतात. ३०.

कोणी हटयोगाच्या क्रमानें [ वज्रासनादि पद्धतीनें ] सर्व आहार जिंकून प्राणवायूरूपी अग्नींत प्रयत्नपूर्वक त्वरेने प्राणांचें हवन करतात ४६. अशा प्रकारें हे सांगितलेले सर्व यज्ञकर्ते मोक्षप्राप्तीचीच इच्छा करणारे असतात, त्यांनीं त्या यज्ञांच्या द्वारें आपले कामक्रोधादिक विकारात्मक मनोमळ धुवून नाहींतसे केलेले असतात ४७. अशा प्रकारें [ आत्मविषयक ] सर्व अविद्या-अज्ञान जाळून टाकल्यामुळें जे स्वाभाविकपणेंच आपले शुद्ध स्वरूप उर्वरित राहते, व जेथे अग्नि आणि यज्ञ करणारा असा द्वैतभावहि शिल्लक राहातच नाहीं; ४८. ज्या ठिकाणीं यज्ञ करणाराच्या सर्व इच्छा पूर्ण होतात व यज्ञक्रिया संपतात अर्थात् शेवटीं जेथून सर्व क्रिया मागच्या पावली परतून नाहींशा होतात; ४९. आणि ज्या ठिकाणीं विचाराचा शिरकाव होत नाहीं, जेथे कामनेचा स्पर्शहि होत नाहीं व जें द्वैतदोषांच्या संपर्कानें लिप्त होत नाहीं १५०.

**अन्वयार्थ—यज्ञशिष्टामृतभुजः**--यज्ञ करून अवशिष्ट राहिलेल्या वेळीं अमृत नांवाचें अन्न खाणारे मुमुक्षु–**सनातनं ब्रह्म**–ब्रह्म--[ चित्तशुद्धि-ज्ञानप्राप्तीच्या द्वारां ] नित्य ब्रह्मास--**यान्ति**--प्राप्त होतात--**हे कुरुसत्तम**--हे कुरुकुलांतील श्रेष्ठा !--**अयज्ञस्य**--एकहि यज्ञ न करणाऱ्या पुरुषाला--**अयं लोकः**–हे लोक--**न अस्ति**--नाहीं–**कुतः अन्यः**--मग दुसरा कोठचा ? ३१.

असें जे अनादिसिद्ध व शुद्ध, आणि ज्ञान यज्ञांत उर्वरित

ब्रह्माहंमंत्रें ॥ ५१ ॥ ऐसें शेषामृतें धाले । कीं अमर्त्यभावा आले । म्हणौनि ब्रह्म ते जहाले । अनायासें ॥ ५२ ॥ येरां विरक्ति माळ न घालीचि । जयां संयमाग्नीची सेवा न घडेचि । जे योगयागु न करितीचि । जन्मले सांते ॥ ५३ ॥ जयांचें ऐहिक धड नाहीं । तयांचें परत्र पुससी काई । म्हणौनि असो हे गोठी पाहीं । पंडुकुमरा ॥ ५४ ॥

एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे । कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥ ३२ ॥

ऐसें बहुतीं परी अनेग । जे सांगितलें तुज कां याग । ते विस्तारूनि वेदेंचि चांग । म्हणितले आहाती ॥ ५५ ॥ परी तेणें विस्तारें काय करावें । हेंचि कर्मसिद्ध जाणावें । येतुलेनि कर्मबंधु स्वभावें । पावेल ना ॥ ५६ ॥

श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप । सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥

अर्जुना वेदु जयांचें मूळ । जे क्रियाविशेषें स्थूळ । जया नव्हाळियेचें फळ । स्वर्गसुख ॥ ५७ ॥ ते द्रव्यादियागु कीर होती । परी ज्ञानयज्ञाची सरी न पवती । जैशी तारातेजसंपत्ती । दिनकरापाशीं ॥ ५८ ॥ देखें परमात्मसुखनिधान । साधावया योगीजन । जे न विसंबिती अंजन । उन्मेषनेत्रीं ॥ ५९ ॥ जें थांवतया कर्माची लाणी । नैष्कर्म्यबोधाची खाणी । जें भुकेलिया धणी । साधनाची ॥१६०॥ जेथ प्रवृत्ति पांगुळ जाहली । तर्काची दिठी गेली । जेणें इंद्रियें विसरलीं । विषयसंगु ॥ ६१ ॥ मनाचें मनपण गेलें । जेथ बोलाचें बोलकेंपण ठेलें । जयामाजि सांपडलें । ज्ञेय दिसे ॥ ६२ ॥ जेथ वैराग्याचा पांगु । फिटे । विवेकाचाही सोसु तुटे । जेथ न पाहतां सहज भेटे । आपणपें ॥ ६३ ॥

तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया । उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥

तें ज्ञान पैं गा बरवें । जरी मनीं आथि आणावें । तरी संतां यां भजावें । सर्वस्वेंसीं ॥ ६४ ॥ जे ज्ञानाचा कुरुठा । तेथ सेवा हा दारवंठा । तो स्वाधीन करी सुभटा । वोळगोनी ॥ ६५ ॥ तरी तनुमनुजीवें । चरणांसीं लागावें । आणि अगर्वता करावें । दास्य सकळ ॥६६ ॥ मग अपेक्षित जें आपुलें । तेंही सांगती पुसिलें । जेणें अंतःकरण बोधलें । संकल्पा नये ॥ ६७ ॥

यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव । येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥

जयाचेनि वाक्य उजिवडें । जाहलें चित्त निधडें । ब्रह्माचेनि पाडें । निःशंकु

राहिलेले जे ब्रह्म ते ज्ञानस्वरूप ब्रह्म. हे ब्रह्मनिष्ठ पुरुष 'अहं ब्रह्मास्मि' मी ब्रह्म आहें-या मंत्रानें सेवन करितात. [ म्हणजे ब्रह्मरूप होतात. ] ५१. ह्याप्रमाणें यज्ञांतील शेष म्हणून शिल्लक राहिलेलें ज्ञानरूप अमृत पिऊन जे तृप्त होऊन अमरत्वावस्थेस प्राप्त होतात, म्हणून ते सहजच ब्रह्मरूप होतात. ५२. याहून जे इतर लोक की, ज्यांना जन्मास आल्यापासून संयमरूप अग्नीची अजिबात सेवा घडत नाही; जे योग-यागादि मुळीच करीतहि नाहीत त्यास विरक्ति माळ घालीत नाही ५३. असें पहा कीं, ज्यास ऐहिक [ सुखहि नीट ] धड मिळत नाहीं मग त्याच्या पारलौकिक [ सुखाची ] गोष्ट कशाला विचारतोस ! [ मग मोक्ष कसा मिळणार ? ] म्हणून अर्जुना ! त्यांच्या विषयींची ती गोष्टच बोलायला नको ५४.

**अन्वयार्थ**—**एवं**–अशा प्रकारें--**बहुविधाः**--बहुत प्रकारचे--**यज्ञाः**--**ब्रह्मणः**--वेदाच्या -- **मुखे**-मुखांत -- वेंद-द्वारां--**वितताः**–विस्तारलेले आहेत. –**तान् सर्वान्** त्या सर्वांस–**कर्मजान्**–कर्मापासून झालेले--**विद्धि**–तूं जाण–**एवं**–असें–**ज्ञात्वा**–जाणून–**विमोक्ष्यसे**-तूं अशुभ संसारापासून मुक्त होशील; सोडविला जाशील. ३२.

अशा प्रकारें जे तुला पुष्कळ प्रकारचे जे अनेक [बारा] यज्ञ सांगितले, तें वेदांनेच बऱ्याच विस्तारांनें चांगलें वर्णन करून सांगितलें आहेत ५५. परंतु वेदांतील त्यांचें विस्तारपूर्वक वर्णन ऐकून आपल्याला काय करावयाचें आहे ? त्यांतील सार हेंच कीं, हे सर्व यज्ञ कर्मापासून उत्पन्न झालेले आहेत, एवढें जाणलें असतां कर्मबंधाची बाधा होणार नाहीं ५६.

**अन्वयार्थ**—**हे परंतप**–हे अर्जुना!– **द्रव्यमयात्**–**यज्ञात्**–द्रव्यादि–साधनांनींच साध्य होणाऱ्या यज्ञाहून–**ज्ञानयज्ञः**–ज्ञानयज्ञ–**श्रेयान्**–अधिक प्रशस्त आहे–**हे पार्थ**–हे पार्था! –**सर्वं कर्म**–सर्व कर्म–**अखिलं**–प्रतिबद्ध न होतां–**ज्ञाने**–ज्ञानांत–**परिसमाप्यते**–अन्तर्भूत होते ३३.

अर्जुना! [परंतु फलाभिलाषानें केल्या जाणाऱ्या] यज्ञाचें मूळ प्रवर्तक वेद आहेत, ज्यांत बाह्यस्थूल क्रियांचा खटाटोप फार आहे व ज्यांचे वरवर अपूर्व दिसणारें [ पण अनित्य ] असें स्वर्ग फल आहे ५७. ते द्रव्यादि यज्ञ आहेत खरें, परंतु सूर्यापुढें जसें नक्षत्रांचें तेज लोपतें तशी त्या यज्ञांना ज्ञानयज्ञाची सर येत नाहीं ५८. जें ज्ञानांजन डोळ्यांत घालून आत्मसुखरूप ठेवा मिळविण्याकरितां योगीजन रात्रंदिवस जागृत असतात ५९. जें ज्ञान आरंभिलेल्या कर्माचें शेवटचें प्राप्यस्थान आहे, जे कर्मातीत अशा ब्रह्मावबोधाची खाण आहे व [ जें आत्मसुखप्राप्तीकरितां ] भुकेलेल्या साधकांच्या साधनांचें तृप्तीचें स्थान आहे १६०. ज्या ठिकाणीं कर्माची प्रवृत्ति थांबतें व तर्काची दृष्टी जाते आणि ज्याच्या योगानें इन्द्रियें विषयसेवन करणें विसरलीं ६१. ज्या ठिकाणीं मनाचें मनपण गेलें, जेथें शब्दाची धांव, बडबड खुंटते, आणि तसें ज्याचे ठिकाणीं ज्ञेय-ब्रह्म व्यापिलेलें दिसतें ६२. ज्या ठिकाणीं वैराग्याची कष्टप्रद स्थिति नाहींशी होते, विचाराचीहि हांव संपते आणि पाहण्याच्या श्रमावांचून आपोआपच आपल्या आत्मस्वरूपाचें दर्शन-ज्ञान होतें ६३.

**अन्वयार्थ**—**तत्**–तें आत्मज्ञान–**प्रणिपातेन**–आचार्याजवळ जाऊन साष्टांग नमस्कारानें--**परिप्रश्नेन**--त्यांना बंधमोक्षादिकांविषयीं प्रश्न करून व--**सेवया**--त्यांची सेवा-शुश्रूषा करून–**विद्धि**–तूं संपादन कर.–**तत्त्वदर्शिनः ज्ञानिनः**–तत्त्ववेत्ते ज्ञानी–**ते**–तुला–**ज्ञानं**–ज्ञान–**उपदेक्ष्यन्ति**– सांगतील ३४.

अरे ! असें जें सर्वोत्कृष्ट ज्ञान, तें जर आपल्याला प्राप्त व्हावें असें मनांत असेल तर तूं [ शास्त्रार्थज्ञासंपन्न आणि ब्रह्मानुभूतिसंपन्न ] अशा संतास सर्वभावानें भजावेस, त्यांची प्रथम सेवा करावी ६४. कारण ते संत म्हणजे साक्षात् ज्ञानाचें घरच आहेत. त्यांच्या घराचा सेवाधर्म हा उंबरठा आहे; तर अर्जुना ! तूं तिकडे वळून सेवाधर्मरूपी उंबरठा प्रथम आपल्या स्वाधीन करून घे ६५. म्हणजे त्यासाठीं संतांची सेवा कर–ती कशी म्हणशील तर–शरीरानें, मनानें व जीवानें त्यांच्या चरणीं लागावेस आणि शरणागतीपूर्वक सर्व प्रकारांनीं गर्वरहित होऊन त्यांच्या चरणांची सेवा करावीस ६६. अशा प्रकारच्या सेवेनें ते प्रसन्न झाल्यानंतर त्या प्रसन्नस्थितींत त्यांना शिष्यांनीं आपणास अपेक्षित असा जन्ममरणदुःखरूपसंसार-निवृत्ति व परमानन्दप्राप्ति याविषयीं प्रश्न केला म्हणजे तेहि त्यास कृपेनें ब्रह्मात्मैक्य ज्ञानाचा उपदेश करितात. त्या त्यांच्या उपदेशापासून होणाऱ्या बोधाचे ऐश्वर्य असें आहे कीं, त्यामुळें शिष्याचे अन्तःकरण ज्ञानसंपन्न होऊन पुनः ते संकल्प-विकल्पात्मक वृत्तीवर मुळीहि येत नाहीं ६७.

**अन्वयार्थ**—**हे पाण्डव**–हे पांडवा !–**यत्** –जें ज्ञान–**ज्ञात्वा**–संपादन केल्यावर–**पुनः**–पुनरपि– **एवम्** –अशा प्रकारें-**मोहम्**-मोहाला-**न यास्यसि**-तूं प्राप्त होणार नाहींस –**येन**--ज्या ज्ञानानें–**अशेषेण भूतानि**--आब्रह्मस्तंबपर्यंत भूतांस–**आत्मनि**–आपल्यामध्यें-प्रत्यगात्म्यामध्यें-**अथो**–व-**मयि**--मजमध्यें-परमेश्वरामध्यें–**द्रक्ष्यसि**--पाहाशील ३५.

तशी तूं सेवा केलीस म्हणजे ज्याच्या उपदेशारूप प्रकाशापासून ब्रह्माप्रमाणें निःसंशय व निर्धास्त असें तुझें

होय ॥ ६८ ॥ तें वेळीं आपणपेयां सहितें । इयें अशेषेंही भूतें । माझ्या स्वरूपीं अखंडितें । देखसी तूं ॥ ६९ ॥ ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल । तैं मोहांधकारु जाईल । जैं गुरुकृपा होईल । पार्था गा ॥ १७० ॥

अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः । सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥

जरी कल्मषाचा आगरु । तूं भ्रांतीचा सागरु । व्यामोहाचा डोंगरु । होउनी अससी ॥ ७१ ॥ तऱ्ही ज्ञानशक्तिचेनि पाडें । हें आघवेंचि गा थोकडें । ऐसें सामर्थ्य असे चोखडें । ज्ञानीं इये ॥ ७२ ॥ देखैं विश्वभ्रमाऐसा । जो अमूर्ताचा कडवसा । तो जयाचिया प्रकाशा । पुरेचिना ॥ ७३ ॥ तया कायसे हे मनोमळु । हें बोलतांचि आति किडाळु । नाहीं येणें पाडें ढिसाळु । दुजें जगीं ॥ ७४ ॥

यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन । ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥

सांगैं भुवनत्रयाची काजळी । जे गगनामाजि उधवली । तिये प्रळयींचे वाहटुळी । काय अभ्र पुरे ? ॥ ७५ ॥ कीं पवनाचेनि कोपें । पाणियेंचि जो पळिपे । तो प्रळयानळु दडपे । तृणें काष्ठें काई ? ॥ ७६ ॥

न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते । तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥ ३८ ॥

म्हणौनि असो हें न घडे । तें विचारितांचि असंगडें । पुढती ज्ञानाचेनि पाडें । पवित्र न दिसे ॥ ७७ ॥ एथ ज्ञान हें उत्तम होये । आणिकही एक तैसें कें आहे । जैसें चैतन्य कां नोहे । दुसरें गा ॥ ७८ ॥ या महातेजाचेनि कसें । जरी चोखाळु प्रतिबिंब दिसे । कां गिंवसिलें गिंवसे । आकाश हें ॥ ७९ ॥ नातरी पृथ्वीचेनि पाडें । कांटाळें जरी जोडे । तरी उपमा ज्ञानीं घडे । पंडुकुमरा ॥ १८० ॥ म्हणौनि बहुतीं परी पाहतां । पुढतपुढती निर्धारितां । हें ज्ञानाची पवित्रता । ज्ञानींची आथि ॥ ८१ ॥ जैसी अमृताची चवी निवाडिजे । तरी अमृताचिसारिखी म्हणिजे । तैसें ज्ञान हें उपमिजे । ज्ञानेंसींचि ॥ ८२ ॥ आतां यावरी जें बोलणें । तें वायांची वेळु फेडणें । तंव साचचि हें पार्थ म्हणे । जें बोलत असां ॥ ८३ ॥ परी तेंचि ज्ञान केवीं जाणावें । ऐसें अर्जुनें जंव पुसावें । तंव तें मनोगत देवें । जाणितलें ॥ ८४ ॥ मग म्हणतसे किरीटी । आतां चित्त देईं इये गोठी । सांगेन ज्ञानाचिये भेटी । उपावो तुज ॥ ८५ ॥

श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः । ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥

अंतःकरण जेव्हां होईल ६८. त्या वेळीं तूं स्वतः आपणासहवर्तमान ही सर्व भूतें माझ्या अखंड स्वरूपाच्या ठिकाणीं पाहाशील ६९. अरे पार्था! अशा रीतीनें जेव्हां श्रीगुरूंची कृपा होईल, तेव्हांच तुझे अंतःकरणांत ज्ञानप्रकाशाचा उदय होईल व मग त्यावेळीं मोहरूपी अंधकार नाहींसा होईल १७०.

**अन्वयार्थ—सवभ्यः पापेभ्यः**--सर्व पाप्यांहून--**पापकृत्तमः अपि**--अतिशय पाप करणाराहि--**असि चेत्**--जरी तूं असलास, तरी--**ज्ञानप्लवेन एव**--ज्ञानरूपी नौकेनेंच -**सर्वं वृजिनं**--सर्व पापाला--**संतरिष्यसि**--अनायासें तरून जाशील ३६.

तूं कितीहि पातकांचे आगर, भ्रांतीचा सागर, अथवा भ्रमाचा पर्वत जरी असलास ७१. तरी ज्ञानाच्या शक्तीच्या मानाने ही सर्वच अगदी किरकोळ, तुच्छ आहेत. असें ह्या ज्ञानाच्या अंगीं उत्तम सामर्थ्य आहे ७२. असें पहा कीं, विश्वाभासाएवढा [ मोठा भ्रम ] पसारा कीं, जो त्या अव्यक्त निराकार परमात्म्याचा कवडसा [ पडछाया ] आहे. तो देखील ज्याच्या [ ज्ञानरूपी ] प्रकाशाला पुरत नाहीं. [ अंतःकरणांत—ब्रह्मात्मैक्य ज्ञानाचा उदय होतांच ] तेथे ही [ विश्वसत्यत्व भ्रांति मुळींच रहात नाहीं ] ७३. त्या ज्ञानापुढें मनांतील [ मल-विक्षेप आवरणादि ] मलाची काय कथा? वास्तविक असें बोलणे हेंच अतीव अनुचित आहे कारण ह्या जगांत ज्ञानाच्या तोडीची समर्थ [ अविद्यादि दोष निवृत्त करणारी ] अशी दुसरी वस्तुच नाहीं ७४.

**अन्वयार्थ—हे अर्जुन**-हे अर्जुना!-**यथा**-ज्याप्रमाणें **समिद्धः अग्निः**—चांगला प्रदीप्त झालेला अग्नि—**एधांसि** लाकडांना—**भस्मसात् कुरुते**—जाळून भस्म करतो-**तथा**-त्याप्रमाणें—**ज्ञानाग्निः**—ज्ञानरूप अग्नि—**सर्वकर्माणि**—सर्व संचित व क्रियमाण कर्मे—**भस्मसात्**—जाळून भस्म—**कुरुते**—करतो ३७.

अरे! त्रैलोक्य पेटल्यावर पसरलेल्या त्याच्या राखेला आकाशांत पार उडवून देणारी जी प्रलयकाळची वावटळ, तिला ढग नाहींतसे करणें अवघड आहे का? सांग बरें! ७५. किंवा वाऱ्याच्या साहाय्यानें भडकलेला प्रलयाग्नि कीं, जो पाणीही जाळून टाकितो, तो प्रलयकाळाचा अग्नि गवत आणि काष्ठें ह्यांनीं दबून विझेल का? ७६.

**अन्वयार्थ--ज्ञानेन सदृशं**-ज्ञानासारखें--**पवित्रं**--पावन करणारें—शुद्धि करणारें—**इह**—या जगांत—**न हि विद्यते**—कांहींच नाहीं.—**तत्** [ **ज्ञानं** ]—तें आत्मविषयक ज्ञान—**कालेन**—दीर्घ कालानें—**योगसंसिद्धः**—कर्मयोगानें व समाधियोगानें सुसंस्कृत झालेला मुमुक्षु—**स्वयम् आत्मनि विंदति**—आपोआपच अन्तःकरणामध्यें संपादन करतो ३८.

असो. ह्या उपर्युक्त गोष्टी कधींहि घडून येणाऱ्या नाहींत, आणि त्यासंबंधींचा विचार करणेंहि असंगत दिसतें. म्हणून ज्ञानाविषयीं पुनः पुनः जों जों विचार करावा, तों तों त्या ज्ञानाच्या योग्यतेची पवित्र वस्तु दुसरी कोणतीच दिसत नाहीं ७७. अरे! ज्याप्रमाणें चैतन्य दुसरे नाहीं, तें एकमेकाद्वितीयच आहे. त्याप्रमाणें ह्या लोकीं ज्ञान हीच एक उत्तम वस्तु असून त्याच्या बरोबरीची दुसरी वस्तु कोठे आहे? नाहीं ७८. जर या सूर्याचे कसोटीला [ लावून पाहतां ] त्याच्या प्रतिबिंबाचें तेज तेजस्वी असल्याचे दिसेल किंवा आकाशाला [ आपल्या दोन्ही हातांनीं ] कवळू गेले असता कवटाळता येईल, ७९. किंवा पृथ्वीचे वजन करण्यासाठीं काट्यांत घालावयास तिच्या बरोबरीची दुसरी वजनदार वस्तु जर सांपडेल, तरच अर्जुना! ज्ञानास उपमा देता येईल!! १८०. म्हणून पुष्कळ प्रकारानें पाहिलें असतां व वारंवार विचारपूर्वक निर्णय केला असतां ह्या ज्ञानाची पवित्रता ही फक्त एका ज्ञानाच्याच ठिकाणीं आहे असे दिसते ८१. अमृताची चव कशासारखी आहे. हे विचारपूर्वक निवडू गेले असतां ती अमृतासारखीच आहे हे असें जसे म्हणावें लागतें;-तशी ज्ञानाला ज्ञानाचीच उपमा द्यावी लागते ८२. आतां ह्यापेक्षां ज्ञानाविषयीं जास्त वाटाघाट करणें म्हणजे फक्त वेळ व्यर्थ घालविणें होय. तेव्हां अर्जुन म्हणाला, देवा! "आपण बोलत आहां तेंच खरें आहे" ८३. पण तेंच ज्ञान कसें प्राप्त करून घ्यावें असें जों अर्जुन विचारणार तोंच तें त्याचे मनोगत देवांनीं जाणलें ८४. आणि मग देव म्हणाले हे अर्जुना! ज्ञानप्राप्तीचा जो उपाय तो मी तुला स्वतःला सांगणार आहें, त्या गोष्टीकडे लक्ष दे. ८५.

**अन्वयार्थ-श्रद्धावान्**-श्रद्धाळू-**तत्परः**-गुरूंची उपासना इत्यादि ज्ञानप्राप्तीच्या उपायांमध्यें अत्यंत आसक्त व **संयतेन्द्रियः**-जितेंद्रिय-विषयांपासून इंद्रियांना ज्यानें निवृत्त केलें आहे असा पुरुष,-**ज्ञानं**-ज्ञानाला-**लभते**-प्राप्त होतो.--**ज्ञानं**--ज्ञान--**लब्ध्वा**--प्राप्त झाल्यावर--**परां शान्तिम्**-मोक्ष या नांवाची शांति-**अचिरेण**-सत्वरच **अधिगच्छति**-त्यास प्राप्त होते ३९.

तरी आत्मसुखाचिया गोडिया । विटे जो कां सकळ विषयां । जयाच्या ठायीं इंद्रियां । मानु नाहीं ॥ ८६ ॥ जो मनासीं चोड न सांगे । जो प्रकृतीचें केलें नेघे । जो श्रद्धचेनि संभोगें । सुखिया जाहला ॥ ८७ ॥ तयातेंचि गिंवसित । तें ज्ञान पावे निश्चित । जयामाजि अचुंबित । शांति असे ॥ ८८ ॥ तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे । आणि शांतीचा अंकुर फुटे । मग विस्तार बहु प्रगटे । आत्मबोधाचा ॥ ८९ ॥ मग जेउती वांस पाहिजे । तेउती शांतीची देखिजे । तेथ आपपरु नेणिजे । निर्धारितां ॥ १९० ॥ ऐसा हा उत्तरोत्तरु । ज्ञानबीजाचा विस्तारु । सांगतां असे अपारु । परि असो आतां ॥ ९१ ॥

अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति । नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥

ऐकें जया प्राणियाच्या ठायीं । इया ज्ञानाची आवडी नाहीं । तयाचें जियालें म्हणों काई । वरी मरण चांगें ॥ ९२ ॥ शून्य जैसें कां गृह । कां चैतन्येंविण देह । तैसें जीवित तें समोह । ज्ञानहीन ॥ ९३ ॥ अथवा ज्ञान कीर आपु नोहे । परि ते चाड एकी जरी वाहे । तरी तेथ जिव्हाळा कांहीं आहे । प्राप्तीचा पैं ॥ ९४ ॥ वांचूनि ज्ञानाची गोठी कायसी । परि ते आस्थाही न धरीं मानसीं । तरी तो संशयरूप हुताशीं । पडिला जाण ॥ ९५ ॥ जे अमृतही परि नावडे । ऐसें सावियेंचीं आरोचेंकु जैं पडे । तैं मरण आलें असें फुडें । जाणों येकीं ॥ ९६ ॥ तैसा विषयसुखें रंजे । जो ज्ञानेसींचि मांजे । तो संशयें अंगिकारिजे । एथ भ्रांति नाहीं ॥ ९७ ॥ मग संशयीं जरी पडिला । तरी निभ्रांत जाणें नासला । तो ऐहिकपरत्रा मुकला । सुखासि गा ॥ ९८ ॥ जया काळज्वरु आंगीं बाणे । तो शीतोष्णें जैशीं नेणे । आगी आणि चांदिणें । सरिसेंचि मानीं ॥ ९९ ॥ तैसें साच आणि लटिकें । विरुद्ध आणि निकें । संशयीं तो नोळखे । हिताहित ॥ २०० ॥ हा रात्रिदिवसु पाहीं । जैसा जात्यंधा ठाउवा नाहीं । तैसें संशयीं असतां कांहीं । मना नये ॥ १ ॥

योगसंन्यस्त कर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् । आत्मवंतं न कर्माणि निबध्नन्ति धनंजय ॥ ४१ ॥

म्हणौनि संशयाहूनि थोर । आणिक नाहीं पाप घोर । हा विनाशाची वागुर । प्राणियांसि ॥ २ ॥ येणें कारणें तुवां त्यजावा । आधीं हाचि एकु जिणावा । जो ज्ञानाचिया अभावा- । माजि असे ॥ ३ ॥ जैं अज्ञानाचें गडद पडे । तैं हा बहुवस मनीं वाढे । म्हणौनि सर्वथा मार्गु मोडे । विश्वासाचा ॥ ४ ॥ हृदयीं हाचि न समाये । बुद्धीतें गिंवसूनि ठाये । तेथ संशयात्मक होये । लोकत्रय ॥ ५ ॥

आत्मसुखाच्या गोडीमुळें जो मनापासून सर्व विषयांविषयीं विटून जातो, आणि ज्याच्या ठिकाणीं इंद्रियांची कधींच प्रतिष्ठा नाहीं ८६. जो आपली इच्छा आपल्या मनालाहि कळूं देत नाहीं, जो प्राचीन कर्मसंस्कारानें उत्पन्न होणारें प्रकृति कार्य कर्में [ त्याचें कर्तृत्व ] आपल्याकडे बळेच घेत नाहीं, आणि जो ज्ञानप्राप्तीमुळें आणि श्रीगुरु व त्यांनीं उपदेशिलेल्या उपदेशावरील अढळ श्रद्धेनें सुखी झालेला असतो ८७. त्याच पुरुषास ज्या ज्ञानांत ओतप्रोत शांति भरलेली असेल असें तें ज्ञानच शोधीत येऊन निश्चयानें प्राप्त होतें ८८. त्या ज्ञानाचे फल कसे आहे पहा. तें ज्ञान अंतःकरणांत स्थिर झालें म्हणजे मग शांतीचा अंकुर फुटतो. पुढें आत्मबोधाचा बराच विस्तार प्रगट होतो ८९. मग तो जिकडे पाहील तिकडे त्याला शांतीच दिसते, आणि त्या शांतीचे ठिकाणीं खरोखर विचारदृष्ट्या पाहूं गेले असतां त्या अवस्थेंत तो आपपरभाव मुळींहि जाणत नाहीं १९०. अशा रीतीनें उत्तरोत्तर वाढत जाणाऱ्या ज्ञानबीजाचा विस्तार सांगूं लागले असतां तो अपार आहे; पण तो आतां राहूं दे ९१.

**अन्वयार्थ**—**अज्ञः**-आत्म्याला न जाणणारा-**च**-व-**अश्रद्दधानः**-अश्रद्धाळु-**च**-व-**संशयात्मा**-संशयी-**विनश्यति**-विनाश पावतो-**संशयात्मनः**-संशयी पुरुषाला-**अयं लोकः**-हा लोक-**न अस्ति**-नाहीं-**परः न**-परलोक नाहीं व-**सुखं न**-सुख नाहीं ४०.

हें पहा--ज्या मनुष्याचे ठिकाणीं 'या' ज्ञानाची आवड नाहीं, त्याच्या जगण्यास काय म्हणावें ? त्यापेक्षां त्याचें मरण चांगलें ! ९२. एखादें ओसाड घर किंवा प्राणावांचून जसें शरीर; त्याचप्रमाणें ज्ञानहीन मनुष्याचें जीवित मोह-अविवेकयुक्त होय ९३. अथवा खरें ज्ञान प्राप्त झालेले नाहीं, तरीपण तें प्राप्त व्हावें अशी केवळ इच्छा जरी एखाद्यानें बाळगली तरी त्याला ज्ञानप्राप्तीचा कांहींसा संभव आहे ९४. याविना ज्ञान असण्याविषयींची गोष्ट कशाला ! ती तर राहोच, परंतु तें प्राप्त व्हावें, अशी जो नुसती कळकळ किंवा तीव्र इच्छाहि मनांत बाळगीत नाहीं, तो संशयरूप अग्नींत पडला असें समज ९५. कारण, अमृतहि आवडत नाहीं, अशी अरुचि जेव्हां सहजच-स्वभावतःच उत्पन्न होते, तेव्हां त्या मनुष्याचें मरण ओढवलें आहे असें निश्चित जाणावें ९६. त्याप्रमाणें जो विषयसुखांतच रंगून जातो आणि ज्ञानप्राप्तीविषयीं बेपर्वा असतो, तो संशयानें घेरला जाईल यांत संशय नाहीं ९७. अशा रीतीनें मग जो संशयांत पडला, त्याचा परमार्थतः निःसंशय नाश झाला, असें समज. म्हणून तो इहलोकच्या व परलोकच्या सुखांस आंचवला ! ९८. ज्याला सन्निपात ज्वर झाला आहे, त्याला ज्याप्रमाणें शीत, उष्ण असा फरक मुळींच कळत नाहीं आणि तो ऊन व चांदणें ही दोन्ही सारखीच मानितो ! ९९. त्याचप्रमाणें खरें काय व खोटें काय, अनुकूल काय, प्रतिकूल काय, हित काय, अहित काय ही त्या संशयी पुरुषाला ओळखतां येत नाहींत २००. पहा ! ज्याप्रमाणें ही रात्र व हा दिवस असें जन्मांधास ठाऊक नसतें; त्याप्रमाणें संशयानें मन ग्रस्त झाले असतां त्या पुरुषाच्या मनाला कांहींच पटत नसतें १.

**अन्वयार्थ**—**हे धनंजय**--हे अर्जुना!-**ज्ञानसंछिन्नसंशयम्**-आत्मा व ईश्वर यांच्या एकत्वदर्शनरूप ज्ञानानें ज्याचा संशय पार नाहींसा झाला आहे व त्यामुळें-**योगसंन्यस्तकर्माणं**-परमार्थदर्शनरूप योगानें म्ह० ज्ञानयोगानें ज्या परमार्थदर्शी पुरुषानें-ज्ञानी पुरुषानें धर्म व अधर्म या नांवाचीं कर्में सोडलीं आहेत अशा-**आत्मवन्तं**-सावधान पुरुषाला-**कर्माणि**-धर्माधर्माख्य कर्में-**न निबध्नन्ति**-बद्ध करीत नाहींत ४१.

म्हणून संशयापेक्षां मोठे असें दुसरें भयंकर पाप कोणतेंच नाहीं ! हा संशय म्हणजे प्राण्यांचा नाश करण्याचें हें एक जाळेंच आहे २. ह्याकरितांच तूं त्याचा त्याग करावास. आधीं ह्या एकट्यालाच जिंकावें कीं, जो जेथें ज्ञानाचा अभाव असतो तेथेंच वास्तव्य करून असतो ३. जेव्हां अज्ञानाचा निबिड काळोख असतो, तेव्हांच हा संशय मनांत फार वाढतो, म्हणून श्रद्धेचा मार्ग सर्वतोपरि मोडला जातो ४. हा हृदयांत न सामावून बुद्धीलाहि ग्रासून टाकतो, आणि मग [ त्या मनुष्याला ] तिन्ही लोक संशयात्मकच दिसूं लागतात ५.

१ निजानंदाच्या. २ इच्छा. ३ मायेचें. ४ अचल विश्वासाच्या योगानें. ५ शोधीत. ६ संपूर्ण. ७ स्थिर होते. ८ जिकडे. ९ वाट. १० तिकडे. ११ वांचणें, जिणें. १२ त्यापेक्षा. १३ चांगले. १४ जीवाविरहित. १५ मोहयुक्त. १६ प्राप्त. १७ इच्छा. १८ संभव. १९ कळकळहि. २० अग्नीत. २१ सहजच. २२ अरुचि. २३ मस्त होतो. २४ संशयानें अंगिकारला म्हणजे संशयांत पडला. २५ इहपरलोकांस. २६ ऊन. २७ प्रतिकूल. २८ अनुकूल. २९ ठाऊक. ३० पटत नाही. ३१ जाळे. ३२ जिंकावा. ३३ लोपला असता. ३४ काळोख, निबिड अंधार. ३५ अत्यंत.

तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनाऽऽत्मनः । छित्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानकर्मसंन्यासयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥२॥

ऐसा जरी थोरावें । तरी उपायें एकें आंगवे । जरी हातीं होय बरवें । ज्ञांनखड्ग ॥ ६ ॥ तरी तेणें ज्ञानशस्त्रें तिखटें । निखळु हा निवटे । मग निःशेष खंता फिटे । मानसींचा ॥ ७ ॥ याकारणें पार्था । उठीं वेगीं वरौता । नाशु करोनि हृदयस्था । संशयासी ॥ ८ ॥ ऐसें सर्वज्ञाचा बापु । जो श्रीकृष्णु ज्ञानदीपु । तो म्हणतसे सकृपु । ऐकें राया ॥ ९ ॥ तंव या पूर्वापर बोलाचा । विचारूनि कुमरु पंडूचा । कैसा प्रश्नु अवसरींचा । करिता होईल ॥ २१० ॥ ते कथेची संगति । भावांची संपत्ति । रसाची उन्नति । म्हणिपेल पुढा ॥ ११ ॥ जयाचिया बरवेपणीं । कीजे आठां रसांची वोवाळणी । जो सज्जनाचिये आयणी । विसांवा जगीं ॥ १२ ॥ तो शांतुचि अभिनवेल । ते परियसा मऱ्हाटे बोल । जे समुद्राहूनि सखोल । अर्थभरित ॥ १३ ॥ जैसें बिंब तरी बचकें एवढें । परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें । शब्दाची व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी ॥ १४ ॥ नातरी कामितयाचिया इच्छा । फळे कल्पवृक्षु जैसा । बोलु व्यापकु होय तैसा । तरी अवधान द्यावें ॥ १५ ॥ हें असो काय म्हणावें । सर्वज्ञु जाणती स्वभावें । तरी निकें चित्त द्यावें । हे विनंती माझी ॥ १६ ॥ जेथ साहित्य आणि शांति । हे रेखा दिसे बोलती । जैसी लावण्यगुणकुळवती । आणि पतिव्रता ॥ १७ ॥ आधींच साखर आवडे । तेचि जरी ओखदा जोडे । तरी सेवावी ना कां कोडें । नावोनावा ? ॥ १८ ॥ सहजें मलयानिळु मंदु सुगंधु । तया अमृताचा होय स्वादु । आणि तेथेंचि जोडे नादु । जरी दैवगत्या ॥ १९ ॥ तरी स्पर्शें सर्वांग निववी । स्वादें जिव्हेतें नाचवी । तेवींचि कानांकरवीं । म्हणवीं बापु माझा ॥ २२० ॥ तैसें कथेचें इये ऐकणें । एक श्रवणासी होय पारणें । आणि संसारदुःख मूळवणें । विकृतीविणें ॥ २१ ॥ जरी मंत्रेंचि वैरी मरे । तरी वायां कां बांधावीं कटारें ? । रोग जाय दूधसाखरें । तरी निंब कां पियावा ? ॥ २२ ॥ तैसा मनाचा मारु न करितां । आणि इंद्रियां दुःख न देतां । एथ मोक्षु असे आयता । श्रवणाचिमाजि ॥ २३ ॥ म्हणौनि आथिलिया आराणुका । गीतार्थु हा निका ज्ञानदेवो म्हणे आइका । निवृत्तिदासु ॥ २२४ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥ श्लोक ४२, ओव्या २२४.

★

**अन्वयार्थ**—**तस्मात्**—त्याअर्थी—**अज्ञानसंभूतम्**—अज्ञानापासून—अविवेकामुळें उत्पन्न झालेल्या—**हृत्स्थं**—बुद्धींत असलेल्या—**आत्मनः**—आत्म्याविषयींच्या—**एनं संशयं**—या संशयाला—**ज्ञानासिना**—शोकमोहादि दोषांना घालविणाऱ्या यथार्थज्ञानरूप तरवारीनें—**छित्वा**—तोडून—**योगं**—ज्ञानसाधनभूत कर्मानुष्ठान—**आतिष्ठ**—कर—**हे भारत**—हे अर्जुना ! आतां अगोदर—**उत्तिष्ठ**—युद्धाला ऊठ ४२.

[ अशी स्थिति आहे मग त्याच्या संशयाच्या नाशाला उपायच कांहीं नाहीं असें म्हणशील तर—उपाय आहे ] अरे ! तो संशय इतका जरी वाढला, तरी त्याला स्वाधीन करून घेण्याला एक उपाय आहे; तीव्र चांगले ज्ञानखड्ग जर हातीं असेल ६. तर त्या ज्ञानरूपी तीक्ष्ण शस्त्राच्या योगानें हा संपूर्ण नाहींसा होतो; आणि मग त्या संशयाचा मनांतून निःशेषतया संमूळ नाश होतो ७. म्हणून अर्जुना ! तूं आपल्या मनांतील सर्व संशयांचा नाश करून लवकर ऊठ पाहूं ८. संजय म्हणतो राजा धृतराष्ट्रा ऐक. ज्ञानीजनांचे जनक जे केवळ ज्ञानदीपच असे जे भगवान् श्रीकृष्ण, ते अशा रीतीनें मोठ्या कृपेनें अर्जुनास म्हणाले ९. तेव्हां ह्या सर्व पूर्वापर, मागच्या पुढच्या बोलण्याचा विचार करून तो अर्जुन पुढे समयोचित कसा प्रश्न करील २१०. त्या कथेची संगतवार जुळणी, त्यांतील अभिप्रायाची अर्थशोभा व रसाची उत्कर्षपूर्ण गोडी पुढें सांगण्यांत येईल ११. ज्या रसाच्या बोलाच्या चांगलेपणावरून बाकीचे आठहि रस ओंवाळून टाकावे आणि जो सज्जनांच्या बुद्धीला ह्या जगतामध्यें विश्रांतीचें स्थान होय १२. श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात—आतां तो शांत रसच माझ्या मराठी बोलापासून अपूर्वतेने प्रगटेल व जे समुद्रापेक्षां गंभीर असून अर्थभरित आहेत, ते मराठी बोल ऐका १३. जसें सूर्यबिंब हें बचकेंत मावण्याएवढेंच दिसतें, तरीपण त्याचे प्रकाशाला त्रिभुवनसुद्धां अपुरे पडते—तशी या शब्दांची व शब्दार्थाची व्याप्ति—अर्थबोधकता फार मोठी आहे असें अनुभवास येईल १४. किंवा, कल्पवृक्ष जसा कामी जनांच्या इच्छेप्रमाणें फळें देतो, तसें हे बोल, ही अर्थपूर्ण शब्दसंहिती सर्व इच्छा पूर्ण करणारी इच्छित—फलदायी आहे; म्हणून ह्यांच्याकडे नीट लक्ष पुरवावें १५. पण हे असो तुम्हांला अधिक काय सांगावें ! जे सर्वज्ञ श्रोते आहेत त्यांना आपोआप सर्व काहीं समजतेच आहे तेव्हां नीट लक्ष द्यावें; एवढीच माझी विनंति आहे १६. ज्याप्रमाणें एखादी स्त्री रूपसुंदर, सौंदर्य, गुण, कुलशील यांनी संपन्न आणि पतिव्रताहि असावी त्याप्रमाणें या माझ्या बोलण्याचे पद्धतींत शांतरस व इतर सर्व रसालंकार याची जोड रेषा असल्याचे तुम्हास स्पष्ट दिसेल १७. अगोदरच साखरेची आवड आणि त्यात तीच जर औषधाच्या बरोबर अनुपानांत मिळाली तर मग रोग्याने तिचे आनंदानें वरचेवर सेवन कां न करावे ? १८. मलय पर्वतावरील वारा—स्वभावतःच सुगंध व मंद असा वाहात असतो. त्यांतच त्याला जर अमृताची गोडी प्राप्त झाली. आणि दैवयोगानें तेथेंच जर पंचम—सुरासारखा सुमधुर नाद ऐकावयास मिळाला १९. तर तो वारा आपल्या स्पर्शानें जसें सर्वांगास शांत करील आणि आपल्या गोडीनें जिव्हेला समाधान देईल, तसेंच मधुर सूर ऐकल्यावर कानाकडून वाहवा म्हणवील व त्यास आपली धन्यता वाटेल २२०. त्याचप्रमाणें हीच कथा ऐकल्यानें होणार आहे. एकतर कानांचें पारणें फिटेल, आणि दुसरे संसार-दुःख कांहींएक कष्ट न होतां, आपोआपच समूळ नाहींसें होईल २१. जर मंत्रानेंच शत्रूचा नाश होईल तर मग कंबरेला कट्यार व्यर्थ कां बांधावी ? तसें दूध-साखरेनेंच जर रोग समूळ जात असेल तर कडूनिंबाच्या रसाचे सेवन कां करावें ? २२. त्याचप्रमाणें मनाला न जिकतां व इंद्रियांना दुःख न देतां केवळ या गीता-श्रवणानेच आयताच [ अगदीं घरबसल्या ] मोक्ष प्राप्त होतो २३. म्हणून श्रीनिवृत्तिदास श्रीज्ञानदेव म्हणतात, तुमच्या मनांत जितकी उत्कंठा असेल, तितक्या उत्कंठेनें—प्रसन्नतेने हा गीतेचा अर्थ चांगला ऐका २२४.

१ माजला, वाढला. २ स्वाधीन होतो. ३ ज्ञानरूप तरवार. ४ तीक्ष्ण. ५ अगदी, संपूर्ण. ६ नाहींसा होतो. ७ दुःख, क्षत. ८ वर. ९ प्रसंगाचा, समयोचित. १० जुळणी. ११ अभिप्रायाची. १२ शोभा. १३ वाढ, उत्कर्ष. १४ बुद्धीला, तत्वनिर्णयेच्छेला. १५ अपूर्व प्रकटेल. १६ सूर्याचें मंडळ. १७ अर्थाची. १८ अलंकार वगैरे. १९ कवित्वरचना. २० औषधांत. २१ आनंदानें. २२ वारंवार. २३ मलयपर्वतावरील वारा. २४ पूट. २५ मधुर गान, स्वर. २६ वाहवा वाहवा; शाबास, शाबास. २७ घालवणें. २८ विकाराशिवाय. २९ कटयार. ३० जय. ३१ असलेल्या. ३२ उत्कंठेला.

★

# अध्याय संगति व चवथ्या अध्यायाचें तात्पर्य

**देवें ब्रह्मार्पणत्वें । क्रिया सांगितलीं ।। अध्याय १८, ओवी १४४१**

तिसऱ्या अध्यायांत मुमुक्षूला ज्ञानप्राप्तीकरितां लागणाऱ्या चित्तशुद्धिकरितां नित्यनैमित्तिक कर्मांची कशी आवश्यकता आहे, तीं सांगितली व शास्त्राज्ञेचा अव्हेर करून स्वैर कर्माचरण करणाऱ्यांची निंदाहि केली; तरीपण कर्मानुष्ठान करतेवेळीं त्यांत असणाऱ्या अज्ञानकृत बंधापासून मुक्त होऊन मोक्षप्राप्ति करून घ्यावयाची असेल, तर शरीर, वाणी व मन यांचेंकडून निर्माण .होणारें कर्म एकमेव ब्रह्मार्पण बुद्धीनें करण्याची आवश्यकता आहे. अर्थात् मुमुक्षु नित्य नैमित्तिक कर्में करीत असला तरी मोक्षाकरितां ती ब्रह्मार्पण कशी करावीं, हें सांगण्याकरितांच ' चवथा अध्याय ' प्रवृत्त झाला आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या दृष्टीनें या अध्यायापासून बाराव्या अध्यायाच्या ' अद्वेष्टा सर्वभूतानां ' या श्लोकापर्यंत गीतेंतील ' उपासनाकांड ' आहे. कांहींच्या मतें तिसऱ्या अध्यायापासून सहाव्या अध्यायापर्यंत गीतेंतील कर्मकांड आहे; तरीपण ते कर्म चित्तशुद्धि व वैराग्यद्वारां ज्ञानाचें साधन आहे, असें यांत सांगतात. तें ज्ञान आचार्यद्वारां ज्यास प्राप्त होईल त्याचे ऐश्वर्य सांगण्यांत देवाचा ओढा आहे, हे लक्षांत ठेविलें पाहिजे.

त्याचे अगोदर मंगलाचरणांत श्रीज्ञानेश्वरमहाराज ज्ञान प्राप्त करून घेणाऱ्या भक्तश्रेष्ठ अर्जुनाचें भाग्य वर्णन करतात, व त्यायोगें श्रोत्यांचे अवधान एकाग्र करून घेतात व श्रोत्यांस श्रवणसुखाची मेजवानी होणार, असें सांगून ज्ञानप्राप्तीविषयीं रुचि उत्पन्न करतात.

श्रीज्ञानेश्वरमहाराज या अध्यायाचे वैशिष्ट्य सांगतात, ते असें कीं, श्रवणेंद्रियांनीं गीतेसारखा ठेवा पाहिला हे एक खरोखर महदाश्चर्यच होय ! कारण, अगोदरच गीता म्हणजे आत्मानात्मविवेक सांगणारी गाथा होय, त्यांत तिचे प्रतिपादन करणोरे जगज्येष्ठ भगवान् श्रीकृष्ण परमात्मा असून, भक्तश्रेष्ठ असा अर्जुनासारखा श्रोता ऐकत आहे. असा उत्तम वक्ता, उत्तम श्रोता व योग्य विषय यांच्या त्रिवेणीसंगमाचा योग क्वचितच येतो. या अध्यायाच्या आरंभीं अर्जुनानें प्रश्न विचारलेला नसतांनाहि भगवान् श्रीकृष्ण, अर्जुनाला आपण होऊनच गुह्यतम, रहस्यभूत व आतांपर्यंत बंधु बळीभद्र, वसुदेव, देवकी, लक्ष्मी व सनकादिक या सर्वांपासून चोरून ठेवलेली विवेकाची गोष्ट अर्जुनाजवळ. बोलत आहेत. याविषयीं श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात कीं, अर्जुनावर असलेलें देवाचें असीम प्रेम, हेंच या रहस्यभूत ज्ञान प्रतिपादनाचें प्रवृत्तिनिमित्त होय [ १ ते १९ ]. हे अर्जुना ! मागील अध्यायांत प्रतिपादिलेला निष्काम कर्मयोग अर्थात् ब्रह्मार्पण बुद्धीनें सांगितलेलें कर्माचरण, हे आतांच तुला सांगितलें, असें नसून हा योग मी कल्पाच्या आरंभापासून सांगत आलो आहें. पूर्वी माझ्यापासून, विवस्वत, मनु, इक्ष्वाकु व इतर कांहीं राजर्षि या निष्काम कर्मयोगास परंपरेनें जाणणारे होऊन गेले; परंतु प्रस्तुतकाळीं प्राण्यांचा सगळा भर विषयवासनेवर व भोगसमृद्धिवर पडला व लोक विवेक वैराग्याच्या अभावामुळें व देहतादात्म्य भ्रांतीमुळें विषयसुखच आत्यंतिक सुख मानून त्यांतच रममाण झालें; त्यामुळें त्यांस आत्मबोधाचा पूर्णतया विसर पडला. म्हणूनच निष्काम कर्मयोगहि लुप्तप्राय झाला. [ १६ ते २६ ]. तोंच योग पुनः मी आज तुला युद्धाची गोष्ट क्षणभर बाजूला ठेवून, त्या गडबडीचा विचारहि मनांत न आणतां सांगत आहें, कारण, तूं प्रेमाचा पुतळा, भक्तीचा जिव्हाळा आणि सख्याची तर चित्कळाच आहेस [ २७ ते ३१ ]. यावर अर्जुन अशी शंका करतो कीं, देवा ! आपण हा योग पूर्वी विवस्वतास सांगितला, असें म्हणता; पण तो विवस्वत म्हणजे कोण ? हे तर वाडवडिलांना सुद्धां ठाऊक नाहीं; तर मग त्याला आपण उपदेश केला, हे कसें बरें शक्य आहे ? तसेच हें देवा ! आपले चरित्र माझ्या अल्पमतीस कसें काय समजणार ! तेव्हां हे एकदम खोटे तरी कसें म्हणावे ? तें कांहींहि असो; पण हे देवा ! आपण सूर्याला उपदेश कसा केला, ही सगळी हकीगत मला नीट कळेल, अशा रीतीनें सांगा [ ३२ ते ४० ]. त्यावर भगवंत म्हणतात अरे अर्जुना !

तुझे व माझे आजवर कितीतरी जन्म होऊन गेलेले आहेत; पण तुला आपल्या जन्मांची आठवण नाहीं आणि मला मात्र त्या साऱ्या जन्मांची आठवण आहे. परमार्थत: मी जन्मरहित आहे; पण मी अवतीर्ण होतो व अवतार संपवितो ही जी एक क्रिया दिसते, ती माझ्या आश्रित असणाऱ्या मायेमुळें भासते. मी तत्वतः निराकारच आहे. त्यांत यत्किंचितहि बिघाड न होतां जेव्हां मी मायेचा आश्रय करून कांहीं विशेष कार्यासाठीं सगुणरूपाच्या वेषानें नटतों, तेव्हांच माझे अवतार कार्य भासतें [ ४१ ते ४८ ]. हे अवतार कार्य म्हणजे प्रत्येक युगांत साधूंचें रक्षण व दुष्टांचे निर्दळण आणि तद्वारां धर्मसंस्थापना करणें, हें होय. तसेंच धर्माची व नीतींची योग्य अशी सांगड घालतो, अविचाररूपी काजळी झाडून टाकून विचाररूपी दिवा प्रज्वलित करतो, त्यावेळीं योग्यांना तर आनंदाच्या निरंतर दिवाळीचा दिवस उगवतो. मग संपूर्ण विश्व सत्सुखानें भरून जाते व जिकडे तिकडे लोक धर्माचरण करीत राहिल्यानें एकमेव धर्मच जगांत नांदूं लागतो व भक्तजन सात्विकतेनें परिपूर्ण होतात. याच कार्याकरितां मी प्रत्येक युगांत अवतार घेतो. ही 'अवतार मीमांसा' जो जाणतो तोच खरा ज्ञानी. किंबहुना ! हेंच माझें अवतार कार्य होय, असे तत्त्व जें काम, क्रोध, भय यापासून मुक्त असतील त्या तत्त्वज्ञांसच नितान्त अचूकपणें समजतें. ते ज्ञानी मद्रूपच असतात. तसेंच मी माझें अजत्व कायम ठेवून जन्मतों, अक्रिय असूनहि कर्म करतों, हें माझें अलिप्तत्व जाणणारा परममुक्त होय. तो व्यवहारांत वागत असल्याचे दिसलें; तरीहि तो अहंकारास व देहतादात्म्यास प्राप्त होत नाहीं म्हणून तो जीवन्मुक्त देहान्तीं मद्रूपतेस म्हणजे विदेह कैवल्यास प्राप्त होतो [ ४९ ते ६५ ]. सहज विचार करून पाहिलें, तर जें अशी माझी भक्ति करतात त्यांच्यावर मीहि तितक्याच प्रमाणांत प्रेम करतो; असें पहा कीं, जेवढे म्हणून मनुष्यप्राणी आहेत, तेवढ्या सर्वांची स्वाभाविक प्रवृत्ति माझी भक्ति करण्याकडेच असते; पण ज्ञान नसल्यामुळें त्यांचें सर्व बिघडतें अर्थात् तें बुद्धिभेदास प्राप्त होऊन स्वगत-सजातीय-विजातीय भेदरहित, द्वैतनिरपेक्ष एक, असा जो मी, त्या माझ्या ठिकाणीं अनेकत्वाची कल्पना करतात. वास्तविक मी अखंड, एकरस, अभेदरूप असतांना तेथें भेद पाहतात, नामरहितास नांवें देतात, तत्वत: जो चर्चेचा अविषय आहे, त्यास देव-देवी, असें म्हणतात. प्रत्येक जण भेदबुद्धिला वश होऊन निरनिराळ्या कामना मनांत धरून त्या कामना पूर्तीसाठीं निरनिराळ्या देव-देवतांची कल्पना करून त्या देवतांची उपासना करतात. स्वभावतः भजनशील अशा सकळ मनुष्य जातांच्या यच्चयावत् उपासनांचा मी केवळ साक्षी आहे. येथें ज्याच्या त्याच्या भावनेनुरूप फलप्राप्ति होते [ ६६ ते ७६ ]. आतां ब्राह्मणादि चार वर्णांतील सर्वलोक वस्तुत: एकच खरें; पण त्यांच्या ठिकाणीं असणाऱ्या गुण कर्म व विभिन्न स्वभावधर्म यांच्या अनुरोधानें मी त्यांची चार वर्णांत, वर्गांत विभागणी केली आहे. प्रकृतीगत गुणभेदानुरूप त्यांची कर्मेंहि वाटून दिलीं आहेत. अशी ही गुणकर्मानुरूप वर्णभेद व्यवस्था असल्यामुळें वास्तविक 'वर्णभेद संस्थे'चा कर्ता मी नाही. ही व्यवस्था माझ्या सत्तेवरच रूढ झाली असली म्हणजे माझ्यावांचून हीं व्यवस्थिति राहूं शकत नाहीं; तरीपण ही व्यवस्था मी केली असें मात्र नाहीं. हे ज्यानें तत्त्वत: ओळखलें तो कर्मबंधनापासून मुक्त होतो. शिवाय हरएक मनुष्यानें आपापल्या वाट्यांस आलेली कर्में यथाशास्त्र ब्रह्मार्पण बुद्धीनें केली तर तींच त्यास कर्मबंधांतून सोडविण्यास कारण होतात, यांत संशय नाहीं [ ७७ ते ८४ ]. अर्जुना ! यांत आणखी महत्त्वाची गोष्ट आहे, ती म्हणजे कर्म, अकर्म आणि विकर्म कशाला म्हणावें ? त्यांची लक्षणें कोणती ? याचा विचार करतां करतां मोठमोठाले चिकित्सक, चांगले चांगले क्रान्तदर्शी, दूरदर्शी पुरुषहि घोटाळ्यांत पडतात; मूढ बनतात. किंबहुना ! ! भ्रमामुळें कर्मपाशांतहि सांपडतात. मग त्या बाबतींत बापड्या, बिचाऱ्या सामान्यांची काय कथा ? म्हणून आतां महत्त्वपूर्ण अशा कर्माकर्म विवेकांतील मार्मिकता तुला सांगतों. सर्व कर्में घडत असतां किंवा सर्व कर्मांचे आचरण करीत असतांहि तत्वत: आपण तें कर्म करीत नाहीं, असा आपला दृढनिश्चय ठेवणें व कर्मफलाची मुळींहि आशा न ठेवणें [ अर्थात् कर्तृत्व अहंकार व फलासक्ति सोडून कर्में केली म्हणजे ती ज्ञानद्वारां मोक्षाला कारणीभूत होतात ] व आपली नैष्कर्म्यता जशीच्या तशी कायम आहे, अशा निश्चयानें राहणें हीच खरी मार्मिकता होय.

किंबहुना ! ! आपल्यावांचून दुसरेंपणानें जगांत कांहींच नाहीं. म्हणून ज्याचा कर्तव्यबुद्धिरहित आपल्या नैष्कर्म्यतेचा बोध दृढ झालेला असतो, असें असतांहि इतर लोकांस कर्म करीत असलेला दिसला तरीहि तो उपर्युक्त लक्षणावरून, कृतकृत्य, प्राप्तपुरुष आहे, असें जाणावें. उपरिनिर्दिष्ट मार्मिकता, युक्ति ज्यास प्राप्त झाली तो तत्त्ववेत्ता दिसण्यांत कर्माचरण करीत असला किंवा सामान्य माणसासारखा दिसला, तरीहि तो दृढापरोक्षज्ञानी आपलें नैष्कर्म्य पूर्णपणें जाणत असतो. किंबहुना [ **' एकं विज्ञानेन सर्वं विज्ञातं भवति '** एक ब्रह्म जाणले असतां सर्व जाणलें जाते या श्रुतिप्रतिपादित विचारदृष्टीनें ] त्यानें संपूर्णविश्व पाहिलें नसतांहि पाहिल्याप्रमाणेंच आहे; कांहीं न करितांहि सर्व कांहीं केल्याप्रमाणेंच आहे; यथायोग्य वस्तूंचा उपभोग न घेतांहि त्या भोगल्याप्रमाणेंच आहेत. एका ठिकाणीं तो बसून असला तरी सर्वत्र तो गेल्यासारखाच आहे; फार कशाला ! तो स्वतः अंगानेंच विश्वरूप झालेला असतो. [ कारण तत्त्ववेत्त्यास जगदधिष्ठान ब्रह्माचें आत्मत्वेंकरून दृढापरोक्षज्ञान झालेलें असतें व ब्रह्माच्या ठिकाणीं संपूर्ण विश्व अध्यस्त असल्यामुळें ब्रह्माची सर्वत्र अधिष्ठानरूपानें साधारण व्याप्ति आहे. म्हणूनच ब्रह्माचे अपरोक्षज्ञान झाल्यामुळें त्याचें ठिकाणीं अध्यस्त असणारें संपूर्ण जगत सामान्यरूपेंकरून आपोआपच जाणलें जाते [ ८९ ते १०२ ].

तो तत्त्ववेत्ता पुरुष शरीर तादात्म्यरहित असून फलोपभोगाविषयीं निरिच्छ असतो व संतोषाच्या गाभाऱ्यांत आत्मबोधाचें सदैव सेवन करीत असतो. म्हणून यदृच्छेनें वेळेनुसार जें जें मिळेल त्यांतच तो संतुष्ट असतो. त्याला आपलें व परकें असा भेदमात्र नसतो. किंबहुना ! ! संपूर्ण विश्व ज्याला आपल्याहून वेगळें उरतच नाहीं, मग त्याला कर्म ते कसलें ? व त्याला बाधा तरी काय करणार ? ज्या द्वैतापासून मत्सर, भय, इत्यादिकांची उत्पत्ति होते, तें द्वैत ज्याच्या ठिकाणीं अजिबात उरलेलें नसतें, तो निर्मत्सर आहे, हे काय शब्दांनीं बोलून दाखविलें पाहिजे ? अशा रीतीनें तो सर्व प्रकारें मुक्त असूनहि, कर्म करीत असला तरीहि कर्मरहित आहे. ती लीलेनें, कौतुकानें त्यानें केलेली यज्ञादिक कर्में हीं सरतेशेवटीं त्याच्या ऐक्यभावनेमुळें ऐक्यालाच मिळतात. कारण, हें यज्ञरूपीं कर्म व तें करणारा मी, किंवा या यज्ञांत हा मी भोक्ता, असा भेद त्याच्या बुद्धींत नसतो [ कारण ब्रह्मात्मैक्य ज्ञानानें कर्माविषयींची कर्तृत्व–भ्रान्ति व भोग्याविषयींची भोक्तृत्व–भ्रान्ति मुळींहि राहिलेली नसतें ] म्हणून असा आत्म्याच्या ठिकाणीं स्थिर बुद्धि असलेला पुरुष म्हणजे यच्चयावत् कर्म ब्रह्मरूपच आहेत, असें साम्य ज्याच्या दृढ प्रतीतीस आलें, त्यानें कर्तव्य कर्में केली तरीहि तें तत्त्वतः नैष्कर्म्यच होय [ १०३ ते १२१ ]. आतां ज्यांनीं विवेकयुक्त व वैराग्ययुक्त होऊन योगरूप अग्नीची उपासना स्वीकारली आहे व रात्रंदिवस यज्ञ करण्यांत मग्न होऊन ज्यानें गुरुवाक्यरूपीं अग्नींत मनासह अविद्येची आहुती देऊन हवन केलें आहे व दैवयज्ञाचे उपासक, ब्रह्मरूप अग्नीचें उपासक, इंद्रियसंयमाग्नींचे उपासक, इंद्रियाग्नीचे उपासक, इंद्रियांची व प्राणांची सर्व कर्में सम्यक् ज्ञानानें प्रदीप्त झालेल्या आत्मसंयमरूप योगाग्नींत आहुती देणारें, तसेंच द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ, योगयज्ञ, वाग्यज्ञ, ज्ञानयज्ञ, व्रतयज्ञ या विभिन्न स्वरूपाच्या साऱ्यांच्याच यज्ञक्रिया शेवटीं एकमेव मोक्षरूप फलप्राप्तीसच उपकारक आहेत. त्यांनीं या योगयज्ञादिकांच्या द्वारें मनाच्या ठिकाणीं असणारे मल-विक्षेपादिक सर्वच दोष धुवून टाकलेलें असतात. तसेंच सर्व अज्ञान नाहींसें झाल्यामुळें उर्वरित असें ज्ञानच राहते. जेथें यज्ञकर्त्यांच्या इच्छा पूर्ण होतात, यज्ञक्रियाहि संपते, जेथून यच्चयावत् क्रिया माघारी परतून नाहींशा होतात, जेथें विचाराचा प्रवेश होत नाहीं, तर्कहि चालत नाहीं, द्वैत दोष संपर्कानें जें मुळींच लिप्त होत नाहीं, असें जें अनादि सिद्ध, शुद्ध, ज्ञानस्वरूप, ब्रह्म तें ब्रह्मनिष्ठ पुरुष ' मी ब्रह्म आहे ' या मंत्रद्वारें सेवन करतात. किंबहुना ! ! ब्रह्मवेत्ते ब्रह्मरूप होतात. योग यज्ञादिक हें यज्ञ खरें; पण त्यास ज्ञानयज्ञाची सर येत नाहीं. अंतरांत ज्ञेय ब्रह्मानंदाचा ब्रह्मात्मैक्य ज्ञानानें दृढतर अनुभव आल्यानें प्रवृत्ति पांगळी होते. तर्काची दृष्टि जाते. किंबहुना ! ! इंद्रियांना विषयसंगाचा परिपूर्णतया विसर पडतो. मनाचें मनपणच नाहींसे होते. जेथें शब्दाची धांवहि खुंटतें, तसेंच वैराग्याचा पांग फिटतो, विचाराची हांव संपते व ज्या ठिकाणीं सहजच आत्मस्वरूप प्रगट होते, तें ज्ञान होय; अशी ही ज्ञानाची सर्वोत्कृष्टता व महती आहे [ १२२–१६४ ]. अरे अर्जुना ! तें बरवें

ज्ञान लाभावें, असें मनांत असेल तर शरीरानें, मनानें, आणि जीवानें संतांच्या चरणीं लागून, गर्वरहित होऊन संत-सेवारूपीं दारवंठा स्वाधीन करून घेणें, हाच एकमेव ज्ञानप्राप्तीचा उपाय होय. संतांच्या उपदेशानें अंतःकरण ज्ञान-संपन्न होऊन ब्रह्माप्रमाणें शंकारहित होईल. अर्थात् जेव्हां श्रीगुरुकृपा होईल, तेव्हां चित्तांत ब्रह्मात्मैक्य ज्ञानाचा उदय होऊन मोहरूपीं अंधकार पार नाहींसा होईल. मग यत्किंचितहि भेद-भ्रांति राहणार नाहीं. एकंदरींत पाहतां ज्ञाना-सारखी पवित्र अशी दुसरीं कोणतीच वस्तु नाहीं. ज्ञानाची पवित्रता ही फक्त ज्ञानाच्याच ठिकाणीं आहे. जो आत्म-सुखाच्या गोडीनें सर्व विषयांना विटतो, ज्याच्या ठिकाणीं इंद्रियांना अजिबात मान उरत नाहीं, जो कशाचीहि इच्छा मनांत बाळगीत नाहीं, जो प्रकृतीकडून होणाऱ्या कर्मांचे कर्तृत्व आपल्या स्वतःकडे घेत नाहीं अशा श्रद्धावानास, ज्या ज्ञानांत सोलीव शांतीची वसती असतें, तें ज्ञान शोधीत येऊन निश्चित प्राप्त होतें; पण त्याची परिणती मात्र सर्वत्र ब्रह्मभाव व सर्वत्र शांतीच प्रतीत होण्यांत होते. हेंच ज्ञानाचे अंतिम साध्य होय [ १६९ ते १९२ ]. ज्ञानप्राप्ति झालेली नसली, पण नुसती ज्ञानाची विशुद्ध तळमळ, तीव्र इच्छा असली तरीहि त्याला ज्ञानप्राप्तीची कांहींतरी आशा आहे; येव्हवीं, या शरीरांत येऊन ज्यास संयमाग्नीची सेवा घडत नाहीं व ज्यास मनांत ज्ञानाविषयीं खरोखर आस्थाहि नाहीं, तो संशयरूप अग्नींत पडला, असें समजावें. तसेंच जो विषयसुखानें रंगून जातो व ज्ञानाविषयीं तर बेपर्वा असतो, तो संशयानें घेरला जाईल, यांत संशय नाहीं. या रीतीनें जो संशयांत पडला, त्याचें ऐहिक जीवनहि नीट-धड राहत नाहीं; मग पारलौकिक सुख तर दूरच. त्यांचा निःसंशय घात झाला, असें समज. कारण संशयापेक्षां मोठे घोर असें पातक कोणतेंहि नाहीं. हा संशय म्हणजे प्राण्याला विनाशाचें जणुं एक जाळेंच होय. जेथें यथार्थ ज्ञानाचा अभाव असतो, तेथेंच हा संशय असतो. जेव्हां अज्ञानाचा निबिड काळोख असतो तेव्हांच हा संशय वाढतो व त्यामुळें श्रद्धेचा मार्ग सर्वतोपरी बंद पडतो. किंबहुना ! ! संशयात्मक मनुष्यास त्याची बुद्धि व हृदय, हीं दोन्ही संशयग्रस्त झाल्यामुळें सर्व त्रैलोक्यहि संशयात्मकच दिसूं लागते [ १९२ ते २०६ ].

तो संशय इतका वाढला तरीहि ज्ञानरूपी तीक्ष्ण खड्ग जर हातीं असेल तर या बलवत्तर संशयाचाहि संपूर्ण नाश करतां येतो व मनावरील सर्वच्या सर्व मळ पूर्णतया नाहीसें होतात. म्हणून हें अर्जुना ! तूं ज्ञानद्वारां आपल्या मनांतील संशयांचा नाश कर [ २०७ ते २०८ ]. यानंतर श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात : माझ्या या ग्रंथांत मराठी बोलापासून शान्तरसच परमोत्कर्षरूपेंकरून प्रगटेल व त्यांत समुद्रापेक्षांहि गंभीर व अर्थभरित अशीच पदयोजना आहे. त्यांतील शब्द वरवर दिसण्यांत लहान असलें तरी अर्थप्रकाशनाच्या बाबतींत सर्वतोपरी समर्थ असल्याचें अर्थात् शब्दार्थांची व्याप्ति अमर्याद असल्याचें अनुभवास येईल. तसेंच माझ्या ग्रंथांत साहित्य, शब्दालंकार, अर्था-लंकार यांचा आविष्कार आणि तत्त्वविवेचन यांचा उत्कृष्ट, सुमधुर समन्वय आढळेल. या ग्रंथश्रवणानें संसारदुःखाची आत्यंतिक निवृत्ति होऊन, नित्यनिरतिशय सुखाची प्राप्ति होईल. यांत मनाला न मारतां, इंद्रियांना दुःख न देतां, केवळ पूर्णतया अवधान देऊन ऐकल्यानेंच घरबसल्या मोक्ष मिळणार आहे. [ या चवथ्या अध्यायापासून 'कर्में ईशु भजावा' अशा स्वरूपाच्या "देवताकांडास" सुरुवात झाली आहे. या अध्यायांत 'निष्कामकर्मयोगा'चे वर्णन करून ईश्वराच्या अवताराचे प्रवृत्तिनिमित्तहि सांगितलेनंतर कर्तव्य कर्मापासून च्युत करणारी देहासक्ति सोडून धर्म्य कर्मा-चरण करणे ऐहिक व पारत्रिकदृष्ट्या हिताचे आहे. त्यांत 'यज्ञसंस्थेचे' वर्णन करतेवेळीं सर्व यज्ञांत 'ज्ञान यज्ञ' हा श्रेष्ठ आहे. कारण, अखिल विश्व म्हणजे आपणच अशा या सर्वात्मकत्व ज्ञानामुळें प्राप्त-उचित-कर्तव्यकर्म करूनहि ज्ञानी 'नैष्कर्म्य' स्थितींत असतो. निष्क्रिय स्थितींत नव्हे. असे कर्माला अकर्म करणाऱ्या ज्ञानाची महती सांगून तें ज्ञान श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ गुरुपासून मिळवून त्या तीक्ष्ण ज्ञानखड्गाने सर्व कर्तव्याकर्तव्यविषयक संशयाचा निरास करून कर्तव्यकर्म करीत रहावे असें या अध्यायांत महत्वाने सांगितले आहे. ] म्हणून सुप्रसन्न मनानें मी जो गीतार्थ सांगणार, त्याकडे चांगले अवधान द्या, अशी माझी विनंती आहे; असें श्रीनिवृत्तिनाथांचें शिष्य श्रीज्ञानदेव म्हणतात [ २०९ ते २२५ ].

[ या संपूर्ण चवथ्या अध्यायांतील नकाशे क्रमांक ४ व ५ पहावेत ]



# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय पांचवा

अर्जुन उवाच :—

संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि । यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥ १ ॥

मग पार्थु श्रीकृष्णातें म्हणे । हां हो हें कैसें तुमचें बोलणें । एक होय तरी अंतःकरणें । विचारूं ये ॥ १ ॥ मागां सकळ कर्मांचा संन्यासु । तुम्हींचि निरोपिला होता बहुवसु । तरी कर्मयोगीं केवीं अतिरसु । पोखीतसां पुढती ? ॥ २ ॥ ऐसें द्व्यर्थ हें बोलतां । आम्हां नेणतयांच्या चित्ता । आपुलिये चाडें श्रीअनंता । उमंजु नोहे ॥ ३ ॥ ऐकें एकसारातें बोधिजे । तरी एकनिष्ठचि बोलिजे । हें आणिकीं काय सांगिजे । तुम्हांप्रति ॥ ४ ॥ तरी याचिलागीं तुमतें । म्यां रांउळासि विनविलें होतें । जें हा परमार्थु ध्वनितें । न बोलावा ॥ ५ ॥ परी मागील असो देवा । आतां प्रस्तुतीं उकलु देखावा । सांगें दोहींमाजि बरवा । मार्गु कवणु ॥ ६ ॥ जो परिणामींचा निर्वाळीं । अचुंबितु ये फळा । आणि अनुष्ठितां प्रांजळीं । सावियांचि ॥ ७ ॥ जैसें निद्रेचें सुख न मोडे । आणि मार्गु तरी बहुसाल सांडे । तैसें सोहोकांसन सांगडें । सोहपें होय ॥ ८ ॥ येणें अर्जुनाचेनि बोलें । देवो मनीं रिझले । मग होईल ऐकें म्हणितलें । संतोषोनियां ॥ ९ ॥ देखा कामधेनु ऐसी माये । सदैवा जया होये । तो चंद्रुही परी लाहे । खेळावया ॥ १० ॥ पाहे पां श्रीशंभूची प्रसन्नता । तया उपमन्यूचिया आर्ता । काय क्षीराब्धि दूधभाता । देइजेचिना ? ॥ ११ ॥ तैसा औदार्याचा कुरुठा । श्रीकृष्णु आपु जाहालिया सुभटा । कां सर्व सुखांचा वसौटा । तोचि नोहावा ? ॥ १२ ॥ एथ चमत्कारु कायसा । गोसांवी श्रीलक्ष्मीकांताऐसा । आतां आपुलिया सवेसा । मागावा कीं ॥ १३ ॥ म्हणौनि अर्जुनें म्हणितलें । तें हांसोनि येरें दिधलें । तेंचि सांगेन बोलिलें । काय कृष्णें ॥ १४ ॥

श्रीभगवान् उवाच :—

संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ । तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय पांचवा

**अन्वयार्थ**—**हे कृष्ण**—हे कृष्णा !—**कर्मणां संन्यासं**—कर्माचा संन्यास [ एकदां सांगतोस ]—**च पुनः**—आणि पुनरपि [ **कर्मणां** ] **योगं**—शास्त्रोक्त कर्माचें अनुष्ठान करावयास—**शंससि** — सांगतोस—[ यास्तव ]—**एतयोः**—या दोहोंतील — **यत् एकं** — जें एक — **श्रेयः**— अधिक चांगलें श्रेयःसाधन असेल – **तत्**—तें—**मे**—मला – **सुनिश्चितम्**—अगदीं निश्चयानेंच—**ब्रूहि**- सांग १.

मग अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला, " अहो, देवा ! असे कसे हें तुमचें [ दुटप्पी ] बोलणें ? तुम्ही एक कांहीं तरी निश्चित असे सांगाल तर त्यासंबंधीचा मनाने कांहीं विचार करतां येईल १. अगोदर सर्व कर्मांचा त्याग करावा, असें परोपरीनें पूर्वी तुम्हींच निरूपण केलें होते, तरीपण आतां शेवटी मला कर्म करण्याविषयीं पुनः आग्रह कां वाढवितां ? २. हे श्रीअनंता, असें तुमचें द्व्यर्थी—दुटप्पी बोलणें आमच्यासारख्या अज्ञानी जनांच्या मनाला, आमच्या स्वतःच्या बुद्धीने उचित असा उलगडा होत नाहीं ३. हें पहा देवा, एका तत्त्वाचा बोध करावयाचा असेल, तर एकच मार्ग निश्चितपणें सांगावयास पाहिजे हे दुसऱ्यांनीं का आपल्याला सांगावयास पाहिजे ? ४. तरी याकरितांच मीं पूर्वी आपणासारख्या थोर पूज्यांस विनवणी केली होती कीं हे परमार्थांतील गूढ तत्त्वज्ञान संदिग्ध भाषेत सांगू नये ५. पण देवा, ती मागील गोष्ट राहूं द्या; प्रस्तुत ज्ञान किंवा योग या दोन मार्गांपैकीं उत्तम मार्ग कोणता, याचा चांगला उलगडा करून सांगा ६. जो मार्ग निवाडा अखेरचा असून जो अचूकपणें [ मोक्षरूपी चरम ] फल [ प्राप्त करून देणारा ] व अनुष्ठान करण्यास सहज सुलभ असेल, असा असावा ७. ज्याप्रमाणें झोपेचे सुख तर मोडूं नये आणि मार्ग तर बराच आक्रमिला जावा—अशा सुखावह वाहनासारखा सोपा व सोयीचा तो मार्ग असावा. [ त्याप्रमाणें तुम्ही मला सुलभ साधन सांगा ] ८. याप्रमाणें अर्जुनाचें बोलणें ऐकल्यावर देव मनांत फार संतुष्ट झाले, आणि मोठ्या उल्हासानें अर्जुनास म्हणाले, " तूं म्हणतोस त्याप्रमाणें होईल, ऐक " ९. श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात अर्जुनाचे भाग्य केवढे मोठे आहे पहा ! ज्याप्रमाणे एखाद्या भाग्यवानास कामधेनूसारखी आई मिळाली तर त्याला खेळण्यास चंद्र, पण तो देखील मिळेल १०. असें पहा कीं, उपमन्यूला श्रीशंकरांनी प्रसन्न होऊन त्यांचे इच्छेप्रमाणें दूधभाताकरितां त्याला क्षीरसमुद्र दिला नाहीं कां ? ११. त्याचप्रमाणें औदार्याचें आश्रयस्थान असा जो श्रीकृष्ण परमात्मा, तो अर्जुनास प्राप्त व स्वाधीन झाला असता मग तो अर्जुनच सर्व सुखाचें वसतिस्थान कां होऊं नये ? [ अर्थात् झालाच पाहिजे ] १२. यांत आश्चर्य ते कसले ? श्रीलक्ष्मीकांतासारखा ज्यास धनी, मिळाला असता आपल्या इच्छेप्रमाणें हवे तसे त्यानें कां मागून घेऊं नये ? १३. म्हणून अर्जुनानें जें जें मागितलें तें तें श्रीकृष्णांनीं त्याला सुप्रसन्न वदनानें दिलें. [ श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात ] श्रीकृष्ण जें काय, म्हणाले तेंच आतां मी सांगेन १४.

**अन्वयार्थ**—**संन्यासः**—अज्ञ मुमुक्षूनें केलेला कर्माचा परित्याग—**च**— व त्यानें केलेलें—**कर्मयोगः**—कर्मानुष्ठान—**उभौ**—हीं दोन्हीं साधनें – **निःश्रेयसकरौ**— मोक्ष देणारीं आहेत—**तु**- परंतु—**तयोः**—त्या दोन साधनांतील – **कर्मसंन्यासात्** – अनात्मज्ञाच्या कर्मत्यागाहून – **कर्मयोगः**—त्याचे कर्मानुष्ठान—**विशिष्यते**—अधिक चांगलें आहे २.

---

१ परोपरीनें. २ आग्रह. ३ पोसतां, वाढवितां. ४ पुढें, पुनः. ५ दोन अर्थाचें, दुटप्पी. ६ इच्छेप्रमाणें. ७ समजूत. ८ एक तत्त्वाचा. ९ पूज्य, श्रेष्ठ गुरुराज. १० कीं. ११ गूढार्थानें, संक्षेपानें. १२ दाखवा. १३ शेवटपर्यंतचा. १४ सोबत, जामीन. १५ बिनचूक, परिपूर्ण. १६ सुलभ. १७ सहज. १८ पुष्कळ. १९ क्रमिला जाईल. २० पालखीसारखें वाहन. २१ बरोबरीचें. २२ संतोषले. २३ मिळवील. २४ दुधाचा समुद्र. २५ घर. २६ प्राप्त. २७ योद्ध्याला, अर्जुनाला. २८ आश्रय, वसतिस्थान. २९ होऊं नये. ३० धनी. ३१ इच्छेप्रमाणें.

तो म्हणे गा कुंतीसुता । हे संन्यासयोगु विचारितां । मोक्षकरु तत्त्वता । दोनीही होती ॥ १५ ॥ तरी जाणां नेणां सकळां । हा कर्मयोगु कीर प्रांजळा । जैसी नाव स्त्रियां बाळां । तोयतरणी ॥ १६ ॥ तैसें सारासार पाहिजे । तरी सोहपा हाचि देखिजे । येणें संन्यासफळ लाहिजे । अनायासें ॥ १७ ॥ आतां याचिलागीं सांगेन । तुज संन्यासियाचें चिन्ह । मग सहजें हें अभिन्न । जाणसी तूं ॥ १८ ॥

ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न काङ्क्षति । निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥ ३ ॥

तरी गेलियाची से न करी । न पवतां चाड न धरी । जो सुनिश्चळु अंतरीं । मेरु जैसा ॥ १९ ॥ आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण । पार्था तो संन्यासी जाण । निरंतर ॥ २० ॥ जो मनें ऐसा जाहला । संगीं तोचि सांडिला । म्हणौनि सुखें सुख पावला । अखंडित । २१ ॥ आतां गृहादिक आघवें । तें कांहीं नलगे त्यजावें । जें घेतें जाहलें स्वभावें । निःसंगु म्हणौनि ॥ २२ ॥ देखैं अग्नि विझोनि जाये । मग जे राखोंडी केवळु होये । तैं ते कापुसें गिंवसूं ये । जियापरी ॥ २३ ॥ तैसा असतेनि उपाधी । नाकळिजे तो कर्मबंधीं । जयाचिये बुद्धी । संकल्पु नाहीं ॥ २४ ॥ म्हणौनि कल्पना जैं सांडे । तैंचि गा संन्यासु घडे । इयें कारणें दोनी सांगडे । संन्यासयोगु ॥ २५ ॥

सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पण्डिताः । एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विन्दते फलम् ॥ ४ ॥

एऱ्हवीं तरी पार्था । जे मूर्ख होती सर्वथा । ते सांख्ययोगुसंस्था । जाणती केवीं ? ॥ २६ ॥ सहजें ते अज्ञान । म्हणौनि म्हणती ते भिन्न । एऱ्हवीं दीपाप्रति काई आनान । प्रकाशु आहाती ? ॥ २७ ॥ पैं सम्यक् येणें अनुभवें । जिहीं देखिलें तत्त्व आघवें । तें दोहींतेंही ऐक्यभावें । मानिती गा ॥ २८ ॥

यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते । एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५ ॥

आणि सांख्यीं जें पाविजे । तेंचि योगीं गमिजे । म्हणौनि ऐक्य दोहींतें सहजें । इयापरी ॥ २९ ॥ देखैं आकाशा आणि अवकाशा । भेदु नाहीं जैसा । तैसें ऐक्य योगसंन्यासा । वोळखे जो ॥ ३० ॥ तयासीचि जगीं पाहलें । आपणपें तेणेंचि देखिलें । जया सांख्ययोग जाणवले । भेदेंविण ॥ ३१ ॥

संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः । योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥

श्री भगवान् म्हणाले:-हे कुंतीसुता, खरोखर विचार केला असतां कर्मयोग आणि कर्मसंन्यास हे दोन्हीहि मोक्षदायकच आहेत १५. तरीपण नाव जशी बायकांना व बालांना पाण्यांतून तरून जाण्यास सुलभ साधन आहे, तसा जाणत्याला व नेणत्याला संसाररूपी समुद्र तरून जाण्यास हा कर्मयोगच खरोखर सुलभ आहे १६. तसा सारासारविचार करून पाहिले असता हाच कर्मयोग सोपा आहे असें दिसतें आणि ह्याचेंच आचरण केलें असतां अनायासानें कर्मसंन्यासाचेंहि फल प्राप्त होते १७. आतां याच कारणाकरितां अगोदर मी तुला कर्मसंन्यासाचें लक्षण सांगेन, म्हणजे हे दोन्ही मार्ग फल देण्याच्या बाबतीत एकच आहेत, असे तूं सहजच जाणशील १८.

**अन्वयार्थ**—**यः**-जो-**न द्वेष्टि**-द्वेष करीत नाहीं-**न कांक्षति**-व आकांक्षा करीत नाहीं-**सः**-तो-**नित्यसंन्यासि**-नित्य संन्यासीच-**ज्ञेयः**-जाणावा-**हि**-कारण-**हे महाबाहो**-हे महापराक्रमी अर्जुना !-**निर्द्वंद्वः**-द्वंद्वरहित पुरुष-**बन्धात्**-बंधापासून-**सुखम्**-अनायासानें-**प्रमुच्यते**-सर्वथा मुक्त होतो ३.

**कर्मसंन्याश्याची** काय स्थिति असते ती पहा. जो गेलेल्या वस्तूची आठवणहि करीत नाहीं, आणि एखादी वस्तु मिळाली नाहीं तर त्या वस्तूची इच्छाहि करीत नाहीं, जो मेरुपर्वताप्रमाणें अंतर्यामीं अगदीं स्थिर असतो १९. आणि पार्था ज्याचें अंतःकरणांत [ स्वशरीराचें ठिकाणीं ] मी [ पणा ] आणि [ शरीरसंबंधी पुत्रादिकांचे ठिकाणीं ] माझें [ पणा ] याची आठवण देखील होत नाहीं, तो कर्मे करीत असता नित्य संन्यासीच आहे असें समज २०. ज्याच्या मनाची अशी स्थिति झाली आहे, त्याला विषयसंगच सोडून गेल्यामुळें त्यालाच अखंड नित्यनिरतिशय सुखाची अनायासे प्राप्ति होते २१. अशा मनुष्याला गृहादिक वगैरे कांहींएक सोडावे लागत नाहीं, कारण "ह्यांचा माझा कांहींएक संबंध नाहीं." असें त्याच्या मनानें स्वभावतःच घेतलेले असतें. म्हणून तेच निःसंग झाले आहेत २२. असें पहा की विस्तव विझून गेल्यावर मग त्याची नुसती राखोंडीच जशी शिल्लक राहते तेव्हा ती पिंजलेल्या कापसांतहि गुंडाळून ठेवितां येतें २३. त्याचप्रमाणें त्याच्या बुद्धींत मी कर्ता आहें, [ त्याचे फल मला मिळाले पाहिजे ] इत्यादि संकल्प नाही. तो शरीरेंद्रियादि उपाधींत असूनहि कर्मबंधांत सांपडत नाहीं २४. म्हणून जेव्हां मनांतील 'मी' व 'माझें' या कल्पना नाहींतशा होतात, तेव्हांच खरा संन्यास घडतो, आणि प्राप्यस्थान एकच असल्यामुळें कर्मसंन्यास आणि कर्मयोग हे दोन्ही सारखे आहेत असे मी म्हणतो २५.

**अन्वयार्थ**—**बालाः**-अज्ञजन-**सांख्ययोगौ**-संन्यास व योग-**पृथक्**-निरनिराळे फल देणारे आहेत, असें-**प्रवदन्ति**-सांगतात-**पण्डिताः न**-पण पंडित-तत्त्ववेत्ते तसें सांगत नाहींत.-**एकम् अपि**-त्या दोहोंतील एका साधनाचाहि-**सम्यक्**-उत्तम प्रकारें-**आस्थितः**-आश्रय केलेला पुरुष-**उभयोः**-त्या दोहोंच्या-**फलं**-फलास-**विन्दते**-संपादन करतो. ४.

एरवी तरी अर्जुना ! जे सर्वस्वीं अज्ञानी आहेत. त्यांना ज्ञानयोग व कर्मयोग यांची व्यवस्था कशी समजेल ? [ त्याचे स्वरूप कसे जाणूं शकतील ? ] २६. ते स्वभावतःच मूर्ख असतात त्यामुळे हे दोन्ही मार्ग भिन्न भिन्न आहेत असें ते समजतात; एरवी अरे ! अनेक दिव्यांचे प्रकाश भिन्नभिन्न असतात कीं काय ? २७. तरीपण [ हे दोन्ही मार्ग तत्त्वतः मोक्षप्राप्तीच्या दृष्टीने एकाच योग्यतेचे आहेत ] या सम्यक् अनुभवामुळे [ व एकाचे चांगले अनुष्ठान केल्यामुळे ] ज्यांनी संपूर्ण [ परब्रह्मरूपी ] तत्त्व [ आत्मत्वाने ] जाणले आहे ते हे दोन्ही योग [ फलदृष्ट्या ] एकच आहेत, असे मानतात २८.

**अन्वयार्थ**—**यत् स्थानं**-जें स्थान-**सांख्यैः**-सांख्यांकडून-**प्राप्यते**-प्राप्त केलें जातें,-**तत्**-तें-**योगैः अपि**-योग्यांकडूनहि-**गम्यते**-क्रमानें प्राप्त केलें जातें. यास्तव-**यः**-जो-**सांख्यं च योगं च**-सांख्य-ज्ञानलक्षण संन्यास-ज्ञाननिष्ठा व योग-त्याचा उपाय-निष्काम ईश्वरार्थ कर्मानुष्ठान-**एकम्**-एकच आहे असें-**पश्यति**-पाहतो-**सः**-तो यथार्थ-**पश्यति**-पाहतो-जाणतो ५.

आणि ज्ञानयोगापासून साक्षात जी [ मोक्ष ] प्राप्ति होते, तीच कर्मयोगापासूनहि [ ज्ञानद्वारां ] होते. म्हणून अशा प्रकारें या दोहोंमध्यें सहजींच ऐक्य आहे २९. हें पहा ! आकाश आणि पोकळी यांत जसा भेद नाहीं, तसा ज्ञानयोग आणि कर्मयोग यांत [ भेद नसून ] ऐक्य आहे असे जो जाणतो ३०. ज्ञानयोग आणि कर्मयोग यांत फळदृष्ट्या तीळमात्र भिन्नभाव नाहीं असे जाणतो त्यालाच ह्या जगतामध्यें उजाडलें, [ ज्ञानप्राप्ति झाली ] व त्यानेंच आत्मस्वरूप पाहिलें असें समज ३१.

**अन्वयार्थ**—**हे महाबाहो**-हे पराक्रमी अर्जुना !-**तु**-पण-**संन्यासः**-खरा संन्यास-परमार्थ, संन्यास म्ह. सांख्य-**अयोगतः**-योगावांचून-**आप्तुं**-प्राप्त होणें-**दुःखं**-कठीण आहे.-**योगयुक्तः**-वैदिक कर्मानुष्ठानानें युक्त असलेला-**मुनिः**-ईश्वराचें मनन करणारा मुनि-**ब्रह्म**-परमार्थ संन्यासाला-**न चिरेण**-लवकरच-**अधिगच्छति**-प्राप्त होतो ६.

जो युक्तिपंथें पार्था । चढे मोक्षपर्वता । तो महासुखाचा निमथां । वहिला पावे ॥ ३२ ॥ येरा योगस्थिति जया सांडे । तो वायांचि गा हव्यासीं पडे । परि प्राप्ति कहीं न घडे । संन्यासाची ॥ ३३ ॥

योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः । सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥

जेणें भ्रांतीपासूनि हिरतलें । गुरुवाक्यें मन धुतलें । मग आत्मस्वरूपीं घातलें । हारौनियां ॥ ३४ ॥ जैसें समुद्रीं लवण न पडे । तंव वेगळें अल्प आंवडे । मग होय सिंधूचि एवढें । मिळे तेव्हां ॥ ३५ ॥ तैसें संकल्पोनि काढिलें । जयाचें मनाचि चैतन्य जाहलें । तेणें एकदेशियें परी व्यापिलें । लोकत्रय ॥ ३६ ॥ आतां कर्ता कर्म करावें । हें खुंटलें तया स्वभावें । आणि करी जऱ्ही आघवें । तऱ्ही अकर्ता तो ॥ ३७ ॥

नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् । पश्यञ्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपन्श्वसन् ॥ ८ ॥

प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि । इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन् ॥ ९ ॥

जे पार्था तया देहीं । मी ऐसा आठऊ नाहीं । तरी कर्तृत्व कैचें काई । उरे सांगैं ? ॥ ३८ ॥ ऐसें तनुत्यागेंवीण । अमूर्ताचे गुण । दिसती संपूर्ण योगयुक्तां ॥ ३९ ॥ एऱ्हवीं आणिकांचिये परी । तोही एक शरीरी । अशेषाही व्यापारीं । वर्ततु दिसे ॥ ४० ॥ तोही नेत्रीं पाहे । श्रवणीं ऐकतु आहे । परि तेथींचा सर्वथा नोहे । नवल देखें ॥ ४१ ॥ स्पर्शासि तरी जाणे । परिमळु सेवी घ्राणें । अवसरोचित बोलणें । तयाहि आथी ॥ ४२ ॥ आहारातें स्वीकारी । त्यजावें तें परिहरी । निद्रेचिया अवसरीं । निदिजे सुखें ॥ ४३ ॥ आपुलेनि इच्छावशें । तोही गा चालतु दिसे । पैं सकळ कर्म ऐसें । रहाटे कीर ॥ ४४ ॥ हें सांगों काई एकेक । देखें श्वासोच्छ्वासादिक । आणि निमिषोन्निमिष । आदिकरूनि ॥ ४५ ॥ पार्था तयाचे ठायीं । हें आघवेंचि आथि पाहीं । परी तो कर्ता नव्हे कांहीं । प्रतीतिबळें ॥ ४६ ॥ जैं भ्रांति सेजे सुतलों । तैं स्वप्नसुखें भुतलों । मग तो ज्ञानोदयीं चेइलों । म्हणौनियां ॥ ४७ ॥

ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः । लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा ॥ १० ॥

आतां अधिष्ठानसंगती । अशेषाही इंद्रियवृत्ती । आपुलालिया अर्थीं । वर्तत

पार्था, निष्काम कर्मानुष्ठानाच्या हातवटीच्या मार्गानें जो मोक्षरूप पर्वतावर चढतो, तो त्या पर्वताचे नित्य निरतिशयानंदरूपी शिखर लवकरच गांठतो ३२. याहून दुसरा, ज्याच्या हातून या निष्काम कर्ममार्गाचे आचरण घडत नाहीं तो [ ज्ञानप्राप्तीविषयींच्या ] व्यर्थच हव्यासात पडतो; परंतु त्याला त्या संन्यासाची [ ज्ञानयोगाची ] प्राप्ती केव्हांच होत नाहीं ३३.

**अन्वयार्थ**—**योगयुक्तः**-जो वर सांगितलेल्या निष्काम कर्मानुष्ठानानें युक्त आहे त्यामुळें—**विशुद्धात्मा**—ज्याचें चित्त अतिशय शुद्ध झालें आहे, त्यामुळेंच—**विजितात्मा** ज्यानें आपल्या देहाला आपल्या स्वाधीन ठेविलें आहे व—**जितेन्द्रियः**—ज्यानें इंद्रियांनाहि जिंकिलें आहे तो—**सर्वभूतात्मभूतात्मा**—ज्याचा आत्मा सर्व भूतांच्या आत्मरूप झाला आहे, असा ज्ञानी होतो—**कुर्वन् अपि**—तो कर्म जरी करीत असला तरी—**न लिप्यते**—त्यानें बद्ध होत नाहीं ७.

ज्यानें आपलें मन भ्रांतीपासून सोडवून घेतले व ते गुरुवाक्योपदेशानें शुद्ध केलें व मग ते मन आत्मस्वरूपाचे ठिकाणीं लीन करून ठेवले ३४. जोंपर्यंत समुद्रांत मीठ पडले नाहीं; तोपर्यंत तें जसें समुद्रापासून वेगळें असून लहान दिसतें व मग जेव्हां तेंच समुद्रांत मिळते तेव्हां समुद्रायेवढेच व्यापक होते; ३५. त्याचप्रमाणें संकल्पापासून वेगळे काढल्यावर ज्याचे मनच चैतन्य स्वरूप झाले आहे तो दिसण्यांत जरीं एकदेशी परिच्छिन्न दिसतो खरें; पण त्यानें त्रिभुवन व्यापिलें आहे ! असें समज ३६. मग त्याला 'मी एक कर्ता', हें एक कर्म' व 'अमुक एक कार्य,' असा हा त्रिपुटीचा भेदव्यवहार स्वभावतःच नाहींसा होऊन बंद पडतो आणि लोकदृष्टया त्यानें जरी सर्व कर्में केलीं तरी [ स्व-दृष्टया अकर्तृत्व जाणत असल्यानें ] तो वास्तविक अकर्ताच आहे ३७.

**अन्वयार्थ**—**तत्वविद्**-तत्त्वज्ञ—**पश्यन्**—डोळ्यांनीं पाहात—**शृण्वन्**-कानांनीं ऐकत—**स्पृशन्**—त्वगिंद्रियानें स्पर्श करीत—**जिघ्रन्**—नाकानें वास घेत—**अश्नन्**-जिभेनें रस चाखीत—**गच्छन्**-पायानें चालत-**स्वपन्**—मन लीन झाल्यामुळें झोप घेत—**श्वसन्**—श्वासोच्छ्वास करीत—**प्रलपन्**—वागिंद्रियानें बोलत—**विसृजन्**-पायो इंद्रियानें विष्टेचा त्याग करीत—**गृह्णन्**—हातांनीं ग्रहण करीत—**उन्मिषन्**—पापण्या उघडीत व—**निमिषन्**— **अपि**--पापण्या झांकीत असतांनाहि—**इन्द्रियाणि**-इंद्रियें—**इन्द्रियार्थेषु**—विषयांमध्यें—**वर्तन्ते**-प्रवृत्त होत आहेत [ मी नव्हे ]—**इति**—असें **धारयन्**—मनांत धरून समजून—**किंचित्**—कांहीं—कोणत्याहि क्रिया—**न एव करोमि**—मी स्वतः करीत नाहींच—**इति**—असें—**युक्तः**—आत्म्यामध्यें चित्ताला स्थिर ठेवून—**मन्येत**—चिंतितो ८–९.

कारण, पार्था, त्याला देहाच्या ठिकाणीं "मी देह आहे" अशा आत्मत्वबुद्धीचीच आठवण नसते तर मग त्याच्या ठिकाणीं 'मी कर्ता आहे' आहे असा कर्तृत्व अभिमान कोठून व कसा उरणार, सांग बरें ? ३८. याप्रमाणें शरीराचा त्याग केल्याविना त्या योगयुक्त पुरुषाचे अंगीं निराकार ब्रह्माचे सर्व गुण, सर्व लक्षणें, स्पष्टपणें दृष्टीस पडतात ३९. एरवीं इतर लोकांप्रमाणें तोही एक शरीरधारी असून, सर्व व्यवहारांत वावरत आहे, असें दिसतें ४०. तोहि नेत्रानें पाहतो, कानांनीं ऐकतो, तरीहि त्या शरीर व्यवहारामध्यें तो मुळींच लिप्त होत नाहीं, हें नवल आहे ! ४१. झालेल्या स्पर्शासहि तो समजतो, तो नाकानें गंधाचा अनुभव घेतो आणि समयोचित, बोलण्याचा व्यवहारहि तो करीत असतो ४२. तो आहाराचे सेवन करतो, टाकावयाची वस्तु ती टाकितो, झोपेच्या वेळीं सुखानें झोंप घेतो ४३. आपले इच्छेप्रमाणें तोहि चालत असतांना दिसतो व त्याचप्रमाणें, ज्या ज्या वेळेस जीं जीं कर्में करावयाचीं तीं ती सर्व करितो, हें खरें; ४४. हें एक एक काय सांगावें हें पहा श्वासोच्छ्वास करणें, डोळ्यांच्या पापण्यांची उघडझाप करणें इत्यादि करून ४५. या सर्व कांहीं गोष्टी त्याचे ठिकाणीं दृष्टीस पडतात, परंतु पार्था, आपल्या आत्मानुभवाचे बळानें तो त्या गोष्टींचा मुळींच कर्ता नसतो ४६. कारण जेव्हां तो भ्रांतिरूप अंथरुणावर निजला होता, तेव्हां स्वप्नसुखानें भुलला होता, परंतु आतां ब्रह्मात्मैक्यज्ञानाचा उदय झाल्यावर तो जागा झाला म्हणून तो कर्ता नव्हे ४७.

**अन्वयार्थ** —**यः**—जो—**कर्माणि**—शास्त्रीय कर्में-**ब्रह्मणि** ब्रह्मामध्यें—ईश्वरामध्यें—**आधाय**-अर्पण करून—**संगं**-फलाची आसक्ति—**त्यक्त्वा**—सोडून—**करोति**—करतो—**सः**—तो—**अम्भसा**—पाण्यानें—**पद्मपत्रम् इव**—कमळाचें पान किंवा पाकळी जशी, त्याप्रमाणें—**पापेन**—पापानें—**न लिप्यते**—लिप्त होत नाहीं १०.

आतां आत्मचैतन्याच्या आश्रयानें सर्व इंद्रियांच्या वृत्ति

१ कर्मयोगानें. २ ब्रह्मसुखाचा. ३ माथा शिखर. ४ सत्वर. ५ कर्मयोग. ६ छंदांत. ७ ज्ञानयोगाची. ८ हिरावून घेतलें. ९ आंत विरवून. १० दिसतें. ११ निराकार ब्रह्माचें. १२ समयोचित. १३ टाकतो. १४ अनुभवाच्या जोरावर. १५ निजला. १६ भुलला. १७ जागा झाला. १८ आत्मा. १९ विषयामध्यें.

आहाती ॥ ४८ ॥ दीपाचेनि प्रकाशें । गृहींचे व्यापार जैसे । देहीं कर्मजात तैसे । योगयुक्ता ॥ ४९ ॥ तो कर्में करी सकळें । परी कर्मबंधा नाकळे । जैसें न सिंपे जळीं जळें । पद्मपत्र ॥ ५० ॥

कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिन्द्रियैरपि । योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये ॥ ११ ॥

देखें बुद्धीची भाष नेणिजे । मनाचा अंकुर नुदैजे । ऐसा व्यापारु तो बोलिजे । शारीरु गा ॥ ५१ ॥ हेंच मैराठे परियेशीं । तरी बाळकाची चेष्टा जैशी । योगिये कर्में करिती तैशीं । केवळा तनु ॥ ५२ ॥ मग पांचंभौतिक संचलें । जेव्हां शरीर असे निदेलें । तेथ मनचि रहाटे एकलें । स्वप्नीं जेवीं ॥ ५३ ॥ नवल ऐकें धनुर्धरा । कैसा वासनेचा संसारा । देहा होऊं नेदी उजगरा । परी सुखदुःखें भोगी ॥ ५४ ॥ इंद्रियांच्या गांवीं नेणिजे । ऐसा व्यापारु जो निपजे । तो केवळु गा म्हणिजे । मानसांचा ॥ ५५ ॥ योगिये तोही करिती । परी कर्में ते नं बांधिजती । जे सांडिली आहे संगती । अहंभावाची ॥ ५६ ॥ आतां जाहालिया भ्रंमहत । जैसें पिशाचाचें चित्त । मग इंद्रियांचें चेष्टित । विकळु दिसे ॥ ५७ ॥ स्वरूप तरी देखे । आंळविलें आइके । शब्दु बोले मुखें । परी ज्ञान नाहीं ॥ ५८ ॥ हें असो काजेंविणें । जें जें कांहीं करण । तें केवळ कर्म जाण । इंद्रियांचें ॥ ५९ ॥ मग सर्वत्र जें जाणतें । तें बुद्धीचें कर्म निरुतें । ओळख अर्जुनातें । म्हणे हरी ॥६०॥ ते बुद्धी धुरे करुनी । कर्म करिती चित्त देऊनी । परी ते नैष्कर्म्यापासुनी । मुक्त दिसती ॥ ६१ ॥ जें बुद्धीचिये ठावूंनि देहीं । तयां अहंकाराची सेचि नाहीं । म्हणौनि कर्म करितां पाहीं । चोखाळले ॥ ६२ ॥ अगा करितेनवीण कर्म । तेंचि तें नैष्कर्म्य । हें जाणती सुवर्म । गुरुगम्य जें ॥ ६३ ॥ आतां शांतरसाचें भरितें । सांडीत आहे पात्रातें । जें बोलणें बोलापरौतें । बोलवलें ॥ ६४ ॥ एथ इंद्रियांचा पांगु । जया फिटला आहे चांगु । तयासीचि आथि लागु । परिसावया ॥ ६५ ॥ हा असो अतिप्रसंगु । न संडी पां कथालागु । होईल श्लोकसंगति भंगु । म्हणौनियां ॥ ६६ ॥ जें मना आकळितां कुवाडें । घाघुसितां बुद्धी नातुडे । तें दैवाचेनि सुरवाडें । सांगवलें तुज ॥ ६७ ॥ जें शब्दातीत स्वभावें । तें बोलींचि जरी फावे । तरी आणिकें काय करावें । कथा सांगें ॥ ६८ ॥ हा

आपआपल्या विषयांत व्यवहार करीत असतात ४८. दिव्याच्या उजेडावर ज्याप्रमाणें घरांतील सर्व व्यवहार चालतात-[ पण स्वतः दिवा त्या व्यवहारापासून अगदीं अलिप्त असतो ] त्याप्रमाणे तो योगयुक्त शारीरिक सर्व कर्में करीत असतो [ पण तो व्यवहारापासून अगदी अलिप्त असतो ] ज्ञान्यांकडून कर्में होत असतात; [ पण ] ४९. कमळाचे पान जसें पाण्यांत असूनहि भिजत नाहीं, तसा तो ज्ञानी सर्व कर्में करतो, तरीपण त्याहि कर्मबंधनानें आकळिला जात नाहीं ५०.

**अन्वयार्थ**--**योगिनः**--कर्माधिकारी गृहस्थ-**कायेन**-केवळ शरिरानें-**मनसा** - केवळ मनानें-**बुद्ध्या** - केवळ बुद्धीनें व-**केवलैः इंद्रियैः अपि**-केवळ नुसत्या इंद्रियांनींहि -**संगं**-फलांविषयींची आसक्ति-**त्यक्त्वा**-सोडून-**आत्मशुद्धये**-चित्तशुद्धीसाठीं-**कर्म**-नित्य व नैमित्तिक कर्म-**कुर्वन्ति**-करितात ११.

पहा ! ज्या कर्मांत बुद्धिपूर्वकत्व दिसत नाहीं व मनाचा विचाराचा अंकुर उगवत नाहीं, असा जो कर्मव्यवहार त्या व्यापाराला 'कायिक कर्म' म्हणतात ५१. हेच यापेक्षां ज्यास्त स्पष्ट करून सांगतों, ऐक.-जसे लहान मुलाचे खेळण्याचे व्यापार [ मन किंवा बुद्धि यांना सोडून कोणतेहि फल नसतांना ] अहंभावरहित होतात; तसे योगी लोकहि इतर लोकाप्रमाणें केवळ देहानेंच [ फलहेतुवांचून ] कर्में करतात ५२. मग अशा प्रकारें हे पांच भूतांचे बनलेले शरीर जेव्हां निजलेलें असतें, तेव्हां स्वप्नांत मन हें एकटेंच व्यापार करीत असतें ५३. अर्जुना हें एक नवल ऐक; या वासनेचा असा अफाट पसारा आहे कीं, ती देहास कळूं देत नाहीं पण त्यांजकडून सुखदुःखे मात्र भोगविते ५४. अरे ! इंद्रियांना ज्याची वार्ताहि नाहीं असा जो व्यवहार उत्पन्न होतो; त्यालाच केवळ मानसिक कर्म असें म्हणतात ५५. योगी लोक तो केवळ मानसिक व्यवहारहि करितात, परंतु ते त्या कर्मानें बांधले जात नाहींत, कारण त्यांनीं अहंकाराची संगतीच टाकलेली असते ५६. जसें पिशाच्याची बाधा-भूतसंचार झालेल्या एखाद्या मनुष्याचें चित्त भ्रमिष्ट झालेलें असतें मग त्या माणसाच्या इंद्रियांचे सर्व व्यापार अव्यवस्थित दिसतात, ५७. [समोर मनुष्य आलें असतां त्याला] त्याचे रूप तर दिसतें, कोणी हांक मारली असतां ऐकूं येते व तो स्वतः मुखानें शब्दांचा उच्चारहि करतो; परंतु त्या त्या साऱ्या क्रियांचे त्याला भान नसतें. [ कारण, चित्त जाग्यावर नसतें म्हणून ] ५८. हे असो; सारांश, फलांवाचून निष्कारण जें जे कांहीं कर्म करणें, तें ते सर्व केवळ इंद्रियांचेंच कर्म होय, असें समज ५९. मग श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले; अरे ! ह्या शिवाय सर्व ठिकाणीं जाणणे किंवा जाणून जें कर्म करणें, तें खरोखर बुद्धीचें कर्म आहे असें समज ६०. ते योगी, बुद्धीला पुढें करून मनःपूर्वक कर्माचें आचरण करितात; परंतु ते वस्तुतः नैष्कर्म्यतेपेक्षांहि मुक्त असल्याचे दिसतात. [ जसा कर्मानुष्ठानांत अहंभाव नसतो तसा कर्म सापेक्ष नैष्कर्म्यतेचाहि अहंभाव नसतो, तर देहासह अहंभावाचाहि समूळ बाध झालेला असतो हे यांतील तात्पर्य होय ] ६१. कारण बुद्धीपासून देहापर्यंत कोठेहि त्यांना अहंकाराची आठवणसुद्धां होत नाहीं. म्हणून ते कर्मानुष्ठान करीत असले तरीहि शुद्धच, अलिप्तच असतात असें समज ६२. अरे ! कर्म करणारा मी आहें, असा कर्तृत्व अहंकार न ठेवितां केलेले जें कर्म तेंच नैष्कर्म्य होय, हें गुरूपासून कळणारें मार्मिक तत्त्व, ते जाणतात ६३. [ श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात ] आतां शांतरसास इतकी भरती आली आहे कीं, तो पूर मर्यादा सोडून पात्रांतून खालीं सांडत आहे ! कारण आम्ही आतां जें शब्दांनी प्रतिपादन करतां येणार नाहीं ते बोललों. ६४. [ हे ऐकण्याचा अधिकारी कोण असें म्हणशील तर ] ज्यांच्या इंद्रियांचें दैन्य-इंद्रियांधीनत्व पार नाहींसें झालें आहे, म्हणजे जो उत्कृष्ट वैराग्य संपन्न आहे त्यालाच हें तात्त्विक भाषण ऐकण्याचा अधिकार आहे ६५. [ मग श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे बोलण्यावर संत म्हणतात ] अरे ! हें विषयांतर करणें पुरें कर; कथेचा संबंध सोडूं नकोस कारण तसे करण्यामुळे श्लोकांच्या संगतीचा बिघाड होईल ६६. जें मनानें आकलन करण्यास अवघड व ऊहापोहपूर्वक विचार करूनहि बुद्धीला जें सांपडत नाहीं तें [ अनाकलनीय तत्त्व ] दैवाच्या अनुकूलतेनें तुला सांगतां आलें ६७. जें स्वभावतःच शब्दमर्यादेच्या पलीकडचे आहे, तें जर बोलण्यांत सांपडलें तर मग इतर गोष्टींचे काय प्रयोजन ? आतां तूं अगोदर ती श्रीकृष्णार्जुनाची संवादात्मक कथा सांग ६८. ऐकणारांची ही उत्कट

१ सर्व कर्में. २ भिजे. ३ खूण. ४ उगवत नाहीं. ५ देहाचा. ६ स्पष्ट रीतीनें. ७ पंचतत्वांनीं. ८ बनलेले. ९ निजलेलें. १० कळणें. ११ मनाचा. १२ बांधले जात नाहींत. १३ कारण. १४ भ्रमिष्ट. १५ अव्यवस्थित. १६ हांक मारलेली. १७ निष्कारण. १८ खरें. १९ पुढें. २० स्थानापासून. २१ देहांचे व्यापर. २२ शुद्ध झाले

आंर्तीविशेषु श्रोतयांचा । जाणोनि दास निवृत्तीचा । म्हणे संवादु दोघांचा । परिसोनि परिसा ॥ ६९ ॥ मग श्रीकृष्ण म्हणे पार्थातें । आतां प्रोप्ताचें चिन्ह पुरतें । सांगेन तुज निरुतें । चित्त देईं ॥ ७० ॥

युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांन्तिमाप्नोति नैष्ठिकीम् । अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ॥ १२ ॥

तरी आत्मयोगें आंथिला । जो कर्मफळाशीं विटला । तो घर रिघोनि वरिला । शांति जगीं ॥ ७१ ॥ येरु कर्मबंधें किरीटी । अभिलाषाचिया गांठीं । कळासला खुंटी । फळभोगाच्या ॥ ७२ ॥

सर्वकर्माणि मनसा संन्यस्याऽऽस्ते सुखं वशी । नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥

जैसा फळाचिये हांवें । तैसें कर्म करी आघवें । मग न कीजेचि येणें भावें । उपेक्षी जो ॥ ७३ ॥ तो जयाकडे वांसु पाहे । तेउती सुखाची सृष्टि होये । तो म्हणे तेथ राहे । महाबोधु ॥ ७४ ॥ नवद्वारें देहीं । तो असतुचि परि नाहीं । करितुचि न करी कांहीं । फलत्यागी ॥ ७५ ॥

न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः । न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १४ ॥

जैसा कां सर्वेश्वरु । पाहिजे तंव निर्व्यापारु । परि तोचि रची विस्तारु । त्रिभुवनाचा ॥ ७६ ॥ आणि कर्ता ऐसें म्हणिपे । तरी कवणें कर्मीं न शिंपे । जे हातुपावो न लिंपे । उदासवृत्तीचा ॥ ७७ ॥ योगनिद्रा तरी न मोडे । अकर्तेपणा सळु न पडे । परि महाभूतांचें दळवाडें । उभारी भले ॥ ७८ ॥ जगाच्या जीवीं आहे । परी कवणाचा कहीं नोहे । जगचि हें होय जाये । तो शुद्धीहि नेणे ॥ ७९ ॥

नाऽऽदत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः । अज्ञानेनाऽऽवृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः ॥ १५ ॥

पापपुण्यें अशेषें । पासींचि असतु न देखे । आणि साक्षीही होऊं न ठके । येरी गोठी कायसी ? ॥ ८० ॥ पैं मूर्तीचेनि भेळें । तो मूर्तचि होऊनि खेळे । परि अमूर्तपण न मैळे । दादुलयाचें ॥ ८१ ॥ तो सृजी पाळी संहारी । ऐसें बोलती जे चराचरीं । तें अज्ञान गा अवधारीं । पंडुकुमरा ॥ ८२ ॥

---

१ उत्कट इच्छा. २ योग्याचें. ३ आत्मज्ञानानें. ४ संपन्न झाला. ५ दुसरा. ६ कर्मफलाची इच्छा. ७ खिळला जडफला. ८ आशेनें. ९ सोडतो. १० वाट. ११ ब्रह्मज्ञान. १२ पहावा. १३ अकर्ता. १४ भंग. १५ समुदाय. १६ देहाच्या. संगतीनें. १७ देह धारण करून. १८ निराकाररपण. १९ प्रभूचें.

इच्छा जाणून श्रीनिवृत्तिदास, श्रीज्ञानदेव म्हणतात, ' श्रीकृष्ण व अर्जुन ' या दोघांचा संवाद जो एवढा वेळ ऐकिला, त्याचें मननपूर्वक अनुसंधान ठेवून यापुढें तोच ऐका ६९. मग श्रीकृष्ण अर्जुनास म्हणालेः-आतां कृत-कृत्य झालेल्या ब्रह्मनिष्ठाला ओळखण्याचें खरें संपूर्ण चिन्ह मी तुला सांगेन. तूं चांगलें लक्ष दे ७०.

**अन्वयार्थ**—**युक्तः**-हीं कर्में ईश्वरासाठीं आहेत, माझ्या फलासाठीं नव्हेत, असें समजून मनांत शांत असलेला मुमुक्षु-**कर्मफलं**-कर्माच्या फलाला-**त्यक्त्वा**-सोडून-**नैष्ठिकीं**-निष्ठांच्या क्रमानें प्राप्त होणाऱ्या-**शान्ति**-मोक्षाख्य शांतीस-**आप्नोति**-प्राप्त होतो.-**अयुक्तः**-पण जो मनांत असमाहित-अशांत असतो, तो-**काम-कारेण**-कामाच्या योगानें प्रेरित झाल्यामुळें-**फले सक्तः**-फलामध्यें आसक्त झालेला असा होत्साता-**निबध्यते**-अत्यंत बद्ध होतो १२.

हें पहा-आत्मज्ञानानें जो पूर्ण संपन्न झाला आहे व ज्याला कर्मफलाचा अगदीं वीट आलेला आहे, त्याला या जगामध्यें घरीं बसल्याच शांति घरांत घुसून वरते [ आपण होऊन प्राप्त होते ] ७१. अर्जुना! त्याहून दुसरा जो संसारी, तो कर्मबंधामुळें अभिलाषाच्या गांठीनें फल-भोगाच्या खुंट्याला बळकट बांधला जातो ७२.

**अन्वयार्थ**—**वशी**-जितेंद्रिय-**देही**-देहवान् आत्मा-मुमुक्षु-**सर्वकर्माणि**-नित्यादि सर्व कर्में-**मनसा**-मनानें-**संन्यस्य**-सोडून-**नवद्वारे पुरे**-नऊ द्वारांनीं युक्त अशा पुरांत-शरीरांत-**न एव कुर्वन्**-स्वतः कांहींएक न करी-तच-व **न [ एव ] कारयन्**-दुसऱ्यांकडून कांहीं न करवीतच-**सुखं**-सुखानें-**आस्ते**-राहतो १३.

फलाच्या इच्छेनें कर्माचरण करणाऱ्याप्रमाणें जो बाह्यतः सर्व कर्में यथासांग करितो, परंतु त्या कर्मांचा मी कर्ता नव्हेच, अशा अकर्तृत्व बोधानें कर्माचा त्याग करितो, त्याविषयीं उदासीन असतो ७३. तो पुरुष जिकडे जिकडे पाहतो, तिकडे तिकडे त्याला सुखमयच सृष्टि होते, आणि तो म्हणेल तेथें महाबोध नांदतो [ ज्याच्यावर कृपा करील त्यास ब्रह्मज्ञान प्राप्त होते ] ७४. या नवद्वारांनीं युक्त अशा देहांत वागत असूनहि [ ब्रह्मात्मैक्य बोधानें देह-तादात्म्य भ्रांतीचा निरास झाल्यामुळें ] तो नसल्यासारखाच आहे. कर्मफलासक्तीचा त्याग करणारा सर्व कर्में करीत असला तरीहि [ ज्याचे कर्म ब्रह्ममय झाले तो तत्त्वतः ] कांहींच करीत नाहीं ७५.

**अन्वयार्थ**—**प्रभुः**-आत्मा-**लोकस्य**-लोकांचें-**कर्तृत्वं**-कर्तृत्व-तूं अमुक कर असें म्हणून-**न सृजति**-निर्मित नाहीं.-**कर्माणि**-रथ, घट, मोठा वाडा इत्यादि कर्त्याला अतिशय इष्ट असलेले पदार्थ **न [ सृजति ]**-उत्पन्न करीत नाहीं-[ **च**-आणि ]-**कर्मफलसंयोगं**-रथादि पदार्थ कर-णाऱ्या कर्त्याला त्याच्या फलाशीं संयुक्त-**न [ सृजति ]** उत्पन्न करीत नाहीं-**तु**-तर-**स्वभावः**-अविद्यारूप माया-प्रकृति-**प्रवर्तते**-प्रवृत्त होते १४.

वस्तुतः विचार केला असतां सर्व व्यापक परमे-श्वर जसा तत्त्वतः अकर्ताच आहे, परंतु तो [ मायो-पाधीचा स्वीकार केला म्हणजे ] या त्रिभुवनाच्या विस्ताराची रचना करितो ७६. आणि तो कर्ता आहे असें म्हटलें तरी तो कोणत्याहि कर्मानें लिप्त होत नाहीं. कारण, त्याची उदासीन वृत्ति असल्याकारणानें कोणतेंहि कर्म त्याला स्पर्श करीत नाहीं ७७. त्याच्या योगनिद्रेचा म्ह. सहज स्वरूपस्थितीचा तर मुळींच भंग होत नाहीं व त्याच्या अकर्तेपणालाहि मुळींच बाध येत नाहीं, म्हणजे अकर्तेपणा मोडत नाहीं; तरी पण तो [ मायेच्या साह्यानें ] पंचमहाभूतांच्या समुदायांची उत्तम तऱ्हेने उभारणी करितो ! ७८. तत्त्वतः पाहिलें तर ह्या जगांत प्राणिमात्राच्या ठायीं हा अन्तर्यामी रूपानें व्याप्त आहे, परंतु परमार्थदृष्ट्या पाहिले तर हा असंग असल्या-मुळें याचा केव्हांहि कोणाशीं संबंध नसतो, फार तर काय हें जगत् उत्पन्न होतें व लयास जातें, याची त्याला दादहि नसतें ! ७९.

**अन्वयार्थ**—**विभुः**-सर्वव्यापी आत्मा-**कस्यचित्**-कोणाचें-**पापं**-पाप-**न आदत्ते**-स्वतः घेत नाहीं-**च**-आणि-**सुकृतं**-कोणाचें पुण्यहि-**न एव [ आदत्ते ]** घेत नाहींच-**ज्ञानं**-विवेकविज्ञानाला-**अज्ञानेन**-अज्ञानानें-**आवृतम्**-आच्छादित केलें आहे,-**तेन**-त्यामुळें-**जन्तवः** जीव-**मुह्यन्ति**-मोहित होतात १५.

पापपुण्य सर्व त्याच्या अगदीं जवळ आश्रयावर असूनहि तो पाहात नाहीं; इतकेंच नव्हे तर त्याला साक्षीभूतहि होऊन रहात नाहीं; मग दुसऱ्या गोष्टीबद्दल कशाला विचारावें ? ८०. तरीपण तो मायिक साकार रूपांच्या संगतीनें [ व्यावहारिक ] सगुणरूपानें लिलेनें वावरतो, पण त्या [ अध्यस्त व्यवहारामुळें ] समर्थाचे अमूर्तपण मात्र [ परमार्थतः नित्य निवृत्त देहादि आकाराकडून ] यत्किंचि-तहि मलीन होत नाहीं ८१. असें असतां, अर्जुना ! तो चराचर सृष्टि उत्पन्न करितो, पालन करितो आणि संहार करतो, असें जे त्याच्या कर्तृत्वाचे बाबतींत लोक म्हण-तात, ते सर्व केवळ अज्ञानामुळें म्हणतात असें समज ८२.

ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः । तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥

तें अज्ञान जैं समूळ तुटे । तै भ्रांतीचें मसैरें फिटे । मग अकर्तृत्व प्रगटे । मज ईश्वराचें ॥ ८३ ॥ एथ ईश्वरु एकु अकर्ता । ऐसें मानलें जरी चित्ता । तरी तोचि मी हें स्वभावता । आदीचि आहे ॥ ८४ ॥ ऐसेनि विवेकें उदो चित्तीं । तयासी भेदु कैंचा त्रिजगतीं । देखें आपुलिया प्रतीति । जगचि मुक्त ॥ ८५ ॥ जैशी पूर्वदिशेच्या राउळीं । उदया येतांचि सूर्य दिवाळी । कीं येरीही दिशां तियेचि काळीं । काळिमा नाहीं ॥ ८६ ॥

तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणः । गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥

बुद्धिनिश्चयें आत्मज्ञान । ब्रह्मरूप भावी आपणा आपण । ब्रह्मनिष्ठा राखे पूर्ण । तत्परायण अहर्निशीं ॥ ८७ ॥ ऐसें व्यापक ज्ञान भलें । जयांचिया हृदया गिंवसित आलें । तयांची समता दृष्टि बोलें । विशेषूं काई ॥ ८८ ॥ एक आपणपांचि जैसें । ते देखतीं विश्व तैसें । हें बोलणें कायसें । नवलु एथ ॥ ८९ ॥ परी दैवं जैसे कवतिकें । कहींचि दैन्य न देखे । कां विवेकु हा नोळखे । भ्रांतीतें जेवीं ॥ ९० ॥ नातरी अंधकाराची वानी । जैसा सूर्यो न देखे स्वप्नीं । अमृत नायके कानीं । मृत्युकथा ॥ ९१ ॥ हें असो संतापु कैसा । चंद्रु न स्मरे जैसा । भूतीं भेदु नेणती तैसा । ज्ञानिये ते ॥ ९२ ॥

विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि । शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ १८ ॥

मग हा मशकु हा गजु । कीं हा श्वपचु हा द्विजु । पैलें इतरु हा आत्मजु । हें उरेल कें ? ॥ ९३ ॥ ना तरी हे धेनु हें श्वान । एक गुरु एक हीन । हें असो कैचें स्वप्न । जागतया ॥ ९४ ॥ एथ भेदु तरी कीं देखावा । जरी अहंभाव उरला होआवा । तो आधींचि नाहीं आघवा । आतां विषमु काई ॥ ९५ ॥

इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः । निर्दोषं हि समं ब्रह्म तस्मात् ब्रह्मणि ते स्थिताः ॥ १९ ॥

म्हणौनि सर्वत्र सदा सम । तें आपणचि अद्वय ब्रह्म । हें संपूर्ण जाणे वर्म । समदृष्टीचें ॥ ९६ ॥ जिहीं विषयसंगु न सांडितां । इंद्रियांतें न दंडितां । परी भोगिली निसंगता । कामनेविण ॥ ९७ ॥ जिहीं लोकांचेनि आधारें । लौकिकेंचि व्यापारें । परि सांडिलें निदसुरें । लौकिकु हें ॥ ९८ ॥ जैसा जनामाजि खेचरु ।

**अन्वयार्थ**—**तु**-पण-**येषां**- ज्यांचें -**तत् आत्मनः अज्ञानं**-तें आत्म्याविषयींचें अज्ञान-**ज्ञानेन**-आत्म्याच्या ज्ञानानें-**नाशितं**-नष्ट केलें आहे-**तेषां**-त्यांचें-**तत्**-तें-**ज्ञानं**-ज्ञान-**आदित्यवत्**--सूर्याप्रमाणें -**परं**-परमात्म्याला -**प्रकाशयति**-प्रकाशित करतें १६.

तें अज्ञान जेव्हां समूळ नाहींसें होतें, तेव्हां भ्रांतिरूप काळोखी नाहींशी होते; असें झालें म्हणजे मग ईश्वराचें अकर्तेपण स्पष्ट समजून येतें ८३. अशा प्रकारें ईश्वर हा जसा अकर्ता आहे तसाच मीहि अकर्ता आहें, असें जर चित्ताला पटलें तर तो व मी पूर्वीपासून एकच आहोत हे सहजच सिद्ध होते; [ तेव्हां अर्थात् मीहि अकर्ता आहे हें आपोआप सिद्ध झालेंच ! ] ८४. याप्रमाणें विवेकाचा ज्यांचे चित्तात उदय झालेला असतो, त्याला या त्रिजगतात भेद [ प्रतीति ] कोठला ? आपले स्वतःच्या अनुभवाच्या दृष्टीनें सर्व जगच मुक्त आहे, असें तो पाहतो ८५. कसा ? तर-पूर्व दिशेच्या घरीं सूर्य उगवतांच प्रकाशाचा-दिवाळीचा सण सुरू होतो, त्यामुळें त्याच वेळेस दुसऱ्याहि इतर दिशांचा अंधार नाहींसा होतो, त्याप्रमाणें [ ज्यांच्या अंतःकरणवृत्तींत जीवब्रह्मैक्यज्ञानाचा उदय झाला; पण त्याची परिणती मात्र सर्व जगत् ब्रह्मरूप आहे अशा अपार बोधसागरांत होते ] ८६.

**अन्वयार्थ**—**तद्बुद्धयः**-परमार्थ तत्त्वामध्येंच ज्यांची बुद्धि आहे.-**तदात्मानः**-जे तद्रूप झालेले आहेत,-**तन्निष्ठाः**-त्यांतच ज्यांची निष्ठा आहे-**तत्परायणाः**-तें तत्त्व हीच ज्यांची परागति आहे, ते-**ज्ञाननिर्धूतकल्मषाः** [ **सन्तः** ]-ज्ञानानें ज्यांचें पाप पार नाहींसें झालें आहे असे होत्साते-**अपुनरावृत्ति**-पुनर्जन्म राहित्यास-मोक्षास-**गच्छन्ति**-प्राप्त होतात १७.

असा ज्याच्या बुद्धीचा निश्चय आत्मज्ञानाविषयीं आहे व जो आपणच आपल्या स्वतःला ब्रह्मरूप मानितो आणि आपली चित्तवृत्ति पूर्ण ब्रह्माकार ठेवून रात्रंदिवस ब्रह्मानुसंधान तत्पर होऊन असतो ८७. असें उत्तम सर्वव्यापक ज्ञानच ज्यांच्या अंतःकरणाचा शोध करीत आलें, त्यांची समता दृष्टि होते हें शब्दांनीं विशेषेंकरून काय वर्णन करूं ? ८८. तें जसें आपणांस स्वतःसच सच्चिदानंद ब्रह्मरूप आहोंत असें पाहतात, त्याप्रमाणें ते सर्व विश्वालाहि ब्रह्मरूपच पाहतात, हे येथें सांगण्यांत काय मोठें आश्चर्य आहे ! ८९. ज्याप्रमाणें भाग्य हे कौतुकानें देखील दारिद्र्याचा अनुभव घेत नाहीं, किंवा विचार हा जसा भ्रांतीला ओळखत नाहीं ९०. अथवा सूर्य जसा स्वप्नांत देखील अंधकाराचें स्वरूप पाहात नाहीं, किंवा स्वतः अमृताच्या कानावर मृत्यूची वार्ता देखील येत नाहीं ९१. हें असो, परंतु-ज्याप्रमाणें चंद्रास उष्मा कसा असतो हे आठवूनहि लक्षांत येत नाहीं-त्याचप्रमाणें ज्ञानी जे आहेत, त्यांना प्राणिमात्रांत तत्त्वतः भेद असा मुळींच दिसत नाहीं ९२.

**अन्वयार्थ**—**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे**-विद्या व विनय यांनीं संपन्न असलेल्या ब्राह्मणाचे ठिकाणीं-**गवि**-गायींमध्यें किंवा बैलामध्यें-**हस्तिनि**-हत्तीमध्यें-**शुनि**-कुत्र्यामध्यें-**च श्वपाके**-व चांडालामध्यें-**पण्डिताः**-ब्रह्मज्ञानी ब्रह्मनिष्ठ-**समदर्शिनः एव**-समब्रह्म पाहणारे असतातच १८.

मग हें चिलट किंवा हा हत्ती, तसाच हा अंत्यज हा ब्राह्मण, तसेंच हा आपला मुलगा किंवा हा पलीकडे असलेला परका हा भेद त्यांच्यापाशीं कोठून उरणार ? ९३. किंवा ही गाय आणि हा कुत्रा, एक थोर-श्रेष्ठ, एक लहान-कनिष्ठ अशा तऱ्हेचें द्वैतभावाचें स्वप्न अद्वैतबोधाचे ठिकाणीं जागृत असलेल्या पुरुषांना कोठून पडणार ? ९४. जेथें अहंकार उरला असेल तेथेंच भेदभ्रांतीची प्रतीति होते तो अहंकारच जर अगोदर सर्वतोपरी नाहींसा झाला तर आतां भेद प्रतीति होणार कोणाला? ९५.

**अन्वयार्थ**—**येषां मनः**-ज्यांचें अंतःकरण-**साम्ये**-सर्व भूतांतील साम्यामध्यें-**स्थितं**-स्थित असतें-**तैः**-त्यांनीं- **इहएव**-या शरिरांत असतांनाच-जिवंतपणींच-**सर्गः**-पुढील जन्म-**जितः**-जिंकला आहे-**हि**-कारण-**ब्रह्म**-अक्षर आत्मतत्त्व-**निर्दोषं**-सर्वदोषशून्य व-**समं**-सर्वत्र सम आहे-**तस्मात्**-म्हणून-**ते**-ते सर्व-**ब्रह्मणि** ब्रह्मामध्यें-**स्थिताः**-स्थित असतात १९.

म्हणून, सर्वत्र, सर्वकाळ आणि सर्वांत सम म्ह. साधारण व्याप्त असणारें जे एकमेवाद्वितीय ब्रह्म ते मीच स्वतः आहे; हे जे समदृष्टीचें मार्मिक तत्त्व आहे, तें तो संपूर्ण जाणतो ९६. ज्यानें विषयसंग न सोडता आणि इंद्रियाचे दमन न करतां, विषय कामनेचा त्याग केल्यामुळें-वासनांचा बाध केल्यामुळें त्याने अलिप्तपणाचा अकर्तेपणाचा उपभोग-अनुभव घेतला आहे; ९७. जे बाह्यतः लोकांच्या राहटीप्रमाणें त्यां आधारानें सर्व लौकिक व्यवहाराचें, व्यापाराचें आचरण करतात; पण ज्यांनीं लौकिकांत असलेल्या आत्मस्वरूपविषयक अज्ञानरूपीं महानिद्रेचा [ व तत्कार्य-अहंममाध्यासाचा ] त्याग केला आहे ९८. पिशाच्च ज्याप्रमाणें सर्व लोकांत असूनहि लोकांला दिसत नाहीं-त्याप्रमाणें तो पुरुष

१ भाग्य. २ स्वरूप. ३ ऊष्मा. ४ मुरकूट. ५ अंत्यज. ६ पलोकडचा. ७ मुलगा. ८ कोठून. ९ मीपणा.

असतुचि जना नोहे गोचरु । तैसा शरीरीं परी संसारु । नोळखे तयांतें ॥ ९९ ॥ हें असो पवनाचेनि मेळें । जैसें जळींचि जळ लोळे । तें आणिकें म्हणती वेगळें । कल्लोळ हे ॥ १०० ॥ तैसें नाम रूप तयाचें । एऱ्हवीं ब्रह्मचि तो साचें । मन साम्या आलें जयाचें । सर्वत्र गा ॥ १ ॥ ऐसेनि समदृष्टी जो होये । तया पुरुषा लक्षणही आहे । अर्जुना संक्षेपें सांगेन पाहें । अच्युत म्हणे ॥ २ ॥

न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम् । स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद् ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥

तरी मृगजळाचेनि पूरें । जैसें न लोटिजे कां गिरिवरें । तैसा शुभाशुभीं न विकरे । पातलिया जो ॥ ३ ॥ तोचि तो निरुता । समदृष्टी तत्त्वतां । हरि म्हणे पंडुसुता । तोचि ब्रह्म ॥ ४ ॥

बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत्सुखम् । स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥ २१ ॥

जया आपणपें सांडूनि कहीं । इंद्रियग्रामावरी येणेंचि नाहीं । तो विषय न सेवी हें काई । विचित्र येथ ॥ ५ ॥ सहजें स्वसुखाचेनि अपारें । सुरवाडलेनि अंतरें । रचिला म्हणौनि बाहिरें । पाउल न घाली ॥ ६ ॥ सांगें कुमुददळाचेनि ताटें । जो जेविला चंद्रकिरणें चोखटें । तो चकोरु काई वाळुवंटें । चुंबितु असे ? ॥ ७ ॥ तैसें आत्मसुख उपाइलें । जयासि आपणपेंचि फावलें । तया विषयो सहजें सांडवले । म्हणो काई ? ॥ ८ ॥ एऱ्हवीं तरी कौतुकें । विचारूनि पाहें पां निकें । या विषयांचेनि सुखें । झकविती कवण ॥ ९ ॥

ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते । आद्यन्तवन्तः कौन्तेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥

जिहीं आपणपें नाहीं देखिलें । तेचि इहीं इंद्रियार्थीं रंजले । जैसें रंकु कां आंळुकैलें । तुषांतें सेवी ॥ ११० ॥ नातरी मृगें तृषापीडितें । संभ्रमें विसरोनि जळांतें । मग तोयबुद्धी बरडीतें । ठाकूनि येती ॥ ११ ॥ तैसें आपणपें नाहीं दिठे । जयातें स्वसुखाचे सदा खरांटे । तयासीचि विषय हे गोमटे । आवडती ॥ १२ ॥ एऱ्हवीं विषयीं सुख आहे । हे बोलणेंचि सारिखें नोहे । तरी विद्युत्स्फुरणें कां न पाहे । जगामाजीं ॥ १३ ॥ सांगें वात वर्ष आतपु धरे । ऐसे अभ्रच्छायाचि जरी सरे । तरी त्रिमाळिकें धवळारें । करावीं कां ॥ १४ ॥ म्हणौनि विषयसुख जें बोलिजे । तें नेणतां गा वायां जल्पिजे । जैसें महूर कां म्हणिजे । विषकंदातें

[ तत्त्ववेत्ता ] शरीरधारी असतो तरीपण संसारी लोक त्याला ओळखीत नाहींत ९९. हें असो-जसें वाऱ्याच्या संबंधामुळें पाण्यावरच पाणी लाटांच्या रुपानें खेळते. पण त्याला इतर लोक मात्र त्या लाटा पाण्याहून वेगळ्या आहेत असे म्हणतात १००. त्याचप्रमाणे त्याचे नामरूप [ व जगत् या व्यष्टि समष्टि विक्षेपाची प्रतीति असते; तरीपण ज्याचें मन सर्व ठिकाणीं समतेला [ सर्वत्र ब्रह्मभावास ] पावले आहे. खरोखर तो साक्षात् ब्रह्मच आहे; १. श्रीभगवान् म्हणतातः—अर्जुना, अशी ज्याची समदृष्टि झालेली असते त्या पुरुषाला [ ओळखण्याचे ] लक्षणहि आहे. तें संक्षेपानें मी तुला सांगतो, ऐक २.

**अन्वयार्थ—प्रियम्**-इष्ट वस्तूला किंवा परिस्थितीला-**प्राप्य**-प्राप्त होऊन-**न प्रहृष्येत्**-अतिशय हृष्ट होऊं नये **च**-आणि तसेंच-**अप्रियम्**-अनिष्ट वस्तूला किंवा अवस्थेला-**प्राप्य**-प्राप्त होऊन-**न उद्विजेत्**-उद्विग्न होऊं नये-**स्थिरबुद्धिः**-ज्याची बुद्धि स्थिर आहे, ब्रह्म निर्दोष व सम आहे-याविषयीं ज्याला संशय नाहीं-**असंमूढः**-त्यामुळें ज्याला संमोह झालेला नाहीं, असा-**ब्रह्मविद्**-ब्रह्मवेत्ता-**ब्रह्मणि**-ब्रह्मामध्यें-**स्थितः**-अवस्थित असतो २०.

-ज्याप्रमाणें मृगजलाच्या पुरानें मोठा डोंगर मुळींच लोटला जात नाहीं, त्याचप्रमाणें चांगल्या किंवा वाईट गोष्टी प्राप्त झाल्या असतां जो [ हर्षविषादादि ] विकारास प्राप्त होत नाहीं, ३. तोच खरोखर तात्त्विक दृष्ट्या समदृष्टीचा पुरुष होय. श्रीहरि म्हणतातः—अर्जुना ! आणि तोच स्वयमेव ब्रह्म आहे असें समज ४.

**अन्वयार्थ—बाह्यस्पर्शेषु**-शब्दादि बाह्य विषयांमध्यें **असक्तात्मा**-ज्याचें अंतःकरण सक्त-आसक्त झालेलें नसतें, तो-**आत्मनि**-प्रत्यगात्म्यामध्यें -**यत्**-जें-**सुखं** स्वरूप-भूत सुख असतें-[ **तत्** ]-तें **विन्दति**-अनुभवितो-**सः**-तो-**ब्रह्मयोगयुक्तात्मा**-ब्रह्मामध्यें जो योग म्ह० चित्ताची स्थिरता-चित्तसमाधान, त्यानें ज्याचें चित्त युक्त आहे असा तो-**अक्षय्यं सुखं**-क्षय न पावणारे-नित्य सुख-**अश्नुते**-अनुभवितो २१.

जो आत्मस्वरूपाला सोडून कधींहि इंद्रियरूपी गांवात येत नाहीं म्ह० इंद्रियाधीन होत नाहीं, तो तत्त्वतः विषयांचें सेवन करीत नाहीं यांत नवल तें काय ? ५. अपरिमित अशा स्वाभाविक आत्मसुखाच्या विपुलतेनें त्याचें अंतःकरण स्थिर व संतुष्ट झालेलें असतें, म्हणून तो बाहेर पाऊल घालीत नाहीं ६. जो चकोर पक्षी चंद्रविकासी कमलांच्या पाकळीच्या पानांत उत्तम शुद्ध चंद्रकिरणांचें भोजन करतो, तो चकोर पक्षी वाळवंटांत वाळूचे कण चाटीत बसेल काय ? ७. तसेंच ज्याला स्वतः आपल्याच ठिकाणीं उत्कृष्ट आत्मस्वरूपसुख प्राप्त झालें आहे, त्याला विषय [ व वैषयिक सुख ] सहजच सुटलें हे काय सांगावयास पाहिजे ! ८. एरवी या विषयांच्या सुखानें कोण फसले जातात, याचा तूं कौतुकानें आपल्याशींच सहज चांगला विचार करून पहा ! ९.

**अन्वयार्थ—हि**-कारण-**ये**-जे-**संस्पर्शजाः**-इंद्रियें व विषय यांच्या संबंधापासून होणारे-**भोगाः**-भोग-सुखानुभव-**ते**-ते सर्व-**दुःखयोनयः एव**-दुःखाचीं बीजेंच आहेत. तसेंच-**ते**-**आद्यन्तवन्तः**-उत्पत्ति व नाश यांनीं युक्त आहेत-**कौन्तेय**-हे अर्जुना !-**बुधः**-पंडितः-तत्त्वज्ञ **तेषु**-त्या विषयांमध्यें-**न रमते**-रममाण होत नाहीं २२.

ज्याप्रमाणें भुकेनें व्याकुळ झालेला दरिद्री माणूस कोंडा देखील खातो-त्याप्रमाणें ज्यांनीं आत्मस्वरूप सुखाचा अनुभव घेतला नाहीं, तेच ह्या [ इंद्रिय विषयसंबंधापासून होणाऱ्या ] विषयसुखांत रंगलेलें असतात ! ११०. किंवा तहाननें व्याकुळ झालेलीं हरिणें भ्रमानें खऱ्या पाण्याला विसरून [ मृगजळासच म्ह० उन्हाच्या झळांनाच ] हे पाणी आहे असें समजून माळजमिनीवरच धांवून येऊन पोचतात ११. त्याप्रमाणें ज्याला आपल्या आत्मस्वरूपाचा यथार्थ अनुभव नाहीं, ज्यांस स्वात्मसुखाचा सदाचाच तुटवडा-पूर्ण अभाव असतो, त्यांनाच हें विषय सुखसाधन किंवा सुखरूप आहेत असें वाटतें ! १२. सहज पाहिलें असतां, विषयांत सुख आहे हें म्हणणे अजीबात योग्य नाहीं. बरें ! [ तुष्यतु दुर्जनः या न्यायानें ] विषयांत सुख आहे असें धरून चाललें तर मग अरे विजेच्या चमकण्यापासून पडणाऱ्या प्रकाशानें जगांतील व्यापार चालण्यास योग्य असे कां उजाडत नाहीं १३. शिवाय तूं हें सांग पाहू, वारा पाऊस आणि ऊन यांचें निवारण, जर ढगांच्या सावलीपासून होईल तर तीन तीन मजली घरें बांधण्याचा खटाटोप तरी का करावा ? १४. म्हणून विषाच्या कांद्याला [ बचनागाला ] ज्याप्रमाणें अज्ञानपणानें 'मधुर' म्हणावें, त्याप्रमाणें, "विषयाचें ठिकाणीं सुख आहे" असें जे म्हणतात ती [ विषयाचे व वैषयिक सुखाचें; साधनाधीनत्वादि दोषयुक्त, दुःखमिश्रित असें खरें स्वरूप ]

१ अमर्याद. २ सुख पावलेल्या. ३ मनानें. ४ चंद्रविकासी कमलाच्या. ५ उत्सुक होऊन. ६ प्राप्त झाले. ७ सुखावले. ८ भुकेलेले. ९ भ्रमानें. १० पाणी असें मानून. ११ माळ जमिनीवर. १२ तोटा, वाण. १३ तीन मजली. १४ घरें. १५ बडबडावे. १६ मधुर. १७ बचनागाला.

॥ १५ ॥ नातरी भौमा माम मंगळु । रोहिणीतें म्हणती जळु । तैसा सुखप्रवादु बरळु । विषयिकु हा ॥ १६ ॥ हे असो आघवी बोली । सांग पां सर्पफणीची साउली । ते शीतल होईल केतुली । मूषकासी ? ॥ १७ ॥ जैसा आमिषकवळु पांडवा । मीनु न सेवी तंवचि बरवा । तैसा विषयसंगु आघवा । निभ्रांत जाणें ॥ १८ ॥ हे विरक्तांचिये दिठी । जैं न्याहाळिजे किरीटी । तैं पांडुरोगाचिये पुष्टी । सारिखें दिसे ॥ १९ ॥ म्हणौनि विषयभोगीं जें सुख । तें साद्यंताचि जाण दुःख । परि काय कीजे मूर्ख । न सेवितां न सरे ॥ १२० ॥ तें अंतर नेणती बापुडे । म्हणौनि अगत्य सेवणें घडे । सांगै पूयपंकींचे किडे । काय चिळसी घेती ॥ २१ ॥ तयां दुःखियां दुःखचि जिव्हार । ते विषयकर्दमींचे दर्दुर । ते भोगजळींचे जळचर । सांडिती केवीं ॥ २२ ॥ आणि दुःखयोनि जिया आहाती । तिया निरर्थका तरी नव्हती । जरी विषयांवरी विरक्ती । धरिती जीव ॥ २३ ॥ नातरी गर्भवासादि संकट । कां जन्ममरणींचे कष्ट । हे विसांवेवीणें वाट । वोहावी कवणें ॥ २४ ॥ जरी विषयीं विषयो सांडिजेल । तरी महादोषीं कें वसिजेल । आणि संसारु हा शब्दु नव्हेल । लटिका जगीं ? ॥ २५ ॥ म्हणौनि अविद्याजात नाथिलें । तें तिहींचि साच दाविलें । जिहीं सुखबुद्धी घेतलें । विषयदुःख ॥ २६ ॥ याकारणें गा सुभटा । हा विचारितां विषय वोखटा । तूं झणें कहीं या वाटा । विसरोनि जाशी ॥ २७ ॥ पैं यातें विरक्त पुरुष । त्यजिती कां जैसें विष । निराशा तयां दुःख । दाविलें नावडे ॥ २८ ॥

शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात् । कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥

ज्ञानियांच्या हन ठायीं । याची मातुही कीर नाहीं । देहीं देहभावो जिहीं । स्ववंश केले ॥ २९ ॥ जयांतें बाह्याची भाष । नेणिजेचि निःशेष । अंतरीं सुख । एक आथि ॥ १३० ॥ परि तें वेगळेपणें भोगिजे । जैसें पक्षियें फळ चुंबिजे । तैसें नव्हे तेथ विसरिजे । भोगितेपणही ॥ ३१ ॥ भोगीं अवस्था एकी उठी । ते अहंकाराचा अंचळु लोटी । मग सुखेंसि घे आंटी । गाढेपणें ॥ ३२ ॥ तिये आलिंगनमेळीं । होय आपेंआप कवळी । तेथ जळ जैसें जळीं । वेगळें न दिसे ॥ ३३ ॥ कां आकाशीं वायु हारपे । तेथ दोन्ही हे भाष लोपे । तैसें सुखचि उरे

न जाणताच केलेली व्यर्थ बडबड आहे १५. किंवा भौम ह्या [ पीडाकारक अमंगल ] ग्रहास जसें मंगळ हें नांव आहे. किंवा मृगजलाला जल म्हणतात [ खरें, पण तृषा निवारण्यास त्याचा कांहीं उपयोग नाहीं ] तसें विषय-सेवनांत सुख आहे असें म्हणतात [ पण सातिशय, परिच्छिन्नतादि दोषग्रस्त असलेले ते विषयसुख मनास रम्य समाधान, तृप्ति देण्यास पर्याप्त नाहीं म्हणून ] ते म्हणणें व्यर्थ आहे १६. हें सर्व प्रतिपादन राहूं दे तूंच असें सांग कीं सर्पाच्या फणीची जी सावली ती उंदराला कितपत सुखावह होईल बरें ? १७. अर्जुना ! जसे गळाला लावलेल्या अमिषांचा पिंड-घास जोपर्यंत मासा सेवन करीत नाहीं तोंपर्यंतच चांगलें आहे. त्याचप्रमाणें विषय-संगाचा प्रकार आहे. [ जोंपर्यंत विषयसुखाचा अनुभव घेतला नाहीं, तोंपर्यंतच तें चांगलें आहे, असें वाटतें ] असें निःसंशय जाण ! १८. परंतु विरक्ताच्या दृष्टीनें हे विषयसुख पाहिले तर अर्जुना ! ते पंडुरोगाच्या पुष्टीसारखें [ दिसण्यांत चांगलें दिसलें तरी परिणामी घातक ] आहे, असें समज १९. म्हणून, विषयभोगापासून होणारें जें सुख तें आरंभापासून अखेरपर्यंत दुःखच आहे, असें समज. परंतु काय करतील मूर्ख बिचारे ! कारण विषयाचे सेवन केल्यावांचून त्यांचे भागतच नाहीं १२०. कारण बिचारे ! विषयाचे आतले [ दुःख ] स्वरूप असल्याचें ते जाणतच नाहींत म्हणून त्यांचेकडून विषयाचे अगत्य सेवन वडते. असें पहा कीं, पुवाच्या चिखलांत असणाऱ्या किड्यांना पुवाची किळस कधीं तरी आली आहे कां ? सांग बरें ! २१. त्या दुःखितांना दुःखच प्रिय [ जीवन ] बनलेलें असतें; कारण, ते विषयरूप चिखलांतील बेडूकच होत व विषयोपभोगरूप जलांतील [ ते विषयासक्त म्हणजे जणु ] मासेच असल्याने ते विषयांचें सेवनरूपी पाण्याला कसें सोडतील ? २२. जर हे जीवमात्र विषयांचें ठिकाणीं विरक्ति धरतील, तर जितक्या म्हणून दुःखदायक योनी आहेत, तितक्या सर्व निरर्थक होणार नाहींत कां ? २३. किंवा गर्भवासादिक संकट अथवा जन्ममरणापासून होणारें कष्ट हे अविश्रांतपणें चालावे लागणारे मार्ग, कोणीं चालावे ? २४. जर विषयासक्त लोक विषयोपभोग सोडून देतील तर महादोषांनीं कोठें वसती करून रहावें ? आणि मग या जगांत 'संसार' हा शब्दच खोटा ठरणार नाहीं काय ? २५. म्हणून जे विषयांच्या भोगापासून होणारे दुःखच 'सुख आहे' या बुद्धीनें स्वीकारले आहे त्यांनीच मिथ्या म्ह. तत्त्वतः सत्ता-स्फूर्तिरहित असलेले सर्व अज्ञानादिक हे खरें आहे असें लोकांस दाखविलें २६. याकरितां अर्जुना ! विचार करून पाहिले असतां हे विषय फार वाईट आहेत म्हणून तूं कदाचित् चुकून कधीं या मार्गाला जाशील. पण जाऊं नकोस हो ! २७. कारण, जे विरक्त पुरुष आहेत, ते या विषयसुखाला जणुं कांहीं विषच आहे असें समजून त्याचा त्याग करतात; कारण, ते निरिच्छ असल्यामुळें विषयांनीं दाखविलेलें ते वैषयिक सुखरूपी दुःख आहे ते त्यांना आवडत नाहीं २८. /

**अन्वयार्थ**—**यः**–जो–**इह एव**–जिवंतपणींच–**प्राक् शरीरविमोक्षणात्**–शरीराचा नाश होईपर्यंत–**कामक्रोधोद्भवं वेगं**–काम व क्रोध यांपासून उत्पन्न होणारा वेग–**सोढुं**–सहन करण्यास–**शक्नोति**–समर्थ होतो–**सः**–तो–**युक्तः**–योगी व–**सः**–तो–**सुखी**–सुखी–**नरः**–पुरुष आहे २३.

ज्ञान्यांच्या ठिकाणीं तर निश्चयानें विषयांची वार्तासुद्धां नसते. कारण, ज्यांनीं देहामध्यें असूनहि देहधर्म [ देहांतील विकारात्मक वृत्ति ] आपल्या ताब्यांत ठेविले आहेत २९. ज्यांना अंतर्यामी एक ब्रह्मात्मैक्य सुख अनुभवास आलेले असते म्हणून ते बाह्य विषयांची गोष्ट देखील, मुळींच जाणत नाहींत १३०. परंतु पक्षी जसा फलाचा उपभोग [ तो पक्षी भोक्ता, फल ही भोग्यवस्तु आणि खाण्याचा भोग अशा त्रिपुटीनें युक्त ] वेगळेपणानें घेतो तसें तें [ ब्रह्मात्मैक्यसुख ] वेगळेपणानें [ उपर्युक्त त्रिपुटी कायम ठेवून ] भोगण्यासारखें नाहीं. तर तेथें भोक्तेपणाहि विसरले पाहिजे [ कारण, तेथें त्रिपुटीरहित, भोगनिरपेक्ष, स्वरूपभूत सुखच उर्वरित असते ] ३१. त्या आत्मसुखाच्या भोगामध्यें अशी एक वृत्तीची स्थिति उत्पन्न होते कीं, ती अहंकाराचा पडदा दूर करिते, व मग दृढपणानें सुखाला आलिंगन देते; [ आपण सुखरूप बनते ] ३२. आणि त्या आलिंगनाचे भरांत आपोआपच एकरूपता होऊन जाते.–ज्याप्रमाणें पाणी पाण्यांत मिसल्यावर वेगळें दिसत नाहीं ३३. किंवा आकाशांत वायूचा

१ मांसाचा घांस. २ पंडुरोगाच्या. ३ मुळापासून अखेरपर्यंत. ४ वर्म. ५ पुवाच्या चिखलांतले. ६ किळस. ७ प्रिय, जिव्हाळा. ८ विषयरूपी चिखलांतले. ९ बेडूक. १० वीट. ११ विश्रांति वांचून. १२ चालावी. १३ सर्व अज्ञान. १४ लटकें. १५ वार्ता. १६ देहांतील विकार. १७ आपल्या स्वाधीन. १८ बाहेरील. १९ आंत. २० मी भोक्ता हेहि. २१ इच्छा, वृत्ति. २२ पदर, पडदा. २३ आलिंगन. २४ दृढतेनें. २५ एकरूपता.

स्वरूपें । सुरतीं तिये ॥ ३४ ॥ ऐसी द्वैताची भाष जाय । मग म्हणों जरी एक होय । तरी तेथ साक्षी कवणु आहे । जाणते जें ॥ ३५ ॥

योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः । स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥

लभन्ते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः । छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥

म्हणौनि असो हें आघवें । एथ न बोलणें काय बोलावें । ते खुणाचि पावले स्वभावें । आत्माराम ॥ ३६ ॥ जे ऐसेनि सुखें मातले । आपणपांचि आपण गुंतले । ते मी जाणें निखिळ वोतले । सौमरस्याचे ॥ ३७ ॥ ते आनंदाचे अनुकार । सुखाचे अंकुर । कीं महाबोधें विहार । केले जैसे ॥ ३८ ॥ ते विवेकाचे गांव । कीं परब्रह्मींचे स्वभाव । नातरी अळंकारले अवयव । ब्रह्मविद्येचे ॥ ३९ ॥ ते सत्त्वाचे सात्त्विक । कीं चैतन्याचे आंगिक । हें बहु असो एकैक । वानिसी काइ ॥ १४० ॥ तूं संतस्तवनीं रतसी । तरी कथेचि से न करिसी । कीं निराळीं बोल देखसी । सनागर ॥ ४१ ॥ परि तो रसांतिशयो मुकुळीं । मग ग्रंथार्थदीपु उजळीं । करी सांधुहृदयराउळीं । मंगळउखा ॥ ४२ ॥ ऐसा श्रीगुरूचा उवायिला । निवृत्तिदासासी पातला । मग तो म्हणे श्रीकृष्ण बोलिला । तेंचि आइका ॥ ४३ ॥ अर्जुना अनंत सुखाच्या डोहीं । एकसरा तळुचि घेतला जिहीं । मग स्थिरोऊनि तेही । तेंचि जाहले ॥ ४४ ॥ अथवा आत्मप्रकाशें चोखें । जो आपणपेंचि विश्व देखे । तो देहेंचि परब्रह्म सुखें । मानूं येईल ॥ ४५ ॥ जें साचोकारें परम । ना तें अक्षर निःसीम । जिये गांवींचे निष्काम । अधिकारिये ॥ ४६ ॥ जे महर्षी वाढले । विरक्तां भागा फिटलें । जे निःसंशया पिकलें । निरंतर ॥ ४७ ॥

कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् । अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥

जिहीं विषयांपासोनि हिरतलें । चित्त आपुलें आपण जिंतिलें । ते निश्चित जेथ सुतले । चेतीचिनी ॥ ४८ ॥ तें परब्रह्म निर्वाण । जें आत्मविदांचें कारण । तेंचि ते पुरुष जाण । पंडुकुमरा ॥ ४९ ॥ ते ऐसे कैसेनि जहाले । जे देहींचि ब्रह्मत्वा आले । हें पुससी तरी भलें । संक्षेपें सांगों ॥ १५० ॥

लय झाल्यावर त्या ठिकाणीं आकाश आणि वायु हे दोन आहेत असा भेद उरत नाहीं. त्याप्रमाणें त्या वृत्ति व आत्मा [ यांच्या ] ऐक्यांत फक्त [ भोगनिरपेक्ष स्वरूप-भूत ] सुखच उर्वरित राहते ३४. याप्रमाणें द्वैताची भाषाहि नाहींशी होऊन गेली म्हणजे मग एकत्व प्राप्त होतें, असें म्हणावें तर त्या एकत्वाला जाणून 'ऐक्य आहे' असें म्हणणारा दुसरा साक्षी तरी कोण उरला आहे ३५.

**अन्वयार्थ**—**यः**–जो – **अन्तःसुखः**–अंतरात्म्यामध्येंच ज्याचें सुख आहे, असा व–**अन्तरारामः**–आत्म्यामध्येंच ज्याचा आराम–क्रीडा–करमणूक आहे–**तथा**–त्याचप्रमाणें –**यः**–जो–**अन्तर्ज्योतिः एव**–आत्मा हीच ज्याची ज्योति-प्रकाश आहे–**सः**–तो–**योगी**–आत्मनिष्ठ-**ब्रह्मभूतः** [**सन्**] –ब्रह्मरूप होऊन–**ब्रह्मनिर्वाणं**–ब्रह्मामध्यें निर्वाणास–मोक्षास–**अधिगच्छति**–प्राप्त होतो २४. **क्षीणकल्मषाः**–ज्यांचे पापादि दोष क्षीण झाले आहेत–**छिन्नद्वैधाः**–ज्यांचे सर्व संशय तुटले आहेत–**यतात्मानः**–ज्यांनीं इंद्रियांचें नियमन केलें आहे व जे–**सर्व**–**भूतहिते रताः**–सर्व प्राण्यांच्या हितामध्यें रत आहेत, असे–**ऋषयः**–ज्ञानी–तत्त्ववेत्ते–संन्यासी–**ब्रह्मनिर्वाणं**–ब्रह्मामध्यें निर्वाण मोक्ष–**लभन्ते**–पावतात २५.

म्हणून, हें सर्व राहू द्या. कारण येथें [ अनुभवाविना ] [ शब्दास अविषय असण री ] न बोलतां येणारी गोष्ट ती बोलून त्या केवळ शब्दांनी काय बोलावी? जो स्वतः आत्मस्वरूपवेत्ता झाला आहे त्यालाच त्याची खूण सहज समजेल; ३६ अशा सुखानें जे परिपूर्ण झाले आहेत आणि आपण स्वतःच आपल्या स्वस्वरूपांत जे निमग्न होऊन राहिले आहेत ते मद्रूप होऊन ब्रह्मात्मैक्य भावाचें ओतलेले निखालस पुतळेच आहेत, असें मी समजतों; ३७. ते आनंदाचे प्रतिबिंब किंवा स्वरूपसुखाचे अंकुर आहेत किंवा ब्रह्मात्मैक्यरूप महाबोधानें आपले वसतीस्थान अगर क्रीडास्थानच केले आहे ३८. ते विचारांचे राहण्याचे गांव, किंवा परब्रह्मीचे स्वभाव, इतकेंच नव्हे, तर तें ब्रह्मविद्येचे अलंकारादिकांनीं सुशोभित केलेले अवयवच होत ३९ ते सत्त्वाचेंहि [शुद्ध] सात्त्विक किंवा चैतन्या-चेच स्वरूप अवयव आहेत. असें श्रीज्ञानेश्वरमहाराज त्याचें वर्णन करण्याच्या भरांत असतां, श्रीगुरु निवृत्तिनाथ म्हणाले, विस्तारपूर्ण बोलणे हे पुरे! असे तूं एक एक वर्णन कोठवर करणार? १४०. तूं साधुसंतांच्या स्तुति करण्यांत तल्लीन होतोस तेव्हां चालू कथेची आठ-वणसुद्धां राहत नाहीं व तूं विषयाला सोडून तुझ्या डोळ्यासमोर जो वेगळाच विषय येतो; पण त्याचेंहि रसा-लंकारयुक्त शब्दांनी प्रतिपादन करतोस ४१. परंतु तो रसालंकारयुक्त विस्तार आटोपता घे. आणि गीता ग्रंथाचा अर्थरूपी दीप प्रज्वलित कर व साधुजनांच्या हृदयरूपी मंदिरांत मंगलदायक– [ अद्वैत दिवसाचा ] उषःकाल कर ४२. याप्रमाणें श्रीनिवृत्तिनाथांचे शिष्य श्रीज्ञानदेवांना श्रीगुरूंचा सूचनात्मक इषारा मिळाला व मग ते म्हणाले कीं, बरें आतां श्रीकृष्ण काय बोलले, तेंच ऐका ४३. अर्जुना! देश–काल–वस्तु परिच्छेदरहित स्वरूपभूत सुखाच्या डोहांत जे एकदम बुडी देऊन तळाशींच जाऊन पोचले आहेत ते मग तेथेंच स्थिर होऊन तद्रूपतेस प्राप्त झाले ४४. किंवा आत्म्याच्या निर्मळ प्रकाशानें–शुद्ध ज्ञानानें जो आपणच [ अधिष्ठानरूपानें विश्वांत व्याप्त ] आहोत असे जाणतो तो देहामध्यें असूनहि परब्रह्मच आहे असें खुशाल मानितां येईल ४५. जें खरोखर अति श्रेष्ठ अविनाशी व अमर्याद आहे [ असें ब्रह्मसुख; ] त्याची प्राप्ति करून घेण्याचे निरिच्छ पुरुषच अधिकारी होत ४६. तें सुख महर्षिकरितांच राखून ठेविले, विरक्तांच्याच वांटणीस आलेलें आहे आणि जे निःसंदेह जीवाकरितांच निरंतर पिकलें–फलद्रूप झाले आहे असें समज ४७.

**अन्वयार्थ**—**कामक्रोधवियुक्तानां**–काम व क्रोध यांनीं रहित असलेल्या – **यतचेतसां** – चित्ताचें संयमन केलेल्या–**विदितात्मनाम्**–आत्म्याला साक्षात् जाणलेल्या –**यतीनां**–संन्याश्यांचा –**ब्रह्मनिर्वाणं**–मोक्ष – **अभितः**–जिवंतपणीं व मेल्यावरहि–**वर्तते**–असतो. २६.

ज्यांनीं आपलें चित्त विषयापासून हिरावून घेऊन, जिंकून आपल्या स्वाधीन ठेवले आहे आणि ते [ ज्या ब्रह्मरूपाचे ठिकाणीं ] निजले आहेत तेथून जागेच होत नाहींत ४८. हे पंडुकुमरा, ते पुरुष म्हणजे आत्मवेत्त्यांचे कारण म्ह. साध्य जे मोक्षरूप परब्रह्म तेंच ते पुरुष होत ४९. ते असे कशाने झाले, आणि देहांत असतांनाच ब्रह्म-भावास कशानें आले, हें जर तूं विचारशील, तर तुला ते चांगले; पण संक्षेपानें सांगतों ऐक. १५०.

---

१ निखालस, सर्व. २ ब्रह्मानंदाचें. ३ स्वरूप, प्रतिमा. ४ आत्मज्ञानाचे. ५ जीवात्म्याचे. ६ अंगाचे शरिरावयव, ठसे. ७ वर्णन करितोस. ८ निराकार स्वरूप. ९ अति चांगले. १० स्तुति. ११ पुरे करा, आटोपा. १२ सत्पुरुषांच्या हृदयमंदिरांत. १३ कल्याणकारक पहांट. १४ अभिप्राय. १५ एकदम. १६ स्थिर होऊन. १७ खरोखर. १८ अविनाशी. १९ निरिच्छ. २० हिसवून घेतले. २१ निजले. २२ जागे होतच नाहींत. २३ मोक्षपद. २४ आत्मज्ञान्याचें.

स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः । प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ ॥ २७ ॥

यतेन्द्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः । विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ २८ ॥

तरी वैराग्याचेनि आधारें । जिहीं विषय दवडूनि बाहिरें । शरीरीं एकंदरें । केलें मन ॥ ५१ ॥ सहजें तिहीं संधी भेटी[२] । जेथ भ्रूपल्लवा[३] पडे गांठी । तेथ पाठीमोरी दिठी । पाँरखोनियां ॥ ५२ ॥ सांडूनि दक्षिण वाम । प्राणापानसम । चित्तेसीं व्योमं- । गाँमिये करिती ॥ ५३ ॥ तेथ जैसीं रथ्योदकें सकळें । घेऊनि गंगा समुद्रीं मिळे । मग एकेकु वेगळें । निवडूं नये ॥ ५४ ॥ तैसी वासनांतरांची विवंचनां । मग आँपसी पारुंखे अर्जुना । जे वेळीं गंगनीं लयो मना । पवनें कीजे ॥ ५५ ॥ जेथ हें संसारचित्र उमटे । तो मनोरूप पटुं फाटे । जैसें सरोवर आटे । मग प्रतिभा[३] नाहीं ॥ ५६ ॥ तैसें मन एथ मुद्दल जाय । मग अहंभावादिक कें आहे । म्हणौनि शरीरेंचि ब्रह्म होये । अनुभवी तो ॥ ५७ ॥

भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् । सुहृदं सर्व भूतानाम् ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ॥ २९ ॥

इतिश्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रम्हविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मसंन्यासयोगो नाम पंचमोऽध्यायः ॥

आम्हीं मागां हन सांगितलें । जे देहींचि ब्रह्मत्व पावले । ते येणें मार्गें आले । म्हणौनियां ॥ ५८ ॥ आणि यमनियमांचे[१५] डोंगर । अभ्यासाचे सागर । क्रमोनि हे पार । पातले ते ॥ ५९ ॥ तिहीं आपणपें करूनि निर्लेप[१६] । प्रपंचाचें घेतलें माप । मग साचाचेंचि रूप । होऊनि ठेले ॥ १६० ॥ ऐसा योगयुक्तीचा उद्देशुं । जेथ बोलिला हृषीकेशु । जेथ अर्जुनु सुदंर्शु । म्हणौनि चमत्कारेला ॥ ६१ ॥ तें देखिलिया कृष्णें जाणितलें । मग हांसोनि पार्थातें म्हाणितलें । काई पां चित्त उवाइलें । इये बोलीं तुझें ? ॥ ६२ ॥ तंव अर्जुन म्हणे देवो । परचित्तलेक्षणांचा[२१] रावो । भला जाणितला जी भावो । मानसु माझा ॥ ६३ ॥ म्यां जें कांहीं विवरोनि[२२] पुसावें । तें आधींचि जाणितलें देवें । तरी बोलिलें तेंचि सांगावें । विवेळ[२३] करूनि ॥ ६४ ॥ एऱ्हवीं तरी अवधारा । जो दाविला तुम्हीं अनुसारा[२४] । तो पर्व्हेण्याहूनि[२५] पायउतारा । सोहपा जैसा ॥ ६५ ॥ तैसा सांख्याहूनि[२६] प्रांजळों । आम्हांसारिखियां अभोळां[२७] । एथ आहाति परि कांहीं काळा । तो साहों ये वर ॥ ६६ ॥ म्हणौनि एक वेळ देवा । तोचि पडेताळा[२८] घेयावा । विस्तरेल तरी

**अन्वयार्थ**—**यः मुनिः**–जो मुनि–संन्यासी–**बाह्यान् स्पर्शान्**–शब्दस्पर्शादि बाह्य विषयांस–**बहिः एव कृत्वा**–बाहेरच करून–**च**–आणि–**चक्षुः**–चक्षुरिन्द्रिय–**भ्रुवोः अन्तरे** [ **कृत्वा** ]–दोन्ही भुवयांच्या मध्यें [ करून ]–**नासाभ्यन्तरचारिणौ**–नासिका व कंठादि अभ्यंतर भाग यांत संचार करणारे–**प्राणापानौ** प्राण व अपान हे वायु–**समौ**–सम–तुल्य–**कृत्वा** – करून – **यतेंद्रियमनोबुद्धिः**–ज्यानें इंद्रियें, मन व बुद्धि यांना नियमित केले आहे, त्यांचा निरोध केला आहे–**मोक्षपरायणः**–जो मोक्षपरायण झाला आहे व–**विगतेच्छाभयक्रोधः**–इच्छा, भय व क्रोध ज्याच्यापासून निघून गेले आहेत–**सः**–असा तो–**सदा**–सर्वदा–**मुक्तः एव**–मुक्तच आहे २७-२८.

तर वैराग्याच्या साह्यानें [ अंतःकरणांतील ] विषयांना बाहेर घालवून, ज्यांनी शरीरामध्येंच आपलें मन एकनिष्ठ-एकाग्र केलें आहे ९१. इडा पिंगला व सुषुम्ना या तिहींच्या भेटीच्या संधींत, जेथें भुवयांच्या टोकांचा मिलाफ होतो तेथें दृष्टि माघारी फिरवून स्थिर करतात ९२. डाव्या आणि उजवव्या नाकपुडीतून जात-येत वाहणाऱ्या वायूची गति बंद करून प्राण व अपान या वायूस सम म्ह. एक करून, ते चित्तासहित चिदाकाशांत [ मूर्ध्न्याकाशांत ] नेतात ९३. मग तेथें रस्त्यावरून वाहणारे [ बरें वाईट ] सर्व प्रकारचें पाणी घेऊन गंगा समुद्रास जाऊन मिळते तेव्हां ज्याप्रमाणें त्यांतून एक रस्त्यावरील पाणी व एक गंगेचे पाणी अशी वेगवेगळी निवड करतां येत नाहीं ९४. त्याप्रमाणें अर्जुना ! ज्या वेळेस प्राणांच्या निरोधानें चिदाकाशांत मनाचा लय केला जातो, त्या वेळीं नानाप्रकारच्या वासनांची निवड आपोआपच थांबते ९५. ज्या मनोरूप पटावर हें संसाररूपी चित्र उमटत असते, तो मनोरूपी पट फाटतो, जसें सरोवर आटल्यावर त्यांत प्रतिबिंबहि दिसत नाहींसे होते ९६. तसें जेथें मुद्दल मनच नाहींसें झाल्यावर मग तेथें अहंकार इत्यादि कोठून राहणार ? म्हणूनच ब्रह्मस्वरूपाचा अनुभव घेणारा पुरुष तो शरीरधारी असतानांच 'ब्रह्म' होतो ९७.

**अन्वयार्थ**—**यज्ञतपसां**–यज्ञ व तपश्चर्या यांच्या–**भोक्तारं**–भोक्त्यास–**सर्वलोकमहेश्वरं** –सर्व लोकांच्या महान् ईश्वरास–**सर्वभूतानां सुहृदं**–सर्व भूतांच्या निरपेक्ष उपकारकास–**मां**–मला – **ज्ञात्वा** –जाणून –**शान्ति**–सर्व संसाराच्या शांतीस–**ऋच्छति**–प्राप्त होतो २९.

देहधारी असतानांच कांहीं लोक ब्रह्मभावास पावले, असें जें आम्हीं पूर्वीं तुला सांगितलें, ते तरी या मार्गानें आले म्हणूनच ९८. आणि ते यमनियमरूपी योगमार्गाचे डोंगर व योगाभ्यासरूप सागर ओलांडून पार झाले व पैलतीरास [ ब्रह्मभावास ] पोचलें ९९. आणि त्यांनींच आपल्या स्वतःला शुद्ध म्ह. उपाधिरहित करून प्रपंच अजमावला, [ मिथ्यात्व निश्चय केला ] व मग ते स्वतः त्रिकालाबाधित सत्य अशा ब्रह्माचे स्वस्वरूपच होऊन राहिले १६०. याप्रमाणें जेव्हां श्रीकृष्णांनीं योगयुक्तीचा-मार्गाचा अभिप्राय थोडक्यांत प्रदर्शित केला, तेव्हां अर्जुन मर्मज्ञ होता, म्हणून तो आश्चर्यचकित झाला ६१ हें पाहून श्रीकृष्णांनीं त्यांच्या मनांतील उद्देश जाणला व मग हांसून पार्थास म्हणाले, माझ्या या बोलण्यानें तुझें चित्त कां बरें प्रसन्न झालें ? ६२ तेव्हां अर्जुन म्हणतो, देवा ! दुसऱ्याच्या मनांतील अभिप्राय जाणणारांचे तुम्ही राजे आहांत, त्यामुळें आपण माझ्या मनांतील अभिप्राय चांगलाच जाणलात ६३. देवा ! मी जें कांहीं तुम्हांस [ योगासंबंधीं ] विचारपूर्वक पुसावें, तें तुम्हीं [ माझ्या मनांतील ] आधींच जाणलेंत, तर तुम्हीं जें कांहीं योगासंबंधीं आतां बोलला तेंच मला अधिक स्पष्ट करून सांगा ६४. सहज पाहिले तर देवा ऐका जो मार्ग तुम्हीं सांगितला, तो खोल पाण्यांतून पोहून जाण्यापेक्षां पायउतार जसा सोपा असतो, तसा आहे ६५. त्याचप्रमाणें ज्ञानयोगापेक्षां हा मार्ग [ अष्टांगयोग ] आमच्यासारख्या अधिकार दुर्बळांना सुगम आहे; येथें साध्यप्राप्तीस कांहीं विलंब लागेल; तरीपण तो विलंब सहन करतां येईल ६६. म्हणून देवा ! तोच योग आणखी एक वेळ विस्तारानें सांगावा. आतां अशानें जरी विस्तार होईल तरी हरकत

१ एकनिष्ठ, एकत्र, एकाग्र. २ इडा, पिंगला व सुषुम्ना या तिहींची जेथे भेट होते तेथे. ३ भिवयाच्या टोकांची. ४ माघारी फिरवून. ५ उजव्या व डाव्या नाकपुडीचे मार्ग. ६ ब्रह्मांड, चिदाकाश. ७ जाणारें. ८ रस्त्यावरील उदकें. ९ इतर वासनांची. १० विचार. ११ नाहीं होतें. १२ चिदाकाशांत. १३ वस्त्र. १४ प्रतिबिंब. १५ यम, नियम, आसन, धारणा इत्यादि योगमार्गाचे. १६ उपाधिरहित. १७ अभिप्राय. १८ मार्मिक ज्ञाता. १९ चमत्कार वाटला. २० प्रसन्न झाले. २१ दुसऱ्याच्या मनोगताचा जाणता. २२ विचार करून. २३ स्पष्ट. २४ मार्ग. २५ खोल पाण्यांतून पोहून जाण्यापेक्षां. २६ ज्ञानयोगापेक्षां २७ सुगम, सोपा. २८ निर्बळाला. २९ अनुभव.

सांगावा । साद्यंतुचि ॥ ६७ ॥ तंव श्रीकृष्ण म्हणती हो कां । तुज हा मार्गु गमला निका । तरी काय जाहलें आईकीजो कां । सुखें बोलों ॥ ६८ ॥ अर्जुना तूं परिससी । परिसोनि अनुष्ठिसी । तरी आम्हांसीचि वानी कायसी । सांगावयाची ? ॥६९॥ आधींचि चित्त मायेचें । वरी मिष जाहले पढियंतयांचें । आतां तें अद्‌भुतपण स्नेहाचें । कवण जाणे ॥ १७० ॥ तें म्हणों कारुण्यरसाची वृष्टि । कीं नवया स्नेहाची सृष्टि । हें असो नेणिजे दृष्टी । हरीची वानूं ॥ ७१ ॥ जे अमृताची वोतली । कीं प्रेमचि पिऊनि मातली । म्हणौनि अर्जुनमोहें गुंतली । निघों नेणे ॥ ७२ ॥ हें बहु जें जें जाल्पिजेल । तेथें कथेसि फांकु होईल । परि तें स्नेहरूपा न येल । बोलवरी ॥ ७३ ॥ म्हणौनि विसुरें काय येणें । तो ईश्वरु कवळावा कवणें । जो आपुलें मौन नेणें । आपणचि ॥ ७४ ॥ तरी मागील ध्वनीआंतु । मज गमला सावियाँची मोहितु । जे बलात्कारें असे म्हणतु । परिस बापा ॥७५॥ अर्जुना जेणें जेणें भेदें । तुझें कां चित्त बोधे । तैसें तैसें विनोदें । निरूपिजेल ॥ ७६ ॥ तो काइसया नाम योगु । तयाचा कवण उपेगु । अथवा अधिकारप्रसंगु । कवणा येथ ॥ ७७ ॥ ऐसें जें जें कांहीं । उक्त असे इये ठाईं । तें आघवेंचि पाहीं । सांगेन आतां ॥ ७८ ॥ तूं चित्त देऊनि अवधारीं । ऐसें म्हणौनि श्रीहरी । बोलिजेल ते पुढारी । कथा आहे ॥ ७९ ॥ श्रीकृष्ण अर्जुनासी संगु । नें सांडोनि सांगेल योगु । तो व्यक्त करूं प्रसंगु । म्हणे निवृत्तिदासु ॥ १८० ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥ श्लोक २९, ओव्या १८०



नाहीं; पण तो योगमार्ग साद्यंत–संपूर्णतया सांगाच ६७. श्रीकृष्ण म्हणाले:–"असें कां? तुला हा योगमार्ग चांगला आवडला असेल तर मग सांगायला आमचें काय बिघडते? आम्हीं आनंदानें सांगूं; खुशाल ऐक ६८. अर्जुना तूं ऐकतोस आणि त्याप्रमाणें आचरणहि करतोस असें जर आहे तर आम्हींच तुला सांगण्याचे बाबतींत कमतरता कां करावी? ६९. या श्रीकृष्णार्जुनांच्या बोलण्यावर श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात अगोदरच आईचें अंतःकरण आणि त्यांत आवडतेपणाचे निमित्त झालें तर मग त्या ठिकाणच्या प्रेमाचे अद्‌भुतपण कोण जाणील? ७०. ती श्रीहरीची कृपादृष्टि म्हणजे कारुण्यरसाचा वर्षावच आहे म्हणूं किंवा अद्भुत स्नेहाची सृष्टिच आहे असे म्हणूं!! परंतु हें असो. भगवंताच्या त्या कृपादृष्टीचें वर्णन कसें करावें हें आम्हांस कळत नाहीं ७१. ती दृष्टि जणुं अमृताचीच ओतलेली होती. किंवा प्रेम पिऊनच उन्मत्त–मस्त झाली होती म्हणूनच कीं काय अर्जुनाच्या मोहांत गुंतल्यामुळें तिला बाहेर निघण्याचे कळेना! ७२. या श्रीहरीच्या कृपादृष्टिविषयीं जों जों अधिक बोलावें, तों तों कथेची संगती सुटून विषयांतर होईल; तरीपण श्रीकृष्णाच्या आणि अर्जुन विषयींच्या प्रेमाचें यथार्थ वर्णन शब्दानें करतां येणार नाहीं ते नाहींच ७३.

म्हणून हा विचार करीत बसण्यांत काय उपयोग आहे? कारण, जो ईश्वर आपले [ अमर्याद, अनंत स्वरूपाचें ] मोजमाप आपणच जाणत नाहीं तो [अनाकलनीय] ईश्वर कोणी आकलन करावा? ७४. तरी मागें सांगितलेल्या अभिप्रायावरून मला सहजच असें वाटतें कीं, प्रस्तुत तो श्रीकृष्ण अर्जुनाविषयीं फार मोहित झाला आहे; हें निश्चित. कारण तो अर्जुनाला आग्रहानें बाबारें 'ऐक' असें म्हणत आहे; ७५. "अर्जुना! ज्या ज्या प्रकारानें तुझ्या चित्ताला बोध होईल त्या त्या प्रकारानें तुला कौतुकानें आम्ही हा योगमार्ग सांगूं ७६. तो 'योग' हे कशाला नांव आहे? त्याचा उपयोग कोणता? आणि त्या योगाचा अधिकार कोणाला आहे? ७७. असें जें जें कांहीं या संबंधानें योग्य, सांगण्याजोगे असेल, तें सर्वच आतां तुला मी सांगतों ७८. म्हणून तूं चित्त देऊन ऐक." असें बोलून श्रीहरींनीं जें कांहीं सांगितलें, तीं कथा पुढें आहे, ती सांगण्यांत येईलच ७९. श्रीनिवृत्तिदास श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात कीं, द्वैतसख्यभक्ति संबंधांत बिघाड होऊं न देतां श्रीकृष्णांनीं अर्जुनाला जो योग सांगितला, तो प्रसंग मी स्पष्ट करून सांगेन १८०.

१ आचारशील. २ न्यूनता, उणीव. ३ निमित्त. ४ आवडत्या मुलांचें. ५ अद्‌भुत. ६ वर्णन करूं. ७ जास्त बोलावें. ८ विषयांतर. ९ शब्दानें. १० विचार. ११ जाणावा. १२ प्रमाण. १३ सूचित अभिप्राय. १४ सहज. १५ कोणत्या. १६ उपयोग. १७ योग्य, सांगण्याजोगे. १८ सहवास, संबंध. १९ द्वैत कायम ठेवून. २० स्पष्ट.



# अध्याय संगति व पांचव्या अध्यायाचें तात्पर्य

**तरी जाणां नेणां सकळां । हा कर्मयोगु कीर प्रांजळा ।। अध्याय ५, ओवी १६.**

मागील चवथ्या अध्यायांत भगवंतांनीं आत्मज्ञानाची प्रशंसा केली अर्थात् कर्मसंन्यासाची किंवा ज्ञानमार्गाची अनेक रीतीनें महती वर्णनपूर्वक स्तुति केली; पण शेवटच्या श्लोकांत मात्र अर्जुनाला तूं कर्मयोगाचा अवलंब कर व युद्धाला उठ, उभा रहा, असा उपदेश केला. अशा प्रतिपादनामुळें अर्जुनाचें मन द्विधा होऊन त्याच्या मनांत कर्मयोग व कर्मसंन्यास, या दोन मार्गांपैकीं कोणता मार्ग अधिक हितकर आहे ? या विषयीं संभ्रम किंवा गोंधळ उत्पन्न झाला व अर्जुनानें देवास विचारलें 'हे देवा ! उपर्युक्त उभय मार्गांपैकीं श्रेयस्कर मार्ग कोणता ? कीं ज्या मार्गाचें अनुसरण केलें असतां मला मोक्षप्राप्ति होईल ? हे निश्चितपणें सांग' या अर्जुनाच्या प्रश्नांतून–शंकेंतून–किंवा विनंतींतून पांचवा अध्याय निर्माण झाला आहे.

या अध्यायांत नैष्कर्म्य स्थितीच्या स्वरूपाची नितान्तरम्य, उदात्त, उद्‌बोधक अशी चर्चा केली आहे. ती साधकाच्या पक्षीं अत्यंत आवश्यक व उपयुक्त आहे. तसेंच या अध्यायांत सिद्धाची, प्राप्तपुरुषाची अर्थात् ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारी पुरुषाची, जी लक्षणें सांगितलीं आहेत ती देखील साधकाच्या पक्षीं अत्यंत उपयुक्त आहेत. कारण, '**सिद्धस्य लक्षणानि साधकस्य साधनानि**' सिद्धांचीं जीं लक्षणें असतात तीं साधकांची साधनें असतात. साधकांनीं त्या प्रयत्नसाध्य साधनांचा अवलंब करून नैष्कर्म्यस्थिति संपादन करावी या दृष्टीनेंहि हें एक या अध्यायाचें वैशिष्ट्य होय.

उपरिनिर्दिष्ट भक्तराज अर्जुनाची विनंती ऐकून भगवंत मनांत फार प्रसन्न, संतुष्ट झाले व मोठ्या उत्साहानें त्याच्या प्रश्नाचें उत्तर दिलें, तें असें [ १ ते १४ ]. निष्काम कर्मयोग किंवा ज्ञानयोग तत्त्वतः हें दोन्ही मार्ग मोक्ष प्राप्त करून देणारे आहेत; तरीपण त्यांतल्या त्यांत उपर्युक्त दोन्ही मार्गांपैकीं कर्मयोग हा कर्मसंन्यासापेक्षां अधिक हितकर आहे, असें भगवंत निःसंदिग्धपणें सांगतात. याचा अर्थ ज्ञानयोग अगदींच कमी दर्जाचा, अनुपयोगी आहे असा मात्र नव्हे; हें सांगण्यासाठीं भगवंताच्या म्हणण्यांतील तात्पर्यविषयीभूत अर्थ श्रीज्ञानेश्वर महाराज सांगतात. तो असा कीं, सारासार विचार केला तर या जगांत कर्मयोगाचेच अधिक अधिकारी आहेत व हा निष्काम कर्मयोग म्हणजे जाणते, नेणते या सगळ्यांना आचरण्यास सुलभ आणि निश्चित फलदायी अर्थात् मोक्षफल पर्यवसायी असें साधन होय. आणि कर्मसंन्यास योगाचे अर्थात् ज्ञानमार्गाचे अधिकारी म्हणजे साधनचतुष्टयसंपन्न, अंतरंग मुमुक्षु, हे होत. त्यामुळें त्या ज्ञानमार्गाचें अधिकारी अर्थात् ज्यांचा पूर्वाधिकार सिद्ध आहे व ज्यास संशय विपर्ययाचा मुळींहि प्रतिबंध नाहीं असें अधिकारी फार विरळे !! अगदीं थोडे आहेत. म्हणून प्रायः सर्व सामान्यांना निष्काम कर्मयोग, हाच अधिकारदृष्टीनें सुयोग्य व आचरण्याच्या दृष्टीनें सर्व सुलभ आहे. याच एका वैशिष्ट्यामुळें 'निष्काम कर्मयोग श्रेयस्कर आहे' असें भगवंत म्हणतात [ १५ ते १८ ]. ज्याच्या अंतःकरणांत 'मी' आणि 'माझें' याचे स्मरणहि राहिलें नाहीं, म्हणजे ज्याचा 'अहंममाध्यास' समूळ निवृत्त झाला आहे, तो व्यवहारांत वावरत असल्यासारखा दिसला, तरीहि तो सदोदित कर्मसंन्यासीच होय. ज्याच्या मनाची विषयासक्तिरहित अशी स्थिति झाली आहे, त्यास अनायासानें सुखप्राप्ति होते; किंबहुना !! अशा स्थितींत घरदार इत्यादिकांचा त्याग करण्याची मुळींहि आवश्यकता नाहीं. कारण, मन विषयासक्ति विवर्जित होणें, देहेंद्रियादि उपाधिकडून कर्में होत असतांनासुद्धां आपल्या अकर्तृत्वांत, अलिप्तत्वाच्या बोधांत मुळींहि बिघाड होऊं न देणें, हीच खरी नैष्कर्म्यता वा नैष्कर्म्यस्थिति होय. यावरून सर्व सामान्यांच्या दृष्टीनें नैष्कर्म्यस्थिति म्हणजे कर्मानुष्ठान टाकून कांहीं एक न करतां राहणें, ही समजूत कशी चुकीची आहे, हें सहज लक्षांत येईल. सारांश, विषय वासनारहित होतो, तोच खरा संन्यासी होय [ १९ ते २९ ].

ज्ञानयोगाचें व कर्मयोगाचें फल एकच आहे. ही गोष्ट या दोन्ही मार्गांपैकीं कोणत्याहि एक मार्गाचे यथार्थत्व ज्यानें अनुष्ठानपूर्वक, नीट, परिपूर्ण जाणून घेतलें आहे, त्यास सहज कळेल. आत्मानात्म विचार करणाऱ्या ज्ञानयोगी

सांख्यांना जें स्थान प्राप्त होतें, तेंच स्थान, तेंच फल निष्कामकर्मानुष्ठान करणाऱ्या कर्मयोग्यासहि क्रमानें प्राप्त होतें म्हणजे ज्ञानमार्गाचें व कर्ममार्गाचें शेवटीं प्राप्यस्थान एकच आहे. [ दोन मार्गांत फरक एवढाच कीं, ज्ञानसाध्य 'सद्योमुक्ति' आणि निष्कामकर्म साध्य 'क्रममुक्ति' यांच्या अनुक्रमें सांख्ययोगी व कर्मयोगी या अधिकाऱ्यांत 'विहंगम' व 'पिपिलिका' यांच्या गतीइतकेंच फक्त काळाचें अंतर असते; तरीपण शेवटीं फलाच्या ऐक्यतेंत, प्राप्यस्थानाच्या ऐक्यतेंत सांख्ययोग व निष्काम कर्मयोग यांत अभेद आहे, अशी यांतील तात्पर्यविषयीभूत प्रक्रिया आहे. या अध्यायाचें एक आगळें विशेष महत्त्व गणलें जातें, तेंहि याच एका दृष्टीनें होय ] [ २६ ते ३१ ]. उपरिनिर्दिष्ट निष्काम कर्मयोगाच्या हातवटीच्या मार्गानें मोक्षरूप पर्वतावर जो वाटचाल करतो, चढतो तो परमानंदरूपी शिखर त्वरेनें, तात्काळ गांठतो. या मार्गाची उपेक्षा करून जो निष्काम कर्मयोगाचें यथायोग्य अनुष्ठान करीत नाहीं; पण निष्कारणच अधिकार विचार न करतां कर्मसंन्यासाच्या छंदांत पडतो, त्याला मात्र संन्यास-फलाची किंवा कोणत्याच फलाची प्राप्ति होत नाहीं [ ३२ ते ३३ ]. [ ज्यानें निष्काम कर्मयोग, हा चित्तशुद्धिद्वारां, विविदिषेद्वारां ज्ञानाचें साधन आहे, असें जाणून ] ज्यानें विवेकयुक्त वैराग्यानें मनांतील विषयसक्ति निवृत्त करून श्रीगुरूंच्या उपदेशानें शुद्ध होऊन, मन आत्मस्वरूपीं मुरवून स्थिर केलें व मन संकल्परहित केल्यामुळें ज्याचें चित्त चिद्रूप झालें आहे, तो परिच्छिन्न असल्यासारखा दिसला, तरी त्यानें तिन्ही लोक व्यापिलें आहेत, असें समज. अशा पुरुषाकडून सर्व कर्में झालीं तरीहि तो देहतादात्म्य-भ्रान्तिरहित झाल्यामुळें अकर्ताच असतो. अर्जुना ! त्याला 'मी देह आहें' अशी देहात्मत्व भ्रांतीच राहिलेली नसते. त्यामुळें त्याला कर्तेपणा राहणार नाहीं व कर्तेपणा त्याचे ठिकाणीं राहणें शक्यहि नाहीं; किंबहुना !! त्याचे ठिकाणीं कर्तेपणा कसा राहूं शकेल ? मुळींहि नाहीं. एऱ्हवीं तोहि इतर लोकांप्रमाणें देहांत असून देहेंद्रिय स्थूल-सूक्ष्म-संघातांत वावरत असला तरीहि बोधानें त्यांच्याशीं तादात्म्य नसल्यानें तोच खरा अकर्ता होय. ब्रह्मात्मैक्यज्ञानाचा उदय झाल्यामुळें त्याची पूर्वींची भ्रांतीची झोप पार नाहींशी झालेली असते. त्यामुळेंच चेतनाधिष्ठानावर अचेतन शरीरेंद्रियादिक उपाधीकडून सर्व कर्में होत असली तरीसुद्धां जसें कमळाचें पान पाण्यांत असूनहि पाण्यानें लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें तो धर्माधर्मरूप कर्मबंधनापासून अलिप्त असतो. कर्मबंधानें आकळला जात नाहीं [ ३४ ते ५० ]. त्याच्या ठिकाणीं बुद्धिपासून तों थेट स्थूल देहापर्यंत कोठेंहि अहंकार, तादात्म्यभ्रान्ति नसल्यामुळें कर्मानुष्ठान करतांनाहि, त्यापासून अलिप्त व शुद्धच असतो. अर्जुना ! कर्तेपणाचा अहंकार टाकून केलें जाणारें जें कर्म तेंच खरें नैष्कर्म्य होय. केवळ श्रीगुरुकडूनच कळणारी ही मार्मिक गोष्ट, ते प्राप्तपुरुष जाणतात. श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, शब्दातीत, शब्दमर्यादेपलीकडील स्थितीचें वर्णन करतेवेळीं शांत रसाचे भरते आल्यामुळें ते मर्यादा सोडून उचंबळत आहे. आतां श्रीकृष्ण अर्जुनाला प्राप्तपुरुषाचे लक्षण सांगतात, ते असें [ ५१ ते ७० ]. या ज्ञानयोगसंपन्नपुरुषास फलाभिलाष मुळींहि नसल्यामुळें शांति घरांत घुसून वरते. तो जिकडे पाहतो तिकडे सुखमय सृष्टि होते. तो सांगेल तेथें महाबोध राहतो, असा तो पुरुष देहांत असूनहि देहतादात्म्यरहित असल्यामुळें व कर्मफलाविषयीं उदास असल्यामुळें कर्में करीत असला तरी तत्त्वतः अकर्ताच असतो [ ७१ ते ७५ ].

हा पुरुष बोधदृष्ट्या ईश्वराप्रमाणेंच असतो. सर्वेश्वर हा तत्त्वतः अकर्ताच असतो. तो अखिल विशाल विश्वांतील प्राणीमात्रांच्या ठायीं व्यापक असूनहि तो कोणाविषयींहि आसक्त न होतां उदास राहतो; किंबहुना !! त्याच्या अकर्तेपणाला यत्किंचितहि बाध न येतां जगत् उत्पन्न होते व लयासहि जाते. तरी त्याची त्याला दादहि नसते. तो स्वरूपेंकरून असंग असल्यामुळें सगुण अवतार धारण करून जगांत वावरतो, तरीहि त्याच्या पारमार्थिक, अशा निर्विशेष स्वरूपांत यत्किंचितहि न्यूनाधिकता होत नाहीं; तरीपण सामान्य लोक अज्ञानामुळें ईश्वराचें ठिकाणीं जगतादिकांच्या कर्तृत्वाचा उगाच आरोप करतात. परमार्थतः मात्र ईश्वर अकर्ताच असतो [ ७६ ते ८२ ]. जेव्हां संपूर्ण अज्ञान नाहींसें होतें, तेव्हां भेदभ्रान्तिरूप काजळी दूर होते. व मग जसा ईश्वर अकर्ता, नित्यमुक्त आहे, तसाच मीहि अकर्ता, असंसारी, नित्यमुक्त आहे, असें ज्यास आत्मत्वानें अपरोक्षज्ञान होतें. तेव्हां पूर्वीपासूनच स्वभावतः तो व

मी एकच आहोत. असें त्यास फक्त ज्ञात होते. अर्थात् ज्याच्या चित्तांत अशा विचाराचा उदय होतो त्याला त्रैलोक्यांत भेदप्रतीती येईल कशी? तो आपल्या स्वतःच्या दृष्टीनें सारे 'जगचि मुक्त' असें पाहतो. ज्याप्रमाणें पूर्वदिशेच्या मंदिरांत सूर्योदय होतांच दिवाळीच्या सणाची सुरुवात होते; तरीपण त्याचवेळीं इतर दिशांचाहि काळोख नाहींसा होतो. [ यांतील मुख्य अभिप्राय, तात्पर्य असें कीं, चित्तांत 'मी ब्रह्मरूप आहें' असें ब्रह्माचें आत्मत्वानें निःसंदिग्ध अपरोक्षज्ञान झालें, कीं मग त्याची परिणति, परिपूर्ति अंतर्बाह्य सर्वत्र ब्रह्मच ओतप्रोत, सभराभरित, व्याप्त आहे, या अपार बोधसागरांत होते. कारण, यच्चयावत् दृश्यांचा द्रष्टा जो प्रमाता तो ब्रह्मरूप झाला कीं मग यच्चयावत् प्रमेयांचीहि ब्रह्मरूपेंकरूनच प्रतीति येते. ही सर्वत्र ब्रह्मभावरूप व्यापक अनुभूति प्राप्त होणें, हेंच खरें अंतिम परमोच्च, सर्वोत्कृष्ट साध्य होय ].

या व्यापक अनुभूतीसाठीं बुद्धि निश्चयानें ब्रह्माचें आत्मत्वानें ज्ञान झालें म्हणजे साधक आपण आपणास ब्रह्मरूप मानूं लागतो व तो रात्रंदिवस ब्रह्मपरायण होऊन, अखंड ब्रह्माकार वृत्तिरूप निदिध्यासन करीत असतो. मग तें बरवें ज्ञान त्याच्या हृदयाचा शोध करीत येतें व त्यास ब्रह्माचे आत्मत्वानें साक्षात्कारात्मक ज्ञान प्राप्त झालें कीं, मग त्यांस समतादृष्टि–सर्वत्र व्यापक ब्रह्मदृष्टि लाभते. तिचे शब्दानें अधिक वर्णन काय करूं? त्या समदृष्टि पुरुषास भेदप्रतीति अशी होतच नाहीं. कारण, जर अहंकार, देहात्मत्वभ्रांति उर्वरित राहिली असेल तरच त्यांस भेदाची प्रतीति होईल; पण सिद्धपुरुषाची ती देहात्मत्व भ्रांति मुळांत पूर्णतया नाहींसी झालेली असते; त्यामुळें आतां भेदभाव कोठून असणार? मुळींहि नाहीं. अतएव 'सर्वत्र' म्हणजे सर्व ठिकाणीं किंवा देशपरिच्छेदरहित, "सदा" म्हणजे सर्वकाळ, कालपरिच्छेदरहित, 'सम' म्हणजे सर्व वस्तूंत साधारण व्याप्त, किंवा वस्तुपरिच्छेदरहित असें जें अद्वय ब्रह्म तें आपणच आहोत, हें समदृष्टीचें तत्त्व तो पूर्णतया जाणतो. असा बोधवान् असूनहि त्याची वागणूक अलौकिक नसते; तर तो लौकिकांत लोकांना अनुसरून लोकांप्रमाणेंच व्यवहार करतो. त्यामुळें त्याला संसारी लोक ओळखत नाहींत. त्याचें नामरूप जगाप्रमाणेंच असलें तरी त्याचें मन मात्र समतेस, ब्रह्मभावास प्राप्त झालें असल्यामुळें तो बोधदृष्ट्या ब्रह्मच आहे, असें भगवंत सांगतात [ ८३ ते १०४ ].

समदृष्टीचा तत्त्ववेत्ता आत्मस्वरूपाला सोडून इंद्रियरूपी गांवांतच येत नाहीं. कारण, तो देहेंद्रियतादात्म्य रहितच झालेला असतो. मग तो विषय सेवन करीत नाही यांत आश्चर्य ते काय? अपार, अनंत, अपरिमित, निरतिशय, स्वाभाविक, भोगनिरपेक्ष आत्मसुखाच्या विपुलतेंतच मन स्थिर झाल्यामुळें जो बाहेर पाऊलहि टाकीत नाहीं, अर्थात बाह्यविषयाकडे प्रवृत्तच होत नाहीं. जो चकोर कुमुद-दळांवर असलेल्या शुद्ध चंद्रकिरणांचे सेवन करतो तो चकोरपक्षी वाळवंटांतील वाळूचे कण चाटीत बसेल काय? मुळींच नाहीं. त्याचप्रमाणें ज्यास स्वतःच्या अंतरींच सर्वोत्कृष्ट नित्यनिरतिशय आत्मसुख प्राप्त झालें, त्याची विषयवासना सहजच सुटली, हे काय निराळें सांगावयास पाहिजे? [ १०५ ते १०८ ]. येव्हवीं ज्यास अधिष्ठानभूत अनंत आत्मसुखाची मुळींहि जाणीव नाहीं, अशा भ्रान्तासच विषयांत सुख आहे, असें वाटतें व त्याची सुखप्राप्तीसाठीं विषयाकडे प्रवृत्तीहि होते; कारण अनुकूल विषयापासून क्षणमात्र सुख आहे असें दिसते तरीपण ती प्रवृत्ति परिणामीं निरर्थकच ठरतें. कारण, जीवांना नित्यनिरतिशय सुख हवे आहे तसें तें विषयसुख नाहीं. शिवाय मृगजळाला 'जळ' म्हणण्याप्रमाणें 'विषयांत सुख आहे' म्हणणें व्यर्थ आहे. विषयांत केवळ सुखाभास आहे. त्या विषयांचे ज्यास परिणामीं दुःखद स्वरूप माहित नसते त्यास अगतिकत्वानें विषयाचे सेवन करावे लागते; तर मग मूर्खांनीं विषयसुख सेवन न करावें तर मग काय करावें? आत्मसुखाचे ज्ञानच नसल्यामुळें विषयसुख सेवन करणें भाग पडते. कारण सुखाची इच्छा तर सर्व जीवमात्रांना स्वाभाविकच आहे ना? पण ज्ञानी पुरुषांना विषयांत तत्त्वतः सुख नसून केवळ सुखाभास आहे व वास्तविक आत्माच सुखरूप असें ज्ञात असल्यामुळें तें विषयांत मुळींहि रममाण होत नाहींत. विषयसुख म्हणजे दुःखच समजून त्याचा त्याग करितात व त्यांना होणारें सुख, हें बाह्य विषयोपभोगाप्रमाणें भोक्ता–भोग्य–भोग या

त्रिपुटीनें युक्त, असें नसतें; त्रिपुटीरहित व भोगनिरपेक्ष नित्य असें सुख असते. म्हणूनच निस्पृह पुरुषांस विषयांनीं दाखविलेलें दुःखरूपी सुख किंवा सुखाभास आवडत नाहीं [ १०९ ते १२८ ]. किंबहुना ! ! यथार्थ ब्रह्मात्मैक्य-ज्ञान्यांच्या ठिकाणी या विषयांची वार्ताहि नसते. त्यांनीं देहांत असतांनाच बोधानें देहतादात्म्यभ्रान्तीची निवृत्ति केलेली असते. त्याला आपल्या अंतरींच होणारें त्रिपुटीरहित, भोगनिरपेक्ष, सोलीव, स्वरूपभूत, आत्मसुखच असतें. द्वैताचा तर पूर्णतया निरास झाला असल्यामुळें 'ऐक्य होते' अगर 'ऐक्य आहे' असें म्हणणारा साक्षी तरी कोण उर्वरित राहिला आहे ? म्हणजे द्वैतनिरपेक्ष अद्वय स्थिति, अद्वयानंदावस्था उर्वरित राहते. म्हणून तें सुख अवर्णनीय आहे. जे स्वतः ब्रह्मनिष्ठ आहेत, त्यासच हे वर्म कळेल. ते ज्ञानी म्हणजे आपण आपल्याच सुखांत रममाण झालेलें असतात. किंबहुना ! तें पूर्णपणें सामरस्याचें ओतीव पुतळेंच होत, असें मी समजतों; असें श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात.

श्रीभगवंत म्हणतात अर्जुना ! अपार सुखाच्या डोहांत तें ज्ञानी एकदम तळाशीं जाऊन तेथें स्थिर होऊन तद्रूपतेसच प्राप्त झाले व त्यांस ब्रह्माचें आत्मत्वानें अपरोक्षज्ञान झाल्यामुळें ब्रह्माच्या ठिकाणीं अध्यस्त असणारे अखिल विश्वांत सामान्यरूपानें आपणच आहोत, असें ते जाणतात म्हणून तें देहांतच परब्रह्म आहेत, असें खुशाल मानतां येईल [ १२९ ते १४५ ]. या अक्षय, परम, असीम, ब्रह्मस्थितीचें वैराग्यवान्, विषयवासनारहित, निष्काम अंतरंग पुरुष, हेच अधिकारी असतात; आत्मज्ञान्यांचे अंतिम साध्य जें मोक्षरूप परब्रह्म तेंच तें पुरुष देहांत असतांनाहि आहेत, असें समज. त्यांनीं आरंभीं दृढतर वैराग्याच्या साहाय्यानें चित्तांतील विषयवासनांचा पूर्णपणें त्याग, करून यम, नियम, प्राणायाम या साधनानुष्ठानद्वारां मनोवृत्ति अंतर्मुख, एकाग्र, स्थिर करून मनाचा लय केला. किंबहुना ! ! ज्ञानप्राप्तीनंतर ज्याच्यावर संसाररूपी चित्र उमटते. तो मनोरूपी पटच फाटून जातो, मग अहंकार व देहतादात्म्यभ्रांति आपोआपच निवृत्त होते व ब्रह्मानुभवी मनुष्य देहधारी असतांनाच ब्रह्मरूप होतो. जे शरीरांतच ब्रह्मभावास प्राप्त होतात असें मागें सांगितलें होते, तें याच मार्गानें कीं प्रथम साधक यमनियम अभ्यासाच्या सहाय्यानें स्वतः शुद्ध निरुपाधिक झाले व प्रपंच आजमात्रला, प्रपंचाविषयीं दृढमिथ्यात्वनिश्चय केला. अर्थात् ते साधक चित्तशुद्धि व ज्ञानप्राप्तिद्वारां ब्रह्मस्थितीस प्राप्त झाले [ १४६ ते १६० ].

या प्रकारें भगवंतांनीं योगमार्गाचा दंश–अभिप्राय थोडक्यांत सांगितला, तेव्हां अर्जुन मर्मज्ञ असल्यामुळें आश्चर्यचकित झाला, चमकला; हें पाहून श्रीकृष्ण हांसून अर्जुनाला म्हणाले 'माझ्या या बोलण्यानें तुझे चित्त प्रसन्न झाले कां ? यावर अर्जुन अत्यंत विनम्र भावनापूर्वक म्हणाला देवा ! आपण मनकवड्यांचें राजेच. म्हणून आपण माझ्या चित्तांतील अभिप्राय जाणून मी जे आपणास विचारणार ते विचारण्याच्या आधींच जाणलें ? आपण सांगिततलेला हा योगमार्ग पाय उतारासारखा ज्ञानमार्गापेक्षां सोपा वाटतो व हाच मार्ग आमच्यासारख्या दुर्बलांना समजण्यास सोपा, आचरण्यासहि बरा, उपयुक्त वाटतो. या मार्गानें प्राप्यस्थानाप्रत पोचण्यास कांहीं विलंब लागेल खरा; पण मग तो सहन करतां येईल. म्हणून देवा ! हाच मार्ग पुनः चांगला विशद करून सांगा, असा अर्जुनाचा विनम्रभाव, योग श्रवणाविषयींची उत्कंठा पाहून व अर्जुन नुसतां ऐकणारा नसून ऐकून तदनुसार अनुष्ठान करणारा आहे, असें जाणून देव म्हणाले. अर्जुना ! तूं ऐकणार असशील व तदनुसार आचरण, अनुष्ठान करणार असशील, तर मग मी तुला सांगण्याची कमतरता कां करावी ? तर मी तुला अवश्य आनंदानें सांगेन. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं देव व अर्जुन यांच्यांतील प्रेमाचें हृदयंगम, चित्ताकर्षक वर्णन केले आहे. आतां योग म्हणजे काय ? अर्थात् योगाचे स्वरूप काय ? त्याचा उपयोग काय ? आणि त्याचा अधिकारी कोण ? इत्यादि विषयांचे वर्णन देव अति विशदरूपेंकरून पुढील अध्यायांत अर्जुनाला सांगणार आहेत. तोच विषय मीहि पुढील अध्यायांत सांगेन, असें श्रीनिवृत्तिदास श्रीज्ञानदेव म्हणतात [ १६१ ते १८० ].

[ या संपूर्ण पांचव्या अध्यायाचा नकाशा क्रमांक ६ पहावा ]



# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय सहावा

मग रायातें म्हणे संजयो । तोचि अभिप्रावो अवधारिजो । कृष्ण सांगती आतां जो । योगरूप ॥ १ ॥ सहजें ब्रह्मरसाचें पारणें । केलें अर्जुनालागीं नारायणें । कीं तेचि अवसरीं पाहुणे । पातलों आम्ही ॥ २ ॥ कैसी दैवाची आगळिक नेणिजे । जैसें तान्हेलिया तोयं सेविजे । कीं तेंचि चवी करूनि पाहिजे । तंव अमृत आहे ॥ ३ ॥ तैसें आम्हां तुम्हां जाहलें । जे आडमुठीं तत्त्व फावलें । तंव धृतराष्ट्रें म्हाणितलें । हें न पुसों तूंतें ॥ ४ ॥ तया संजया येणें बोलें । रायाचें हृदय चोजवलें । जें अवसरीं आहे घेतलें । कुमारांचिया ॥ ५ ॥ हें जाणोनि मनीं हांसिला । म्हणे म्हातारा मोहें नाशिला । एऱ्हवीं बोलु तरी भला जाहला । अवसरीं इये ॥ ६ ॥ परि तें तैसें कैसेनि होईल । जात्यंधु कैसें पाहेल । तेवींचि ये रुसें घेईल । म्हणौनि बिहे ॥ ७ ॥ परि आपण चित्तीं आपुला । निकियेंपरी संतोषला । जे तो संवादु फावला । कृष्णार्जुनांचा ॥८॥ तेणें आनंदाचेनि धालेपणें । साभिप्राय अंतःकरणें । आतां आदरेंसीं बोलणें । घडेल तया ॥९ ॥ तो गीतेमाजी षष्ठींचा । प्रसंगु असे आयणीचा । जैसा क्षीरार्णवीं अमृताचा । निवाडु जाहला ॥१०॥ तैसें गीतार्थाचें सार । जे विवेकसिंधूचें पार । नाना योगविभवभांडार । उघडलें कां ॥ ११ ॥ जें आदिप्रकृतीचें विसवणें । जें शब्दब्रह्मासि न बोलणें । जेथूनि गीतावल्लीचें ठाणें । प्ररोहो पावे ॥ १२ ॥ तो अध्यावो सहावा । वरि साहित्याचिया बरवा । सांगिजैल म्हणौनि परिसावा । चित्त देउनी ॥ १३ ॥ माझा मराठाचि बोलु कौतुकें । परि अमृतातेंही पैजां जिंके । ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन ॥ १४ ॥ जिये कोंवाळिकेचेनि पाडें । दिसती नादींचें रंग थोडे । वेधें परिमळाचें बीक मोडे । जयाचेनि ॥ १५ ॥ ऐका रसाळपणाचिया लोभा । कीं श्रवणींचि होति जिभा । बोलें इंद्रियां लागे कळंभा । एकामेकां ॥१६॥ सहजें शब्दु तरी विषो श्रवणाचा । परि रसना म्हणे रसु हा आमुचा । घ्राणासि भावो

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय सहावा

मग संजय धृतराष्ट्रास म्हणाला, राजा! तां श्रीभगवान् अर्जुनाला योग स्वरूपाबद्दल जो आपला अभिप्राय सांगतील, तोच ऐक १. देवांनीं अर्जुनाला सहज ब्रह्मरसाचें पारणें केलें, तों त्याच वेळीं आम्ही तेथें प्राहुणे म्हणून प्राप्त झालों २. मी आपल्या दैवाची थोरवी किती आहे हे जाणत नाहीं! ज्याप्रमाणे तहान लागलेल्या मनुष्यानें पाणी पिण्याकरितां म्हणून पाण्याचें भांडें तोंडीं लावावें व तें चाखून पाहतों तोंच तें अमृतच आहे असें कळावें! ३. त्याचप्रमाणें राजा! एकादी आडगिऱ्हाइकी मौल्यवान् वस्तु थोडक्यांत प्राप्त होते तसेच आम्हांला व तुम्हाला झाले आहे. कारण परमात्मतत्त्व सहजच प्राप्त झालें. परंतु हें भाग्य, दुर्दैवी धृतराष्ट्राचें नव्हतें म्हणून तो धृतराष्ट्र संजयाला म्हणाला कीं, "तुला ब्रह्मरसाविषयीं मी कांहीं विचारीत नाहीं! उगीच काय बोलतोस?" ४. ह्या बोलण्यावरूनच धृतराष्ट्राजाचे मन पुत्राची हकीकत ऐकण्याविषयींच उत्कंठित झाले आहें, असें संजयास कळून आले ५. हें जाणून संजय मनांत विस्मय पावून हंसला आणि आपल्याशीच म्हणाला, अरे! अरे! हा म्हातारा पुत्रमोहाने अगदी वेडावला व वाया गेला आहे. एव्हवीं एथपर्यंतचा कृष्णार्जुनाचा संवाद अति उत्तम झाला आहे ६. परंतु तें तसे कसे होईल? [या संवादाची गोडी याला कोठून लागणार?] कारण, जो जन्मांध आहे त्याला कसें दिसेल? पण याला असें स्पष्ट बोलण्याची सोय नाहीं. कारण त्याच्या मनांत राग येईल, म्हणून संजय उघड रीतीनें स्पष्ट बोलण्यास भ्याला ७. तरीपण श्रीकृष्ण व अर्जुनाचा परस्परांत झालेला संवाद आपल्याला प्राप्त झाला म्हणून तो आपल्या मनांत उत्तम प्रकारें संतोषित झाला ८. त्या आनंदाच्या तृप्तीनें व बोलण्याचा अभिप्राय जाणून प्रफुल्लित अंतःकरणानें तो संजय आतां मोठ्या अदबीनें, आदराने धृतराष्ट्राला सांगता होईल ९. क्षीरसागराचें मंथन करतांना जशी अमृताची निवड व प्राप्ति झाली–त्याचप्रमाणें गीतेमध्यें सहाव्या अध्यायाचा प्रसंग उत्तम असून तो बुद्धीचातुर्यानें जाणावयाचा आहे १०. तो अध्याय गीतार्थाचें सार होय, व आत्मानात्मविचाररूपीं समुद्राचे पैलतीर होय; अथवा जणूं काय योगसंपत्तीचे उघडे केलेले कोठारच आहे ११. जें आदिमायेचें विश्रांतिस्थान आहे व ज्या ठिकाणीं वेदांनाहि मौन धारण करावें लागतें; आणि ज्यापासून गीतारूप वेलीच्या अंकुराचें स्वरूप वाढीला लागले १२. तो हा सहावा अध्याय असून त्यावर सर्व अलंकारादि साहित्यांनीं परिपूर्ण असा सांगितला जाईल म्हणून तो चित्त देऊन ऐकावा १३. माझे हे बोल शुद्ध प्राकृत आहेत खरे; परंतु ते सहज लीलेने अमृतालाहि प्रतिज्ञापूर्वक जिंकतील अशी रसभरित अक्षररचना मी करीन १४. ज्या बोलाच्या मृदुपणाच्या मानाने पाहिले असतां सप्तस्वरांपासून होणारा आनंदहि कमीच दिसेल व ज्या अक्षराचा चित्ताकर्षकपणा सुवासांचे सामर्थ्यहि नाहीसे करील १५. पहा की, अक्षरांच्या रसाळपणाच्या आशेनें कानालाच जिभा उत्पन्न होतील अशा या शब्दामुळें इंद्रियें आपापसांत कलह करूं लागतील. [ कारण ] १६. सहज विचार करून पाहिलें तर 'शब्द' हा कानांचा विषय आहे; परंतु जीभ म्हणेल की, हा आमचाच रस–विषय आहे व नाकालाहि असे वाटेल कीं हा तर आमचा गंध–विषय आहे. असा

१ धृतराष्ट्राला. २ आत्मानात्मज्ञानरसाचें. ३ समर्थी. ४ पाणी. ५ चाखून. ६ आडगिऱ्हाइकी. ७ ब्रह्म. ८ प्राप्त झाले. ९ जाणवले, समजले. १० पुत्रांचीं चांगली हकीकत. ११ पुत्रवात्सल्यानें. १२ संवाद. १३ जन्मांधाला. १४ उजाडेल, उजाडावें. १५ दृष्ट होईल. १६ उत्तम प्रकारें, चांगल्या रीतीनें. १७ परस्पर प्रश्नोत्तररूप संभाषणाचा लाभ झाला. १८ तृप्तीनें. १९ मनांतल्या अर्थासह. २० अदबीनें २१ सहाव्या अध्यायाचा. २२ चतुरपणाचा. २३ क्षीरसागराचें मंथन करतांना. २४ योगसंपत्तीचा जामदारखाना. २५ आदिमायेचें. २६ विश्रांतिस्थान. २७ वेदाला. २८ गीतारूप वेलीचें. २९ स्वरूप. ३० अंकुर. ३१ सर्व कौशल्याचा उपसंहाररहित. ३२ प्राकृत, साधा.

जाय परिमळाचा । हा तोचि होईल ॥ १७ ॥ नवल बोलतीये रेखेची वाहणी । देखतां डोळ्यांही पुरों लागे धणी । ते म्हणती उघडली खाणी । रूपाची हे ॥ १८ ॥ जेथ संपूर्ण पद उभारे । तेथ मनचि धांवे बाहिरें । बोलु भुजाही आविष्करें । आलिंगावया ॥ १९ ॥ ऐशीं इंद्रियें आपुलालिया भावीं । झोंबती परि तो सरिसेपणेंचि बुझावी । जैसा एकला जग चेववी । सहस्रकरु ॥ २० ॥ तैसें शब्दाचें व्यापकपण । देखिजे असाधारण । पाहातयां भावज्ञां फावती गुण । चिंतामणीचे ॥ २१ ॥ हें असोतु या बोलांचीं ताटें भलीं । वरी कैवल्यरसें वोगरिलीं । ही प्रतिपत्ति मियां केली । निष्कामासी ॥ २२ ॥ आतां आत्मप्रभा नीच नवी । तोचि करूनि ठाणदिवी । जो इंद्रियांतें चोरूनि जेवी । तयासीचि फांवे ॥ २३ ॥ येथ श्रवणाचेनि पांगें- । वीण श्रोतयां होआवें लागे । हे मनाचेनि निजांगें । भोगिजे गा ॥ २४ ॥ आहाच बोलाची वालीफ फेडिजे । आणि ब्रह्माचियाचि आंगा घडिजे । मन सुखेंसी सुरवाडिजे । सुखाचि माजीं ॥२५॥ ऐसें हळुवारपण जरी येईल । तरीच हें उपेगा जाईल । एऱ्हवीं आघवी गोठी होईल । मुकिया बहिरयाची ॥ २६ ॥ परी तें असो आतां आघवें । नलगे श्रोतयांतें कडसावें । जे अधिकारिये एथ स्वभावें । निष्कामकामु ॥२७॥ जिहीं आत्मबोधाचिया आवडी । केली स्वर्गसंसाराची कुरोंडी । तेवांचूनि एथींची गोडी । नेणती आणिक ॥ २८ ॥ जैसा वायसीं चंद्र नोळखिजे । तैसा प्राकृतीं हा ग्रंथु नेणिजे । आणि तो हिमांशुचि जेविं खाजें । चकोराचें ॥ २९ ॥ तैसा सज्ञानासी तरी हा ठावो । आणि अज्ञानासी आन गांवो । म्हणौनि बोलावया विषय पहा हो । विशेषु नाहीं ॥३०॥ परी अनुवादलों मी प्रसंगें । तें सज्जनीं उपसाहावें लागे । आतां सांगेन काय श्रीरंगें । निरोपिलें जें ॥ ३१ ॥ तें बुद्धीही आकळितां सांकडें । म्हणौनि बोलीं विपायें सांपडे । परी श्रीनिवृत्तिकृपादीप उजियेडें । देखैन मी ॥ ३२ ॥ जें दिठीही न पविजे । तें दिठीविण देखिजे । जरी अतींद्रिय लाहिजे । ज्ञानबळ ॥ ३३ ॥ ना तरी जें धातुवादाही न जोडे । तें लोहींचि पंधरें सांपडे । जरी दैवयोगें चढे । परिसु हातां ॥ ३४ ॥ तैसी गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु नोहे । म्हणौनि तें अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ॥ ३५ ॥ तेणें कारणें मी बोलेन ।

भास होण्याला कारण, हा शब्दविषयच होईल १७. माझ्या अपूर्व सुंदर अक्षर रचनेची पद्धत नवलपूर्ण आहे कारण, ही बोलण्याची नुसती सरणी पाहून डोळे तृप्त होतील; आणि ते म्हणतील कीं, हे बोल नसून हे प्रत्यक्ष रूपविषयाचे कोठारच उघडले आहे ! १८. जेव्हां शब्द जुळून संपूर्ण वाक्य बाहेर पडेल, अर्थावबोधक पदरचना तयार होईल तेव्हां इन्द्रियांना मागें टाकून मनच बाहेर धांव घेईल आणि आपलें बाहुहि त्या वाक्याला आलिंगन देण्याला सरसावतील १९. याप्रमाणें सर्व इन्द्रियें आपापल्या स्वभावधर्माप्रमाणें त्या बोलाला झोंबतील परंतु तो शब्दहि सगळ्यांची सारखी समजूत पटवून देईल; ज्याप्रमाणें एकटाच सूर्य सर्व जगाच्या व्यवहाराला प्रवृत्त करतो २०. त्याप्रमाणें शब्दांचे व्यापकपण अलौकिक आहे असें समजावें आणि जो त्यांचा अर्थ विचारपूर्वक तात्पर्य जाणणारा आहे, त्याला त्यांचे ठिकाणीं चिंतामणीसारखें गुण आढळून येतील २१. हे असो, अशी शब्दरूपी हीच कोणी मोठालीं चांगली ताटें व त्यांत मोक्षरूपी पक्वान्नें वाढलेली आहेत अशी ही ग्रंथरचनारूपी मेजवानीच मी निष्कामीजनांना केली आहे २२. या मेजवानींत उजेडाकरितां नित्य नवी अशी जी आत्मज्योती हीच कोणी एक ठाणवई करून, त्या उजेडांत जो, इन्द्रियांना न कळतां [ मेजवानीचें ] सेवन करील, त्यालाच [ कैवल्य रसाची ] प्राप्ति होईल २३. या ठिकाणीं श्रवणाचें साधन जे कान त्याचा पंगिस्तपणा टाकून श्रोता व्हावयास पाहिजे व [ कैवल्यरसाचा ] श्रोत्यांनी केवळ मनाच्याच साह्यानें उपभोग घ्यावा २४. वरवर असलेली शब्दरूपीं टरफलें, कवचे प्रथम काढून टाकावीत आणि त्या शब्दाचें लक्ष्यार्थभूत असलेल्या ब्रह्मस्वरूपाशींच तद्रूप व्हावें मग स्वस्थपणानें सुखामध्येंच रंगून जावें, सुखाची गोडी घ्यावी २५. अशा प्रकारें मनाला जर सूक्ष्मपणा येईल तर त्यालाच याचा उपयोग होईल, नाहीं तर—सर्व गोष्टी मुक्यानें सांगितल्या व बहिऱ्यानें ऐकल्या त्याप्रमाणें निष्फल होतील २६. परंतु आतां तें सर्वच राहू दे ! श्रोत्यांची चिकित्सा व निवड करण्याची आवश्यकता नाहीं. कारण, सामान्यतः जे निष्काम पुरुष असतील तेच स्वाभाविकपणें या विषयाचे अधिकारी आहेत २७. [ ते निष्काम कसे म्हणशील तर ] ज्यांनीं ब्रह्मात्मैक्यज्ञानाच्या आवडीनें स्वर्ग आणि संसार हा उतारा ब्रह्मात्मैक्य ज्ञानावरून ओवाळून टाकला आहे, त्यांच्याशिवाय इतरांना या बोलातील विषयाची गोडी कळणार नाहीं २८. कावळ्याला जशी चंद्राची ओळख नसते तशी या गीताग्रंथाची सामान्य [ विषयासक्त ] जनांना ओळख होणार नाहीं. परंतु तोच चंद्र हाच जसा चकोराचे खाद्य आहे हें स्पष्टच आहे २९. तसेंच, जें ज्ञानी आहेत, त्यांना हा ग्रंथ म्हणजे विश्रांतीचें स्थान आहे, आणि जे अज्ञानी आहेत, त्यांना तर परक्या गांवाप्रमाणें अनोळखीचे ठिकाण आहे. म्हणून पहा ! या विषयाविषयीं विशेष बोलण्याचें कारण नाहीं ३०. परंतु प्रसंगानुसार मी जें अनुवादात्मक बोललों, त्याची सज्जनांनीं मला क्षमा करावी. यापुढें, श्रीरंगांनीं जें कांहीं सांगितलें आहे, तें मी सांगेन ३१. तें बोलणें, बुद्धीलाहि आकलन करण्यास कठीण आहे, म्हणून शब्दांमध्यें तें कदाचितच व्यक्त होईल. परंतु श्रीगुरु निवृत्तिमहाराजांच्या कृपारूप दीपाच्या उजेडानें मी तें पाहीन व सांगेन ३२. श्रीगुरुकृपेचें काय ऐश्वर्य सांगावें ! इन्द्रियातीत असें जें ब्रह्मज्ञान, तें ज्ञानबल जर प्राप्त झालें, तर ती जेथें दृष्टीहि पोचूं शकत नाहीं ते दृष्टीशिवाय पाहता येते ३३. जर दैवयोगानें परीस हातीं आला, तर किमयागारासहि न मिळणारें उत्तम सोनें लोखंडांतच सांपडेल ३४. तसें जर सद्गुरूची कृपा होईल, तर प्रयत्न केला असतां कोणती गोष्ट प्राप्त होणार नाहीं ? म्हणूनच श्रीज्ञानदेव म्हणतात, अशी जी सद्गुरुकृपा ती मजवर पूर्ण आहे ३५. त्या श्रीगुरुकृपेच्या योगानें मी बोलेन व म्हणूनच माझ्या व्याख्यानांत अरूप निराकारपरब्रह्म वस्तूचें स्वरूप सर्वांस दाखवीन, आणि जी परब्रह्म

---

१ कवित्वाची. २ पद्धत, सरणी. ३ तृप्ति. ४ अर्थावबोधक शब्द अथवा वाक्य. ५ प्रकटे. ६ स्वभावानें, धर्मानें. ७ सारखेपणानें. ८ बोध करितो. ९ जागा करी. १० सूर्य. ११ भावनेनें जाणूं इच्छिणारास. १२ आढळतात. १३ ब्रह्मरसानें. १४ वाढली. १५ मेजवानी, ग्रंथरचना. १६ आत्मज्योति. १७ दिवा, टाणवई. १८ इंद्रियांना न कळूं देतां. १९ लाभे. २० गरजेवांचून, संबंधाशिवाय.

२१ मनापासून. २२ उगीच. २३ आच्छादन. २४ व्हावें. २५ सुख भोगावे. २६ सूक्ष्मता, नाजुकपणा. २७ सर्व. २८ सावध करावे. २९ कर्मफलाविषयीं निरिच्छ. ३० ओवाळणी. ३१ कावळ्यांनीं. ३२ चंद्रकिरणें. ३३ खाद्य. ३४ अन्य. ३५ क्षमा करावी. ३६ कठीण. ३७ क्वचित्, कदाचित्. ३८ दृष्टीवांचून. ३९ इंद्रियातीत. ४० लाभेल, मिळेल. ४१ ब्रह्मज्ञान. ४२ किमया करणाराला. ४३ प्राप्त.

बोलीं अरूपाचें रूप दावीन । अतींद्रिय परी भोगवीन । इंद्रियांकरवीं ॥ ३६ ॥ आइका यश श्री औदार्य । ज्ञान वैराग्य ऐश्वर्य । हे साही गुणवर्य । वसती जेथ ॥ ३७ ॥ म्हणौनि तो भगवंतु । जो निःसंगाचा सांगातु । तो म्हणे पार्था दत्तचित्तु । होईं आतां ॥ ३८ ॥

श्रीभगवानुवाच :—

अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः । स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥ १ ॥

आइकें योगी आणि संन्यासी जनीं । हे एकचि सिनानें झणीं मानीं । एऱ्हवीं विचारिजती जंव दोन्ही । तंव एकचि ते ॥ ३९ ॥ सांडिजे दुजया नामाचा आभासु । तरी योगु तोचि संन्यासु । पाहतां ब्रह्मीं नाहीं अवकाशु । दोहींमाजीं ॥ ४० ॥ जैसें नामाचेनि अनारिसेपणें । एका पुरुषातें बोलावणें । कां दोहींमार्गीं जाणें । एकाचि ठाया ॥ ४१ ॥ नातरी एकचि उदक सहजें । परि सिनानां घटीं भरिजे । तैसें भिन्नत्व जाणिजे । योगसंन्यासांचें ॥ ४२ ॥ आइकें सकळ संमतें जगीं । अर्जुना गा तोचि योगी । जो कर्में करूनि रागी । नोहेचि फळीं ॥ ४३ ॥ जैसी मही हे उद्भिजें । जंनी अहंबुद्धीवीण सहजें । आणि तेथिंचीं तियें बीजें । अपेक्षीना ॥ ४४ ॥ तैसा अन्वयाचेनि आधारें । जातीचेनि अनुकारें । जें जेणें अवसरें । करणें पावे ॥ ४५ ॥ तें तैसेंचि उचित करी । परी सौटोपु नोहे शरीरीं । आणि बुद्धीही करोनि फळवेरी । जायेचिना ॥ ४६ ॥ ऐसा तोचि संन्यासी । पार्था गा परियेसीं । तोचि भरंवसेनिसीं । योगीश्वरु ॥ ४७ ॥ वांचूनि उचित कर्म प्रासंगिक । तयातें म्हणे हे सांडावें बंद्धक । तरी टांकोटांकीं आणिक । मांडीचि तो ॥ ४८ ॥ जैसा क्षाळुनियां लेपु एकु । सवेंचि लाविजे आणिकु । तैसेनि आग्रहाचा पांइकु । विचंबे वायां ॥ ४९ ॥ गृहस्थाश्रमाचें वोझें । कपाळीं आधींचे आहे सहजें । कीं तेंचि संन्याससवा ठेविजे । सरिसें पुंढती ॥ ५० ॥ म्हणौनि अग्निसेवा न सांडितां । कर्माची रेखा नोलांडितां । आहे योगसुख स्वभावता । आपणपांचि ॥ ५१ ॥

यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव । न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ २ ॥

ऐकें संन्यासी तोचि योगी । ऐसी एकवाक्यतेचि जगीं । गुढी उभविली अनेगीं । शास्त्रांतरीं ॥ ५२ ॥ जेथ संन्यासिला संकल्पु तुटे । तेथचि योगाचें सार भेटे । ऐसें हें अनुभवाचेनि घटें । साचें जया ॥ ५३ ॥

वस्तु इन्द्रियादिकांस अविषय आहे तरीपण ती त्याचाहि इन्द्रियाकडून अनुभव घेता येईल असें मी करीन ३६. ऐका, पहा ! यश, लक्ष्मी, औदार्य, ज्ञान, वैराग्य आणि ऐश्वर्य हे सहा श्रेष्ठ गुण ज्याचे [ श्रीकृष्णाचे ] ठिकाणीं वास करतात ३७. म्हणून त्याला 'भगवंत' असें म्हणतात; व ज्यांनीं सर्वसंगपरित्याग केला आहे, त्यांचा जो मित्र आहे तो श्रीकृष्ण पार्थास म्हणाला कीं, आतां लक्ष देऊन सावधान हो ३८.

**अन्वयार्थ—कर्मफलम् अनाश्रितः**-कर्माच्या फलाचा आश्रय न केलेला—**यः**—जो गृहस्थ—**कार्यं कर्म**—अवश्य कर्तव्यकर्म म्ह० नियतकर्म—नित्य अग्निहोत्रादि कर्म—**करोति**—करतो—**सः** —तो **संन्यासी**—संन्यासी आहे—**च**—व **योगी**—योगी आहे—**च**—परंतु, केवल—**निरग्निः न**—अग्निरहित नव्हे—**च अक्रियः न**—व क्रियारहित नव्हे. अग्निरहित व क्रियारहित पुरुषच संन्यासी व योगी आहे, असें मानूं नये १.

श्रीकृष्ण म्हणतातः—पार्था ! हें पहा, योगी आणि संन्यासी, हे दोन्ही या जगांत एकच आहेत. ते [ नामभेदामुळें ] वेगळे आहेत असें तूं कदाचित् मानशील पण तसें मानूं नकोस हो ! कारण, ह्या दोहोंविषयीं सहज विचार करून पाहिले तर ते एकच आहेत ३९. त्यांच्यावर नांवाच्या भेदामुळें आरोप मात्र आहे, तो सोड. कारण, ब्रह्मदृष्टीनें पाहूं गेलें असतां या दोहोंत भेद नाहीं, म्हणून योग तोच संन्यास होय ४०. जसें नांवाच्या वेगळेपणानें एकाच पुरुषाला हांका मारणे किंवा एकाच ठिकाणाला दोन मार्गानें जाणें ४१. किंवा स्वभावतः पाणी तितके एकच पण ते वेगवेगळ्या घागरीत भरावे, म्ह० ते जसें वेगवेगळें दिसतें एवढेंच. तसाच योग आणि संन्यास यांत केवळ प्रतीति मात्र भेद आहे असें जाण ४२. अर्जुना ऐक, जो कर्में करून त्यांच्या फलांविषयीं आसक्ति धरीत नाहीं, तोच योगी होय असें या जगतांत सर्वांना मान्य आहे ४३. जशी पृथ्वी ही सहजच वृक्षादिकांना उत्पन्न करते त्यांच्या उत्पत्तीबद्दल कांहीं अहंकारबुद्धि दाखवीत नाहीं आणि त्यांच्यापासून उत्पन्न होणाऱ्या फलांचीहि इच्छा करीत नाहीं ४४. त्याचप्रमाणें कुलक्रमांतील आचारात्मक वहीवाटीच्या आधारानें आणि वर्णाश्रम धर्माला अनुरूप असें जें कर्म ज्यावेळीं करणें प्राप्त आहे ४५. तें सर्व तसेंच यथाविधि करतो पण तो आपल्या शरीरांत कर्तृत्व अहंकार उत्पन्न होऊं देत नाहीं, आणि बुद्धीहि फलापर्यंत जात नाहीं. [ फलासक्तिहि नसते ] ४६. पार्था ! ऐक, असा जो पुरुष असेल तोच संन्यासी आणि तोच निःसंशय योगीश्वर होय, असे समज ४७. याशिवाय [हातवटी वांचून ] जा कोणी, नित्यनैमित्तिक कर्म करणे प्राप्त झाली तर ती बद्धक आहेत, म्हणून टाकावीत म्हणतो पण त्यांचा त्याग करितो की, लागलींच दुसरीं कर्में करण्यास प्रवृत्त होतोच ४८. जसा कोणी, एक लेप धुवून टाकून लागलीच दुसरा लेप लावावा त्याप्रमाणें उचित कर्मत्याग करून दुसरें कर्म करण्याच्या आग्रहांचा दास होऊन कष्टांत पडून श्रम पावतो ४९. गृहस्थाश्रमाचें ओझें हें सर्वांच्या कपाळीं अगोदर सहजींच लागलें आहे, परंतु ते गृहस्थाश्रमाचें पहिलें ओझें टाकण्याकरितां संन्यास घेतला तर पुनः संन्यासाश्रमांतील कर्माचे पहिलें ओझें टाकून लगेच दुसरें ओझें डोक्यावर घेतोच ५०. म्हणून श्रौतस्मार्तहोमादिक अग्नीसेवा अर्थात् कर्माचें यथाविधि आचरण न टाकतां व कर्माची मर्यादा उल्लंघन न करतां [ ज्ञान ] योगाचे सुख आपल्याजवळ सहजच उपलब्ध होणारे असे आहे ५१.

**अन्वयार्थ—पांडव**—हे अर्जुना ! श्रुतिस्मृतिवेत्ते—**यं** ज्याला— **संन्यासम् इति**—खरा संन्यास **असें—प्राहुः** - म्हणतात-**तं**-त्याला—**योगं**—योग—**विद्धि**—जाण—**हि**—कारण **असंन्यस्त-संकल्पः**-ज्यानें संकल्प टाकलेला नाहीं असा—**कश्चन**—कोणी—**योगी**—योगी—**न भवति**—होत नाहीं २.

ऐक, जो 'संन्यासी तोच योगी' आहे अशी एकवाक्यतेची ध्वजा अनेक शास्त्रांनीं या जगांत उभारली आहे ५२. ज्या पुरुषाच्या ठिकाणीं त्याग केलेला संकल्प पार नाहीसा होतो त्याचे ठिकाणीं, योगाचें सारसर्वस्व जें ब्रह्म त्याची आत्मत्वाने भेट होते, असें प्रत्यक्ष स्वानुभव प्रमाणानें निश्चयानें ज्याचें खरे ठरलें आहे ५३.

---

१. श्रेष्ठ गुण. २ लक्ष दिलेला. ३ वेगळे वेगळे. ४ आरोप. ५ अंतर, भेद. ६ हांक मारणें. ७ वेगळे वेगळे भांड्यांत. ८ इच्छायुक्त, आसक्त. ९ उपन्न करिते. १० इच्छा करीत नाहीं. ११ आत्मव्याप्तीच्या. १२ अनुरूप. १३ अहंकारयुक्त. १४ फलाच्या आशेपर्यंत. १५ याशिवाय. १६ नैमित्तिक. १७ जन्ममरण देणारे. १८ लागलाच. १९ धुवून. २० नोकर. २१ घोटाळतो, घुटमळतो. २२ पुनः २३ श्रौतस्मार्तहोमादि. २४ मर्यादा. २५ न टाकतां.

आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते । योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ३ ॥

आतां योगाचेंळाचा निमथा । जरी ठाकांवा आथि पार्थां । तरी सोपांना या कर्मपथा । चुकों झणी ॥ ५४ ॥ येणें यमनियमांचेनि तळवटें । रिगे आसनांचिये पाउलवाटें । येई प्राणायामाचेनि आंडकंठें । वरौतें गा ॥ ५५ ॥ मग प्रत्याहारांचा अधाडा । जो बुद्धीचियाही पायां निसरडा । जेथ हटिये सांडिती होडा । कडेलँग ॥ ५६ ॥ तरी अभ्यासाचेनि बळें । प्रत्याहारीं निराळें । नेंखीं लागेल ढाळें ढाळें । वैराग्याची ॥ ५७ ॥ ऐसा पवनाचेनि पैठारें । येतां धारणेचेनि पैसारें । क्रमी ध्यानाचें चवरें । सांपडे तंव ॥ ५८ ॥ मग तया मार्गाची धांव । पुरेल प्रवृत्तीची हांव । जेथ साध्यसाधना खेंव । समरसें होय ॥ ५९ ॥ जेथ पुढील पैसु पारुखे । मागील स्मरावें तें ठाके । ऐसिये सरिसीये भूमिके । समाधि राहे ॥ ६० ॥ येणें उपायें योगारूढु । जो निरवधि जाहला प्रौढु । तयाचिया चिन्हांचा निवाडु । सांगेन आइकें ॥ ६१ ॥

यदा हि नेन्द्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते । सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥

तरी जयाचिया इंद्रियांचिया घरा । नाहीं विषयांचिया येरझारा । जो आत्मबोधाचिया वोवरां । पहुडला असे ॥ ६२ ॥ जयाचें सुखदुःखाचेनि आंगें । झगटलें मानस चेवो नेघे । विषय पासींही आलियां से न रिगे । हें काय म्हणौनि ॥ ६३ ॥ इंद्रियें कर्मांच्या ठायीं । वाढीनलीं परि कहीं । फळहेतूची चाड नाहीं । अंतःकरणीं ॥ ६४ ॥ असतेनि देहें एतुला । जो चेतुचि दिसे निदेला । तोचि योगारूढु भला । वोळखें तूं ॥ ६५ ॥ तेथ अर्जुन म्हणे अनंता । हें मज विस्मो बहु आइकतां । सांगे तया ऐसी योग्यता । कवणें दीजे ॥ ६६ ॥

उद्धरेदात्मनाऽऽत्मानं नात्मानमवसादयेत् । आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५ ॥

तंव हांसोनि श्रीकृष्ण म्हणे । तुझें नवल ना हें बोलणें । कवणासि काय दिजेल कवणें । अद्वैतीं इये ॥ ६७ ॥ पैं व्यामोहाचिये शेजे । बळिया अविद्या निद्रितु होइजे । ते वेळीं दुःस्वप्न हा भोगिजे । जन्ममृत्यूंचा ॥ ६८ ॥ पाठीं अवसांत ये चेवो । तैं तें अवघेंचि होय वावो । ऐसा उपजे नित्य सद्भावो । तोहि आपणपांचि ॥ ६९ ॥ म्हणौनि आपणाचि आपणयां । घातु कीजतु असे धनंजया । चित्त देऊनि नाथिलिया । देहाभिमाना ॥ ७० ॥

**अन्वयार्थ—योगं**–ध्यानयोगावर–**आरुरुक्षोः मुनेः**–आरूढ होण्याची इच्छा करणाऱ्या मुमुक्षु गृहस्थाला–**कर्म**–फलनिरपेक्ष कर्मानुष्ठान हें–**कारणं**–साधन–**उच्यते** सांगितलें जातें–**तस्य एव योगारूढस्य**–पण तोच मुनि कर्माभ्यासानें योगरूढ झाला असतां त्याला–**शमः**–उपशम–सर्व कर्मांपासून उपशम पावणें हें–**कारणं**–साधन–**उच्यते**–सांगितलें जातें ३.

पार्था, आतां अशा प्रकारें योगरूप पर्वताच्या माथ्यावर ज्यास जाऊन पोहचावयाची इच्छा असेल, तो या कर्ममार्गरूपी जिन्यास कदाचित चुकेल पण चुकूं नये हो ! ५४. या कर्ममार्गानें जावयास लागलें म्हणजे पहिल्यान्दा या पर्वताचा यमनियमरूपी तळ लागतो, नंतर आसनांच्या पाऊलवाटेवर येतो व मग प्राणायामरूपी कड्याने योगरूपी डोंगरावर येऊ लागतो ५५. नंतर प्रत्याहार हाच कोणी एक अर्धा तुटलेला कडा लागतो. त्याच्यावरून बुद्धीचेहि पाय निसरतात, आणि जेथे [ तो तुटलेल्या कड्याचा मार्ग ओलांडतांना कडेलोट होईल म्हणून हटयोग्यांना सुद्धां ] आपल्या प्रतिज्ञा शेवटी सोडून धाव्या लागतात ५६. तरीपण अभ्यासाच्या बळानें प्रत्याहाररूपी चढण्यास कठीण, आधार न देणाऱ्या मार्गांत फक्त वैराग्यच हळूं हळूं पाय रोवून चढूं शकते ५७. अशा रीतीनें [ प्राण व अपान ] वायुरूप घोड्याच्या पाठीवर बसून मार्ग आक्रमीत असतां धारणेच्या प्रशस्त रस्त्याने ध्यानरूपी शिखर स्वाधीन होईपर्यंत मार्गक्रमण करितो ५८. मग ह्या ठिकाणीं धारणा मार्गाची धांव व प्रवृत्तीची हाव संपते. आणि ज्या अवस्थेंत ब्रह्मात्मैक्य झाल्यामुळें साध्य साधन ही एकरूप होतात ५९. आणि ज्या ठिकाणीं पुढील पाऊल टाकणें बंद होऊन मागील कशाचीहि आठवण राहात नाहीं, अशा समान ऐक्यरूप भूमिकेवर असलेल्या समाधींत तो पुरुष राहतो ६०. या उपायांनी जो योगारूढ होतो, तो निःसंशय अखंड, परिपूर्ण झाला. आतां त्याच्या चिन्हांचा निर्णय तुला स्पष्ट सांगतों, तो ऐक ६१.

**अन्वयार्थ—यदा हि**–जेव्हां योगी–**इंद्रियार्थेषु**–विषयांमध्यें–**न अनुषज्जते**–आसक्त होत नाहीं, त्याचप्रमाणें–**कर्मसु**–नित्यनैमित्तिकादि कर्मांमध्यें–**न** [ **अनुषज्जते** ]–आसक्त होत नाहीं–**सर्वसंकल्पसंन्यासी**–सर्व संकल्पांचा संन्यास करतो. **तदा**–तेव्हां–**योगारूढः**–योगारूढ–**उच्यते**–म्हटला जातो ४.

हे पहा ! ज्याच्या इंद्रियाच्या घरीं विषयाचे येणे जाणें होत नाहीं, जो आत्मबोधरूपी विश्रांतीच्या खोलीत स्वस्थ निजलेला असतो ६२. ज्यास सुखदुःखानी स्वतः धक्के देऊन झगटले तरी ज्याचें मन जागे होत नाहीं. तसेंच मूर्तिमंत विषय हे त्याच्या अगदी जवळ जरी येऊन उभे राहिले, तरी 'हे काय आहे' म्हणून ज्याला स्मरणच होत नसतें ६३. कदाचित् इंद्रियें कर्म करण्याला प्रवृत्त झाली, तरीपण ज्याच्या अंतःकरणांत फलविषयक संकल्पाची चाड, आवड केव्हांहि नसते. ६४. जो देहधारी असून असे हें एवढे देहाचे व्यवहार चालले असतांना जो जणुं झोंपेंतल्या स्थितीप्रमाणें उदासीन दिसतो, तोच खरा योगनिष्णात, योग साध्य झालेला आहे असें तू समज ६५. अशी योग्याची स्थिति ऐकून अर्जुन देवास म्हणतो–हे अनंता ! तुम्हीं जें सांगतां, तें ऐकून मला फार नवल वाटतें; तर त्या योग्याला अशी ही योग्यता कोण बरे देतो, हें मला सांग ६६.

**अन्वयार्थ—आत्मना** – आत्म्यानें – **आत्मानम्** – आत्म्याला–**उद्धरेत्** उद्धरावें, संसारसागरांतून वर काढावें–**आत्मानम्**–आत्म्याला – **न अवसादयेत्** – अधोगतीस पोचवूं नये–**हि**–कारण–**आत्मा एव**–स्वतः आत्माच–**आत्मनः**–आपला-आत्म्याचा-**बन्धुः**–बंधु आहे व–**आत्मा एव**–आत्माच–आपणच–**आत्मनः**–आत्म्याचा –आपला-**रिपुः**–शत्रु आहे ५.

तेव्हां श्रीकृष्ण हंसून म्हणाले:–तुझे हे बोलणे आश्चर्यकारक नव्हे काय ? कारण अशा या अद्वैतात्मस्थितींत कोणाला कोणी काय द्यावयाचे आहे ? ६७. मनुष्य भ्रांतिरूप शय्येवर प्रबळ अज्ञानानें जेव्हां गाढ निजलेला असतो, त्या वेळेस जन्ममृत्यूंचीं दुष्ट स्वप्नें तो भोगीत असतो ६८. नंतर जेव्हां अकस्मात् जागा झाल्यावर तीं [ जन्ममरणरूपी ] सर्वच स्वप्नें व्यर्थ होतात, मग आपल्या नित्य सद्भावाचा [ आपण अमर आहो असा ] त्याचा सहज प्रत्यय येतो तोहि आपल्याच ठिकाणीं आपल्यास येतो ६९. म्हणून हे धनंजया ! मिथ्या देहाचा अभिमान धारण करून [ देहच मी आहे असे चित्ताने मानून ] आपणच आपला घात करतो ७०.

---

१ कर्मरूपपर्वताचा. २ माथा. ३ प्राप्त करून घ्यावा. ४ जिन्याला. ५ चुकूं नको. ६ कर्ममार्गानें. ७ तळाकडून. ८ योगांतील अनेकविध आसनांच्या. ९ पायवाटेनें. १० ध्यानमार्गानें. ११ वर. १२ प्रत्याहार–विषयांपासून इंद्रियें खेंचणें. १३ धक्का. १४ घसरण्याजोगा. १५ हटयोगी. १६ प्रतिज्ञा, पैज. १७ कडेलोट. १८ निरालंबी, निर्गुणी. १९ प्रवेश. २० हळूहळू. २१ वाहनानें. २२ साधनयुक्त मनाचे स्थितीच्या विस्तृत प्रदेशाला. २३ मार्गानें. २४ उल्लंघी.

बन्धुरात्माऽऽत्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः । अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६ ॥

हा विचारूनि अहंकारु सांडिजे । मग असतीचि वस्तु होईजे । तरी आपली स्वस्ति सहजें । आपण केली ॥ ७१ ॥ एऱ्हवीं कोशकीटकाचिया परी । तो आपणया आपण वैरी । जो आत्मबुद्धि शरीरीं । चारुस्थळीं ॥ ७२ ॥ कैसे प्राप्तीचिये वेळे । निदैवा अंधळेपणाचे डोहळे । कीं असते आपुले डोळे । आपण झांकी ॥ ७३ ॥ कां कवण एकु भ्रमलेपणें । मी तो नव्हे गा चोरलों म्हणे । ऐसा नाथिला छंदु अंतःकरणें । घेऊनि ठाके ॥ ७४ ॥ एऱ्हवीं होय तें तोचि आहे । परि काई कीजे बुद्धि तैशी नोहे । देखा स्वप्नींचेनि घायें । कीं मरे साचें ॥ ७५ ॥ जैशी ते शुकाचेनि आंगभारें । नळिका भोविन्नली एरी मोहरें । तेणें उडावें परी न पुरे । मनशंका ॥ ७६ ॥ वायांचि मान पिळी । अटुवें हियें आंवळी । टिटांतु नळी । धरूनि ठाके ॥ ७७ ॥ म्हणे बांधला मी फुडा । ऐसिया भावनेचिया पडे खोडां । कीं मोकळिया पायांचा चवडा । गोंवी अधिकें ॥ ७८ ॥ ऐसा काजेंवीण आंतुडला । तो सांग पां काय आणिकें बांधिला । मग न सोडीच जऱ्ही नेला । तोडूनि अर्धा ॥ ७९ ॥ म्हणौनि आपणयां आपणचि रिपु । जेणें वाढविला हा संकल्पु । येर स्वयंबुद्धी म्हणे बापु । जो नाथिलें नेघे ॥ ८० ॥

जितात्मनः प्रशान्तस्य परमात्मा समाहितः । शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ७ ॥
ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेन्द्रियः । युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः ॥ ८ ॥

तया स्वांतःकरणजिता । सकळकामोपशांता । परमात्मा परौता । दुरी नाहीं ॥ ८१ ॥ जैसा किडाळाचा दोषु जाये । तरी पंधरें तेंचि होये । तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्पलोपीं ॥ ८२ ॥ हा घटाकारु जैसा । निमालिया तया अवकाशा । नलगे मिळों जाणें आकाशा । आना ठाया ॥ ८३ ॥ तैसा देहाहंकारु नाथिला । हा समूळ जयाचा नाशिला । तोचि परमात्मा संचला । आधींचि आहे ॥ ८४ ॥ आतां शीतोष्णाचिया वाहणी । तेथ सुखदुःखाची कडसणीं । इयें न समाती कांहीं बोलणीं । मानापमानांचीं ॥ ८५ ॥ जे जिये वाटा सूर्यु जाये । तेउतें तेजाचें विश्व होये । तैसें तया पावे तें आहे । तोचि म्हणौनी ॥ ८६ ॥ देखैं मेघौनि सुटती धारा । तिया न रुपती जैसिया सागरा । तैशीं शुभाशुभें योगीश्वरा । नव्हती आनें ॥ ८७ ॥ जो हा विज्ञानात्मकु भावो । तया विवरितां जाहला वावो । मग

**अन्वयार्थ—येन**-ज्या पुरुषानें-**आत्मा एव**-शरीरें-द्रियसमुदायच-**आत्मना**-स्वतः-**जितः**-जिंकलेला असतो **तस्य आत्मनः**-त्याचा म्हणजे स्वतःचा-**आत्मा**-आत्मा-**बंधुः**-हितकर्ता आहे-**तु**-परंतु-**अनात्मनः**-ज्यानें शरीरें-द्रियांना जिंकलेलें नसतें, त्या अनात्म्याचा – **आत्मा एव**-आत्माच -**शत्रुवत्**.-शत्रुप्रमाणें--**शत्रुत्वे**--शत्रुत्व करण्यामध्यें-**वर्तेत**-तत्पर राहतो ६.

विचार करून हा अहंकार सोडावा आणि मग नित्य सिद्ध असलेली ब्रह्म वस्तूच [ आत्मत्वाने जाणून ] व्हावें असें झालें म्हणजे आपण आपलें कल्याण केले असें सहजच होईल ७१. नाहींतर जो [ क्षणमात्र सुशोभित दिसणारें शरीर हेंच उत्तम ठिकाण समजून [ मोहित होऊन ] तेथेंच आत्मबुद्धि ठेवतो. कोश किड्या-[ कोसल्या ] प्रमाणें आपला आपणच वैरी होतो ७२. काय सांगावें ! ऐन लाभाची वेळ आली असतां करंट्या कपाळाच्या मनुष्याला आंधळेपणाचे डोहाळे कसे होतात पहा ! तो जसें आपले धड असलेलें डोळे आपणच झांकून घेतो, [ वस्तुलाभाला अंतरतो;] ७३. किंवा एखादा मनुष्य भ्रम झाल्यामुळें पूर्वींचा जो मी तो हा मी आता नाही मी चोरला गेलो, हरवलो असें म्हणतो, आणि आपल्या अंतःकरणांत असा नसताच आग्रह धरून बसतो ७४. वास्तविक विचार करून पाहिले तर जें ' होय ' ते तो पूर्वींचाच आहे. पण काय करावें ! तशी त्याची बुद्धि होत नाहीं ! असें पहा कीं, जसें स्वप्नांतील तरवारीच्या वारानें कोणी खरोखर मरतो काय ? ७५. राघूला धरण्याकरितां टांगलेल्या नळीवर पोपट बसल्यामुळें त्याच्या अंगभारानें ती नलिका उलट बाजूला फिरते तेव्हां वास्तविक पाहतां त्यानें उडून जावें पण आपण ही नळी सोडली तर पडूं व मरूं अशी मनांतील शंका, निवृत्त होत नाही ७६. मग व्यर्थच मान आळे पिळे घेऊन हालवितो आणि संकोचलेल्या छातीनें नळी आवळीत असतो. व चोचीनें ती नळी धरून राहतो. ७७. आणि मग मनांत म्हणतो कीं, ' मी खरोखर बांधला गेलो आहे ' अशाच भ्रांत समजूतीच्या खोड्यांत सांपडतो आणि मग मोकळा असलेला आपल्या पायाचा चवडा तो अधिकच बळकट धरून गुंतवितो ७८. असा जो निरर्थक-निष्कारण सांपडला, त्या पोपटाला कोणी दुसरे बांधावयास आले होते का ? अशा स्थितींत त्याला अर्धा तोडून जरी नेला तरी तो कांहीं केल्या ती नळी सोडीत नाहीं; सांग बरें ? ७९. म्हणून ज्यानें आपला मनांतील मी व माझें हा संकल्प वाढविला आहे, तो आपणच आपला शत्रु होतो. श्रीकृष्ण म्हणतात, पण दुसरा जो पुरुष मिथ्या देहादिकांचा नसतांच अभिमान धारण करीत नाही, तो आत्मानुभवी आहे असें समजावें ८०.

**अन्वयार्थ—जितात्मनः**-ज्यानें शरीरेंद्रियसमूहाला जिंकलें आहे व त्यामुळें-**प्रशान्तस्य**-ज्याचें अंतःकरण अत्यंत प्रसन्न झालें आहे अशा परमार्थ संन्यासाचा-**परमात्मा**-साक्षी-चिद्रूप आत्मा-**समाहितः**-साक्षात् आत्मभावानें राहतो. त्याचप्रमाणें- **शीतोष्णसुखदुःखेषु**-शीत-उष्ण, सुख-दुःख इत्यादि द्वंद्वांच्या वेळीं-**तथा**-तसेंच-**मानापमानयोः**-मान व अपमान झाल्यावेळीं तो सम असतो.--**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा**--शास्त्रोक्त पदांच्या अर्थांचें ज्ञान व त्यांचा तसाच अनुभव घेणें, हें विज्ञान, यांच्या योगानें ज्याचें चित्त-अंतःकरण तृप्त झालें आहे. त्यामुळें जो-**कूटस्थः**-अप्रकम्प्य-मनांत न डगमगणारा-**विजितेन्द्रियः**-जितेंद्रिय होतो-**समलोष्टाश्मकाञ्चनः**-ज्याला मातीचें ढेकूळ, दगड व सोनें ही सम झालीं आहेत अशा-**योगी**-योग्याला-विरक्ताला-**युक्तः** योगारूढ समाहित-**इति**-असें-**उच्यते**-म्हटलें जातें ७-८.

अरे ! ज्यानें आपलें अंतःकरण जिंकिलें आहे व त्यामुळें ज्याच्या सर्व वासना शांत झाल्या आहेत, त्याला इतरांप्रमाणें परमात्मा कोठे पलीकडे लांब नाहीं ८१. सोन्याचा हिणकसपणा तावून नाहींसा झाला तर तेंच जसें उत्तम सोनें होतें-तद्वत् मनांतील संकल्प नाहींसे होतांच जीवाचें ब्रह्मत्व सहज सिद्धच आहे ८२. घटांतील अवकाशाला घटाचा आकार नाहींसा झाल्यावर जसें महाकाशाला मिळण्याकरितां दुसऱ्या ठिकाणीं जावें लागत नाहीं ८३. ज्याचा हा मिथ्या देहाहंकार समूळ अविद्येसह नाहींसा झाला आहे तो पुरुष मूळचाच सर्वत्र ओतप्रोत भरलेला परमात्मा आहे. ८४. अशा स्थितींत शीत किंवा उष्ण, असा प्रकार सुख किंवा दुःख, अशी निवड, मान किंवा अपमान अशी समजूत, या गोष्टी वा त्यांची भाषाहि ज्याच्याठिकाणीं मुळींहि संभवत नाहीं ८५. कारण, ज्या वाटेनें सूर्य जातो, त्या वाटेंतील तेवढा विश्वाचा भाग प्रकाशित होतो, त्याप्रमाणें त्यास जें जें प्राप्त होईल [ त्याच्या दृष्टीपुढें जें जें कांहीं येईल ] तें तें त्याचेच स्वरूप आहे म्हणून [ उपर्युक्त द्वंद्वाची प्रतीति किंवा भाषाहि तेथे संभवत नाहीं ] ८६. पहा कीं, मेघापासून सुटणाऱ्या ज्या पावसाच्या धारा त्या ज्याप्रमाणें समुद्राला खुपत नाहींत, त्याचप्रमाणें शुभाशुभ कर्में हीं जो ब्रह्मरूप बनला आहे, त्या योगीश्वरास आपल्या आत्मरूपाहून भिन्न वाटंत नाहींत ८७. हे जे प्रत्यक्ष अनुभवास येणारे दृश्यरूप संसारिक भाव किंवा जगत

लागला जंव पाहों । तंव ज्ञान तें तोचि ॥ ८८ ॥ आतां व्यापकु कीं एकदेशी । हे ऊहापोही जे ऐसी । ते करावी ठेली आपैशी । दुजेनवीण ॥ ८९ ॥ ऐसा शरीरीचि परी कौतुकें । परब्रह्माचेनि पाडें तुकें । जेणें जिंतलीं एकें । इंद्रियें गा ॥ ९० ॥ तो जितेंद्रियु सहजें । तोचि योगयुक्तु म्हणिजे । जेणें साने थोर नेणिजे । कवणें काळीं ॥ ९१ ॥ देखैं सोनयाचें निखळ । मेरुयेसणें ढिसाळ । आणि मातियेचें डिखळ । सरिसेंचि मानी ॥ ९२ ॥ पाहतां पृथ्वीचें मोल थोडें । ऐसें अनर्घ्य रत्न चोखडें । देखे दगडाचेनि पाडें । निचांडु ऐसा ॥ ९३ ॥

सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबन्धुषु । साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥

तेथ सुहृद आणि शत्रु । कां उदासु आणि मित्रु । हा भावभेदु विचित्रु । कल्पूं कैंचा ॥ ९४ ॥ तया बंधु कोण काह्याचा । द्वेषिया कवणु तयाचा । मीचि विश्व ऐसा जयाचा । बोधु जाहला ॥ ९५ ॥ मग तयाचिये दिठी । अधमोत्तम असे किरीटी ? । काय परिसाचिये कसवटी । वानियां कीजे ? ॥ ९६ ॥ ते जैशी निर्वाणें वर्णुचि करी । तैशी जयाची बुद्धी चराचरीं । होय साम्याची उंजरी । निरंतर ॥ ९७ ॥ जे ते विश्वालंकाराचें विसुरे । जरी आहाती आनानें आकारें । तरी घडले एकचि भांगारें । परब्रह्में ॥ ९८ ॥ ऐसें जाणणें जें बरवें । तें फांवलें तया आघवें । म्हणौनि आहाचवाहाच न झकवे । येणें आकारचित्रें ॥ ९९ ॥ घेपे पटामाजि दृष्टी । दिसे तंतूंची सैंघ सृष्टी । परी तो एकवांचूनि गोठी । दुजी नाहीं ॥ १०० ॥ ऐसेनि प्रतीती हें गवसे । ऐसा अनुभव जयातें असे । तोचि समबुद्धि हें अनारिसें । नव्हे जाणें ॥ १ ॥ जयाचें नांव तीर्थरावो । दर्शनें प्रशस्तीसि ठावो । जयाचेनि संगें ब्रह्मभावो । भ्रांतासही ॥ २ ॥ जयाचेनि बोलें धर्मु जिये । दिठी महासिद्धीतें विये । देखैं स्वर्गसुखादि इयें । खेळु जयाचा ॥ ३ ॥ विपायें जरी आठवला चित्ता । तरी दे आपुली योग्यता । हें असो तयातें प्रशंसितां । लाभु आथि ॥ ४ ॥

योगी युञ्जीत सततमात्मानं रहसि स्थितः । एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १० ॥

पुढती अस्तंवेना ऐसें । जया पाहलें अद्वैतादिवसें । मग आपणपांचि आपणु असे । अखंडित ॥ ५ ॥ ऐसिया दृष्टी जो विवेकी । पार्था तो एकाकी । सहजें

त्याचा विचार करूं लागलें असतां ते त्यांच्या दृष्टीनें कल्पित [ मिथ्या ] ठरले नंतर पुनः [ मी कोण आहे असें ] जेव्हां पाहूं लागला, जेव्हां जे केवळ स्वरूपभूत ज्ञान तेंच स्वतः आपणच आहोत असें त्यास कळले ८८. असा निश्चय झाल्यानंतर मी व्यापक आहे किंवा अव्यापक परिच्छिन्न आहे अशी जी वाटाघाट ती करण्याचे द्वैताच्या अभावी आपोआपच थांबतें ८९. अर्जुना ! ज्या कोणी एकाने आपलीं इन्द्रियें जिंकली आहेत, तो ज्ञानी जरी देहधारीच असतो तरी पण तो सहजच परब्रह्माच्या बरोबरीचा [ परब्रह्मच ] ठरतो ९०. सहजच जितेंद्रिय आहे आणि तोच योगयुक्त होय. कारण, त्याला लहान आणि थोर असा हा भेद केव्हांहि प्रतीत होत नाहीं ९१. किती अभेदबुद्धी म्हणून सांगावी ? असें पहा कीं, शुद्ध सोन्याचा मेरुपर्वताएवढा ढीग व मातीचें ढेंकूळ हीं दोन्ही जो सारखींच [ मिथ्या ] मानितो ९२. ज्याचें मोल पाहावयास गेलें तर यापुढें पृथ्वीचेंहि मोल अगदीं थोडें आहे, असें अमूल्य रत्नालाहि तो केवळ दगडाप्रमाणें मानतो, इतक्या दृढ मिथ्यात्व निश्चयामुळें जो निरिच्छ असतो ९३.

**अन्वयार्थ—सुहृत्-मित्र-अरि-उदासीन-मध्यस्थ-द्वेष्य-बन्धुषु**-प्रत्युपकाराची अपेक्षा न करणारा सुहृद, स्नेही, शत्रु, कोणत्याहि पक्षाचा अभिनिवेश न धरणारा उदासीन दोन्ही परस्पर विरुद्ध पक्षांचें हित इच्छिणारा मध्यस्थ, अप्रिय असलेला व संबंधीं या सर्वांतील-**साधुषु** शास्त्रानुसार वर्तन करणारे-**अपि च**-आणि त्याचप्रमाणें **पापेषु**-शास्त्रनिषिद्ध आचरण करणारे यांमध्यें-**समबुद्धिः** समान बुद्धि ठेवणारा-त्या सर्वांकडे समान दृष्टीनें पाहणारा-**विशिष्यते**-उत्तम होय ९.

त्याच्या ठिकाणीं हितचिंतक आणि शत्रु अथवा उदासीन आणि मित्र अशा चित्रविचित्र वेगवेगळ्या वृत्तींच्या कल्पना कोठून येणार ? ९४. मीच विश्व आहे; असा ज्यास दृढ बोध झाला आहे, त्याला बंधु कोण आणि द्वेषी कशाचा ? व त्याला वैरी तरी कोण ?' ९५. मग अर्जुना ! त्याच्या दृष्टीनें कनिष्ठ आणि श्रेष्ठ असें कोठून असणार ? असें पहा कीं, परिसाच्या कसोटीवर घासले असतां त्या सोन्यांत निरनिराळें कसाचें प्रकार करतां येतील काय ? ९६. ती परिसाची कसवटी सर्व धातूंना उत्तम सोनेंच करिते, तशी ज्याच्या बुद्धीस या चराचरात्मक विश्वांत साम्याचीच [ अधिष्ठान ब्रह्मभावाचीच ] निरंतर प्रतीति होते ९७. कारण, विश्वरूप अलंकारांचे ठसे जरीं निरनिराळ्या आकारांचे आहेत; तरी ते एकाच परब्रह्मरूपी सुवर्णाचे घडलेले आहेत ९८. असें शुद्ध व खरें तत्त्वज्ञान ज्याला पूर्णपणें प्राप्त झालें आहे, तो या वरवरच्या चित्रविचित्र आकार रचनेनें फसला जात नाहीं ९९. वस्त्रावर नजर फेकली असतां जसें ती सर्व सृष्टि म्ह. रचना तंतुमयच असल्याचे दिसतें. तरीपण तो एकपट म्हणजे त्यांत एका सूतावांचून गोष्टच नाहीं १००. उपर्युक्त तंतुपट न्यायानें वरील अनुभव गवसत असतो. सर्व विश्वांत ब्रह्मच ओतप्रोत व्यापकरूपानें भरलेले आहे ] असा ज्याला अनुभव येतो, तोच समबुद्धि होय, यांत अन्यथा नाहीं, असें पक्के समज १. ज्याचें नांव तीर्थराज होय, व ज्याचें दर्शन घेतलें असतां अंतःकरणाला समाधान होतें आणि ज्याच्या संगतीनें [ अहंकारानें ] भ्रमित झालेल्यासहि [ अविवेकसह भ्रांति जाऊन तो ] ब्रह्मस्वरूपता प्राप्त होते २. ज्याचें बोलण्यानें धर्म जगतो आणि दृष्टि ही महासिद्धिस उत्पन्न करते व स्वर्गादि सुखें ही ज्याचा खेळ आहेत ३. अशा मनुष्याची जरी चित्तांत सहज आठवण झाली तरी तो आपली योग्यता देतो. फार काय सांगावें ! त्याची स्तुति केली असतां महान् लाभच आहे ४.

**अन्वयार्थ—योगी**-ध्यानांचा अभ्यास करणारा योगी-**रहसि स्थितः**-एकांतांत बसलेला-**एकाकी**-एकटाच-**यतचित्तात्मा**-ज्यानें आपलें चित्त व देह यांचें नियमन केलें आहे असा-**निराशीः**-तृष्णाशून्य-**अपरिग्रहः**-व सर्वपरिग्रहरहित-[ **सन्**-असा होत्साता त्यानें ]-**आत्मानम्**-अंतःकरणाला-**सततं** -निरंतर -**युंजीत**- समाहित करावें, त्यानें चित्ताला शांत-स्थिर करावें १०.

पुनः कधीहि मावळणार नाहीं अशा अद्वैत [ बोधरूपी ] सूर्याचा अंतःकरणांत उदय झाल्यामुळें ज्यास उजाडलें आहे तो आपण आपल्या ठिकाणींच सदोदित [ ब्रह्मानंदांत निमग्न ] असतो ५. पार्था ! अशा [ व्यापकानुभूतीच्या ] दृष्टीनें जो विचार युक्त आहे, तोच अद्वितीय

१ अव्यापकता, परिच्छिन्न. २ तर्कवितर्क, वाटाघाट. ३ आपोआप बंद राहिली. ४ जिंकिलीं. ५ गोळा. ६ मेरुपर्वताएवढें. ७ मोठें. ८ ढेकूळ. ९ अमोल. १० निष्काम, निरिच्छ. ११ जिवलग. १२ तिन्हाईत. १३ भिन्नभाव. १४ कशाचा. १५ अंतर. १६ शुद्ध, निर्दोष. १७ स्वच्छ, निर्मळ. १८ विस्तार, पसारा. १९ निरनिराळ्या. २० सोन्याचें. २१ समजलें. २२ वरवरच्या. २३ चित्रविचित्र विश्वरचनेनें. २४ घातल्यानें. २५ केवळ सर्व. २६ वेगळें. २७ प्रयाग. २८ पूज्यतेला. २९ सहज. ३० स्तुति केली असतां. ३१ मावळेना, लोपेना.

अपरिग्रही जो तिहीं लोकीं । तोचि म्हणौनि ॥ ६ ॥ ऐसियें असाधारणें । निष्पन्नाचीं लक्षणें । आपुलेनि बहुवसपणें । श्रीकृष्ण बोले ॥ ७ ॥ जो ज्ञानियांचा बापु । देखणेयांचे दिठीचा दीपु । जया दादुलयांचा संकल्पु । विश्व रची ॥ ८ ॥ प्रणवाचिये पेठें । जाहलें शब्दब्रह्म मांजिठे । तें जयाचिया यशा धाकुटें । वेढूं न पुरे ॥ ९ ॥ जयाचेनि आंगिकें तेजें । आंवो रविशशीचिये वाणिजे । म्हणौनि जग हें वेशंजे- । वीण असे तया ॥ ११० ॥ हां गा नामचि एक जयाचें । पाहतां गगनही दिसे टांचें । गुण एकैक काय तयाचे । आकळशील तूं ॥ ११ ॥ म्हणौनि असो हें वानणें । सांगों नेणों कवणाचीं लक्षणें । दावावीं मिषें येणें । कां बोलिलों तें ॥ १२ ॥ ऐकें द्वैताचा ठांवोचि फेडी । ते ब्रह्मविद्या कीजेल उघडी । तरी अर्जुना पढिये हे गोडी । नासेल हन ॥ १३ ॥ म्हणौनि ते तैसें बोलणें । नव्हे सपातळें आड लावणें । केलें मनाचि वेगळेंवाणें । भोगावया ॥ १४ ॥ जया सोऽहंभाव अटंकु । मोक्षसुखालागोनि रंकु । तयाचिये दिठीचा झणें कळंकु । लागेल तुझिया प्रेमा ॥ १५ ॥ विपांये अहंभावो ययाचा जाईल । मी तेंचि हा जरी होईल । तरी मग काय कीजेल । एकलेया ॥ १६ ॥ दिठीचि पाहतां निविजे । कां तोंड भरोनि बोलिजे । नातरी दाटूनि खेंवं दीजे । ऐसें कवण आहे ? ॥ १७ ॥ आपुलिया मना बरवी । असमाई गोठी जीवीं । ते कवणेंसि चावळावी । जरी ऐक्य जाहलें ॥ १८ ॥ इया काकुळती जनार्दनें । अन्योपदेशाचेनि हातांशनें । बोलामाजि मन मनें । आलिंगूं सरलें ॥ १९ ॥ हें परिसतां जरी कानडें । तरी जाण पां पार्थ उघडें । कृष्णसुखाचेंचि रूपडें । वोतलें गा ॥ १२० ॥ हें असो वयसेचिये शेवटीं । जैसें एकाचि विये वांझोटी । मग ते मोहाची त्रिपुटी । नाचों लागे ॥ २१ ॥ तैसें जाहलें श्रीअनंता । ऐसें तरी मी न म्हणतां । जरी तयाचा न देखतां । अतिशयो एथ ॥ २२ ॥ पाहा पां नवल कैसें चोज । कें उपदेशु केउतें झुंज । परी पुढें वालभाचें भोज । नाचत असे ॥ २३ ॥ आवडी आणि लाजवी । व्यसन आणि शिणवी । पिसें आणि न भुलवी । तरी तेंचि काई ? ॥ २४ ॥ म्हणौनि भावार्थु तो ऐसा । अर्जुन मैत्रियेचा कुवासा । कीं सुखें शृंगारलिया मानसा । दर्पणु तो ॥ २५ ॥ यापरी बाप पुण्यपवित्र । जगीं भक्तिबीजासि सुक्षेत्र । तो श्रीकृष्णकृपे पात्र । याचिलागीं ॥ २६ ॥

आहे. कारण, तोच तिन्ही लोकीं एकटाच राहतो म्हणून सहजच म्ह. दुसरे मुळींच नसल्यामुळें तो परिग्रह रहित आहे असें जाण ६. अशा प्रकारें प्राप्तपुरुषाची मुख्य लोकोत्तर–असाधारण धर्मरूप लक्षणें श्रीकृष्णांनीं आपल्या सर्वज्ञतेनें सांगितलीं ७. जो, सर्व ज्ञानी लोकांत श्रेष्ठ आहे व सर्व पाहणारांच्या दृष्टीचा प्रकाशक आहे आणि ज्या समर्थाचा केवळ संकल्पच अखिल विश्वाची रचना करितो ८. ॐकाराच्या बाजारांत जें शब्दब्रह्म म्ह. वेदरूपी एक उत्तम वस्त्र निघालें तें त्या परमात्म्याच्या यशास लहान असल्यामुळें वेढण्यासहि पुरत नाहीं; तात्पर्य षड्गुणैश्वर्य संपन्न श्रीकृष्णाचें तर नाहींच; परंतु त्याच्या एका यशाचेंहि वेद वर्णन करूं शकत नाहींत ९. ज्या परमात्म्याच्या अंगाच्या तेजानें सूर्य आणि चंद्र यांच्या व्यापारास प्रतिष्ठा येते, तेव्हां प्रकाशाशिवाय जगत प्रकाशित होत आहे काय ! ११०. अरे ! [ ब्रह्म ] या त्याच्या नांवापुढें म्हणजे केवळ नामाच्याच निरनिशय व्याप्तिपुढें, आकाशहि अल्प, परिच्छिन्नच दिसते मग सर्व व्यापक परमात्म्याचें किती म्हणून तूं गुण जाणशील ? ११. म्हणून हें वर्णन करणें पुरें; हीं [ संतांची ] लक्षणें सांगण्याच्यानिमित्तानें [ उपरिनिर्दिष्ट लक्षणांनीं युक्त अशा देवानें ] कोणाची लक्षणें सांगितलीं व ती कां सांगितली, हे मला सांगतां येत नाहीं १२. आतां जी ब्रह्मविद्या द्वैताचा पार समूळ नाश करिते, ती जर स्पष्ट रीतीनें व्यक्त केली, तर आपला प्रियकर असा जो अर्जुन, त्याची आपल्याविषयींची प्रेमाची गोडी [ कारण, तो ब्रह्मरूपच होईल ] नाहींशी होईल १३. म्हणून ब्रह्मज्ञानाविषयीं [ तें ब्रह्म तूं आहेस असे ] स्पष्ट बोलले नाहींत, मध्यें अगदी बारीक असा आडपडदा ठेविला [ अद्वैत ब्रह्मस्थितीस पावलेल्या संतांची लक्षणें सांगून अप्रत्यक्षरीतीनें महावाक्याचा उपदेश केला, पण ] अर्जुनाचे मन त्याच्या व आपल्या प्रेमाचा उपभोग घेण्याकरितां वेगळें व उत्सुक ठेविले १४. जे, 'अहंब्रह्मास्मि' ह्या स्फुरणरूप वृत्तीज्ञानांतच अडकून राहिले आहेत व जे मोक्षसुखाकरितां दीन झाले आहेत, अशांची दृष्ट तुला लागेल म्हणजे त्यांच्या दृष्टीचा कलंक कदाचित् तुझ्या प्रेमाला लागेल हो ! १५. अहो ! कदाचित् या अर्जुनाचा 'मी'पणा जाईल आणि 'मी तोच हा' असें निरुपाधिक होईल, तर मग मी [ सोपाधिक अशा ] एकट्यानें काय करावें ? १६. केवळ दृष्टीनेंच पाहून शांत व्हावें व तोंड भरून बोलावें किंवा आनंदानें दृढ कडकडून आलिंगन देण्याला [ प्रस्तुत अर्जुनाशिवाय दुसरें ] कोण आहे ? १७. आतां जर अर्जुनाचें आणि माझें ऐक्य झालें, तर आपल्या मनास चांगली वाटणारी व अंतःकरणांत न मावणारी अशी आनंदाची गोष्ट कोणाजवळ बोलावी ? १८. अशा अडचणीमुळें श्रीकृष्णांनीं आपल्या बोलण्यांत अन्योपदेशाच्या हातवटीने [ साधूंचीं लक्षणें सांगण्याच्यानिमित्तानें ] ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला व त्याचें मनास मनानें आलिंगन दिले १९. हें ऐकणारास जरी अवघड वाटले, तरी अर्जुन हा खरोखर श्रीकृष्णाच्या सुखाचीच ओतीव उघड मूर्ति आहे, असें समजा १२०. हें असो, एखाद्या वांझ स्त्रीला, वयाच्या शेवटीं [ म्हातारपणीं ] एकुलते एकच मूल झाले म्हणजे त्या स्त्रीच्या रूपानें मूर्तिमंत मोहच [ माता, पुत्र व मोह या त्रिपुटीमधील ] वावरतो. [ प्रेमाची पुतळी होऊन नाचूं लागते ] २१. तशी प्रस्तुत श्रीकृष्णाची गोष्ट झाली आहे ! त्याचें अर्जुनावरील अतिशय प्रेम जर माझ्या दृष्टोत्पत्तीस आले नसते; तर मी असें म्हटलेच नसतें २२. पहा कीं ! हें काय नवल ! व कोण आवड ! कोठें तो घोर युद्धप्रसंग ! आणि कोठें तो [ ब्रह्मज्ञानाचा ] उपदेश ! परंतु अशा ठिकाणीं भगवंताच्या प्रेमाची मूर्तिच जो अर्जुन, त्याच्यापुढें देवाच्या प्रेमाचें चित्रच नाचत आहे ! २३. आवड आहे आणि लाज वाटते असें असेल, तर ती आवड कसली ! व्यसन आहे आणि शीण वाटत असेल, ते व्यसन कसले ? वेड लागले आहे आणि ते भुरळ, भ्रम पाडीत नसेल तर ते वेड कसले ? २४. म्हणून या गोष्टीचें सार इतकेंच कीं, अर्जुन श्रीकृष्णाच्या मैत्रीचें घर, सख्यभक्तीचा आश्रय होय, किंवा सुखानें शृंगारलेल्या श्रीकृष्णाच्या मनास पाहण्याचा जणुं आरसाच आहे २५. अशा प्रकारें 'अर्जुन हा धन्य असून पुण्यशील, पवित्र आणि भक्तिरूप बीज पेरण्याचें चांगले शेत आहे. म्हणूनच तो श्रीकृष्णकृपेस पात्र आहे ! २६. किंवा श्रवणा-

१ परिवार नसणारा. २ असामान्य. ३ सिद्धाची. ४ पाहणाराच्या. ५ समर्थाचा. ६ ओंकाराच्या. ७ बाजारांत. ८ उत्तम वस्त्र. ९ आंगच्या. १० प्रतिष्ठा. ११ वाणिज्यास. १२ आधाराशिवाय. १३ लहान तुकडे. १४ जाणशील. १५ नाहींसा करणारी. १६ पडदा. १७ भिन्न.

१८ अहंब्रह्म. १९ अडथळा. २० कदाचित्. २१ कडकडून. २२ आलिंगन. २३ सामावत नाहीं अशी. २४ बोलावी. २५ अडचण. २६ योगशास्त्राचे. २७ युक्तीनें, हातवटीनें. २८ अवघड. २९ म्हातारपणीं. ३० ममतेनें ३१ पुतळी. ३२ अतिशय प्रेम. ३३ प्रीतींतल्याचें. ३४ चित्र, पुतळा.

हो कां आत्मनिवेदनांतळींची । जे पीठिका होय सख्याची । पार्थु अधिष्ठात्री तेथिंची । मातृका गा ॥२७॥ पोसींचि गोसावी न वर्णिजे । मग पाइकांचा गुण घेईजे । ऐसा अर्जुनु तो सहजें । पढिये हरी ॥ २८ ॥ पाहां पां अनुरागें भजें । जे प्रियोत्तमें मानिजे । ते पतीहूनि काय न वानिजे । पतिव्रता ? ॥ २९ ॥ तैसा अर्जुनचि विशेषें स्तवावा । ऐसें आवडलें मज जीवा । जे तो त्रिभुवनींचिया दैवां । एकायतंनु जाहला ॥ १३० ॥ जयाचिया आवडीचेनि पांगें । अमूर्तुही मूर्ति आवगें । पूर्णाहि परी लागे । अवस्था जयाची ॥ ३१ ॥ तंव श्रोते म्हणती दैव । कैसी बोलाची हेवाव । काय नादांतें हन बेरव । जिणोनि आली ॥ ३२ ॥ हां हो नवल नोहे देशी । मऱ्हाटी बोलिजे तरी ऐशी । वाणें उमटताहे आकाशीं । साहित्य रंगाचे ॥ ३३ ॥ कैसें उन्मेखचांदिणें तोर । आणि भावार्थु पडे गार । हेचि श्लोकार्थ कुमुदिनी फार । सावियां होती ॥ ३४ ॥ चांडचि निचौडां करी । ऐसी मनोरथीं ये थोरी । तेणें विवंळले अंतरीं । तेथ डोलु आला ॥ ३५ ॥ तें निवृत्तिदासें जाणितलें । मग अवधान द्या म्हणितलें । नवल पांडवकुळीं पोंहलें । कृष्णादिवसें ॥ ३६ ॥ देवकीया उदरीं वाहिला । यशोदा सायासें पाळिला । का शेखीं उपेगां गेला । पांडवांसी ॥ ३७ ॥ म्हणौनि बहुदिवस वोळगावा । कां अवसरु पाहोनि विनवावा । हाही सोसु तया सदैवा । पडेचिना ॥ ३८ ॥ हें असो कथा सांगें वेगीं । मग अर्जुन म्हणे सलगी । देवा इयें संतचिन्हें आंगीं । न ठकती माझ्या ॥ ३९ ॥ एऱ्हवीं या लक्षणांचिया निजसारा । मी अपाडें कीर अपुरा । परि तुमचेनि बोलें अवधारा । थोरावें जरी ॥ १४० ॥ जी तुम्ही चित्त देयाल । तरी ब्रह्म मियां होईजेल । काय जहालें अभ्यासिजेल । सांगाल जें ॥४१॥ हां हो नेणों कवणाची काहाणी । आइकोनि श्लाघिजेत असों अंतःकरणीं । ऐसी जहालेपणाची शिरयाणी । कायसी देवा ॥४२॥ हें आंगें म्यां होईजो का । येतुलें गोसावी आपुलेपणें कीजो कां । तंव हांसोनि श्रीकृष्ण हो कां । करूं म्हणती ॥ ४३ ॥ देखा संतोषु एक न जोडे । तंवचि सुखाचें सैंघ सांकडें । मग जोडलिया कवणीकडे । अपुरें असे ? ॥ ४४ ॥ तैसा सर्वेश्वरु बळिया सेवकें । म्हणौनि ब्रह्महि होय तो कौतुकें । परि कैसा भारें आतला पिकें । दैवाचेनि ॥ ४५ ॥ जो जन्मसहस्रांचियासाठीं । इंद्रादिकांही महांगु भेटी । तो

पासून आत्मनिवेदनापर्यंत जी नऊ प्रकारची भक्ति आहे त्या अनुक्रमपैकीं आत्मनिवेदनरूप भक्तीच्या अलिकडची जी 'सख्य' नांवाची आठवी भक्ति, त्या भक्ति भूमिकेची अर्जुन ही प्रमुख देवता आहे २७. अर्जुनापेक्षां श्रेष्ठ भगवान् त्याचे शेजारींच असतां प्रभूचे वर्णन न करितां, मग भक्तसेवकाच्याच गुणांचे वर्णन मी केलें तरी भगवंतास आवडावे इतक्या योग्यतेचा अर्जुन हा भगवंताचा आवडता आहे २८. पहा जी पतिव्रता आपल्या पतीची प्रीतीनें सेवा करिते आणि ती सेवा पतीस मान्यहि होते, म्हणून त्या पतिव्रतेची पतीपेक्षांहि अधिक वाखाणणी करावयास नको काय? २९. त्याचप्रमाणें, अर्जुनाचेच विशेष वर्णन करावे असेंच माझ्या मनास आवडले. कारण, तो आज त्रिभुवनांतील सर्व भाग्याला एकटाच आश्रय–पात्र झाला आहे ! १३०. ज्याच्या आवडीच्या आधीनतेमुळें निराकार अशा ब्रह्माला देखील अवतार धारण करणे भाग पडलें आणि नित्यतृप्त व नित्यपूर्ण अशा देवासहि ज्या अर्जुनाच्या सख्याची उत्कंठा उत्पन्न झाली ३१. तेव्हा श्रोते म्हणाले:–दैवाची गति काय विचित्र आहे, आणि त्याचे वर्णन करण्याची तुझी अपूर्व-सुन्दर शैली तरी काय आहे ! की जिची अपूर्व सुंदरता नादब्रह्मालाहि जिंकून आली आहे ! ३२. अहो ! देशभाषारूपी आकाशांत रसालंकाररूपी रंगाचें निरनिराळें प्रकार स्पष्ट होत आहेत म्हणजे ज्याच्या श्रवणापासून श्रोत्याच्या हृदयावर शांत शृंगारादि नवरसाचें निरनिराळे ठसें उमटतात. अशी मराठी भाषा बोलता येते हे नवल नव्हे काय ? ३३. श्रीज्ञानेशांचें हे बोलणें म्हणजे ज्ञानरूपी चंद्राचे कसे अगदीं स्वच्छ टपोर पडलेले चांदणे आहे आणि त्यांतील भावार्थ हाच त्या चांदण्याचा आल्हाद-दायक गारवा होय. म्हणून गीतेच्या श्लोकांचा अर्थ चंद्रविकासी कमले असून ती सहजच विकसित होत आहेत ३४. त्या बोलण्याची अशी अपूर्वाई आहे कीं, असा या बोलापासून श्रोत्यांच्या अंतर्मामीं प्रकाश पडल्यामुळें प्रसन्न होऊन नकळत त्यास डोल आला ३५. असा श्रोत्यांच्या मनांतील भाव श्रीनिवृत्तिदास श्रीज्ञानदेव यांनीं जाणला व मग 'महाराज ! इकडे लक्ष द्या' असें ते म्हणाले. श्रीकृष्णरूपी नवलसूर्याच्या उदयाने पांडवकुलास उजाडले आहे ३६. [ तो कृष्ण कसा आहे म्हणाल तर ] ज्याला देवकीनें आपल्या उदरांत नऊ महिने वागविलें. यशोदेनें अति कष्टानें ज्यास पालन करून लहानाचे मोठे केले आणि तो शेवटीं उपयोगीं पडला पांडवांच्या ! ३७. म्हणून पुष्कळ दिवस त्याची सेवा करावी, किंवा प्रसन्नतेची वेळ पाहून त्याची विनवणी करावी, इतकाहि प्रयास त्या दैववान् अर्जुनाला पडला नाहीं ! ३८. श्रोते म्हणतात, हें राहूं दे; आतां पुढील कथाभाग लवकर सांगा. तेव्हां श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात मग अर्जुन लडिवाळपणानें म्हणतो कीं, देवा ! तुम्हीं हीं जीं संतांचीं लक्षणें सांगितलीं, तीं माझ्या अंगीं वसत नाहींत खरी; ३९. एरव्हीं या संत लक्षणांच्या तात्पर्याचा [ विचार केला तर ] जाणण्यास मी खरोखर अतिशय अपुरा पडेन तरीपण हे पहा कीं, मी पुरता योग्य झालो तर तुमच्याच उपदेशाने. १४०. महाराज ! जर तुम्ही मनांत आणले तर मी ब्रह्मरूपहि होईन ! याकरितां मला जो कांहीं अभ्यास सांगाल, तो करीन. तो न करावयाला काय झाले? ४१. अहो ! देवा ही आपण कोणाची गोष्ट सांगितली, हें मला कांहीं कळत नाहीं; परंतु ती ऐकल्यापासून तिची स्तुति करावी असें अंतःकरणांत वाटतें;–तर ही योग्यता ज्याच्या अंगांत असेल, त्याच्या आनंदास पारावारच नाहीं ! ४२. प्रभो ! ते मी स्वतः अंगानें होईन कां ? एवढे आपण आपलेपणाने कराल का ? तेव्हां श्रीकृष्ण हंसून म्हणाले कीं, "हो, असे कां तुला वाटतें. तर तसे [ ब्रह्मरूप ] करूं बरे ! ४३. असें पहा कीं, जोपर्यंत एक संतोष प्राप्त झाला नाहीं तोंपर्यंतच चोहींकडे सुखाची अतीव उणीव असते; परंतु तो संतोष एकदां कां प्राप्त झाला म्हणजे मग सुखाला कोठे उणीव आहे? ४४. त्याप्रमाणें, जो अर्जुन सर्वशक्तिमान, सर्वेश्वराचा पूर्ण सेवक आहे. म्हणून तो सहजच ब्रह्मरूपहि होईल; पण अर्जुन सुदैवाच्या पिकाच्या भारानें किती लवला आहे पहा ! ४५. जो ईश्वर, हजारों जन्म घेऊनहि इंद्रादिकास सुद्धां ज्याची भेट

१ नवव्या भक्तीच्या मागची सख्य भक्ति. २ आसन. ३ आश्रयभूत अध्यक्ष. ४ देवता. ५ जवळच. ६ भगवान्. ७ सेवकाचा. ८ अति प्रिय. ९ प्रीतीनें. १० एकाच अधिष्ठान, आश्रय. ११ वशतेनें, आधीनतेनें. १२ स्वीकारतो. १३ उत्कंठा. १४ आवड, शोभा. १५ नादब्रह्माला. १६ सौंदर्य. १७ जिंकून. १८ ठसे. १९ हृदयीं. २० श्रवण सुखाचे नवरस. २१ ज्ञानरूपी चांदणें. २२ चकचकीत. २३ प्रसूत होण्यास, उमलण्यास. २४ सर्वथा, सहज. २५ इच्छा. २६ निष्कामांना. २७ प्रकाशले. २८ आनंदानें डोलूं लागले. २९ उजाडलें. ३० उपयोगी. ३१ सेवावा. ३२ प्रयास, आवड. ३३ दैववानाला. ३४ लडिवाळपणानें. ३५ अपरिमित, अतिशय. ३६ मला महत्त्व येईल. ३७ गोष्ट. ३८ स्तुति करीत राहूं. ९ फार. ४० संकट. ४१ ज्या सेवकाचा धनी सर्वेश्वर समर्थ आहे अशानें. ४२ दडपलेला. ४३ दुर्मिळ.

आधीनु केतुला किरटी । जे बोलुही न साहे ॥ ४६ ॥ मग ऐका जें पांडवें । म्हणितलें म्यां ब्रह्म होआवें । तें अशेषही देवें । अवधारिलें ॥ ४७ ॥ तेथ ऐसेंचि एक विचारिलें । जे या ब्रह्मत्वाचे डोहळे जाहले । परि उदरा वैराग्य आहे आलें । बुद्धीचिया ॥ ४८ ॥ एऱ्हवीं दिवस तरी अपुरे । परी वैराग्यवसंताचेनि भरें । जें सोऽहंभाव मेहुरे । मोडोनि आला ॥ ४९ ॥ म्हणौनि प्राप्तिफळीं फळतां । यासि वेळु न लगेल आतां । होय विरक्तु ऐसा अनंता । भरंवसा जाहला ॥१५०॥ म्हणे जें जें हा अधिष्ठील । तें आरंभींच यया फळेल । म्हणौनि सांगितला नें वचेल । अभ्यासु वायां ॥५१॥ ऐसें विवरोनियां श्रीहरी । म्हाणितलें तिये अवसरीं । अर्जुना हा अवधारीं । पंथराजु ॥ ५२ ॥ तेथ प्रवृत्तितरूच्या बुडीं । दिसती निवृत्तिफळांचिया कोडी । जिये मार्गींचा कापडी । महेशु आझुनी ॥ ५३ ॥ पैल योगवृंदें वाहिलीं । आडवीं आकोशीं निघालीं । कीं तेथ अनुभवाच्या पाउलीं । धोरणुं पडिला ॥५४॥ तिहीं आत्म-बोधाचेनि उजुंकारें । धांव घेतली एकसरें । कीं येर सकळ मार्ग निदसुरे । सांडूनियां ॥ ५५ ॥ पाठीं महर्षी येणें आले । साधकांचे सिद्ध जाहाले । आत्मविद थोरावले । येणेंचि पंथें ॥ ५६ ॥ हा मार्गु जैं देखिजे । तैं तहान भूक विसरिजे । रात्रिदिवसु नेणिजे । वाटे इये ॥ ५७ ॥ चालतां पाऊल जेथ पडे । तेथ अपवर्गाची खाणी उघडे । आव्हांटलिया तरी जोडे । स्वर्गसुख ॥ ५८ ॥ निगिजे पूर्वीलियां मोहरां । कीं येइजे पश्चिमेचियां घरा । निश्चळपणें धनुर्धरा । चालणें एथिंचें ॥ ५९ ॥ येणें मार्गें जया ठाया जाइजे । तो गांवो आपणचि होइजे । हें सांगों काय सहजें । जाणसी तूं ॥ १६० ॥ तेथ पार्थें म्हाणितलें देवा । तरी तेंचि मग केव्हां । कां आर्तिसमुद्रौनि न काढावा । बुडतु जी मी ॥ ६१ ॥ तंव श्रीकृष्ण म्हणती ऐसें । हें उत्सृंखळ बोलणें कायसें । आम्हीं सांगतसों आपैसें । वारि पुशिलें तुवां ॥६२॥

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः । नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ११ ॥

तरी विशेषें आतां बोलिजेल । परि तें अनुभवें उपेगा जाईल । म्हणौनि तैसें एक लागेल । स्थान पाहावें ॥ ६३ ॥ जेथ आराणुकेचेनि कोडें । बैसालिया उठों नावडे । वैराग्यासी दुणीव चढे । देखिलिया जें ॥ ६४ ॥ जो संतीं वसाविला ठावो । संतोषासी सावावो । मना होय उत्सांवो । धैर्याचा ॥ ६५ ॥ अभ्यासुचि आपणयातें

होणें अवघड आहे, तो अर्जुनाच्या किती आधीन झाला आहे. त्या अर्जुनानें प्रश्न करावा व आपण सांगावे हेहि त्यास सहन होत नाहीं ४६. मग ऐका कीं, अर्जुनानें 'मी ब्रह्म व्हावें' असें जें म्हटलें तें देवांनीं पूर्णपणें ऐकिलें ४७. त्या वेळेस देवांनीं असा एकच विचार केला कीं, ज्या अर्थी अर्जुनाला ब्रह्मत्वाचे [ मी ब्रह्म व्हावें असें ] डोहाळे [ तीव्र जिज्ञासा ] लागले आहेत. त्या अर्थी त्याच्या बुद्धीच्या पोटांत वैराग्याचा गर्भ राहिला आहे ४८. सहज विचार करून पाहिले तर अर्जुन हा वयसेनें नूतन लहान झाड आहे. तरीपण वैराग्यरूप वसंताच्या भरानें अहंब्रह्मास्मित्याकारक वृत्तिरूप मोहर दाट आल्यामुळें तो लवला आहे. [ साधन चतुष्टय संपन्न तीव्र मुमुक्षु झाला आहे ] ४९. म्हणून याला मोक्षरूप फलाची प्राप्ति अगदीं लवकर होईल. कारण, हा विरक्त झाला आहे, अशी श्रीकृष्णाचीही खात्री झाली १५०. श्रीकृष्ण म्हणतात, आतां हा अर्जुन ज्या ज्या साधनाचें अनुष्ठान करील, ते ते याला आरंभींच [ लवकरच ] फळास येईल म्हणून त्याला सांगितलेला अभ्यास वायां जाणार नाहीं ५१. अशा प्रकारें श्रीहरींनीं पूर्वापार विचार करून त्या वेळेला म्हटलें–अर्जुना ! हा "अभ्यास योग" तो सर्व मार्गांमध्यें प्रमुख असा पंथराज आहे, तो सांगतों तूं ऐक ५२. तो योग असा कीं, ज्यांत प्रवृत्तिरूपी वृक्षाखालीं कोट्यावधि निवृत्तिरूप फळें दृष्टीस पडतात; [ ज्याचें आचरण पूर्ण झालें असतां चरम फल–मोक्ष-प्राप्ति सहजच होते; ] त्या या मार्गाचे श्रीशंकर हे अद्याप-पावेतों यात्रेकरू आहेत ! ५३. दुसरें योग्यांचे समुदायहि हृदयाकाशांत आडमार्गानें सत्वर जाण्यास निघाले; पण शेवटीं अनुभवाच्या पाउलांनीं चालतां चालतां त्यांना योगाचा हमरस्ता सांपडला ५४. मग इतर अज्ञानरूप सर्व मार्ग सोडून त्या योग्यांनीं आत्मबोधाच्या सरळ मार्गाकडे एकदम धांव घेतली ५५. त्यांच्या मागून पूर्वीचे महर्षिहि याच मार्गानें आले. याच मार्गानें साधकांचे सिद्ध झाले, याच मार्गानें आत्मवेत्ते श्रेष्ठत्वास पावले ५६. जेव्हां हा मार्ग दृष्टीस पडला व या वाटेनें चालू लागले म्हणजे तहान व भूक हीं हरपतात आणि रात्र व दिवस यांची जाणीवहि राहात नाहीं ५७. या मार्गानें वाटचाल करीत असतां, जेथें जेथें पाऊल पडेल तेथें तेथें मोक्षाची खाणच उघडते, व कदाचित् तो चुकून आडमार्गानें गेला तरी त्यास स्वर्गसुख मिळतें ५८. तो पूर्व दिशेच्या वाटेनें निघून पश्चिमेच्या घरास यावे [ प्रवृत्तीच्या मार्गानें आरंभ करून त्याचे शेवटीं निवृत्तींत पर्यवसान व्हावें ] असा हा मार्ग आहे. हे धनुर्धरा ! या मार्गाचें चालणें [ मनाच्या ] स्थिरपणाचे आहे ५९. या मार्गानें ज्या ठिकाणाला जातो, तें गांवच आपण होतो [ म्ह. ब्रह्मरूप होतो ] हें निराळें काय सांगावें ? तूं योगाभ्यास करूं लागलास म्हणजे तें आपोआप जाणशील. १६०. तेव्हां पार्थ म्हणाला, "देवा तर मग तुम्ही असे हे योगशास्त्र मला केव्हां सांगणार हो, कारण उत्कंठारूप समुद्रांत बुडत असलेला जो मी, त्या मला, तुम्ही लवकर वर नाहीं का काढणार ? ६१. तेव्हां कृष्ण म्हणाले, अरे ! असे उतावळेपणाचे भाषण कां करतोस ? आम्ही आपण होऊनच तुला सांगत होतो. त्यांत आणखी तूंहि विचारलेस ! ६२.

**अन्वयार्थ—शुचौ देशे**–पवित्र स्थानीं–**आत्मनः**–स्वतःचें **नात्युच्छ्रितं**–फार तंच नाहीं व–**नातिनीचं**–फार सखल नाहीं, असें व–**चैलाजिनकुशोत्तरं**–खालीं दर्भ, त्यावर हरिणाचें किंवा व्याघ्राचें कातडें व यावर मऊ वस्त्र असें **आसनम्**–आसन–**स्थिरं**–स्थिर, अचल–**प्रतिष्ठाप्य**–स्थापून–मांडून ११.

तर आतां आम्ही तुला [ तो योगमार्ग ] स्पष्टपणें सांगतों, पण तदनुसार अभ्यास करून अनुभव आला तरच उप-योग घडेल. तसे योगाभ्यासाकरितां एक योग्यस्थान शोधून पाहणें जरूर आहे; ६३. ती जागा अशी असावी कीं, ज्या ठिकाणीं सहज बसले असतां असे समाधान होते कीं, त्या जागेवर बसल्यावर उठूंच नये, असें वाटावें; आणि जी जागा पाहतांक्षणींच वैराग्य दुप्पट वाढावें ६४. ती जागा पूर्वीं सत्पुरुषांनीं वास्तव्य केलेली असावी व तिच्यापासून मनाच्या संतोषाला साह्य व्हावें व मनास धैर्याचा उल्हास प्राप्त व्हावा ६५. त्या जागेंत अभ्या-सच आपल्याला साधकाकडून करवितो आणि आपणच साधकाच्या अंतःकरणाला माळ घालतो अशी त्या जागेची

१ अपुरतें. २ मोहरानें. ३ वाकला ४ मोक्षप्राप्ती ५ ग्रहण करील. ६ जाणणार नाही. ७ राजमार्ग, राजयोग. ८ संसारवृक्ष. ९ खालीं. १० मोक्षफलाच्या. ११ कोटी. १२ यात्रेकरू. १३ शंकर. १४ प्रथम. १५ आडव्या-तिडव्या मार्गानें. १६ हृदयाकाशीं. १७ हमरस्ता. १८ सरळ मार्गानें. १९ एकसारखी. २० अज्ञानांतील. २१ नंतर. २२ तत्वज्ञानी. २३ श्रेष्ठ झाले. २४ मोक्षाची. २५ आडमार्गानें गेल्यास. २६ निघावें. २७ प्रवृत्तीच्या. २८ वाटेस. २९ निवृत्तीच्या. ३० उत्कंठारूप सागरांतून. ३१ उतावळीचें. ३२ आपण होऊन. ३३ पुनः ३४ अभ्यासानें ३५ उपयोगी. ३६ समाधान व्हावें या इच्छेनें. ३७ दुप्पटपणा, दृढपणा. ३८ साहाय्य, अधिकपणा. ३९ हर्ष, प्रोत्साहन.

करी । हृदयातें अनुभवु वरी । ऐसी रम्यपणाची थोरी । अखंड जेथ ॥ ६६ ॥ जया आंड जातां पार्था । तपश्चर्या मनोरथा । पाखांडियाहि आस्था । समूळ होय ॥ ६७ ॥ स्वभावें वाटे येतां । जरी वरपेंडा जाहला अवचितां । तरी सकामुही परि मागौता । निघों विसरे ॥ ६८ ॥ ऐसेनि न राहतयातें राहावी । भ्रमतयातें बैसवी । थापटूनि चेववी । विरक्तीतें ॥ ६९ ॥ हें राज्य वरं सांडिजे । मग निवांता एथेंचि असिजे । ऐसें शृंगारियांहि उपजे । देखतखेंवो ॥ १७० ॥ जें येणें मानें बरवंट । आणि तैसेंचि अतिचोखट । जेथ अधिष्ठान प्रगट । डोळां दिसे ॥ ७१ ॥ आणिकही एक पहावें । जें साधकीं वसतें होआवें । आणि जनाचेनि पायरवें । रुळेचिना ॥ ७२ ॥ जेथ अमृताचेनि पाडें । मुळाहीसकट गोडें । जोडती दाटें झाडें । सदा फळतीं ॥ ७३ ॥ पाउला पाउला उदकें । वर्षाकाळेंही अतिचोखें । निर्झरें कां विशेखें । सुलभें जेथ ॥ ७४ ॥ हा आतपुही आळुमाळु । जाणिजे तरी शीतळु । पवनु अति निश्चळु । मंदु झुळके ॥ ७५ ॥ बहुत करूनि निःशब्द । दाट न रिगे श्वापद । शुक हन षट्पद । तेउतें नाहीं ॥ ७६ ॥ पाणिलगें हंसें । दोनी चारी सारसें । कवणे एके वेळे बैसे । तरी कोकिळही हो ॥ ७७ ॥ निरंतर नाहीं । तरी आलीं गेलीं कांहीं । होतु कां मयुरेंही । आम्ही ना न म्हणों ॥ ७८ ॥ परि आवश्यक पांडवा । ऐसा ठावो जोडावा । तेथ निगूढ मठ होआवा । कां शिवालय ॥ ७९ ॥ दोहींमाजीं आवडे तें । जें मानलें होय चित्तें । बहुतकरूनि एकांतें । बैसिजे गा ॥ १८० ॥ म्हणौनि तैसें तें जाणावें । मन राहतें पाहावें । राहील तेथ रचावें । आसन ऐसें ॥ ८१ ॥ वरी चोखट मृगसेवडी । माजीं धूतवस्त्राची घडी । तळवटीं अमोडी । कुशांकुर ॥ ८२ ॥ सकोमळ सरिसे । सुबद्ध राहती आपैसे । एकपाडें तैसें । वोजा घालीं ॥ ८३ ॥ परि सावियाचि उंच होईल । तरी आंग हन डोलेल । नीच तरी पावेल । भूमिदोषु ॥ ८४ ॥ म्हणौनि तैसें न करावें । समभावें धरावें । हें बहु असो होआवें । आसन ऐसें ॥ ८५ ॥

तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेन्द्रियक्रियः । उपविश्यासने युञ्ज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥

मग तेथ आपण । एकाग्र अंतःकरण । करूनि सद्गुरुस्मरण । अनुभविजे ॥ ८६ ॥ जेथ स्मरतेनि आदरें । सबाह्य सात्त्विकें भरे । जंव काठिण्य विरे ।

रम्यपणाबद्दल नेहमीं योग्यता व महती असावी ६६. पार्था ! या जागेच्या जवळून सहज गेलें असतां तपश्चर्या करावीशी वाटते व पाखांड्याचेहि मनांत आस्तिक्य व मनापासून आस्था उत्पन्न व्हावी ६७. एखादा मनुष्य सहज वाटेने येत असतां जर कोणी अवचित त्या ठिकाणीं आला, तर जरी तो विषयासक्त असला, तरी तें ठिकाण सोडून परत माघारी निघण्याचे तो विसरतो ६८. अशा रीतीनें ज्याला त्या ठिकाणीं राहण्याची इच्छा नाहीं, त्यालाहि ती जागा राहवून घेते आणि भटकणाऱ्यास एके ठिकाणीं बसविते व वैराग्यास थापटून, हालवून जागें करिते ६९. एखादा राजा किंवा विलासी पुरुष जरी असला तरी त्यालाहि जे स्थान पाहतांक्षणींच असें वाटावें कीं, आपलें राज्य सोडूनहि या ठिकाणीं एकांतवासांतच निवांत राहावें १७०. अशा प्रकारानें जें स्थान इतकें सुंदर आणि तसेंच अतिशय शुद्ध, स्वच्छ त्या ठिकाणीं अधिष्ठान ब्रह्म-ज्ञानचक्षूंस प्रत्यक्ष दिसते, अनुभवास येते [ ती जागा ब्रह्मानंदानुभवास सहाय्य करते ] ७१. आणखी एक गोष्ट त्या स्थानाचे बाबतीत पहावी; ती ही कीं, त्या ठिकाणीं कांहीं साधकांची वस्ती असावी व इतर लोकांच्या वर्दळीने ते रुळलेले नसावे ७२. त्या ठिकाणीं अमृतासारखी मुळां-पुद्धां गोड असलेली व नेहमीं फळांनीं युक्त असणारी दाट झाडें असावींत ७३. तेथें पावलोपावली पावसाळ्याविनाहि पाण्याचे झरे असावेत, ते असे कीं, ज्यांचें पाणी पावसा-ळ्यांतहि निर्मळ असतें व तें विशेषतः उतरण्यास किंवा पाणी काढण्यास सोपे असावेंत ७४. जेथे सूर्याचें ऊनहि सौम्य असावें, आणि कदाचित् ऊन स्वच्छ पडलें तर त्यापासून ताप होणार नाही असे शीतल असावें. तसाच वारा अतिशय शांत असून त्याच्या मंद झुळुका वहात असाव्यात ७५. तेथें बहुतकरून गडबड नसावी व श्वापदांची गर्दी नसावी; परंतु राघु आणि भ्रमर हे फारसे नसावेत ७६. जेथे पाण्याच्यासंबंधानें असणारे हंस, दोन चार चक्रवाक पक्षी, तसेंच एखादे वेळेस कोकिळ पक्षी येऊन बसला तरी चालेल ७७. जेथे नेहमीं नव्हेत पण केव्हां केव्हां येऊन जाऊन मोरहि असले तरी आम्ही त्यांस नको म्हणणार नाहीं ७८. परंतु हे अर्जुना ! अवश्यमेव अशा तऱ्हेचें निसर्गसुंदर एक स्थान शोधून ठेवावे आणि त्या ठिकाणीं सहजीं न दिसणारा, बाजूला एखादा मठ किंवा शिवालय असावें ७९. आणि दोहोंतून जे आपणास आवडेल किंवा आपल्या चित्तास पसंत पडेल असे एक स्थान असावे, बहुतकरून एकांतवासांत बसावें १८०. म्हणून ते स्थान तसे [ निसर्ग रमणीय ] आहे कीं नाहीं ते पहावे तेथें मन स्थिर रहातें किंवा नाहीं हें पहावें; आणि स्थिर राहात असेल तर तेथें आसन घालावें [ त्याचा प्रकार असा ] ८१. वर धूतवस्त्राची घडी असून त्याच्याखालीं कृष्णाजिन व त्याच्याखालीं साग्र दर्भ असावे ८२. ते दर्भ कोमल, असून सारखे आणि आपोआपच एकमेकाला लागून एकसारखे राहतील, अशा चांगल्या व्यवस्थेनें घालावेत ८३. परंतु तें आसन कदाचित् उंच होईल तर शरीर तोल जाऊन कलंडेल आणि अगदीं सखल होईल तर भूमीचा गारवा अगर इतर दोष प्राप्त होतील ८४. म्हणून तसें [ उंच वा सखल ] करूं नये तर तें समभाग असावे. आतां हे फार वर्णन करणें पुरे, अशी आसनाची योजना असावी ८५.

**अन्वयार्थ—तत्र आसने**—त्या आसनावर-**उपविश्य**-बसून—**यतचित्तेंद्रियक्रियः**—चित्त व इंद्रियें यांच्या क्रिया ज्यानें नियमित केल्या आहेत असा होऊन—**मनः एकाग्रं कृत्वा**—मनाला एकाग्र करून—**आत्मविशुद्धये**—चित्त-शुद्धीसाठीं—**योगं**—ध्यान—**युञ्ज्यात्**—करावें १२.

मग त्या ठिकाणीं आपण एकाग्र अंतःकरण करून सद्-गुरूंचें स्मरण करावें व मग आत्मसुखाचा अनुभव घ्यावा

१. जवळून गेलें असतां. २ प्राप्त. ३ एकाएकीं, सहज. ४ माघारा. ५ फिरणाराला. ६ उठवी, जागे करी. ७ चांगलें. ८ पाहतांच. ९ उत्तम. १० शुद्ध. ११ ब्रह्मस्वरूप. १२ वस्ती केलेली. १३ वर्दळीनें १४ मळेना. १५ तुलनेनें. १६ सांपडतात. १७ फळांनीं युक्त असणारीं. १८ पावसाळ्यावांचून. १९ झरे. २० ऊन. २१ थोडा. २२ शब्दरहित. २३ जनावर. २४ पोपट. २५ अथवा. २६ भ्रमर. २७ तेथें. २८ चक्रवाक पक्षी. २९ असोत. ३० गुप्त निवासस्थान. ३१ मृगचर्म. ३२ धुतलेल्या वस्त्राची. ३३ साग्र, न मोडलेलें. ३४ दर्भ. ३५ चांगलें, व्यवस्थित. ३६ कदाचित.

अहंभावाचें ॥ ८७ ॥ विषयांचा विसरु पडे । इंद्रियांची कसमस मोडे । मनाची घडी घडे । हृदयामाजीं ॥ ८८ ॥ ऐसें ऐक्य हें सहजें । फांवें तंव राहिजे । मग तेणेंचि बोधें बैसिजे । आसनावरी ॥ ८९ ॥ आतां आंगातें आंग वेरी । पवनातें पवनु धरी । ऐसी अनुभवाची उजेरी । होंचि लागे ॥ १९० ॥ प्रवृत्ति मार्घौति मोहरे । समाधि ऐलाडी उतरे । आघवें अभ्यासु सरे । बैसतखेंवो ॥ ९१ ॥ मुद्रेची प्रौढी ऐशी । तेचि सांगिजेल आतां परियेसीं । तरी ऊरु या जघनासी । जडोनि घालीं ॥ ९२ ॥ चरणतळें देव्हेंडीं । आधारद्रुमाच्या बुडीं । सुघंटितें [12]गाढीं । [13]संचरीं पां ॥ ९३ ॥ [14]सव्य तो तळीं ठाविजे । तेणें सिवंणीमध्यें पीडिजे[15] । वरी बैसे तो सहजें । वाम चरणु ॥ ९४ ॥ [17]गुद [18]मेंढ्राआंतौतीं । चारी अंगुळें निगुंतीं । तेथ [20]सांधे सार्ध प्रांतीं । सांडूनियां ॥ ९५ ॥ माजी अंगुळ एक निगे । तेथ टांचेचेनि [21]उत्तरभागें । नेहेटिजे[22] वरि आंगें । [23]पेलेलेनि ॥ ९६ ॥ उचालिलें कां नेणिजे । तैसें [24]पृष्ठांत उचलिजे । गुल्फ[25]द्वय धारिजे । तेणेंचि मानें ॥ ९७ ॥ मग [26]शरीर संचु पार्था । अशेषही सर्वथा । [27]पार्ष्णीचा माथा । स्वयंभु होय ॥ ९८ ॥ अर्जुना हें जाण । [28]मूळबंधाचें लक्षण । वज्रासन गौण । नाम यासी ॥ ९९ ॥ ऐसी [30]आधारीं मुद्रा पडे । आणि आधींचा मार्गु मोडे । तेथ अपानु [3०]आंतुलेकडे । वोहोटों[31] लागे ॥ २०० ॥

समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः । संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३ ॥

तंव [32]करसंपुट आपैसें । वाम चरणीं बैसे । तंव बाहुमूळीं दिसे । [33]थोरीव आली ॥ १ ॥ माजीं [34]उभारलेनि दंडें । शिरकमळ होय [35]गाढें । नेत्रद्वारींचीं [36]कवाडें । लागूं पाहती ॥२॥ [37]वरिचिलें पातीं ढळतीं । तळींचीं तळीं [38]पुंजाळती । तेथ अर्धान्मालित स्थिती । उपजे तया ॥ ३ ॥ दिठी राहोनि आंतुलीकडे । बाहेर पाऊल घाली[40] कोडें । ते ठायीं ठावो पडे । [41]नासाग्रपीठीं ॥ ४ ॥ ऐसें आंतुच्या आंतुचि रचे । बाहेरी मागुतें न वचे । म्हणौनि राहणें आधिये दिठीचें । तेथेंचि होय ॥५॥ आतां दिशांची भेटी घ्यावी । कां रूपाची वास पहावी । हे चाड सरे आघवी । आपैसया ॥ ६ ॥ मग [42]कंठनाळ आटे । हनुवटी [43]हडौती दाटे । ते गाढी होऊनि [44]नेहटे । वक्षःस्थळीं ॥ ७ ॥ माजीं [45]घंटिका लोपे । वरी [46]बंधु जो आरोपे । तो [47]जालंधरु

८६. जेथें आदरपूर्वक केलेल्या श्रीगुरुस्मरणाने अहंकाराचा कठीणपणा इतका नाहींसा होतो कीं,तो अष्टसात्विकभावांनी अंतर्बाह्य व्याप्त होतो ८७. जेथें विषयांचा पूर्ण विसर पडतो, इन्द्रियांची विषयांविषयींची हांव, तळमळ नाहींशी होईल आणि मनाची स्थिरता होऊन हृदयांत शांत घडी बनेल ८८. अशा रीतीनें सहज ऐक्य प्राप्त होईपर्यंत त्या ठिकाणीं राहावें. आणि मग त्याच बोधानें युक्त होऊन आसनावर बसावें ८९. नंतर अंगानें अंग सावरीत आहे व प्राणापानवायूच आपल्या स्वतःला आवरीत आहेत, अशा रीतीनें अनुभवाचा स्पष्ट उदय होऊं लागतो १९०. त्या ठिकाणीं प्रवृत्ति माघारी फिरते, समाधि अलीकडील तीराला येते म्ह. सहज साध्य होते. मग आसनावर बसताक्षणींच सर्व अभ्यास, आपोआप पूर्ण होतात ९१. मुद्रेची थोरवी अशी आहे, तीच आतां सांगतो तें ऐक. पोटर्‍या मांड्यांस लावून आसन घालावें ९२. एका पायावर दुसरा पाय वांकडा ठेवून दोन्ही तळपाय वांकडे करून ते आधारचक्राच्या [ गुदस्थानावरील शिवणीवर ] बुडाशीं चांगले सुस्थिर राहतील असे बळकट बसवावेत ९३. त्यांत उजव्या पायाची टांच खालीं रोवून ठेवावी; त्यानें वृषणापासून गुदस्थानापर्यंत असणारी शिवणरेषा मध्ये दाबावी, म्हणजे मग उजव्या पायावर डावा पाय सहजच बसतो ९४. अपानद्वार आणि शिश्न यांमध्यें बरोबर जी चार बोटें जागा आहे, त्यांत दीड बोट वर, दीड बोट खालीं जागा सोडून ९५. मध्यें जी एक बोट जागा राहते, तेथें टांचेच्या वरच्या भागानें दाबावें व या टांचांवरच शरीर तोलून धरावें ९६. शरीर उचललेलें आहे कीं नाहीं हे समजूं न देतां, पाठीच्या कण्याचा शेवटला खालचा भाग उचलावा आणि त्याचप्रमाणांत दोन्ही पायांचे घोटे उचलून धरावेत ९७. मग पार्था ! ह्या सर्व शरीराचा आकार घोट्यांच्या माथ्यावर दुसर्‍या आधाराशिवाय स्वतः सिद्ध राहील असें बसावें ९८. अर्जुना ! हें मूळबंध नामक आसनाचें लक्षण होय. वज्रासन असें एक याचेच गौण नांव आहे ९९. अशा रीतीनें आधारचक्रावर मूळबंधाचें आसन केलें म्हणजे खालचा रस्ता बंद पडतो, आणि मग अपानवायु आंतल्या बाजूस वर येऊं लागतो २००.

**अन्वयार्थ—कायशिरोग्रीवं**–शरीराचा मध्यभाग,शिर व मान यांना–**समं**–सरळ व–**अचलं**–निश्चल–**धारयन्**–धारण करणारा व–**स्थिरः**–स्थिर होऊन–**स्वं नासिकाग्रम्**–आपल्या नासिकेचें अग्र–**संप्रेक्ष्य** [ **इव** ] जणूं काय चांगल्या प्रकारें पहात असल्याप्रमाणें राहून–**च दिशः**–व इकडे-तिकडे–**अनवलोकयन्**–न पाहाणारा १३.

नंतर द्रोणाकार झालेली हस्तांजुळी सहजच डाव्या पायावर बसते व त्यामुळें दोन्ही खांदे वर चढलेले दिसतात १. त्या वर चढलेल्या खांद्यांत शिरकमल हें आंत गढतें, आणि डोळ्यांच्या पापण्या झाकावयास लागतात २. वरच्या पापण्यास कांहींसा ढाळ येतो व खालच्या पापण्या खालीच प्रफुल्लित झाल्यामुळें पसरतात; त्या वेळीं डोळ्यांचीं अर्धी उघडलेलीं व अर्धी मिटलेली अशी दृष्टि सहजच होते ३. अशा रीतीनें दृष्टि आंतल्या आंतच राहते. जर कौतुकानें बाहेर आलीच तर ती नेमकी नाकाच्या शेंड्यावर पडते ४. अशी आंतल्या आंतच दृष्टि कायम राहते नी पुनः बाहेर येत नाहीं, म्हणून अर्धोन्मिलित दृष्टीचें नाकाच्या शेंड्यावरच राहणें होतें ५. आतां इतर दिशांकडे पहावें किंवा दुसरी रूपें पहावीत अशा ह्या सर्व इच्छा आपोआप नाहींशा होतात ६. मग गळ्याची नळी सकुंचित पावते आणि हनुवटी गळ्याखालच्या खळगींत अडकून बसते व वक्षःस्थलाच्या वरच्या बाजूला दृढ होऊन, दाबून,रोवून राहते ७. हे पंडुकुमरा ! नंतर कंठमणि दिसेनासा होतो. असा जो बंध पडतो त्यास 'जालंधरबंध'

१ कासाविशी, चळवळ. २ संभाळी. ३ उत्कर्ष, स्वच्छता. ४ माघारी फिरे. ५ बसल्याबरोबर. ६ बाहूपासून वरच्या अंगाची जी ठेवण होते ती. ७ मांडी. ८ पोटरीला. ९ एका पायावर दुसरा पाय वांकडा ठेवणें. १० गुदस्थानाच्या. ११ सुस्थिर. १२ बळकट. १३ शिरकवावी, लावावी. १४ उजवीं टांच. १५ वृषणावरून गुदस्थानापर्यंत असणारी शिवणरेषा. १६ दाबावी. १७ अपानद्वार. १८ शिश्नामधील. १९ नुसती. २० दीड दीड अंगुळ. २१ वरचे भागानें. २२ दाबावें. २३ तोलून धरून. २४ पाठीच्या कण्याचा शेवटचा भाग. २५ घोटे. २६ शरीररूपी इमारत. २७ घोट्याच्या. २८ अपानवायु ऊर्ध्वगतीस नेणें. २९ मूलाधार चक्रांत. ३० आंतल्या बाजूस. ३१ संकोचूं लागतो. ३२ द्रोणाकार हात. ३३ उंचपणा. ३४ दंड उभे राहिल्यानें. ३५ आंत गेल्यासारखें. ३६ पापण्या. ३७ वरची. ३८ पसरतात. ३९ अर्धी मिटलेली व अर्धी उघडलेली. ४० कौतुकानें. ४१ नाकाच्या शेंड्यावर. ४२ गळ्याची नळी. ४३ गळ्याखालच्या खळगीला लागे. ४४ दाबून राहते ४५ कंठमणी. ४६ मुद्रा. ४७ या नांवाचा कंठस्थानांतील बंध.

म्हणिपे । पंडुकुमरा ॥ ८ ॥ नाभीवरी पोखे । उदर हें थोके । अंतरीं फांके । हृदयकोशु ॥ ९ ॥ स्वाधिष्ठानावरिचिले कांठीं । नाभिस्थानातळवटीं । बंधु पडे किरीटी । वोढियाणा तो ॥ २१० ॥

प्रशान्तात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः । मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ १४ ॥

ऐसी शरीराबाहेरलीकडे । अभ्यासाची पांखरं पडे । तंव आंतु त्राय मोडे । मनोधर्माची ॥ ११ ॥ कल्पना निमे । प्रवृत्ती शमे । आंग मन विरंमे । सांवियाचि ॥ १२ ॥ क्षुधा काय जाहली । निद्रा केउती गेली । हे आठवणही हारपली । न दिसे वेगां ॥ १३ ॥ जो मूळबंधें कोंडला । अपानु माघौता मुरडला । तो सवेंचि वरी सांकडला । धरी फुगूं ॥ १४ ॥ क्षोभलेपणें माजे । उवाइलां ठायीं गाजे । मणिपूरेंसी झुंजे । राहोनियां ॥ १५ ॥ मग थांवलिये वांहटुळी । सैंघ घेऊनि घर डहुळी । बाळपणींची कुहीटुंळी । बाहेर घाली ॥ १६ ॥ भीतरीं वेंळी न धरे । कोठ्याभाजीं संचरे । कफपित्तांचे थारे । उरों नेदी ॥ १७ ॥ धातूंचे समुद्र उलंडी । मेदाचे पर्वत फोडी । आंतली मज्जा काढी । अस्थिगत ॥ १८ ॥ नाडीतें सोडवी । गात्रांतें विघडवी । साधकातें भेडसावी । परी बिहावें ना ॥ १९ ॥ व्याधीतें दावी । सवेंचि हरवी । आप पृथ्वी कालवी । एकवाट ॥ २२० ॥ तंव येरीकडे धनुर्धरा । आसनाचा उबांरा । शक्ति करी उजगेंरा । कुंडलिनीतें ॥ २१ ॥ नागिणीचें पिलें । कुंकुमें नाहलें । वैंळण घेऊनि आलें । सेजे जैसें ॥ २२ ॥ तैशी ते कुंडलिनी । मोटेंकी औटें वळणी । अधोमुख सर्पिणी । निदेली असे ॥ २३ ॥ विद्युल्लतेची विडी[२९] । वन्हिज्वाळांची घडी । पंधरेयाची चोखडी । घोटीव जैशी ॥ २४ ॥ तैशी सुबद्ध आटली । पुटीं होती दाटली । तें वज्रासनें चिमुटेंली । सावधु होय ॥ २५ ॥ तेथ नक्षत्र जैसें उलंडलें । कीं सूर्याचें आसन मोडलें । तेजाचें बीज विरूढलें । अंकुरेंशीं ॥ २६ ॥ तैशी वेढियातें सोडिती । कवतिकें आंग मोडिती । कंदावरी शक्ती । उठली दिसे ॥ २७ ॥ सहजें बहुतां दिवसांची भूक । वरी चेववीली तें होय मिष । मग आवेशें पसरी मुख । ऊर्ध्वा उजू ॥ २८ ॥ तेथ हृदयकोशा-तळवटीं । जो पवनु भरे किरीटी । तया सगळेयाचि मिठी । देऊनि घाली ॥ २९ ॥ मुखींच्या ज्वाळीं । तळीं वरी कवळी । मांसाची वडवाळी । आरोगूं लागे ॥ २३० ॥ जे जे ठाय समांस । तेथ आहाच जोडे घाउसें । पाठीं एकदोनी घांस ।

असें म्हणतात ८. जो बेंबीवर पुष्ट होतो, पोट खपाटीला जातें व हृदयकमल अंतर्यामीं प्रफुल्लित होते ९. अर्जुना! स्वाधिष्ठान चक्राच्या वरच्या भागावर आणि बेंबीच्या खालच्या [ ओटीपोट ] भागामध्यें जो बंध पडतो त्यास 'ओढियाणबंध' असें म्हणतात २१०.

**अन्वयार्थ—प्रशान्तात्मा**–ज्याचें अंतःकरण अतिशय शांत आहे–**विगतभीः**–भयरहित–**ब्रह्मचारिव्रते–स्थितः**–ब्रह्मचारिव्रतामध्यें स्थित असा होऊन–**मनः**–मनाचें–**संयम्य**–संयमन करून–**मच्चित्तः**–मजमध्यें ज्याचें चित्त आहे असा–**युक्तः**–समाहित–**मत्परः**–मत्पर होऊन–**आसीत**–राहावें १४.

अशा रीतीनें शरिराच्या बाहेरील भागास अभ्यासक्रमाची स्थिति सुरू होते तोंच आंत मनाच्या चंचलतादि धर्मांचें बळ नाहींसें होतें ११. म्हणजे कल्पना खुंटते, मनाची बाह्य विषयाकडील धांव थांबते आणि सहजच शरीर व मन शांत होते १२. भूक काय झाली व झोंप कोणीकडे गेली, ह्यांचीं आठवणहि नाहींशी होऊन त्यांचा पत्ता देखील लागत नाहीं १३. मूलबंधानें कोंडलेला अपानवायु उर्ध्वगतीनें माघारीं फिरला, म्हणजे सहजच वर अवरुंडल्यामुळें फुगवटा धरतो १४. तो अपानवायु खवळून बलवत्तर होतो व अडकलेल्या जागीं गुरगुरतो आणि तेथेंच राहून नाभीस्थानीय मणिपूर चक्राशीं धक्के देत झुंजत राहतो १५. मग अशा रीतीनें बळावलेली वाहुटळ चोहोंकडे पोटांत संचार करून ढवळून शोधन करिते आणि बाळपणापासूनची सांचलेली कुजकी घाण बाहेर टाकते १६. त्या वायुला आंत वळण्याला कोठें जागा नसल्यामुळें तो कोठ्यांत प्रवेश करतो आणि कफपित्तांचा थारा राहूं देत नाहीं १७. सप्त धातूंचे समुद्र ओलांडतो; मेदाचे डोंगर फोडतो आणि हाडांतील मज्जा बाहेर काढितो १८. नाड्यास सोडवितो, अवयवांना शिथिल करितो आणि साधकाला भीति दाखवितो; परंतु त्यानें भिऊं नये १९. तो व्याधि उत्पन्न करितो आणि लागलींच नाहींशीहि करितो व रक्तादिक ओलसर द्रव पदार्थ आणि मासांदिक घट्ट, जड पदार्थ एकत्र कालवितो २२०. अर्जुना! [ मुरडलेला अपानवायु एकीकडे हे कार्य करीत असतो ] दुसरीकडे काय प्रकार होतो तो पहा! तर वज्रासनाच्या उष्णतेनें कुंडलिनी नांवाची शक्ति जागृत होते २१. ती नागिणीचें पिलूं कुंकवानें न्हाऊन निघालेले असून जसे वेटोळें घालून निजलेले असावें २२. त्याप्रमाणें ती कुंडलिनी लहानसे साडेतीन वेढे–वेटोळी घालून खालीं तोंड करून सर्पिणीप्रमाणें निजलेलीं असतें २३. ती विजेच्या कंकणाप्रमाणें किंवा अग्निज्वालेच्या घडीप्रमाणें अथवा जणुं काय घोटून चकचकीत केलेल्या शुद्ध सोन्याच्या वेढ्याप्रमाणें [ ती तेजस्वी व वर्तुळाकार दिसते ] २४. तशी व्यवस्थित आकुंचित पावलेली नाभिस्थानाजवळच्या संकुचित स्थळीं दाटून बसलेली असते, ती वज्रासनाच्या चिमट्यानें, चेपल्यामुळें जागी होते २५. तेव्हां, नक्षत्र तुटून पडावें किंवा सूर्याचें आसन मोडावें अथवा तेजाचे बींजापासूनच अंकुर फुटावा २६. त्याप्रमाणें ती कुंडलिनी आपले वेढे सोडून, कौतुकानें अंगीचा आळस झाडून नाभिस्कंधापर्यंत उभी राहिलेली दिसते २७. सहजच फार दिवसांची भुकेलेली असते, तशांत तिला जागें केल्याचें निमित्त होते, मग ती आवेशानें आपले तोंड सरळ असें वरती उघडते २८. अर्जुना! तेव्हां हृदयकमलाच्या खालीं जो वारा भरलेला असतो, त्या सगळ्याला ती कवटाळून खाऊन टाकते २९. आणि मुखांतील ज्वाळांनीं व्यापून खालचेवरचे मांसादिकांचें घांस करून खाऊं लागते २३०. ज्या ठिकाणीं मांस असेल, त्याचा वरच्यावर सहजच घांस घेते; आणि

१ बेंबी. २ हृदयाकाश. ३ हे द्वितीय प्रश्न अथवा चक्र लिंगमूलांत आहे, हे रक्तवर्ण सहा दलांचें आहे. ४ सुषुम्ना मार्गानें नाभीचे वरचे भागानें उजवीकडे वर वर वायु जातो तो बंध. ५ दशा. ६ आशय. ७ बंद होते. ८ सहज. ९ संकुचित झालेला. १० प्रशस्त स्थळीं. ११ नाभिस्थळांतील तृतीय चक्र, हें हेमवर्णी दशदलात्मक आहे. १२ शांत झालेली. १३ वायुधुळीनें. १४ सर्व. १५ कुजकी घाण. १६ वेढा.

१७ हाडांतील. १८ वायुमार्गास. १९ उष्णतेनें. २० जागृती. २१ कुंडलिनी नामक शक्ति. २२ वेटोळें. २३ लहान. २४ साडेतीन. २५ कडें, कंकण. २६ उत्तम, बंधयुक्त. २७ आकुंचित स्थळीं. २८ चिमटी घेतलेली. २९ उगवलें. ३० कौतुकानें. ३१ नाभीवर. ३२ कुंडलिनी. ३३ जागी केली. ३४ वरतीं. ३५ हृदयकमळाखालीं. ३६ घास. ३७-३८ खाऊं लागे. ३९ मांसयुक्त. ४० सहज. ४१ ग्रास.

हियांही भरी ॥ ३१ ॥ मग तळवे तळहात शोधी। उर्ध्वींचे खंडे भेदी। झाडा घे संधी। प्रत्यंगांचा ॥ ३२ ॥ अधोभाग तरी न संडी। परि नखींचेंही सत्त्व काढी। त्वचा धुवूनि जडी। पांजरेशीं ॥ ३३ ॥ अस्थींचे नळे निरपे। शिरांचे हीरें वोरपे। तंव बाहेरी विरूढी करपे। रोमबीजांची ॥ ३४ ॥ मग सप्तधातूंच्या सागरीं। ताहानेली घोंट भरी। आणि सर्वांचि उन्हाळा करी। खडखडीत ॥ ३५ ॥ नासापुटौनि वारा। जो जातसे अंगुळें बारा। तो गच्च धरूनि माघारा। आंतु घाली ॥ ३६ ॥ तेथ अध वरौतें आकुंचे। उर्ध्व तळौतें खांचे। तया खेंवामाजि चक्राचे। पदर उरती ॥ ३७ ॥ एऱ्हवीं तरी दोन्ही तेव्हांचि मिळती। परी कुंडलिनी नावेकें दुश्चित्तें होती। ते तयांतें म्हणे परौति। तुम्हीचि कायसी एथें ? ॥ ३८ ॥ आइकें पार्थिव धातु आघवी। आरोगितां कांहीं नुरवी। आणि आपातें तंव ठेवी। पुसोनियां ॥ ३९ ॥ ऐसी दोनी भूतें खाये। ते वेळीं संपूर्ण धाये। मग सौम्य होऊनि राहे। सुषुम्नेपाशीं ॥ २४० ॥ तेथ तृप्तीचेनि संतोषें। गरळ जें वमी मुखें। तेणें तियेचेनि पीयूषें। प्राणु जिये ॥ ४१ ॥ तो अग्नि आंतूनि निघे। परी सबाह्य निववूंचि लागे। ते वेळीं कसु बांधिती आंगें। सांडिला पुढती ॥ ४२ ॥ मार्ग मोडिती नाडीचे। नवविधपणें वायूचें। जाय म्हणौनि शरीराचे। धर्मु नाहीं ॥ ४३ ॥ इडा पिंगळा एकवटती। गांठी तिन्ही सुटती। साही पदर फुटती। चक्रांचे हे ॥ ४४ ॥ मग शशी आणि भानु। ऐसा कल्पिजे जो अनुमानु। तो वातीवरी पवनु। गिंवासितां न दिसे ॥ ४५ ॥ बुद्धीची पुंळिका विरे। परिमळु घ्राणीं उरे। तोही शक्तीसवें संचरे। मध्यमेमाजीं ॥ ४६ ॥ तंव वरिलेकडोनि ढाळें। चंद्रामृतांचें तळें। कानवेंडोनी मिळे। शक्तिमुखीं ॥ ४७ ॥ तेणें नाळकें रस भरे। तो सर्वांगामाजीं संचरे। जेथिंचा तेथ मुरे। प्राणपवनु ॥ ४८ ॥ तातलिये मुसें। मेण निघोनि जाय जैसें। मग कोंदली राहे रसें। वोतलेनी ॥ ४९ ॥ तैसें पिंडाचेनि आकारें। ते कळाचि कां अवतरे। वरी त्वचेचेनि पदरे। पांघुरली असे ॥ २५० ॥ जैशी आभाळाची बुंथी। करूनि राहे गभस्ती। मग फिटलिया दीप्ति। धरूनि ये ॥ ५१ ॥ तैसा आहाचवरि कोरडा। त्वचेचा असे पातोडा। तो झडोनि जाय कोंडा। जैसा

हृदयाजवळील मांसमय भागाचेहि एक दोन घांस घेते ३१. मग तळपाय तळ्हात यांचें शोधन करून, वरील अंगाचाहि भेद करिते आणि हरएक अंगाचा व सांध्याचा झाडा घेते ३२. आपला मूळ आश्रय तर सोडीत नाहीं पण तेथूनच नखांतीलहि सत्त्व काढते व त्वचा धुवून त्या त्वचेला हाडांच्या व शरीरांच्या सापळ्यास चिकटविते ३३. अस्थींच्या नळ्यांतील रस निरपून घेते व शिरांचे गाभे म्ह. आंतील सत्त्व ओरपून टाकिते. त्यावेळीं बाहेरील केसांच्या बीजांची वाढ करपून जाते ३४. नंतर ताहनेनें पीडित अशी ती सप्तधातूंच्या सागराचा एक घोट घेऊन आपली तहान भागविते, आणि लागलींच शरीरांत सर्वत्र खडखडीत उन्हाळाच करिते ३५. दोन्ही नाकपुड्यांतून जो बारा बोटें बाहेर वाहणारा वारा त्या प्राणवायूला गच्च धरून ही [ कुंडलिनी ] आंत माघारा फिरविते ३६. [ मूलबंधामुळें अपानवायु वर येतच असतो त्यामुळें ] त्या वेळेस खालचा अपान वायु वरती आकुंचित होतो व वरचा प्राण खाली खचतो आणि त्या प्राणापानाच्या आलिंगनामध्यें चक्रांचे सांगाडे तेवढे उरतात ३७. एऱ्हवीं प्राण व अपान या दोहोंचा तेव्हांच एकत्र मिलाफ झाला असतां; परंतु ती कुंडलिनी क्षणभर बावरी होऊन "तुम्ही येथें कोण ? तुम्ही माघारे जा," असें त्यांना म्हणतें ३८. अर्जुना ! ऐक, शरिरांतील सर्व पृथ्वीचा भाग खाऊन टाकून कांहींएक शिल्लक ठेवीत नाहीं, तसाच पाण्याचा भाग तर सर्व चाटून पुसून टाकिते ३९. अशा रीतीनें दोन्ही भूतांची सर्व द्रव्यें-भाग खाऊन टाकल्यावर तिची संपूर्ण तृप्ति होते, मग ती सौम्य होऊन स्वस्थपणें सुषुम्नानाडीपाशीं राहते २४०. तेथे तृप्तीच्या संतोषामुळें ती मुखांतून जी द्रव पदार्थरूपी गरळ ओकते, त्या गरळरूपी अमृताच्या योगानें प्राण जगतो ४१. तो गरळरूप अग्नि तिच्या मुखांतून बाहेर निघतो खरा; परंतु तो शरीरास अंतर्बाह्य निववितो. त्यावेळीं सर्व अंगांतील पूर्वी गेलेलें सामर्थ्य पुन्हा येऊं लागतें ४२. नाड्यांचे वाहणें बंद पडते व वायूंचे नऊ प्रकारहि जातात. म्हणून शरिराचे धर्म राहात नाहींत ४३. इडा व पिंगळा ह्या नाड्या एक होतात, तिन्ही गांठी सुटतात आणि साही चक्रांचे पदर म्ह. संबंध नाहींतसे होतात ४४. मग चंद्र आणि सूर्य अशीं ज्या वायूला आनुमानिक-कल्पित नांवें आहेत तो नाकापुढें कापसाची वात धरून पाहिले तरीहि दिसत नाहीं ४५. बुद्धीची ज्ञानकळा जागचे जागींच नाहींशी होते आणि नाकामध्यें उरलेला सुगंधहि [ सूक्ष्मवायूहि ] कुंडलिनीबरोबर मध्यमेंत म्हणजे सुषुम्ना नाडींत प्रविष्ट होतो ४६. त्यावेळीं वरच्या बाजूस मस्तकांतील जें चंद्रामृताचें तळें आहे, त्याला हळूंच धक्का बसून तें एका अंगावर कलंडते व त्यांतील अमृत कुंडलिनीच्या मुखांत पडूं लागतें ४७. त्यामुळें तिच्यांत रस भरून तो सर्वांगांत संचरूं लागतो. त्यामुळें तो प्राणवायूहि जेथल्या तेथेंच मुरतो ४८. मग तापलेल्या मुशींतील मेण नाहींसें होऊन ती मूस जशी ओतलेल्या केवळ रसानें गच्च भरून राहते ४९. त्याचप्रमाणें शरीराच्या आकारानें जणुं काय वर त्वचेचा पदर पांघरलेले मूर्तिमंत केवळ तेजच अवतरले आहे ! २५०. सूर्य अभ्राच्या बुरख्यांत दडून राहिलेला असतो, परंतु तेंच आभाळ निघून गेल्यावर तो ज्याप्रमाणें, आपल्या तेजानें वर येतो ५१. त्याप्रमाणें शरीरावरील वरवर असणारा त्वचेचा जो कोरडा पापुद्रा तो कोंड्याप्रमाणें निघून

---

१ हृदयांत. २ भाग. ३ दरएक अवयवाचा. ४ हाडांच्या सांपळ्यास. ५ जाळीं, गाभे. ६ वाढ; वृद्धि. ७ रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा व शुक्र या शरीरांतील सात धातु. ८ नाकपुड्यांतून. ९ खालचा वायु वर चढतो. १० वरचा वायु खालीं खेंचतो. ११ आलिंगनामध्यें. १२ पडदे. १३ क्षणभर. १४ व्यग्र. १५ भक्षितो. १६ तृप्त होय. १७ इडा व पिंगला यांच्यामधील नाडी. १८ सामर्थ्य. १९ अपान, समान, उदान, व्यान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय २० डाव्या नाकपुडीतील नाडी. २२ दिव्याच्या प्रकाशानें शोधीत. २३ विकास. २४ सुगंध. २५ कुंडलिनी. २६ सुषुम्ना. २७ हळूंच. २८ सत्रावीचें. २९ एका अंगावर कलंडून. ३० कुंडलिनीच्या तोंडांत. ३१ त्या नळीनें. ३२ प्राणवायूनें. ३३ तापलेल्या ३४ शरिराच्या. ३५ कांति. ३६ बुरखा. ३७ सूर्य. ३८ गेल्यावर. ३९ वरवरचा, उगाच.

होय ॥ ५२ ॥ मग काश्मीरीचे स्वयंभ । कां रत्नबीजा निघाले कोंभ । अवयवकांतीची भांब । तैसी दिसे ॥५३॥ नातरी संध्यारागींचे रंग । काढूनि वळिलें तें आंग । कीं अंतर्ज्योतीचें लिंग । निर्वाळिलें ॥५४॥ कुंकुमाचें भरींव । सिद्धरेसाचें वोतींव । मज पाहतां सावेव । शांतिचि ते ॥ ५५ ॥ तें आनंदचित्रींचें लेपं । नातरी महासुखाचें रूप । कीं संतोषतरूचें रोप । थांबलें जैसें ॥५६॥ तो कनकचंपकाचा कळा । कीं अमृताचा पुतळा । नाना सासिन्नला मळा । कोंवळिकेचा ॥५७॥ हो कां जे शारदियेचेनि वोलें । चंद्रबिंब पाल्हेलें । कां तेजाचि मूर्त बैसलें । आसनावरी ॥५८॥ तैसें शरीर होये । जे वेळीं कुंडलिनी चंद्रें पीये । मग देहाकृति बिहे । कृतांतु गा ॥ ५९ ॥ वार्धक्य तरी बहुडे । तारुण्याची गांठी विघडे । लोपली उघडे । बाळदशा ॥ २६० ॥ वयसा तरी येतुलेवरी । एऱ्हवीं बळाचा बळार्थु करी । धैर्याची थोरी । निरुपमु ॥ ६१ ॥ कनकद्रुमाच्या पालवी । रत्नकळिका नित्य नवी । नखें तैसीं बरवीं । नवीं निघती ॥६२॥ दांतही आन होती । परि अपांडें सानेजती । जैसीं दुबाहीं बैसे पांती । हिरेयांची ॥६३॥ माणिकुलियांचिया कणिया । सावियेचि अणुमानिया । तैसिया सर्वांगीं उथवंती अणियां । रोमांचियां ॥ ६४ ॥ करचरणतळें । जैसीं कां रातोत्पलें । पाखाळींव होती डोळे । काय सांगों ॥ ६५ ॥ निडारलेनि कोंदाटें । मोतियें नावरती संपुटें । मग शिवणी जैशी उतटे । शुक्तिपल्लवांची ॥६६॥ तैशीं पातियेचिये कवळिये न समाये । दिठी जांकळोनि निघों पाहे । आधिलीचि परी होये । गगना कवळिती ॥६७॥ आइके देह होय सोनियाचें । परि लाघव ये वायूचें । जें आप आणि पृथ्वीचे । अंशु नाहीं ॥ ६८ ॥ मग समुद्रापैलीकडील देखे । स्वर्गीचा आलोचु आइके । मनोगत वोळखे । मुंगियेचें ॥६९॥ पवनाचा वारिकां वळघे । चाले तरी उदकीं पाऊल न लागे । येणें येणें प्रसंगें । येती बहुता सिद्धि ॥२७०॥ आइकें प्राणाचा हातु धरूनी । गगनाची पाउटी करूनी । मध्यमेचेनि दादरेहुनि । हृदया आली ॥७१॥ ते कुंडलिनी जगदंबा । जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा । जया विश्वबीजाचिया कोंभा । साउली केली ॥ ७२ ॥ जे शून्यलिंगाची पिंडी[१७] । जे परमात्मया शिवाची करंडी । जे प्रणवाची उघडी । जन्मभूमी ॥७३॥ हें असो ते कुंडलिनी बाळी । हृदयाआंतु आली । अनुहताची[१८] बोली । चावळे ते ॥ ७४ ॥ शक्तीचिया आंगा लागलें ।

जातो ५२. मग जणुं काय मूर्तिमंत स्फटिकच अथवा रत्नरूप बीजाला निघालेल्या कोंबासारखी केशरी वर्णाची त्याच्या अवयवाची कांती दिसते ५३. नाहींतर संध्याकाळच्या आकाशाच्या रंगाची लाली काढून त्याचे तें अंग बनविलें असावें असें वाटते अथवा आत्मचैतन्याच्या तेजाचें शुद्ध लिंगच असावें; ५४. किंवा तें कुंकुमानें पूर्ण भरलेले आणि चैतन्यरसानें ओतलेली केशरीवर्णाची शरीराकृति ती मूर्तीमंत शांतिच असावी, असें मला ते पाहतांना वाटतें ५५. तें आनंदरूपी चित्राचा रंग किंवा परब्रह्म सुखाची प्रत्यक्ष मूर्तिच अथवा संतोषरूपी वृक्षाचें बळावलेले जणुं काय रोपच आहे असें भासतें ५६. तो सोनचाफ्यांचा कळा किंवा अमृताचा पुतळा अथवा नाजुकपणाचा भराला आलेला मळाच, ५७. शरद्ऋतूच्या पौर्णिमेच्या ओलाव्यानें सुशोभित झालेले चंद्रबिंब, किंवा जणुं काय मूर्तिमंत तेजच आसनावर [ विराजमान झाले आहे की काय ] ५८. त्याप्रमाणें, ज्यावेळीं कुंडलीनी चंद्रामृताच्या तळ्यांतील अमृत पिते त्यावेळीं त्याचे शरीर दिसूं लागतें; मग त्या शरीराकृतीला साक्षात् यम देखील भितो ! ५९. वृद्धपणा परतून मागें जातो, तारुण्याची गांठ उलगडते, आणि गेलेली बाल्यावस्था पुन: प्राप्त होते २६०. वयाने पाहिलें तरी एवढासाच दिसतो; परंतु अतिशय पराक्रमी पुरुषाइतकी कृत्यें करितो व त्याच्या धैर्याची महती तर अनुपमच असतें ६१. सुवर्णवृक्षास पालवी फुटून रत्नाच्या कळ्या नित्य नव्या याव्यात त्याप्रमाणें [ त्याच्या तेजस्वी शरीराला ] नवी नखें निघून सतेज दिसतात ६२. दांतहि दुसरे होतात; परंतु अतिशय बारीक असतात, जणुं काय दोहीं बाजूंना हिऱ्यांच्या दोन पंक्तीच मांडल्या आहेत ! ६३. सर्व अंगावरील रोमांचीं अग्रें अणुएवढ्या माणकांच्या कणिकांप्रमाणें लहान अशीं सतेज सहजच उद्भवतात ६४. हातापायांचे तळवे रक्त कमळाप्रमाणें लाल असतात आणि डोळे अत्यंत स्वच्छ होतात. हे काय सांगावें ! ६५. शिंपलीमध्यें मोती परिपक्वदशेला येऊन फुगल्याकारणानें त्या शिंपींत मावत नाहींत म्हणून शिंपीच्या दोन शकलांचा सांधा उकलतो ६६. त्याप्रमाणें दृष्टि पापण्याच्या कवळींत न मावतां, त्या कवळीस व्यापून पापण्यामधून बाहेर येऊं पहाते. ती दृष्टि पहिलीच असते खरी, परंतु सगळ्या आकाशाला व्यापणारी होते ६७. अर्जुना ! ऐक, देह हा सुवर्णासारख्या कांतिचा होतो; परंतु त्यास सर्वतोपरि वायुसारखा हलकेपणा येतो. कारण त्यांतील आप आणि पृथ्वी यांचा अंशहि उरलेला नसतो ६८. मग तो समुद्रापलीकडीलहि वस्तु पाहतो. तो स्वर्गांतील विचार व मसलतीहि ऐकतो व मुंगीच्याहि मनांतील भाव ओळखतो ६९. तो वायुरूप घोड्यावर स्वार होतो, पाण्यावर चालतो पण पाण्यांत पाय शिरत नाहींत. या व अशा प्रसंगानुसार त्याला पुष्कळ सिद्धि प्राप्त होतात २७०. पहा ! या रीतीनें प्राणवायूचा हात धरून व आकाशाची पायरी करून सुषुम्ना नाडीच्या जिन्यावरून [ कुंडलिनी ] हृदयाकाशापर्यंत आली म्हणजे ७१. जी कुंडलिनी जगदंबा, चैतन्यरूपी सार्वभौमाची शोभा आहे. तिने जगद्बीजाच्या कोंभास सावली केली आहे ७२. जी निराकार परमात्म्याची साकारमूर्ति, जी परब्रह्मरूपी शिवाची संबळी, जी ॐकाराची केवळ जन्मभूमीच ७३. हे असो ती कुंडलिनी बाळी हृदयाकाशांत आली म्हणजे अखंड अनुहत ध्वनीची बोली बोलूं लागते ७४. त्या कुंडलिनीच्या जवळ बुद्धीचे ज्ञान असल्यामुळें त्याने तो अनुहत ध्वनिरूप शब्द किंचितसा

१ केसर. २ शोभा. ३ संध्याकाळच्या प्रकाशांतील. ४ आंतल्या प्रकाशाचें. ५ स्वच्छ केलें. ६ अमृत. ७ मला वाटतें. ८ मूर्तिमंत. ९ रंग, प्रतिमा. १० स्थिर झालें बळावलें. ११ सोनचांफ्याचा. १२ भरास आला. १३ नाजुकपणाचा. १४ शरद्ऋतूच्या. १५ पालवलें, पसरलें. १६ अमृत. १७ मागें फिरे. १८ येथवर, एवढी. १९ पराक्रम. २० सुवर्ण वृक्षाच्या. २१ अपूर्व, फार. २२ लहान होतात. २३ दोन्ही बाजूंनीं. २४ पंक्ति. २५ माणिकांच्या. २६ सहज. २७ उद्भवतो. २८ अग्रें. २९ लाल कमळें. ३० स्वच्छ, प्रक्षालन केलेलें, धुतलेलें. ३१ पक्वदशेमुळें, पोसल्यामुळें. ३२ शिंपल्यांच्या जोडांत. ३३ सांधा. ३४ उकलतो. ३५ शिंप. ३६ पापण्यांचें. ३७ वेंगेत, कक्षांत ३८ मावे. ३९ व्यापून. ४० अर्धोन्मीलित. ४१ कर्तबगारी. ४२ नाद, मंद भाषण, मसलत. ४३ घोड्यावर. ४४ चढे. ४५ हृदयाकाश. ४६ पायरी. ४७ सुषुम्नेचे. ४८ जिन्यावरून. ४९. आत्मस्वरूपाजवळ. ५० जीवारंभाची. ५१ विश्वबीज—जगद्-बीज, ॐकार. ५२ जीव. ५३ निराकार ब्रह्माची. ५४ साकार मूर्ति. ५५ संबळी, संपुष्ट. ५६ ॐकाराची. ५७ कोमल. ५८ अखंड ॐकाराचा ध्वनि.

बुद्धीचें चैतन्य होतें जाहलें । तें तेणें आइकिलें । अळुमाळु ॥७५॥ घोषाच्या[१०] कुंडीं । नादचित्रांचीं रूपडीं । प्रणवाचिया मोंडी । रेखलीं ऐसीं ॥ ७६ ॥ हेंचि कल्पावें तरी जाणिजे । परी कल्पितें कैचें आणिजे । तरी नेणों काय गाजे । तिये ठायीं ॥७७॥ विसरोनि गेलों अर्जुना । जंव नाशु नाहीं पवना । तंव वाचा आथी गगना । म्हणौनि घुमे ॥ ७८ ॥ तया अनाहताचेनि मेघें । आकाश द्रुमदुमों लागे । तंव ब्रह्मस्थानींचें बेगें । सहज फिटे ॥ ७९ ॥ आइकें कमळगर्भाकारें । जें महदाकाश दुसरें । जेथ चैतन्य आधांतुरें । करूनि असिजे ॥ २८० ॥ तया हृदयाच्या परिवरीं[११] । कुंडलिनिया परमेश्वरी । तेजाची शिदोरी[१२] । विनियोगिली[१३] ॥ ८१ ॥ बुद्धीचेनि शाकें । हातेंबोनें निकें । द्वैत तेथ न देखे । तैसें केलें ॥८२॥ निजकांती हारविली । मग प्राणुंचि केवळ जाहाली । ते वेळीं कैसी गमली । म्हणावी पां ? ॥८३ ॥ हो कां जे पवनाची पुतळी । पांघुरली होती सोनसळी[१४] । ते फेडूनियां वेगळी । ठेविली तिया ॥८४॥ नातरी वायूचेनि आंगें झगटली । दीपाची दिठी निवटली । कां लखलखोनि हारपली । वीजु गगनीं ॥ ८५ ॥ तैशी हृदयकमळवेन्हीं । दिसे जैशी सोनियाची सरी । नातरी प्रकाशजळाची झरी । वाहत आली ॥ ८६ ॥ मग ते हृदयभूमी पोकळे[२१] । जिराली कां एके वेळे । तैसें शक्तीचें रूप मावळे । शक्तीचिमाजीं ॥८७॥ तेन्हां तरी शक्तीचि म्हणिजे । एऱ्हवीं तो प्राणु केवळ जाणिजे । आतां नादुबिंदु[२२] नेणिजे । कळा ज्योती ॥ ८८ ॥ मनाचा हन मारु । कां पवनाचा आधारु । ध्यानाचा आदरु । नाहीं परी ॥ ८९ ॥ हे कल्पना घे सांडी । तें नाहीं इये परवडी । हे महाभूतांची फुंडी[२३] । आटणी[२४] देखां ॥ २९० ॥ पिंडें पिंडाचा ग्रासु । तो हा नाथसंकेतींचा दंशु । परि दाऊनि गेला उद्देशुं । श्रीमहाविष्णु ॥ ९१ ॥ तया ध्वनिताचें[२८] केणें सोडुनि । यथार्थाची घडी झाडुनी । उपेलविली म्यां जाणुनी । ग्राहीकं श्रोते ॥ ९२ ॥

युञ्जन्नेवं सदाऽऽत्मानं योगी नियतमानसः । शान्तिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥ १५ ॥

ऐकें शक्तीचें तेज जेन्हां लोपे । तेथ देहाचें रूप हारपे । मग तो डोळ्यांमाजीं लपे । जगाचिया ॥ ९३ ॥ एऱ्हवीं आधिलेंचि ऐसें । मावयेव[३३] तरी दिसे । परी वायूचें कां जैसें । वळिलें होय ॥ ९४ ॥ नातरी कर्दळीचा गाभा । बुंथी[३४]

ऐकला ७५. घोषाच्या कुंडात ध्वनि व नादरूपी चित्राची रूपडी ॐकाराच्या आकारासारखी रेखलेलीं असतात ७६. या गोष्टी कल्पनेनेंच जाणतां येतात; परंतु कल्पना करणारा कोठून आणावा ? [ कारण, त्याचें जीवात्म्याशीं ऐक्य झालें असतें ] म्हणून त्या हृदयाकाशांत कसली गर्जना होते, ती कांहीं समजत नाहीं ७७. अरे अर्जुना ! मी तुला एक गोष्ट सांगण्याची विसरलों बोवा ! ती कोणती तर, जोंपर्यंत प्राण, अपान वगैरे वायूंचा नाश झाला नाहीं, तोंपर्यंत हृदयाकाशांत शब्द असतो आणि म्हणूनच तेथे [ अनुहतध्वनिरूप ] शब्द घुमत असतो ७८. त्या अनाहत नादरूपी मेघाच्या गर्जनेनें हृदयाकाश दुमदुमायला लागतें, तेव्हां ब्रह्मस्थानींची खिडकी सहजच उघडते ७९. अर्जुना ऐक ! कमळांतील पोकळीच्या आकाराप्रमाणें हृदयाकाशांत जी पोकळ जागा असते ते जणूं दुसरें महाकाशच आहे तेथे चैतन्य हें अधांतरी वास करितें २८०. त्या चैतन्याला हृदयाकाशाच्या घरीं असलेली कुंडलिनी परमेश्वरी देवी ही आपल्या तेजाचीच शिदोरी अर्पण करते ८१. द्वैत ज्यास पाहणार नाही, असा बुद्धिरूप भाजीसह हातांत वाढून घेतलेला चांगला नैवेद्य अर्पण केला ८२. कुंडलिनी आपली तेजरूप कांति अर्पण केल्यानंतर ती केवळ वायुरूप होऊन राहते, त्यावेळीं ती कशी भासते म्हणून म्हणाल तर ८३. प्रत्यक्ष वाऱ्याची पुतळी असावी व तिने सोनसळी, जरतरी वस्त्र पांघरलेले असावे मग ते [ वस्त्र ] फेडून तिनें एका बाजूस ठेवावे अशी दिसली ८४. किंवा दिव्याची ज्योति वाऱ्याची झुळुक लागल्यानें विझावी अथवा वीज चमकून आकाशांत लुप्त-अदृश्य व्हावी ८५. त्याप्रमाणें हृदयकमळापर्यंत जणूं काय सोन्याची सतेज सरीच किंवा कुंडलिनीच्या तेजरूप पाण्याचा झरा हृदयकमळापर्यंत वाहात आलेली आहे अशी दिसते ८६. मग तो प्रकाशा-जळाचा झरा हृदयरूप भुसभुशीत भूमींत एकाएकीं जिरावा तसे कुंडलिनी शक्तीचें रूप शक्तींतच लय पावतें ८७. अशी स्थिति झाल्यावर हिला शक्तीच म्हणावयाचें; एऱ्हवी ती खरोखर केवळ प्राणरूपच असते असें जाण. परंतु त्या वेळेस ध्वनि, बिंदु, कळा, ज्योति हीं नाहींतशीं होतात ८८. नंतर मन जिंकणें, वायूचा निरोध करणें, किंवा ध्यान करणें हेहि प्रकार तेथें रहात नाहींत ८९. आणि कल्पना घे व ती कल्पना टाक, हे प्रकारहि तेथें संभवत नाहींत, म्हणून [ कुंडलिनी जागृतीनें ] अशीं ही केवळ महाभूताची आटणीच होते असें समज २९०. "पिंडानें पिंडाचा ग्रास करणें", हा योगशास्त्राचे आदिनाथ जे शंकर, त्यांच्या प्रमुख सिद्धांताचा गूढ अभिप्राय होय; पण त्याचे हे खुणेचे मर्म श्रीमहाविष्णूच येथें दाखवून गेले ९१. [ श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात ] त्या श्रीमहाविष्णूच्या संकेताचें गाठोडें सोडून व यथार्थरूप वस्त्राची घडी झाडून साफ करून श्रोते हेच या मालाचें गिऱ्हाईक आहेत असें जाणून मी त्यांच्यापुढें घडी उलगडून ठेविली आहे ९२.

**अन्वयार्थ—एवं**-याप्रमाणें-**आत्मानं**-मनाला-**सदा**-**युञ्जन्**-सतत समाधानयुक्त करणारा-सर्वदा मनाला समाहित करणारा-योगी-ध्यानी पुरुष-योगाभ्यासी-**नियतमानसः**-संयतचित्त-होऊन-**निर्वाणपरमां**-मोक्ष हीच जिची निष्ठा आहे अशा व-**मत्संस्थां**-माझ्या आधीन असलेल्या मद्रूप-**शान्ति**-शांतीला-**अधिगच्छति**-प्राप्त होतो १५.

अर्जुना ! ऐक ज्या वेळेस शक्तीचें तेज नाहींसें होतें, त्या वेळेस देहाचें रूपहि नाहींसें होतें, देह वायुरूप होतो आणि तो योगी इतकें सूक्ष्म रूप धारण करितो कीं, तो लोकांच्या डोळ्यास दिसेनासा होतो ९३. एऱ्हवीं तें शरीर पूर्वीप्रमाणेंच सावयव असतें; परंतु जणूं काय ते केवळ वायूचेंच बनलेलें आहे असें होतें ९४. किंवा

१ किंचित्. २ योगधारणेनें दहा नादांचा ध्वनि ऐकूं येतो, त्याच्या आधारचक्रीं घोषाकार परा नांवाची पहिली वाचा आहे. ३ नादरूपी बाहुल्यांची. ४ ॐकाराच्या. ५ आकारानें, ६ कल्पना करणारे. ७ गर्जे. ८ शब्द करी. ९ खिडकी. १० अधांतरी. ११ जागेंत, घरीं. १२ न्याहारी. १३ अर्पण केली. १४ नैवेद्य. १५ वायु. १६ पीतांबर. १७ लागली. १८ झांकली. १९ हृदयकमळापर्यंत. २० झरा. २१ पोकळीमध्यें. २२ मध्यमा वाचा. २३ स्पष्ट. २४ क्लेश, दुर्दशा. २५ नाथसांप्रदायाचा. २६ गूढाभिप्राय, मर्म. २७ हेतु. २८ मालाचा गठ्ठा. २९ सोडून दाखविली. ३० गिऱ्हाईक. ३१ पूर्वीच्या सारखेच. ३२ साकार. ३३ केळीचा. ३४ आच्छादन, सोपट.

सांडोनि उभा । कां अवयवचि नभा । उदयला तो ॥९५॥ तैसें होय शरीर । तैं तें म्हणिजे खेचरें । हें पद होतां चमत्कार । पिंडजनीं ॥ ९६ ॥ देखें साधकु निघोनि जाये । मागां पाउलांची वोळ राहे । तेथ ठायीं ठायीं होये । अणिमादिक ॥ ९ ॥ परि तेणें काय काज आपणयां । अवधारीं ऐसा धनंजया । लोप आथी भूतंत्रया । देहींचा देहीं ॥९८॥ पृथ्वीतें आप विरवी । आपातें तेज जिरवी । तेजातें पवनु हरवी । हृदयामाजीं ॥९९॥ पाठीं आपण एकला उरे । परि शरीराचेनि अनुकारें । मग तोही निगे अंतरें । गगना मिळे ॥३००॥ ते वेळीं कुंडलिनी हे भाष जाये । मग मारुती ऐसें नाम होये । परि शक्तिपण तें आहे । जंव न मिळे शिवीं ॥१॥ मग जालंधर सांडी । ककारांत फोडी । गगनाचिये पाहाडीं । पैठी होय ॥२॥ ते ॐकाराचिये पाठी । पाय देत उठाउठी । पश्यंतीचिये पाउटी । मागां घाली ॥३॥ पुढें तन्मात्रा अर्धवेरी । आकाशाच्या अंतरीं । भरती गमे सागरीं । सरितां जेवीं ॥४॥ मग ब्रह्मरंध्रीं स्थिरावोनी । सोऽहंभावाच्या बाह्या पसरूनी । परमात्म-लिंगा धांवोनी । आंगा घडे ॥ ५ ॥ तंव महाभूतांची जेवनिका फिटे । मग दोहींसि होय झटें । तेथ गगनासकट आटे । समरसीं तिये ॥ ६ ॥ पैं मेघाचेनि मुखीं निव-डिला । समुद्र कां वोघीं पडिला । तो मागुता जैसा आला । आपणपयां ॥ ७ ॥ तेवीं पिंडाचेनि मिषें । पदीं पद प्रवेशे । तें एकत्व होय तैसें । पंडुकुमरा ॥८॥ आतां दुजें हन होतें । कीं एकचि हें आइतें । ऐशिये विवंचनेपुरतें । उरेचिना ॥ ९ ॥ गगनीं गगन लया जाये । ऐसें जें कांहीं आहे । तें अनुभवें जो होये । तो होऊनि ठाके ॥३१०॥ म्हणौनि तेथिंची मातु । न चढेचि बोलाचा हातु । जेणें संवादा-चिया गांवाआंतु । पैठी कीजे ॥ ११ ॥ अर्जुना एऱ्हवीं तरी । इया अभि-प्रायाचा जे गर्व धरी । ते पाहें पां वैखरी । दुरी ठेली ॥१२॥ भ्रूलता मागिलीकडे । तेथ मकाराचेंचि आंग न मांडे । सडेया प्राणा सांकडें । गगना येतां ॥ १३ ॥ पाठीं तेथेंचि तो भेसळला । तैं शब्दाचा दिवो मावळला । मग तयाहि वरी आटु भविन्नलों । आकाशाचा ॥ १४ ॥ आतां महाशून्याचिया डोहीं । जेथ गग-नासीचि थाव नाहीं । तेथ तागा लागेल काई । बोलाचा इया ? ॥ १५ ॥ म्हणौनि आखरामाजीं सांपडे । कीं कानवरी जोडे । हें तैसें नव्हे फुडें । त्रिशुद्धी गा ॥१६॥

केळीची सोपटें काढून त्याचा पोकळीरूप गाभा उभा करावा म्हणजे जसें कांहींच उरत नाहीं, किंवा आकाशालाच जसे अवयव फुटावेत असा तो दिसतो ९५. तसें जेव्हां त्याचें शरीर होतें, तेव्हां त्याला 'खेचर' म्ह. आकाशांत संचार करणारा असें म्हणतात. ही सिद्धि प्राप्त झाल्यावर शरीरधारी सामान्य लोकांस तो मोठा चमत्कार वाटतो ९६. पहा, योग साध्य करणारा साधक चालून गेल्यावर, पाठीमागें त्याच्या पावलाची ओळ उमटलेली असते. या प्रत्येक पावलाच्या ठिकाणीं अणिमादिक अष्टसिद्धी हात जोडून उभ्या असतात ९७. परंतु धनंजया! ऐक, या अणिमादिक सिद्धींशीं आपल्याला काय कर्तव्य आहे? [ कांहींच नाहीं; पण एवढें खरें कीं, ] पृथ्वी, आप व तेज या तीन भूतांचा असा देहांतल्या देहांतच लोप होतो ९८. पृथ्वीतत्त्वाला उदकतत्त्व विरवतें, उदकतत्त्वाला अग्नितत्त्व जिरविते आणि तेजतत्त्वाला वायुतत्त्व अशा क्रमानें ह्रदयांत विरवते ९९. पाठीमागें शेवटीं एकटा वायु आपण उरतो. पण तो शरीराचे आकृतीनें असतो; पण तोहि कांहीं वेळानें निघून ह्रदयाकाशांत जाऊन विलीन होतो ३००. त्या वेळीं कुंडलिनी हें नांव, ही भाषा जातें मग फक्त 'मारुती' हें नांव प्राप्त होतें. तरीपण ती जोंवर शिवाशी एकरूप होत नाहीं तोंवर तिचे 'शक्तिपण' कायम असतेच १. मग ती जालंधरबंध ओलांडते [ काकीमुख] कंठस्थानीय विशुद्ध चक्रांतून फोडून वर जाऊन मस्तकाकाशाच्या ठिकाणी जाऊन पोचते २. ती ॐकाराचे पाठीवर पाय देऊन पश्यंती वाचेची पायरी मागें टाकतें ३. पुढें ॐकारांतील 'म' या अर्ध मात्रेस मागें टाकून [ त्याने ध्वनित केलेल्या भ्रमर गुंफेतून ] ज्याप्रमाणें नदी सागराला मिळते, तशी ती मस्तकाकाशांत जाऊन मिळते ४. नंतर मस्तकाच्या पोकळींत [ सहस्रदल कमलांतील ब्रह्मरंध्रांत ] स्थिर होऊन, 'सोऽहम्' ह्या भावनेच्या बाहू पसरून परब्रह्मलिंगाला मिठी मारून त्याच्या स्वरूपाशी ऐक्य पावते ५. तेव्हां त्या पंचमहाभूतांचा पडदा नाहींसा होतो मग शिव आणि शक्ति यांचे ऐक्य होते. त्या सामरस्यांत ती आकाशासकट मिळून जाते ६. ज्याप्रमाणें समुद्राचें मेघांच्या द्वारें समुद्रापासून वेगळे झालेले पाणी जमिनीवर, नदीच्या ओघांत पडून ते पुनः नदीमार्गानें समुद्रासच येऊन मिळते ७. त्याप्रमाणें अर्जुना! देहोपाधीच्या निमित्तानें [ वेगळा भासणारा ] जीवात्मा परब्रह्मांत प्रविष्ट होतो. हें एकत्वहि वरील समुद्राच्या पाण्याप्रमाणें होय ८. नंतर [ जीव-शिवांत ] द्वैत होते कीं एकच एक असें अद्वयस्वरूप स्वतः सिद्ध आहे अशी वाटाघाट करण्यापुरतांहि वाव उरतच नाहीं ९. आकाशच आकाशांत लय पावते तसाच हा जीव-शिवैक्य होण्याचा प्रकार आहे. अशी जी कांहीं [ एक ब्रह्मस्थिति ] आहे, ती जो कोणी अनुभवानें होईल त्यासच ती स्थिति प्राप्त होईल ३१०. म्हणून त्या अवस्थेची अनुभवाची गोष्ट शब्दांकितच करून दाखविता येत नाहीं कीं, ज्यामुळें ती गोष्ट संवादाच्या गांवांत पोहोचूं शकेल ११. अर्जुना! सहज विचार करून पाहिलें तर मनांतील आशय व्यक्त करण्याचा अभिमान जी वैखरी वाणी धरतें ती सुद्धां या अनुभवापासून दूर राहिली आहे १२. भिवयांच्या आंतल्या बाजूस मकाराचेच स्वरूप राहात नाहीं, तसेच एकट्या प्राणवायूला देखील ब्रह्माकाशांत येण्याला संकट पडतें १३. पुढें तो वायु तेथेंच गेल्यावर तदाकार होतो. त्या वेळेस शब्दाचा दिवस मावळतो म्ह. बोलणें खुंटतें. मग आकाशतत्त्वाचीहि आटणी होते १४. आतां ज्या अत्यंत निर्विशेष ब्रह्मस्थितीच्या डोहांत महदाकाशाचाच थांगपत्ता लागत नाहीं, तेथें या आकाश गुण, शब्दाची दाद लागणार कशी? १५. म्हणून ही ब्रह्मस्थिति अक्षरांत सांपडण्याजोगी किंवा कानांनी ऐकतां येण्याजोगी अशी खरोखर नाहीं. हें अगदी विचार सत्य आहे १६.

---

१ आकाशास. २ आकाशसंचारी. ३ स्वरूप. ४ शरीरधारी लोकांत. ५ योगधारणादि करणारा. ६ अणिमा महिमा चैव। गरिमा लघिमा तथा॥ इत्यादि. ७ पृथ्वी, आप व तेज यांना. ८ वायु. ९ आकारानें. १० वायूला. ११ ब्रह्मांत. १२ कंठनाडी आकुंचन करून हनुवटी वक्षःस्थलावर दाबली असतां जालंधरबंध होतो. १३ सुषुम्ना नाडी काकीमुख, ककार आहे अंती ज्याच्या मस्तक. १४ टेंकडीवर. १५ प्रविष्ट. १६ परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी या चार वाचांतील दुसऱ्या वाचेच्या. १७ पायरी. १८ सूक्ष्म भूतापासून. १९ आत्माकाशाच्या. २० नदी. २१ मस्तकछिद्रांत. २२ परमात्माच मी आहें या भावनेच्या. २३ परब्रह्माला. २४ पडदा. २५ शिवशक्तीस. २६ संमीलन, ऐक्य. २७ ब्रह्मानंदीं. २८ देहधारी जीवदशेच्या. २९ ब्रह्मपदीं. ३० सिद्ध होतो. ३१ वृत्तांत. ३२ शिरकावें. ३३ चौथी वाचा. ३४ भ्रुकुटीच्या. भुवईच्या. ३५ आंतील बाजूस ३६ ॐकारांतील तिसऱ्या मात्रेचेंच, दशमद्वाराचें. ३७ एकट्या. ३८ संकट. ३९ मिसळला. ४० दिवस. ४१ आटणी. ४२ झाला. ४३ शून्याधिष्ठान ब्रह्माच्या, महदाकाशाच्या. ४४ ठिकाण. ४५ थांग

जें कहीं दैवें । अनुभविलें फांवे । तैं आपणचि हें ठाकावें । होऊनियां ॥ १७ ॥ पुढती जाणणें तें नाहींचि । म्हणौनि असो किती हेंचि । बोलावें आतां वायांचि । धनुर्धरा ॥ १८ ॥ ऐसें शब्दजात माघौतें सरे । तेथ संकल्पाचें आयुष्य पुरे । वाराही जेथ न शिरे । विचाराचा ॥ १९ ॥ जें उन्मनियेचें लावण्य । जें तुर्येचें तारुण्य । अनादि जें अगण्य । परमतत्त्व ॥ ३२० ॥ जें विश्वाचें मूळ । योगद्रुमाचें फळ । जें आनंदाचें केवळ । चैतन्य गा ॥ २१ ॥ जें आकाराचा प्रांतु । जें मोक्षाचा एकांतु । जेथ आदि आणि अंतु । विरोनी[१४] गेले ॥ २२ ॥ जें महाभूतांचें बीजें । जें महातेजाचें तेज । एवं पार्था जें निज- । स्वरूप माझें ॥ २३ ॥ ते हे चतुर्भुज कोंभेली[१७] । जयाची शोभा रूपा आली । देखोनि नास्तिकीं नोकिलीं । भक्तवृंदें ॥ २४ ॥ तें अनिर्वाच्य महासुख । पैं आपणचि जाहले जे पुरुष । जयांचे कां निष्कर्ष । प्राप्तिवेरीं ॥ २५ ॥ आम्हीं साधन हें जें सांगितलें । तेंचि शरीरीं जिहीं केलें । ते आमुचेनि पाडें आले । निर्वाळलेया ॥ २६ ॥ परब्रह्माचेनि रसें । देहाकृतीचिये मुसें । वोतींव जाहलें तैसें । दिसती आंगें ॥ २७ ॥ जरी हे प्रतीति हन अंतरीं फांके । तरी विश्वचि हें अवघें झांके । तंव अर्जुन म्हणे निकें । सांचाचि जी हें ॥ २८ ॥ कां जें आपण आतां देवो । हा बोलिले जो उपावो । तो प्राप्तीचा ठावो । म्हणोनि घडे[२६] ॥ २९ ॥ इये अभ्यासीं जे दृढ होती । ते भरंवसेनि ब्रह्मत्वा येती । हें सांगातियांची रीती । कळलें मज ॥ ३३० ॥ देवा गोठीचि[२८] हे ऐकतां । बोधु उपजतसे चित्ता । मां अनुभवें तल्लीनता । नोहेल केवीं ? ॥ ३१ ॥ म्हणौनि एथ कांहीं । अनारिसें नाहीं । परी नांवभरी चित्त देईं । बोला एका ॥ ३२ ॥ आतां कृष्णा तुवां सांगितला योगु । तो मना तरी आला चांगु । परि न शकें करूं पांगु । योग्यतेचा ॥ ३३ ॥ सहजें आंगिकें जेतुलें आहे । तेतुलियाची जरी सिद्धि जाये । तरी हाचि मार्गु सुखोपायें । अभ्यासीन ॥ ३४ ॥ नातरी देवो जैसें सांगतील । तैसें आपणपें जरी न[३८] ठकेल । तरी योग्यतेवीण होईल । तेंचि पुसों ॥ ३५ ॥ जीवींचीये ऐसी धारणा । म्हणोनि पुसावया जाहलें कारण । मग म्हणे तरी आपण । चित्त देईजो ॥ ३६ ॥ हां हो जी अवधारिलें । जें हें साधन तुम्हीं निरूपिलें । तें आवडतयाहि अभ्यासिलें । फावों[४४] शके ? ॥ ३७ ॥ कीं योग्यतेवीण नाहीं । ऐसें हन आहे कांहीं । तेथ

जेव्हां कधीतरी दैवगतीनेंच ही स्थिति अनुभवास येईल त्या वेळेस आपण स्वतःच तत्स्वरूप होऊन राहावे १७. तत्स्वरूप झाल्यानंतर ते ज्ञेयत्वानें जाणण्याचे आपोआपच उरत नाहीं म्हणून धनुर्धरा हे असो. आतां हेंच किती बोलावे ? अर्थात् याच्याबद्दल कितीहि बोललें तरी ते बोलणे व्यर्थ होय १८. याप्रमाणें शब्दमात्र जेथून माघारी परततो, जेथें संकल्पाचेहि आयुष्य संपते आणि म्हणूनच जेथें विचाराचा वाराहि शिरत नाहीं १९. असें जें परमात्मतत्त्व मनरहित अशा सहज स्थितीचें सौन्दर्य आहे आणि चवथ्या ज्ञानरूप अवस्थेचें तरुणपण होय; आणि जे अनुत्पन्न स्वरूप आहे व अमर्याद असें श्रेष्ठ तत्त्व आहे ३२०. तें विश्वाचे मूळ कारण व योगरूप वृक्षाचें फळ आहे आणि आनंदाचें केवळ जीवन-कलाच होय २१. तेथें आकाशाचा शेवट होतो, म्हणजे मोक्षाची केवळ अद्वैत स्थिति असते त्या ठिकाणीं आदि आणि अंत यांचा लय झालेला असतो २२. तें ब्रह्म [ तटस्थ लक्षणाने ] पंचमहाभूतांचें मूळकारण व महातेजांचें तेज होय. सारांश, पार्था ! तें शुद्ध ब्रह्म माझें स्वतःचे मूळ-स्वरूप होय २३. नास्तिकांनी छळलेली, भक्तवृंदें पाहिली तेव्हां ज्यांची संपूर्ण शोभा चतुर्भुजरूपानें प्रगट झाली, तीच ही आकाराला आलेली चतुर्भुजमूर्ति होय २४. [अर्जुना] असें हे अवर्णनीय महासुख ते योगी आपण स्वतःच होऊन जातात कीं, ज्या पुरुषांचें प्रयत्न अव्याहत चालले असून ज्यांचे निश्चय फळप्राप्तिपर्यंत टिकतात २५. आम्हीं हें जें अष्टांगयोगाचें साधन सांगितलें, तें स्वतः शरीरानें जें करतील, ते योगानें शुद्ध होऊन माझ्याच योग्यतेस येतील २६. त्या योग्यांचीं शरीरें परब्रह्मरूपी रस देहाकृतीच्या मुशींत ओतून तयार केलेली सतेज मूर्तिच, असें ते शरी-राने दिसतात २७. जर हा अनुभव अंतःकरणांत अभि-व्यक्त झाला, तर हें सर्व विश्व त्याला मावळतें. तेव्हां अर्जुन म्हणाला, “ ठीक महाराज ! आपण जे बोलला तें अगदी सत्य आहे २८. कारण देवा ! आपण आतां, जो हा उपाय सांगितला. तो ब्रह्मप्राप्तीचें ठिकाण आहे. म्हणूनच त्या उपायानें ब्रह्मसाक्षात्कार होतो २९. आपण जो हा मार्ग सांगितला, त्याचा दृढ निश्चयानें जे अभ्यास करतात ते खात्रीने ब्रह्मत्वाला पावतात, हें आपल्या सांगण्याच्या रीतीवरून मला समजलें. ३३०. देवा ! ही योगाची केवळ गोष्ट ऐकतानांच चित्तांत ज्ञान उत्पन्न होतें, तर मग प्रत्यक्ष अनुभवानें तल्लीनता कशी बरें प्राप्त होणार नाहीं ? ३१. म्हणून, हें जें आपण सांगितलें, यांत कांहीं अन्यथा नाहीं, परंतु क्षणभर मी जी विनंति करतों, तिकडे लक्ष द्यावें ३२. कृष्णा ! आतां तूं जो मला योग सांगितलास तो माझ्या मनाला तर फार चांगला पटला. परंतु माझ्या ठिकाणीं अधिकाराची उणीव असल्या-कारणानें मी त्याचे अनुष्ठान करूं शकत नाही, असे मला वाटते ३३. आतां माझ्या अंगांत जेवढी योग्यता आहे. तेवढ्यानेंच जर हा अभ्यास सिद्धीस जाईल तर मी मोठ्या समाधानानें याच मार्गाचा अभ्यास करीन ३४. किंवा देवा ! तुम्ही जसें सांगता तसे माझ्याच्यानें होणार नाहीं, असें आपणास वाटत असेल तर माझ्या योग्यतेच्या मानानें माझ्या हातून जें होण्यासारखें असेल तेच देवास विचारूं ३५. अशी माझ्या मनाची समजूत झाली हेच आपल्याला विचारण्याचें कारण होय.” अर्जुन म्हणतो, आतां मी विचा-रतो आपण इकडे लक्ष द्यावें ३६. महाराज ! आपण हें जें योगसाधन सांगितलें तें मी ऐकलें; परंतु वाटेल त्यानें ह्याचा अभ्यास केला तर याची प्राप्ति होईल काय ? ३७. किंवा कांहीं विशेष योग्यतेशिवाय होणारच नाहीं असे कांहीं आहे काय ? तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले,

१ प्राप्त होतें, साधतें. २ राहावें. ३ सर्व बोलणें. ४ मार्गे. ५ जींत मनाचा लय होतो, त्या पांचव्या अवस्थेचें–सहज स्थितीचें. ६ सौंदर्य. ७ चवथी समाधि अवस्था. ८ ज्याला आदि नाहीं असें. ९ मोजतां न येण्याजोगें. १० ब्रह्मस्वरूप. ११ योगरूप वृक्षाचें. १२ शेवट. १३ केवळस्थिति. १४ लय पावले. १५ मूळकारण. १६ ह्या प्रकारचें. १७ आकाराला आली. १८ जेव्हां भक्तवृंदें नास्तिकांनीं नोकिलीं, छळिलीं तेव्हां हीं चतुर्भुज मूर्ति मीं धारण केली. १९ बोलण्यास कठीण. २० शेवट, सार, मतितार्थ. २१ प्राप्तीपर्यंत. २२ बरोबरीनें. २३ तयार झाल्यामुळें. २४ अनुभव. २५ सत्यच. २६ ब्रह्म-साक्षात्कार होतो. २७ आपल्या सांगण्यावरून. २८ गोष्ट. २९ ज्ञान. ३० मग. ३१ तद्रूपता. ३२ कशी होणार नाहीं ? ३३ मिथ्या. ३४ क्षणभर. ३५ चांगला. ३६ माझ्या अंगीं योग्यतेचा हीनपणा आहे; माझी तितकी लायकी नाहीं. ३७ स्वतःचें बळ. ३८ प्राप्त न होईल. ३९ विचारूं. ४० धारणा, इच्छा. ४१ द्यावें. ४२ वाटेल त्यालाहि.

श्रीकृष्ण म्हणती काई । धनुर्धरा ॥३८॥ हें काज कीर निर्वाणें । परि आणिकही जें कांहीं साधारण । तेंही अधिकाराचे वोडवेविणें । काय सिद्धि जाय ? ॥ ३९ ॥ पैं योग्यता जे म्हणिजे । ते प्राप्तीची अधीन जाणिजे । कां जे योग्य होऊनि कीजे । तें आरंभिलें फळे ॥ ३४० ॥ तरी तैसी एथ कांहीं । सावियांची केणी नाहीं । आणि योग्यतेची काई । खाणी असे ? ॥ ४१ ॥ नावेकं विरक्तु । जाहला देहधर्मी नियंतु । तरि तोचि नव्हे व्यवस्थितु । अधिकारिया ? ॥ ४२ ॥ येतुलालिये आयणीमाजिवडें । योग्यपण तूंतेंही जोडे । ऐसें प्रसंगें सांकडें । फेडिलें तयाचें ॥ ४३ ॥ मग म्हणे पार्था । ते हे ऐसी व्यवस्था । अनियंतासि सर्वथा । योग्यता नाहीं ॥ ४४ ॥

नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकान्तमनश्नतः । न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ १६ ॥

जो रसनेंद्रियाचा अंकिला । कां निद्रेसी जीवें विकला । तो नाहींच एथ म्हणितला । अधिकारिया ॥ ४५ ॥ अथवा आग्रहाचिये बांदोडी । क्षुधा तृषा कोंडी । आहारातें तोडी । मारूनियां ॥ ४६ ॥ निद्रेचिया वाटा नवंचे । ऐसा दंढिवेचेनि अंवतरणें नाचे । तें शरीरचि नव्हे तयाचें । मा योगु कवणाचा ? ॥४७॥ म्हणौनि अतिशयें विषयो सेवावा । तैसा विरोधु नोहावा । कां सर्वथा निरोधावा । हेंही नको ॥ ४८ ॥

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु । युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७ ॥

आहार तरी सेविजे । परी युक्तीचेनि मापें मविजे । क्रियाजात आचरिजे । तयाचि स्थिती ॥ ४९ ॥ मितलीं बोलीं बोलिजे । मितलियां पाउलीं चालिजे । निद्रेही मानु दीजे । अवसरें एकें ॥ ३५० ॥ जागणें जरी जाहलें । तरी होआवें तें मितलें । येतुलेनि धातुसाम्य संचलें । असेल सहजें ॥ ५१ ॥ ऐसें युक्तीचेनि हातें । जें इंद्रियां वोपिजे[२५] भातें । तैं संतोषासी वाढतें । मनचि करी ॥ ५२ ॥

यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते । निस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥ १८ ॥

बाहेर युक्तीची मुद्रा पडे । तंव आंत आंत सुख वाढे । तेथें सहजेंचि योगु घडे । नाभ्यासितां ॥ ५३ ॥ जैसें भाग्याचिया भेंडसें । उद्यमाचेनि मिसें । मग समृद्धिजात आपैसें । घर रिघे ॥ ५४ ॥ तैसा युक्तिमंतु कौतुकें । अभ्यासाचिया मोहरा ठाके । आणि आत्मसिद्धीचि पिके । अनुभवु तयाचा ॥ ५५ ॥ म्हणोनि युक्ति हे पांडवा । घडे जया सदैवा । तो अपवर्गीचिये राणिवा । अळंकारिजे ॥ ५६ ॥

अर्जुना! हें तूं काय विचारतोस? ३८. हा योग तर मोक्ष मिळविण्याची निर्वाणीची गोष्ट आहे. म्हणून योग्य अधिकाऱ्याला मोक्ष मिळतो. अरे! पण साधारण गोष्ट सुद्धां अधिकाराच्या सहाय्याशिवाय सिद्धीस जाईल काय? कोणतीहि गोष्ट सिद्ध होण्यास योग्यता पाहिजेच ३९. अरे! योग्यता म्हणून जिला म्हणतात, ती प्राप्तीच्या आधीन म्ह. अदृश्य असल्यामुळें फलप्राप्तीचे पूर्वी समजत नाहीं; पण अधिकारी होऊन आरंभिलेलें कार्य तत्काळ फलद्रूप होतें ३४०. तरी तसा येथे 'योग्यता' हा कांहीं सहजासहजीं मिळणारा माल नाहीं आणि योग्यतेची एखादी खाण का आहे? ४१. अरे! योगाला अधिकार म्हणजे थोडा विरक्त आणि देह धर्मांचे नियमन करणारा असेल तोच यथायोग्य असा अधिकारी होणार नाहीं काय? ४२. अशा युक्तीनें पाहिले तर इतकी योग्यता तुझे ठिकाणींहि आहे, असें सांगून देवांनी अर्जुनाचे मनांतील अधिकार विषयक अडचण सहजच दूर केली ४३. मग श्रीकृष्ण म्हणाले, "पार्था! या योगप्राप्तीची अशी व्यवस्था आहे कीं, अव्यवस्थित मनुष्याला मात्र त्याची प्राप्ति होण्याची मुळीच योग्यता नाहीं" ४४.

**अन्वयार्थ—तु**—पण—**अत्यश्नतः**—जितकें हवें त्याहून अधिक अन्न खाणाऱ्या पुरुषाला—**योगः**—ध्यान—चित्तवृत्तीचा निरोध—योगाभ्यास—**न अस्ति**—होत नाहीं—**च एकान्तं**—न अगदीं मुळींच—**अनश्नतः**—अन्न न खाणाऱ्या पुरुषालाहि—**न**—योग करतां येत नाहीं—**अतिस्वप्नशीलस्य**—फार निजण्याचें ज्याचें शील आहे त्याला—**न च**—योगाभ्यास करतां येत नाहीं. **च**—व—**अर्जुन**—हे अर्जुना! **जाग्रतः न एव**—अतिशय जागणाऱ्या पुरुषालाहि योग घडत नाहीं १६.

अरे! जो जिव्हेच्या अंकित झाला, किंवा सर्वथैव झोंपेला जीवभावानें विकला आहे तो या योगाचा अधिकारी म्हटला जात नाहीं ४५. अथवा दुराग्रहाच्या आवेशांत जो भूक आणि तहान मारतो आणि भूक मारून आहार कमी करितो, ४६. तसेंच झोंप मुळींच घ्यावयाची नाहीं असा दुराग्रह धरून नाचतो, त्यांत धन्यता मानतो, त्याचे शरीरच जर त्याच्या स्वाधीन राहात नाही तर मग त्याला योग कोठून साध्य होणार? ४७. म्हणून विषयांचें अति सेवन करावें अशी विरोधीवृत्ति नसावी किंवा त्यांचा सर्वथैव त्याग करण्याचा आग्रह धरणें हेहि योग्य नाहीं ४८.

**अन्वयार्थ—युक्ताहारविहारस्य**— ज्याचा आहार—अन्नाचे परिणाम व विहार—जाणें येणें वगैरे परिमित असतें—त्याचा **कर्मसु**—कर्मामध्यें—**युक्तचेष्टस्य**—परिमित चेष्टा करणाऱ्या योग्याचा—**युक्तस्वप्नावबोधस्य**—झोंप व जागणें हीं दोन्हीं ज्याचीं परिमित आहेत, त्याचा—**योगः**—**दुःखहा** सर्व संसार—दुःखाचा घात करणारा—**भवति**—होतो १७.

अन्न तर सेवन करावेंच, पण तें युक्तीच्या मापानें मोजून परिमित करावें; त्याचप्रमाणें, इतर सर्वच्या सर्व क्रियाहि युक्तीनेंच प्रमाणांत कराव्यात ४९. म्हणजे परिमित शब्दांत बोलावें, नियमित पावलांनी चालावें. कोणा एका नेमलेल्या योग्य वेळींच झोंपेलाहि मान द्यावा ३५०. जागरण जरी करायचें झालें तरी तेंहि नियमित वेळेपर्यंतच करावें. अशा नियमित रीतीनें आचरण केल्यावर शरीरांतील रक्तादिक सप्तधातु सहजच समतोल राहातील ५१. अशा प्रकारें बेतावातानें, इंद्रियांची तृप्ति नियमितपणाच्या द्वारानें, या इंद्रियांना त्यांचे विषय दिले म्हणजे आपले मनच संतोषास वाढवितें ५२.

**अन्वयार्थ—यदा**—ज्यावेळीं—**विनियतं चित्तं**—विशेषतः नियमित केलेलें म्ह० एकाग्रतेस प्राप्त झालेलें चित्त **आत्मनि एव**—आत्म्यामध्यें—**अवतिष्ठते**—अवस्थित होतें व ज्या अवस्थेंत योगी—**सर्वकामेभ्यः**—सर्व कामांपासून—दृष्ट व अदृष्ट विषयांपासून—**निस्पृहः**—निस्पृह झालेला—ऐहिक व पारलौकिक सर्व विषयांविषयींची तृष्णा सोडलेला असा होतो—**तदा**—तेव्हां—**युक्तः**—समाहित—**इति**—असें—**उच्यते**—तो म्हटला जातो १८.

याप्रमाणें बाहेरील इंद्रियांची स्थिति नियमित ठेविली तर अंतर्यामीं सुखहि वाढत जातें. त्या मनुष्याला अभ्यास न करितां योग सहजच घडतो. याचा अभिप्राय—नियमितपणानें वागणें हे एक योगाभ्यासाचें अवश्य साधन आहे ५३. ज्याप्रमाणें भाग्योदयाच्या प्रबलतेनें व उद्योगाचे निमित्तानें सर्व संपत्ति आपोआप घरीं चालून येते, ५४. त्याचप्रमाणें जो नियमशील आहे, तो लीलेने जरी योगाभ्यासाकडे वळला, तरी त्याचा आत्मस्थितीचा अनुभव फलीभूत होतो ५५. म्हणून अर्जुना! ज्या दैववान् पुरुषाला युक्तीचें साह्य असतें, तो मोक्षाच्या राज्यानें शोभिवंत होतो ५६.

१ मोक्षाचे. २ योग्यतेवांचून, साह्यावांचून. ३ सर्वथा, खरोखर. ४ [अडचणीचा] पदार्थ, प्रकार. ५ क्षणभर. ६ विहित धर्मांत. ७ नेमांचा. ८ युक्तीनें. ९ संकट. १० अव्यवस्थिताला. ११ जिव्हेचा. १२ स्वाधीन झाला. १३ मनानें सर्वथैव. १४ बंधनानें. १५ जात नाहीं. १६ हट्टाच्या, हढतेच्या. १७ अभिमानानें. १८ बंद करावा. १९ मोजावा.

यथा दीपो निवातस्थो नेङ्गते सोपमा स्मृता । योगिनो यतचित्तस्य युञ्जतो योगमात्मनः ॥ १९ ॥

युक्ति योगाचें आंग पावे । ऐसें प्रयाग जेथ होय बरवें । तेथ क्षेत्रसंन्यासें स्थिरावें । मानस जयाचें ॥ ५७ ॥ तयातें योगयुक्त तूं म्हण । हेंही प्रसंगें जाण । तें दीपाचें उपलक्षण । निर्वातींचिया ॥ ५८ ॥ आतां तुझें मनोगत जाणोनी । कांहीं एक आम्ही म्हणौनि । तें निकें चित्त देउनी । परिसावें गा ॥ ५९ ॥ तूं प्राप्तीची चाड वाहसी । परी अभ्यासीं दक्षु नव्हसी । तें सांग पां काय बिहसी । दुवाडपणा ? ॥ ३६० ॥ तरी पार्था हें झणें । सायासे घेशीं हो मनें । वायां बागूल इये दुर्जनें । इंद्रियें करिती ॥ ६१ ॥ पाहे पां आयुष्यातें अढळ करी । जें सरतें जीवित वारी । तया औषधातें वैरी । काय जिव्हा न म्हणे ? ॥ ६२ ॥ ऐसें हितासि जें जें निकें । तें सदाचि या इंद्रियां दुःखें । एऱ्हवीं सोपें योगासारिखें । कांहीं आहे ? ॥ ६३ ॥

यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया । यत्र चैवात्मनाऽऽत्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ २० ॥
सुखमात्यन्तिकं यत्तद् बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम् । वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥ २१ ॥

म्हणौनि आसनाचिया गाढिकां । जो आम्हीं अभ्यासु सांगितला निका । तेणें होईल तरी हो कां । निरोधु यया ॥ ६४ ॥ एऱ्हवीं तरी येणें योगें । जैं इंद्रियां विंदाणं लागे । तैं चित्त भेटों रिगे । आपणपेयां ॥ ६५ ॥ परतोनि पाठिमोरें ठाके । आणि आपणियांतें आपण देखे । देखतखेंवो वोळखे । म्हणे तत्त्व हें मी ॥ ६६ ॥ तिये ओळखीचिसरिसें । सुखाचिया साम्राज्यीं बैसे । मग आपणपां समरसें । विरोनि जाय ॥ ६७ ॥ जयापरतें आणिक नाहीं । जयातें इंद्रियें नेणती कहीं । तें आपणचि आपुलिया ठायीं । होऊनि ठाके ॥ ६८ ॥

यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः । यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणाऽपि विचाल्यते ॥ २२ ॥

मग मेरूपासूनि थोरें । देह दुःखाचेनि डोंगरें । दाटिजो पां पडिभरें । चित्त न दटे ॥ ६९ ॥ कां शस्त्रें वरी तोडिलिया । देह अग्निमाजीं पडलिया । चित्त महासुखीं पहुडलिया । चेवोचि नये ॥ ३७० ॥ ऐसें आपणपां रिगोनि ठाये । मग देहाची वासु न पाहे । आणिकचि सुख होऊनि जाये । म्हणूनि विसरे ॥ ७१ ॥

तं विद्याद् दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् । स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ॥ २३ ॥

**अन्वयार्थ–यथा**–ज्याप्रमाणें–**निवातस्थः दीपः**–वायु–रहित प्रदेशांत असलेला दीप–दीपाची ज्योत–**न इंगते**–हालत नाहीं तर निश्चल तेवत असते–**सा उपमा**–ती उपमा–त्या दीपज्योतीची उपमा–दृष्टान्त–**आत्मनः योगं युञ्जतः**–आत्म्याच्या योगाचें–समाधीचें अनुष्ठान करणाऱ्या–**योगिनः**–योग्याच्या–**यतचित्तस्य**–संयतचित्ताला–**स्मृता**–सांगितलेली आहे १९.

नियमित वागणाराला जर योगाभ्यास करण्याची इच्छा झाली, तर तो योग, गंगा आणि यमुना यांचा संगम झालेल्या प्रयागतीर्थाप्रमाणें होय. त्या आत्मस्वरूपीं प्रयागाचे ठिकाणीं ज्याचे मन क्षेत्रसंन्यास करून कायमचे स्थिर राहतें ५७. त्याच मनुष्याला तूं योगयुक्त म्हण; आणि प्रसंगानुरोधानें हेंहि लक्षांत ठेव कीं, त्याच्या चित्ताला निर्वातस्थलीच्या दिव्याची उपमा योग्य लागू पडेल ५८. आतां तुझ्या मनांतील भाव जाणून आम्ही तुला कांहीं थोडेसें सांगतों, ते तूं चांगले चित्त देऊन ऐक ५९. तूं योगप्राप्तीची इच्छा मनांत बाळगतोस, परंतु अभ्यासाचे बाबतींत तूं तत्पर असत नाहींस. त्या अभ्यासाच्या कठीणपणास भितोस कीं काय ? तें सांग बरें ! ३६०. पार्था ! कदाचित् तूं ही भीति मनांत बाळगशील; पण तसें करूं नकोस हो ! कारण हीं दुष्ट इन्द्रियें त्या अभ्यासाचा उगीचच बागुलबोवा करून भीति दाखवितात ! ६१. पहा, बरें ! जें आयुष्यास स्थिर करतें, [ वाढवितें ] आणि जे संपणाऱ्या जीविताला मागें आणतें, [ मृत्यु टाळतें ] त्या औषधाला देखील जिव्हा, शत्रु समजत नाहीं काय ? ६२. त्याचप्रमाणें, आपल्या हितास जें जें चांगलें, तें तें नेहमीं या इंद्रियांना दुःखदायकच वाटतें; एऱ्हवीं या योगसाधनाइतकें दुसरें कांहीं सोपें साधन आहे काय ? ६३.

**अन्वयार्थ–यत्र**–जेव्हां–**योगसेवया**–योगाभ्यासानें **निरुद्धं**–सर्व बाजूंनीं आवरून धरलेलें,–**चित्तं**–चित्त–**उपरमते**–उपरतीस प्राप्त होतें–**च**–आणि–**यत्र**–ज्यावेळीं **आत्मना**–समाधीनें अत्यंत शुद्ध झालेल्या अंतःकरणानें–**आत्मानं**–चैतन्यज्योतिस्वरूप परमात्म्यास–**पश्यन्**–पाहणारा–**आत्मनि**–स्वरूपांत–**तुष्यति एव**–संतुष्ट होतोच २०.–**यत्र**–ज्यावेळीं –**यत्**–जें– **आत्यन्तिकम्**–अनन्त–**बुद्धिग्राह्यं**–केवळ बुद्धीनेंच ग्रहण करण्यास योग्य–**अतीन्द्रियम्**–इंद्रियांचा विषय न होणारें–**सुखं**–सुख–**तत्**–तें **वेत्ति**–तो अनुभवितो **च**–व [ –**यत्र**–ज्यावेळीं– ] **अयं**–हा ज्ञानी–**स्थितः**–आत्मस्वरूपांत स्थित झाला असतां–**तत्त्वतः**–त्या तत्त्वापासून –**न एव चलति**–च्युत होतच नाहीं [ तेव्हां योगसिद्धि होते ] २१.

म्हणूनच आसनाच्या बळकटपणापासून येथवरील जो आम्ही खरा-चांगला योगाभ्यास सांगितला, त्या योगानेंच या इंद्रियांचा निग्रह झाला तर होईल ६४. एऱ्हवीं तरी या योगसाधनामुळें जेव्हां इंद्रियांचा वेध लागतो तेव्हां आपण होऊनच चित्त हें आपल्या आत्मस्वरूपाची भेट घेण्याकरितां निघते ६५. चित्ताची स्वाभाविक असलेली बहिर्मुख धांव टाकून परत अन्तर्मुख होते व आपण आपल्या आत्मस्वरूपास पाहते त्याचवेळीं त्याला " हे आत्मतत्त्वच मी आहे " अशी ओळख पटते ६६. त्या ओळखीबरोबरच तें सुखाच्या साम्राज्यावर बसतें, आणि मग आत्मानंदांतच समरसतेनें लय पावतें ६७. आणि ज्यापेक्षां दुसरें अधिक कांहीं नाहीं, व ज्याला इंद्रियें कधींच जाणत नाहींत असें जें आत्मस्वरूप म्हणजे ब्रह्मरूप तें [ चित्त ] आपण स्वतःच आपल्या ठिकाणीं होऊन राहतें ६८.

**अन्वयार्थ––च** –आणि – **यं** – ज्या आत्मलाभाला –**लब्ध्वा**–प्राप्त होऊन–**अपरं लाभं**–दुसऱ्या लाभाला–**ततः**–त्याहून – **अधिकम्** – अधिक – **न मन्यते**–मानीत नाहीं,–**यस्मिन्** – ज्या आत्मस्वरूपांत – **स्थितः**–स्थित झालेला हा–**गुरुणा अपि दुःखेन**–फार मोठ्या दुःखानेंहि **न विचाल्यते**–मोठ्या दुःखाकडूनहि चंचल केला जात नाहीं २२.

अशी स्थिति प्राप्त झाली कीं मग मेरु पर्वतापेक्षांहि मोठ्या दुःखाच्या डोंगराने देह दडपला तरीहि त्याच्या भाराने त्याचे चित्त तत्त्वतः दडपले जात नाहीं; ६९. किंवा शस्त्रानें त्याचा देह तोडला, अथवा देह अग्नींत पडला, तरीहि निरतिशय महासुखांत निमग्न झालेलें त्याचे चित्त परत फिरून जागृत होत नाहीं ३७०. याप्रमाणें चित्त आपल्या आत्मस्वरूपांत प्रवेश करून राहिल्यावर तो देहाची आठवणहि विसरतो, आणि अनिर्वाच्य ब्रह्मसुखच बनल्यामुळें इतर सर्व गोष्टींचा त्याला विसर पडतो ७१.

**अन्वयार्थ––तं दुःखसंयोगवियोगं**–त्या दुःखसंयोगाच्या वियोगाला–**योगसंज्ञितं**–योगसंज्ञित–योग ही संज्ञा ज्याला प्राप्त झाली आहे, असा–**विद्यात्**–जाणावें–**सः योगः**–तो योग–**निश्चयेन**–निश्चयानें–**अनिर्विण्णचेतसा**–अखिन्न चित्तानें–**योक्तव्यः**–करावा २३.

---

१ उपमा. २ वारा नसलेल्या ठिकाणच्या. ३ सावध. ४ कठीण. ५ त्रास, धास्ती. ६ स्थिर. ७ बळकटपणानें. ८ अटक. ९ इंद्रियांना. १० निग्रह ११ पाहतांच, तत्क्षणीं. १२ ऐक्यतेनें. १३ दडपला जावा. १४ निजलें असतां.

जया सुखाचिया गोडी । मन ओर्तीची सेचि सोडी । संसाराचिया तोंडीं । गुंतलें जें ॥ ७२ ॥ जें योगाची बैरव । संतोषाची राणिवें । ज्ञानाची जाणीवें । जयालागीं ॥ ७३ ॥ तें अभ्यासिलेनि योगें । सावयवें देखावें लागे । देखिलें तरी आंगें । होईजेल गा ॥ ७४ ॥

संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः । मनसैवेन्द्रियग्रामं विनियम्य समन्ततः ॥ २४ ॥

तरि तोचि योगु बापा । एके परी आहे सोपा । जरी पुत्रशोकु संकल्पा । दाखविजे ॥ ७५ ॥ हां विषयातें निमालियां आइके । इंद्रियें नेमाचिया धांरणीं देखे । तरी हिये[१०] घालूनि मुके । जीवित्वासी ॥ ७६ ॥ ऐसें वैराग्य हें करी । तरी संकल्पाची सरे वेंरी । सुखें धृतीचिया धंवळारीं । बुद्धि नांदे ॥ ७७ ॥

शनैः शनैरुपरमेद् बुद्धया धृतिगृहीतया । आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिन्तयेत् ॥ २५ ॥
यतो यतो निश्चरति मनश्चञ्चलमस्थिरम् । ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥

बुद्धी धैर्या होय वसौटा[११] । मनातें अनुभवाचिया वाटा । हळु हळु करी प्रतिष्ठा । आत्मभुवनीं ॥ ७८ ॥ याही एके परी । प्राप्ति आहे विचारीं । हें न ठके तरी सोपारी । आणिक ऐकें ॥ ७९ ॥ आतां नियमुचि हा एकला । जीवें करावा आपुला । जैसा कृतनिश्चयाचिया बोला- । बाहेरा नोहे ॥ ३८० ॥ जरी येतुलेनि चित्त स्थिरावें । तरी काजा आलें स्वभावें । नाहीं तरी घालावें । मोकलुनी ॥ ८१ ॥ मग मोकलिलें जेथ जाईल । तेथूनि नियमूचि घेउनि येईल । ऐसेनि स्थैर्यचि होईल । सावियाचि कीं ॥ ८२ ॥

प्रशान्तमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् । उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥

पाठीं केतुलेनि एके वेळे । तया स्थैर्याचेनि मेळें । आत्मस्वरूपाजवळें । येईल सहजें ॥ ८३ ॥ तयातें देखोनि आंगा घडेल । तेथ अद्वैतीं द्वैत बुडेल । आणि ऐक्यतेजें उघडेल । त्रैलोक्य हें ॥ ८४ ॥ आकाशीं दिसे दुसरें । तें अभ्र जैं विरे । तैं गगनचि कां भरे । विश्व जैसें ॥ ८५ ॥ तैसें चित्त लया जाये । आणि चैतन्यचि आघवें होये । ऐसी प्राप्ति सुखोपायें । आहे येणें ॥ ८६ ॥

युञ्जन्नेवं सदाऽऽत्मानं योगी विगतकल्मषः । सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यन्तं सुखमश्नुते ॥ २८ ॥

या सोपिया योगस्थिती । उकलु देखिला गा बहुतीं । संकल्पाचिया संपत्ती । रुसोनियां ॥ ८७ ॥ तें सुखाचेनि सांगातें । आलें परब्रह्मा आंतौतें । तेथ लवण

ज्या ब्रह्मसुखाच्या गोडीनें संसाराच्या तोंडांत गुंतलेलें जे मन ते विषयवासनेची आठवणच ठेवीत नाहीं ७२. जे योगाचे सौभाग्य, संतोषाचें केवळ राज्य आणि ज्याच्याकरितां ज्ञानाची आवश्यकता ७३. तें ब्रह्मसुख अभ्यासाच्या योगानें मूर्तिमंत दिसूं लागतें आणि तें सुख पाहिले तर तो पाहाणाराहि स्वतः अंगानें सुखरूप होतो ७४.

**अन्वयार्थ—संकल्पप्रभवान्**-संकल्प हाच ज्यांचा प्रभव-उत्पत्तिकारण आहे अशा-**सर्वान् कामान्**-सर्व कामांना-**अशेषतः**-समूळ कांहीं बाकी न ठेवतां-**त्यक्त्वा**-टाकून-**मनसा एव**-विवेकयुक्त मनानेंच-**इंद्रियग्रामम्**-इंद्रियसमुदायास-**समंततः**-सर्व बाजूंनीं-**विनियम्य**-नियमित करून त्याचें सर्वतः नियमन करून २४.

तरीपण बाबा ! अर्जुना ! एका दृष्टीनें हा योग सोपा आहे; तो असा कीं, संकल्पाचे पुत्र जे कामक्रोधादिक, त्यांचा नाश करावा म्हणजे त्या संकल्पाला असा जेव्हां पुत्रशोक दाखवावा तेव्हांच तो साध्य होतो ! ७५. हा संकल्प जर विषय वासनारूप कामादिक लय पावलें असें ऐकेल व इंद्रियें नियमाच्या योग्य स्थितींत वागतात असें पाहील तर तो संकल्प छाती फुटून आपल्या जिवालाच मुकेल ७६. असें हें वैराग्य प्राप्तीने केल्यावर संकल्पाच्या खेपा संपतात, आणि धैर्याच्या मंदिरांत बुद्धि ही सुखानें वास करिते ७७.

**अन्वयार्थ—धृतिगृहीतया**-धैर्यानें युक्त अशा-**बुद्ध्या**-बुद्धीनें-**शनैः शनैः**-हळू हळू-**उपरमेत्**-उपरति करावी-**मनः**-मनाला-**आत्मसंस्थं कृत्वा**-आत्म्यामध्यें संस्थित करून-**किंचित् अपि न चिन्तयेत्**-कशाचेंहि चिंतन करूं नये-**मनः**-अंतःकरण-**चंचलं**-रागादि स्वभावदोषामुळें चंचल व म्हणूनच-**अस्थिरम्**-अस्थिर होऊन-**यतः यतः**-ज्या ज्या शब्दादि विषयांच्या निमित्तानें-**निश्चरति**-बाहेर निघतें-आत्म्यापासून दूर होतें-**ततः ततः** त्या त्या शब्दादि विषयांपासून-**एतत्** त्याला-**नियम्य**-नियमित करून-**आत्मनि एव**-आत्म्यामध्येंच **वशं**-वश-**नयेत्**-न्यावें, त्याला आत्मवश करावें २५-२६.

बुद्धिला धैर्याचा आश्रय मिळाला, म्हणजे मग ती मनाला हळू हळू ब्रह्मानुभवाच्या वाटेला लावून, त्याची ब्रह्मात्मैक्यस्वरूपीं सदाचीच स्थापना करिते ७८. याही एका मार्गानें ब्रह्मप्राप्ति होते, याचा विचार कर आणि हेंहि घडत नसल्यास याहीपेक्षां सुलभ असा दुसरा एक मार्ग सांगतों, तो ऐक. ७९. साधकानें आपण आपल्याकडून केलेल्या निश्चयापासून कधींहि ढळावयाचें नाहीं. असा एक जीवाभावापासून नियमच करावा ३८०. एवढ्या नियमानें जर चित्त स्थिर झालें, तर अनयासेंच काम झालें; ठीकच. नाहींतर त्या चित्ताला खुशाल मोकळे सोडून द्यावें ८१. मग तें मोकळें सोडले असतां जेथें जाईल तेथून तो नियमच त्याला परत घेऊन येईल. आणि अशा रीतीनें तें तत्काळ स्थिर होईल ८२.

**अन्वयार्थ — प्रशान्तमनसं**-ज्याचें मन अत्यंत शांत झालें आहे-**शांतरजसं**-ज्याच्यांतील मोहादि क्लेशरूप मल शांत झाले आहेत-**ब्रह्मभूतं**-ब्रह्म झालेल्या जीवन्मुक्त-**अकल्मषम्**-अधर्मादिरहित-**एनं योगिनं हि**-अशा या प्रसिद्ध योग्याला खरोखर-**उत्तमं सुखं**-निरतिशय सुख-**उपैति**-प्राप्त होतें २७.

नंतर अशा प्रकारें अनेक वेळां स्थिरतेस प्राप्त झाल्याने तें एखादेवेळीं सहजच आत्मस्वरूपाजवळ येईल; ८३. आणि त्या आत्मस्वरूपाला पाहून [ तें मन ] स्वतः तद्रूपहि होईल. मग अद्वैतस्वरूपामध्यें द्वैत पार बुडून जाईल, आणि हें त्रैलोक्य ऐक्याच्या तेजाने प्रकाशित होईल ८४. आकाशांत त्याहून वेगळीं दिसणारीं अभ्रें ज्या वेळेस नाहींतशीं होतात तेव्हां संपूर्ण विश्वांत सभराभरित एक शुद्ध आकाशच व्याप्त असल्याचे दिसते, ८५. त्याचप्रमाणें चित्त ब्रह्मात्मैक्यस्वरूपीं लयाला गेलें कीं संपूर्ण विश्व, चैतन्यरूपच होतें. या अत्यंत सुलभ, सुखकर उपायानें अशी [ एवढी मोठी अन्वयात्मक व्यापकानुभूतीची ] प्राप्ति होते ८६.

**अन्वयार्थ—एवं**-या क्रमानें-**सदा**-सर्वदा-**आत्मानं युञ्जन**-चित्ताला समाहित करणारा, त्यामुळें-**विगतकल्मषः**-ज्याचें पाप अगदीं नाहींसें झालें आहे असा-**योगी**-निर्विघ्नपणें योगाभ्यास करणारा पुरुष-**ब्रह्मसंस्पर्शं**-परब्रह्माशीं ज्यांचा निकट संबंध आहे, ब्रह्मस्वरूप-**अत्यन्तं**-निरतिशय-अन्तरहित-नित्य-**सुखं** - सुखाला-**सुखेन**-अनायासाने-**अश्नुते**-व्यापतो-अनुभवितो २८.

मनांतील संकल्पाच्या संपत्तीचा [ विषयवासनांचा ] त्याग करून या सोप्या योगस्थितीचा पुष्कळांनी अनुभवात्मक उलगडा पाहिला आहे ८७. ते त्या सुखाच्या संगतीनें परब्रह्मस्वरूपांत येऊन पोहोंचले. मीठ पाण्यांत

१ इच्छेची. २ आठवणच. ३ शोभा. ४ राज्य. ५ ज्ञान, ज्ञातेपणा. ६ मूर्तिमंत. ७ संकल्प. ८ लय पावलेलें. ९ स्थितींत. १० हृदय फुटून. ११ यात्रा. १२ धैर्याच्या १३ चुनेगच्ची महालांत. १४ आश्रय. १५ ब्रह्मानुभवाच्या.

जैसें जळातें । सांडूं नेणें ॥ ८८ ॥ तैसें होय तिये मेळीं । मग सामरस्याचिया राउळीं । महासुखाची दिवाळी । जगेंसि दिसे ॥ ८९ ॥ ऐसें आपुले पांयवरी । चालिजे आपुले पाठीवरी । हें पार्था नोगवे तरी । आन ऐकें ॥ ३९० ॥

सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि । ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ २९ ॥
यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति । तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३० ॥

तरी मी तंव सकळ देहीं । असे एथ विचारु नाहीं । आणि तैसेंचि माझ्या ठायीं । सकळ असे ॥ ९१ ॥ हें ऐसेंचि संचलें । परस्परें मिसळलें । बुद्धी घेपे एतुलें । होआवें गा ॥ ९२ ॥ एऱ्हवीं तरी अर्जुना । जो एंकवटलिया भावना । सर्वभूतीं अभिन्ना । मातें भजे ॥ ९३ ॥ भूतांचेनि अनेकपणें । अनेक नोहे अंतःकरणें । केवळ एकत्वाचि माझें जाणें । सर्वत्र जो ॥ ९४ ॥ मग तो एक हा मियां । बोलतां दिसतसे वायां । एऱ्हवीं न बोलिजे तरी धनंजया । तो मीचि आहें ॥ ९५ ॥ दीपा आणि प्रकाशा । एंकवंकीचा पाडु जैसा । तो माझ्या ठायीं तैसा । मी तयामाजीं ॥ ९६ ॥ जैसा उदकाचेनि आयुष्यें रसु । कां गगनाचेनि मानें अवकाशु । तैसा माझेनि रूपें रूपसु । पुरुषु तो गा ॥ ९७ ॥

सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः । सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥ ३१ ॥

जेणें ऐक्याचिये[1] दिठी । सर्वत्र मातेंचि किरीटी । देखिला जैसा पटीं[2] । तंतु एकु ॥९८॥ कां स्वरूपें तरी बहुतें आहाती । परी तैसीं[3] सोनीं बहुवें न होती । ऐसी ऐक्याचळाची स्थिती । केली जेणें ॥ ९९ ॥ नातरी वृक्षांचीं पानें जेतुलीं । तेतुलीं रोपें नाहीं लाविलीं । ऐसी अद्वैतदिवसें पाहली । रात्री जया ॥ ४०० ॥ तो पंचात्मकीं सांपडे । तरी मग सांग पां कैसेनि अडे ? । जो प्रतीतीचेनि पाडें । मजसीं तुके ॥ १ ॥ माझें व्यापकपण आघवें । गवसलें तयाचेनि अनुभवें । तरी न म्हणतां स्वभावें । व्यापकु जाहला ॥ २ ॥ आतां शरीरीं तरी आहे । परी शरीराचा तो नोहे । ऐसें बोलेंवरी होये । तें करूं काई ॥ ३ ॥

आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन । सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ ३२ ॥

म्हणौनि असो तें विशेषें । आपणपेंयासारिखें । जो चराचर देखे । अखंडित ॥ ४ ॥ सुखदुःखादि वर्में । कां शुभाशुभें कर्में । दोनी ऐसीं मनोधर्में । नेणेचि जो ॥ ५ ॥ हें सम विषम भाव । आणिकही विचित्र जें सर्व । तें

मिळाल्यावर ज्याप्रमाणें पाण्याला सोडूं शकत नाहीं; ८८. त्याप्रमाणें, जीव आणि ब्रह्म यांचें ऐक्य झाल्यावर त्याची स्थिति होते आणि नंतर समरसतेच्या मंदिरांत महासुखाची दिवाळी, तो आपल्याप्रमाणें सर्व जगास झाली आहे असें पहातो ८९. अरे! आपलेच पाय आपल्या पाठीवर घेऊन चालण्याइतका अवघड हा योगमार्ग आहे, तो तुला घडत नसेल तर आणखी दुसरा उपाय सांगतों ऐक ३९०.

**अन्वयार्थ—योगयुक्तात्मा**-ज्याचें अंत-करण योगानें युक्त म्ह० समाहित आहे-**सर्वत्र समदर्शनः**-आणि ज्याचें ज्ञान सर्व भूतांमध्यें सम आहे; तो-**आत्मानं**-स्वात्म्याला - **सर्वभूतस्थं** - सर्व भूतांमध्यें स्थित - **च सर्वभूतानि**-व सर्व भूतांना **आत्मनि**-आत्म्यामध्यें स्थित-**ईक्षते**-पाहतो-**यः**-जो--**मां**-मला--**सर्वत्र**--सर्व भूतांमध्यें-**पश्यति**-पाहतो-**च** व-**सर्वं**-सर्व भूतवर्गास **मयि**-माझ्यामध्यें-**पश्यति**-पाहतो-**तस्य**-त्याला--**अहं**-मी-**न**-**प्रणश्यामि**-नाहींसा होत नाहीं-**च**-व-**सः**-तो-**मे**-मला-**न प्रणश्यति**-नाहींसा होत नाहीं, २९-३०.

मी सर्वांच्या देहांत आहे, यांत वाद नाहीं. आणि माझ्या ठिकाणीं हे सर्व आहे, याविषयींहि वाद नाहींच ९१. हे असेच बनलेलें आहे. तसेच जग व ईश्वर हीं एकमेकांत मिसळलीं आहेत, परंतु त्याप्रमाणें साधकांच्या बुद्धीनें, तसें पत्करलें पाहिजे एवढेंच ९२. अर्जुना! एऱ्हवीं तरी, जो एकत्वभावनेनें सर्व भूतांच्या ठिकाणीं मी साधारण व्यापक आहें असें जाणून मला भजतो ९३. व्यक्तिमात्राच्या अनेकत्वानें ज्याच्या अंतःकरणांत तत्त्वतः अनेकत्व उत्पन्न होत नाहीं, आणि जो केवळ सर्व ठिकाणीं मीच व्यापक आहे, असें एकत्वच जाणतो, ९४. तो आणि मी एकच हे खरे, पण तसें बोलणें व्यर्थ आहे. एऱ्हवीं धनंजया बोलून दाखविलें नाहीं, तरी त्याचें व माझें ऐक्य म्ह० एकच स्वरूप आहे ९५. ज्याप्रमाणे दिवा आणि त्याचा प्रकाश यांच्यांत एकत्व असतें. त्याप्रमाणें तो माझ्या ठिकाणीं व मी त्याच्या ठिकाणीं ऐक्यतेनें आहोंत ९६. जसें पाणी आणि त्याची गोडी किंवा आकाश आणि अवकाश म्ह० त्याची पोकळी यांचें स्वरूप असतें, तसा माझ्याच रूपानें तो योगी रूपवान् आहे ९७.

**अन्वयार्थ—एकत्वम् आस्थितः यः**-एकत्वास पूर्णपणें प्राप्त झालेला जो - **सर्वभूतस्थितं मां** - सर्व भूतांमध्यें स्थित असलेल्या मला-**भजति**-भजतो-**सः योगी**-तो योगी-**सर्वथा वर्तमानः अपि**-कोणत्याहि प्रकारें जरी वागत असला तरी-**मयि**-माझ्या ठिकाणीं-परमपदीं-**वर्तते**-राहतो ३१.

अर्जुना! ज्याप्रमाणें वस्त्रांत केवळ एक तंतूच असतात त्याचप्रमाणें ज्यानें ऐक्याच्या दृष्टीनें सर्व ठिकाणीं केवळ माझी व्याप्ति आहे, असें मला जाणलें ९८. किंवा अलंकाराचें आकार जरी पुष्कळ असले तरी सोनें जसें पुष्कळ प्रकारचें होत नाहीं, त्याचप्रमाणें ज्यानें जीव-ब्रह्मैक्य निश्चयाची पर्वताप्रमाणें अचल स्थिति बनविली आहे ९९. अथवा जितकीं झाडाचीं पानें आहेत तितकीं रोपें लाविलेलीं नाहींत, अशा अद्वैत-दिवसाच्या प्रकाशानें ज्याची अज्ञानरात्र उजाडली आहे ४००. तो पंचमहाभूतात्मक शरिरांत जरी असला तरी मग तो स्वस्वरूपास येण्याला देहतादात्म्यभ्रांतीनें कसा बरें प्रतिबंध पावेल? कारण, अनुभवाच्या दृष्टीनें तो माझ्याशीं तोलला जातो १. त्याच्या अनुभवानें माझें सर्वत्र असलेलें व्यापकपण कवटाळलें आहे, मग 'तो सर्व व्यापक झाला' असें म्हटलें नाहीं तरी तो स्वभावानें सहजच व्यापक आहे २. हें पहा, त्यानें जरी शरीर धारण केलें असले तरी त्याला देहतादात्म्य नसल्यामुळें तो शरीराचा नाहीं. अर्जुना! ही त्याची स्थिति शब्दानें बोलून दाखवितां येईल असें करितां येईल काय? ३.

**अन्वयार्थ—अर्जुन**-हे अर्जुना! **यः**-जो-**सर्वत्र**-सर्व ठिकाणीं-सर्व भूतांमध्यें-**आत्मौपम्येन**-आपल्या उपमेनें-**सुखं वा यदि वा दुःखं**-सुख किंवा दुःख-**समं** सम-**पश्यति**-पाहतो-**सः**-तो-**परमः योगी**-श्रेष्ठ योगी-**मतः**-मानलेला आहे ३२.

अर्थात् या विषयाबद्दल विशेष सांगणे नको. जो ज्ञानी सदोदित आपल्यासारखेंच, आत्मरूपानें सर्व चराचरात्मक जग पाहतो; ४. जो सुख आणि दुःख यांचें विकार अथवा शुभ व अशुभ कर्में हीं दोन आहेत असें आपल्या मनोवृत्तीनें समजतच नाहीं ५. हे समविषम पदार्थ आणि दुसरेही जे जे कांहीं चित्र विचित्र

१. ब्रह्मानंदाच्या मंदिरांत. २ उत्साह. ३ जगासह. ४ पायांनीं. ५ घडत नाहीं. ६ शंका. ७ एकत्व. भावनेनें. ८ ऐक्यतेचा. ९ योग्यता. १० गोडी. ११ पोकळी. १२ रूपवान. १३ ऐक्य दृष्टीनें. १४ वस्त्रांत. १५ आकार, अलंकार. १६ सुवर्ण. १७ ऐक्य-रूप पर्वताची. १८ उजाडली. १९ अज्ञानरूप रात्र. २० पंचभूतात्मक शरीरांत. २१ प्रतिबंध पावे. २२ अनुभवाच्या. २३ तोलला जातो. २४ सांपडलें. २५ शब्दानें सांगण्यासारखें.

मानी जैसे अवयव । आपुले होती ॥६॥ हें एकेक काय सांगावें । जया त्रैलोक्यचि आघवें । मी ऐसें स्वभावें । बोधा आलें ॥ ७ ॥ तयाही देह एकु कीर आथी । लौकिकीं[२] सुखदुःखी तयातें म्हणती । परी आम्हांतें ऐसी प्रतीती । परब्रह्मचि हा ॥ ८ ॥ म्हणौनि आपणँपां विश्व देखिजे । आणि आपण विश्व होईजे । ऐसें साम्यचि एक उपासिजे । पांडवा गा ॥९॥ हें तूतें बहुतीं प्रसंगीं । आम्ही म्हणों याचिलागीं । जे साम्यँापरौती जगीं । प्राप्ति नाहीं ॥ ४१० ॥

अर्जुन उवाच :—

योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन । एतस्याहं न पश्यामि चंचलत्वात्स्थितिं स्थिराम् ॥ ३३ ॥
चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद् दृढम् । तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥

तंव अर्जुन म्हणे देवा । तुम्ही सांगा कीर आमुचिया[१] कणवा । परी ने पुरों जी स्वभावा । मनाचिया ॥ ११ ॥ हें मन कैसें केवढें । ऐसें पाहों म्हणों तरी न सांपडे । एऱ्हवीं राहाटावया थोडें । त्रैलोक्य यया ॥ ॥ १२ ॥ म्हणौनि ऐसें कैसें घडेल । जे मर्कट समाधी येईल । कां राहा म्हणितलिया राहेल । महावातु ? ॥ १३ ॥ जें बुद्धीतें सळी । निश्चयातें टाळी । धैर्येंसीं हातफळी । मिळऊनि जाय ॥१४॥ जें विवेकातें भुलवी । संतोषासी चाड लावी । बैसिजे तरी हिंडवी । दाही दिशा ॥ १५ ॥ जें निरोधलें घे[१२] उवावो । जया संयँमुचि होय सावावो । तें मन आपुला स्वभावो । सांडील काई ? ॥ १६ ॥ म्हणौनि मन एक निश्चळ राहेल । मग आम्हांसि साम्य होईल । हें विशेषेंही न घडेल । याचिलागीं ॥ १७ ॥

श्रीभगवानुवाच :—

असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् । अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥

तंव कृष्ण म्हणती साचचि । बोलत आहासि तें तैसेंचि । यया मनाचा कीर चपळचि । स्वभावो गा ॥ १८ ॥ परि वैराग्याचेनि आधारें । जरी लाविलें अभ्यासाचिये मोहरें[१६] । तरी केतुलेनि एके अवसरें । स्थिरावेल ॥ १९ ॥ कां जें यया मनाचें एक निकें । जें देखिलें गोडीचिया ठाया सोकें[१] । म्हणौनि अनुभवसुखचि कवतिकें । दावीत जाइजे ॥ ४२० ॥

असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः । वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥ ३६ ॥

एऱ्हवीं विरक्ति जयांसि नाहीं । जे अभ्यासीं न रिघती कहीं । तयां नौकळे

वस्तु आहेत त्या सर्व आपले अवयवच आहेत, असें तो मानतो ६. हे वेगवेगळे काय सांगावे ! ज्याला सर्व त्रैलोक्यच मी आहें, असें अनुभवानें सहजच समजलें आहे, ७. त्यालाहि एक शरीर आहे हे खरें, आणि तो सुखदुःखे भोगतो असें लोक व्यवहारांत म्हणतात. तरीपण आम्हाला तर अशीच अनुभूति आहे की, तो परब्रह्मच आहे ८. म्हणून हे अर्जुना ! आपल्याच ठिकाणीं सर्व विश्व पाहावे आणि आपण स्वतःच विश्वरूप व्हावे, अशा त्या एका समदृष्टीचीच तूं उपासना कर ९. 'तूं समदृष्टि संपन्न हो' असें आम्ही याच कारणाकरितां तुला पुष्कळ प्रसंगीं सांगितलें. कारण, समदृष्टीपेक्षां या जगांत दुसरा अधिक 'लाभ' नाहीं ४१०.

**अन्वयार्थ**—**मधुसूदन**–हे मधुसूदना ! **त्वया**–तूं–**यः अयं योगः**–जो हा योग–**साम्येन**–समत्वानें–**प्रोक्तः**–सांगितलास–**एतस्य**–या योगाची–**स्थिरां स्थितिम्**–अचल स्थिति–**चंचलत्वात्**–मनाच्या चंचलपणामुळें–**अहं**–मी–**न पश्यामि**–पाहात नाहीं–**कृष्ण**–[ कारण ]–**हे** कृष्णा ! **मनः चंचलं**–मन चंचल–**प्रमाथि**–शरीर व इंद्रियें यांना परवश–व्याकुळ करणारें,–**बलवत्**–अतिशय दुर्निवार व **दृढम्**–अच्छेद्य आहे–**हि**–हें प्रसिद्ध आहे–**अहं**–मीं–**तस्य**–त्याचा–**निग्रहं**–निग्रह **वायोः इव**–वायूच्या निग्रहाप्रमाणें–**सुदुष्करम्**–अति दुष्कर–**मन्ये**–समजतों. ३३–३४.

मग अर्जुन म्हणाला, "देवा ! तुम्ही आमच्या विषयींच्या करुणेने हा समतेचा मार्ग सांगितला खरा, परंतु मनाच्या चंचल स्वभावामुळें आमचा टिकाव लागत नाहीं. ११. हें मन कसें आणि केवढें आहे, असें पाहूं म्हटलें तर तें मुळीहि सांपडत नाहीं. एऱ्हवीं या मनाला फिरण्याला त्रैलोक्यहि अपुरेंच पडते १२. म्हणून हे असें कसें होईल कीं, माकडाला समाधि लागेल किंवा मोठा सोसाट्याचा वारा 'स्थिर हो' म्हणतांच तो थांबेल काय ? १३. जें मन बुद्धीला छळते, तिचा केलेला निश्चय सिद्धीस जाऊ देत नाही आणि धैर्याचे हातावर हात मारून हां हां म्हणतां पळून जातें १४. जें विचाराला भ्रमांत पाडते, संतोषाला आशा लावतें आणि आपण एके ठिकाणीं बसून राहिलो, तरी आपल्याला दाही दिशांना हिंडवितें १५. ज्याला कोंडलें असतां तें उसळून बाहेर येतें, आणि निग्रह करूं गेलो तर उलटा तो निग्रहच त्याला साह्य करितो, असें हें मन आपला स्वभाव टाकील काय ? १६ म्हणून एक मन जर स्थिर राहील, तर मग आम्हांस साम्यावस्था प्राप्त होईल, परंतु मनाची अशीच चंचल वृत्ति असल्यामुळें बहुतेक ती साम्यावस्था प्राप्त होणें दुर्घट आहे" १७.

**अन्वयार्थ**—**महाबाहो**–हे अर्जुना ! **मनः**–मन–**दुर्निग्रहं**–निग्रह करता येण्याजोगें नाहीं व–**चलं**–चंचल आहे; यांत–**असंशयं**–कांहीं संशय नाहीं–**तु कौन्तेय**–पण हे कुंतीपुत्रा ! **अभ्यासेन**–अभ्यासानें–**च**–व–**वैराग्येण**–वैराग्यानें–**गृह्यते**–त्याचा निरोध केला जातो ३५.

तेव्हा श्रीकृष्ण म्हणतातः–तूं मनासंबंधाने जे बोललास, तें खरोखर तसेंच आहे. या मनाचा स्वभाव खरोखरी चंचलच आहे १८. परंतु याला वैराग्याच्या आधारानें अभ्यासाच्या रस्त्याला लावलें, तर कांहीं कालानें हे स्थिर होईल १९. कारण, या मनाच्या ठिकाणीं एक महत्त्वपूर्ण चांगला गुणहि आहे. तो म्हणजे त्या मनाला एकदा अनुभविलेल्या सुखाची गोडी लागली कीं त्याच ठिकाणीं राहावयास हे सवकते. म्हणून याला कौतुकानें आत्मानुभव सुखच दाखवीत जावे ४२०.

**अन्वयार्थ**—**असंयतात्मना**–ज्याचें चित्त अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें अनिरुद्ध असतें त्याच्याकडून–**योगः**–योग–**दुष्प्रापः**–मोठ्या कष्टानें संपादिला जातो–**इति**–अशी–**मे**–माझी–**मतिः**–मति आहे–**तु**–पण–**वश्यात्मना**–ज्यानें आपलें अंतःकरण अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें स्वाधीन करून घेतलें आहे व–**यतता**–आणखी जो यत्न करीत आहे, त्याच्याकडून–**उपायतः**–पूर्वोक्त उपायानें योग–**अवाप्तुं शक्यः**–संपादन करणें शक्य आहे २६.

एऱ्हवीं ज्याला वैराग्य नाहीं, व जो कधींच अभ्यास

---

१ अनुभवाला. २ लोकव्यवहारांत. ३ आपल्या ठिकाणीं. ४ समदृष्टि पलीकडे. ५ मनांत आमची दया आणून. ६ पुरें पडणार नाहीं. ७ व्यवहार करण्यास, फिरण्यास. ८ मोठा वारा. ९ छळी. १० हां हां म्हणतां तुरी देऊन. ११ इच्छा, नाद, आवड. १२ उसळी घेते. १३ निग्रह. १४ साहाय्य. १५ स्थिर. १६ रस्त्याला. १७ अवकाशानें. १८ ठिकाणास. १९ चटक लागून राहते. २० आत्मसुख. २१ कौतुकानें. २२ आकळलें जात नाहीं.

हें आम्हीही । नें मनूं कोंयी ॥ २१ ॥ परि यमनियमांचिया वाटा न वचिजे । कहीं वैराग्याचि से न करिजे । केवळ विषयजळीं ठाकिजे । बुडी देउनी ॥ २२ ॥ येंया जेंालिया मानसा कहीं । युक्तीची कोंबी लागली नाहीं । तरी निश्चळ होईल काई । कैसेनि सांगें ? ॥ २३ ॥ म्हणौनि मनाचा निग्रहो होये । ऐसा उपाय जो आहे । तो आंरभीं मग नोहे । कैसा पाहों ॥ २४ ॥ तरी योगसाधन जितुकें । तें अवघेंचि काय लटिकें ? । परि आपणयां अभ्यासूं न ठाके । हेंचि म्हण ॥ २५ ॥ आंगीं योगाचें होय बळ । तरी मन केतुलें चपळ ? । काय महदादि हें सकळ । आपुं नोहे ? ॥ २६ ॥ तेथ अर्जुन म्हणे निकें । देवो बोलती तें न चुके । साचचि योगेंबळेंसीं न[१२] तुके । मनोबळ ॥ २७ ॥ तरी तोचि योगु कैसा केवीं जाणों । आम्ही येतुले दिवस याची मौतुही नेणों । म्हणौनि मनातें जी म्हणों । अनोंवर ॥ २८ ॥ हा आतां अघवेयां जन्मा । तुझेनि प्रसादें पुरुषोत्तमा । योगपरिचयो आम्हां । जाहला आजी ॥ २९ ॥

अर्जुन उवाच :–

अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः । अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥ ३७ ॥

कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति । अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ३८ ॥

एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः । त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ॥ ३९ ॥

परि आणिक एक गोसांवियां । मज संशयो असे सावियां । तो तूं वांचूनि फेडावया । समर्थु नाहीं ॥ ४३० ॥ म्हणौनि सांगें गोविंदा । कवण एकु मोक्षपदा । झोंबत होता श्रद्धा । उपायेंविण ॥ ३१ ॥ इंद्रियग्रामोनि निघाला । आस्थेचिया वाटे लागला । आत्मसिद्धीचिया पुढिला । नगरा यावया ॥ ३२ ॥ तंव आत्मासिद्धि नें ठकेचि । आणि मागुतें[१३] न येववेचि । ऐसा अस्तु गेला माझारींचि । आयुष्यभानु ॥ ३३ ॥ जैसें अकाळीं आभाळ । अळुमाळुं[१४] सपातळ । विपायें आलें केवळ । वसे ना वर्षे ॥ ३४ ॥ तैसीं दोन्ही दुरावलीं । जे प्राप्ती तंव अलेंग ठेली । आणि अप्राप्तीही सांडवली । श्रद्धा तया ॥ ३५ ॥ ऐसा दोंलां अंतरला कां जी । जो श्रद्धेच्या समाजीं । बुडाला तया हो जी । कवण गति ? ॥ ३६ ॥

श्रीभगवानुवाच :—

पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते । न हि कल्याणकृत्कश्चिद् दुर्गतिं तात गच्छति ॥ ४० ॥

करण्याकडे प्रवृत्त होत नाहीं, त्याला हें मन आवरणार नाहीं, असें आम्हीहि मानीत नाहीं काय? २१. परंतु जो यम, नियम, प्राणायाम वगैरेंचा अभ्यास करण्याच्या मार्गाला गेला नाहीं, जो वैराग्याची कधीं नुसती आठवणहि करीत नाहीं. आणि जो केवळ विषयरूप जलांत माशासारखी बुडी देऊन राहिला आहे २२. आणि अशा प्रकारें विषयलंपट झालेल्या त्याच्या मनाला साऱ्या जन्मांत कधीं युक्तीची चिमट लागलीच नाहीं, त्याचें मन निश्चल कसें काय होईल? सांग बरें २३. म्हणून मनाचा निग्रह होईल असा जो उपाय आहे, तो करण्याला तूं आरंभ कर. मग तो मनोनिग्रह कसा होत नाहीं, तें पाहूं तर खरे! २४. अरे! वेदांत योगसाधनें म्हणून जेवढीं सांगितली आहेत तेवढी सर्व खोटीं आहेत काय? परंतु आपल्याला अभ्यास होत नाहीं असें म्हण २५. अरे! जर योगसाधनेचें बळ अंगांत असलें तर त्यापुढें मन चंचल ते किती आहे! योगबळानें हे महत्तत्त्वादिक सर्व आपल्या स्वाधीन होणार नाहींत का? २६. तेव्हां अर्जुन म्हणतो, ठीक आहे! "देवा आपण जें म्हणतां तें मुळीच चुकीचे नाही. खरोखर योगबलाशी मनाच्या बलाची तुलना करता येणार नाही २७. तरी तोच योग कसा आहे व तो कशा रीतीनें जाणावा! याची आजवर आम्हांस वार्ताहि नव्हती. म्हणून देवा! मन अनावर आहे असेंच आम्ही म्हणत होतों २८. हे पुरुषोत्तमा! तुमच्या प्रसादानें आमच्या या साऱ्या जन्मांत हा आजच योगाचा परिचय आम्हांस झाला!" २९.

**अन्वयार्थ**--**कृष्ण**-हे कृष्णा! **अयतिः**-प्रयत्न न करणारा-**श्रद्धया उपेतः**-योगमार्गाविषयींच्या श्रद्धेनें युक्त आहे, पण-**योगात् चलितमानसः**- अंतकालीं योगापासून ज्याचें मन चलित झालें आहे, ज्याला योगाचें विस्मरण झालें आहे, तो-**योगसंसिद्धिं**-योगाच्या फलाला-**अप्राप्य**-प्राप्त न होऊन-**कां गतिं**-कोणत्या गतीस-**गच्छति**-प्राप्त होतो?-**हे महाबाहो**!-हे महापराक्रमी कृष्णा!-**उभयविभ्रष्टः**-कर्ममार्ग व योगमार्ग या दोन्ही मार्गापासून विभ्रष्ट झालेला-भ्रंश पावलेला, त्यामुळें-**अप्रतिष्ठः**-निराधार झालेला-**ब्रह्मणः पथि**-ब्रह्मप्राप्तीच्या मार्गांत-**विमूढः**-अत्यंत मूढ झालेला तो-**छिन्नाभ्रम् इव**-आपल्या आधारापासून तुटून निराळ्या झालेल्या अभ्राप्रमाणें-**न नश्यति कच्चित्**-नाश तर पावत नाहींना? **कृष्ण**-कारण हे कृष्णा! **मे एतं संशयं**-माझ्या या संशयास-**अशेषतः**-पूर्णपणें - **छेत्तुं** - तोडण्यास - संशय घालविण्यास-**अर्हसि**-तूं योग्य आहेस-**अस्य संशयस्य छेत्ता**-या संशयाचा छेद करणारा-**त्वत् अन्यः**-तुजवांचून दुसरा कोणी-**न हि उपपद्यते**-संभवत नाहीं. ३७-३८-३९.

"परंतु, हे प्रभो! आणखी एक संशय सहज उत्पन्न झाला आहे. तो फेडण्यास तुझ्या विना दुसरा कोणीहि समर्थ नाहीं ४३०. म्हणून गोविंदा मला सांगा कीं, कोणी एक मनुष्य मोक्षप्राप्तीकरितां श्रद्धा भक्तियुक्त अंतःकरणानें, तीव्र प्रयत्नाशिवाय इच्छा करीत होता; ३१. इंद्रियरूपी गांवाहून निघाला व आत्मसिद्धिरूपी पुढच्या गांवास जाण्याकरितां तो भक्तिरूप मार्गाला लागला ३२. तो त्यास प्रसंग असा आला कीं; आत्मसिद्धिहि प्राप्त झाली नाहीं आणि संसारांतहि परत येववत नाहीं, अशा स्थितींत त्याचा आयुष्यरूपी सूर्य मध्येंच मावळला; ३३. कदाचित् सहज अकालीं आलेले लहान पातळ अगदी थोडेसे ढग ज्याप्रमाणें टिकत नाहींत व वृष्टीहि करीत नाहींत ३४. त्याप्रमाणें महाराज! ज्याला दोन्हीं अंतरलीं, म्हणजे आत्मसिद्धिरूप मोक्षप्राप्ति तर दूरच राहिली आणि आत्मसिद्धीच्या श्रद्धेमुळें सोडलेल्या संसारासहि तो मुकला ३५. असा दोन्हीं गोष्टींना जो मुकला; परंतु आत्मसिद्धीच्या भक्तींत निमग्न असतांना मेला त्याला कोणती गति प्राप्त होते! हें सांगा." ३६.

**अन्वयार्थ**--**हे पार्थ**!-हे अर्जुना!-**तस्य**-त्याचा-**विनाशः**-विनाश-**इह**-या लोकीं-**न एव**-नाहींच व-**अमुत्र**-परलोकींहि-**न विद्यते**-होत नाहीं-**हि**-कारण-**हे तात**!-अरे बाबा!-**कश्चित्**-कोणीहि-**कल्याणकृत्**-शुभाचरण करणारा-**दुर्गतिं**-दुर्गतीला - **न गच्छति**-जात नाहींच ४०.

---

१ मानीत नाहीं. २ कां? ३ जावें. ४ विषयलंपट. ५ जन्मादारभ्य. ६ चिमट. ७ प्रतिबंध. ८ आरंभ कर. ९ महत्तत्त्वादि. १० प्राप्त. ११ योगसामर्थ्याशीं. १२ बरोबरी पावत नाहीं. १३ गोष्टहि. १४ अजिंक्य. १५साऱ्या जन्मांत. १६ हे स्वामी. १७ साहजिक. १८ विश्वासानें. १९ इंद्रियांच्या गांवाहून. २० मार्गाला. २१ प्राप्त झाली नाहीं. २२ माघारे. २३ मावळला. २४ मध्येंच. २५ किंचित्. २६ सहज. २७ आनंदप्राप्ती. २८ दूर. २९ दोहींला.

तंव कृष्ण म्हणती पार्था । जया मोक्षसुखीं आस्था । तया मोक्षावांचूनि अन्यथा । गती आहे गा ? ॥ ३७ ॥ परि ऐतुलें हेंचि एक घडे । जें माझारीं विसवांवें पडे । तेंहि परी ऐसेनि सुरवाडें । जो देवां नाहीं ॥ ३८ ॥ एऱ्हवीं अभ्यासाचा उचलता । पाउलीं जरीं चालता । तरी दिवसाआधीं ठाकिता । सोऽहंसिद्धीतें ॥ ३९ ॥ परि तेतुला वेगु नव्हेचि । म्हणौनि विसांवा तरी निकाचि । पाठीं मोक्षु तंव तैसाचि । ठेविला असे ॥ ४४० ॥

प्राप्य पुण्यकृतां लोकानुषित्वा शाश्वतीः समाः । शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥

ऐकें कवतिक हें कैसें । जें शतमखा लोक सायासें । तें तो पावे आनायासें । कैवल्यकामु ॥ ४१ ॥ मग तेथिंचे जे अमोघ । अलौकिक भोग । भोगितांही सांग । कांटाळे मन ॥ ४२ ॥ हा अंतरायो अवचितां । कां वोढवला भगवंता ? । ऐसा दिविभोग भोगितां । अनुतापी नित्य ॥ ४३ ॥ पाठीं जन्मे संसारीं । परि सकळ धर्मांचिया मोहरीं । लांबा उगवे आगरीं । विभवश्रियेचा ॥ ४४ ॥ जयातें नीतिपंथें चालिजे । सत्यधूत बोलिजे । देखावें तें देखिजे । शास्त्रदृष्टीं ॥ ४५ ॥ वेद तो जागेश्वरू । जया व्यवसाय निजाचारु । सारासार विचारु । मंत्री जया ॥ ४६ ॥ जयाच्या कुळीं चिंता । जाली ईश्वराची पतिव्रता । जयातें गृहदेवता । आदि ॠद्धि ॥ ४७ ॥ ऐसी निजपुण्याची जोडी । वाढिन्नली सर्वसुखाची कुळवाडी । तिये जन्मे तो सुरवाडी । योगच्युतु ॥ ४८ ॥

अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् । एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥ ४२ ॥
तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् । यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनन्दन ॥ ४३ ॥

अथवा ज्ञानाग्निहोत्री । जे परब्रह्मण्यश्रोत्री । महासुखक्षेत्रीं । आदिवंत ॥४९॥ जे सिद्धांताचिया सिंहासनीं । राज्य करिती त्रिभुवनीं । जे कूजती कोकिल वनीं । संतोषाच्या ॥ ४५० ॥ जे विवेकद्रुमाचे मुळीं । बैसले आहाति नित्य फळीं । तया योगियांचिया कुळीं । जन्म पावे ॥ ५१ ॥ मोटकी देहाकृति उमटे । आणि निजज्ञानाची पाहांट फुटे । सूर्यापुढें प्रगटे । प्रकाशु जैसा ॥ ५२ ॥ तैसी दशेची वाट न पाहतां । वयसेचिया गांवा न येतां । बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें ॥ ५३ ॥ तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें । मनाचि सारस्वतें दुभे । मग सकळ शास्त्रें

तेव्हां श्रीकृष्ण म्हणतातः–पार्था ज्याला मोक्षप्राप्तीची तीव्र इच्छा आहे, त्याला मोक्षावांचून दुसरी गति आहे काय ! ३७. परंतु एवढेंच एक होते कीं, त्याला मध्यंतरी विश्रांति घ्यावी लागते. पण त्या विश्रांतींत त्याला असें सुख होतें कीं तें देवांनाहि मिळत नाहीं ! ३८. एऱ्हवीं, जर ह्यानें अभ्यासाचीं पावलें जोरानें टाकिलीं असतीं म्हणजे झपाट्यानें अभ्यास केला असता तर आयुष्य भानु मावळण्याच्या पूर्वींच हा मोक्षप्राप्तीच्या गांवाला पोहोंचला असता ! ३९. परंतु तितका अभ्यासाचा वेग नसल्यामुळें तो विसांवा घेणें तरी योग्यच आहे. शिवाय मागाहून तरी मोक्षप्राप्ती ही ठेविलेलीच आहे ४४०.

**अन्वयार्थ**—**योगभ्रष्टः**–योगमार्गापासून भ्रष्ट झालेला संन्यासी–**पुण्यकृतान्**–पुण्याचरण करणाऱ्या लोकांच्या–**लोकान्**–लोकांस–**प्राप्य**–प्राप्त होऊन–**शाश्वतीः समाः**–हजारों वर्षें–**उषित्वा**–त्या लोकीं राहून–**शुचीनां श्रीमतां गेहे**–शास्त्रोक्त आचरण करणाऱ्या श्रीमंतांच्या घरीं–**अभिजायते**–उत्पन्न होतो ४१.

ऐक, हें कौतुक तरी कसे आहे ते ! ज्या लोकांची जी स्थिति प्राप्त व्हावयास शंभर यज्ञ करणाऱ्या इंद्रालाहि सायास पडतात, ती या मोक्षेच्छु पुरुषाला अनायासें प्राप्त होतो ४१. मग तेथील निष्फळ न होणारे व अप्रतिम असे भोग भोगतां भोगतां त्याच्या मनाला कंटाळा येतो ! ४२. म्हणूनच स्वर्गांत ते दिव्य भोग भोगीत असतां 'हे भगवंता, हें भोगाचें विघ्न आमच्यावर कां कोसळलें ?' असा तो निरंतर पश्चात्ताप करीत असतो ४३. नंतर तो फिरून मृत्युलोकीं जन्म पावतो, पण सर्व धर्मांचें माहेरघर अशा कुळांत जन्म पावतो, आणि शेत कापल्यावर पडलेल्या भातगोट्यांचें शेत जसें जोरानें फोफावतें तशी त्याच्या ऐश्वर्याची वृद्धि होते ४४. जें कुल नीतिमार्गानें चालणारें, सत्य आणि पवित्र भाषण करणारें आणि पहावयाचे ते शास्त्र दृष्टीनें पाहणारे व वागणारें, ४५. ज्या कुळांत वेद हे नित्य जागृत दैवत म्हणून असतो व स्वधर्माचें आचरण हा ज्याच्या कुलाचा व्यवसाय आहे आणि सारासार विचार हाच सल्ला मसलत देणारा मंत्री आहे ४६. ज्या कुळांत चिंता ईश्वराचीच एकनिष्ठ पत्नि आहे [ ज्या कुळांत सर्व व्यक्तींना ईश्वरावांचून दुसऱ्या कशाचेंहि चिंतन होत नाहीं ] आणि ज्याला आदिऋद्धि [ संपत्ति ] हीच गृहदेवता आहे ४७. असें ज्या कुलानें पुण्य जोडलें आहे व जेथें सर्व सुखाचा व्यापार समृद्ध झाला आहे अशा कुळांत तो योगभ्रष्ट पुरुष सुखानें जन्म घेतो ४८.

**अन्वयार्थ**—**अथवा**–किंवा तो योगभ्रष्ट–**धीमतां–योगिनाम् एव कुले**–बुद्धिमान् दारिद्र्यांच्याच कुळांत–**भवति**–उत्पन्न होतो–**लोके हि**–या लोकीं–**यत् ईदृशं जन्म**–जें हें अशा प्रकारचे जन्मदरिद्री योग्यांच्या घरीं झालेलें जन्म–**एतत्**–तें **दुर्लभतरम्**–अतिशय दुर्लभ आहे ४२.–**तत्र**–त्या दरिद्री योग्यांच्या कुळांत **तं**–त्या **पौर्वदेहिकं**–पूर्वदेहांतील–**बुद्धिसंयोगं**–बुद्धियोगास **लभते**–तो योगभ्रष्ट प्राप्त होतो–**च कुरुनंदन**–आणि हे कुरुनंदना ! **संसिद्धौ**–योगसिद्धीसाठीं–**ततः**–पूर्वजन्मांतील अभ्यासाच्या संस्कारामुळें, किंवा त्याहून–**भूयः**–अधिकच–**यतते**–यत्न करतो ४३.

अथवा ज्ञानरूप अग्नीमध्यें हवन करणारे व जे परब्रह्मानुभूति संपन्न व वेदसंपन्न आहेत, आणि परब्रह्मसुखरूप गांवचे वतनदार आहेत ४९. जें 'एकमेवाद्वितीयं' या सिद्धांताच्या सिंहासनावर बसून त्रिभुवनाचें राज्य करतात आणि संतोषरूप वनांत मधुर ध्वनि करणारे कोकिळ आहेत ४५०. आणि जे विचारवृक्षाच्या मुळापाशीं बसून ब्रह्मरूप नित्य फळाचें सेवन करतात, अशा योग्यांच्या कुळांत त्या योगभ्रष्ट पुरुषास जन्म मिळतो ५१. तेथें जन्म घेतल्यावर लहान वयांतच त्याच्या ठिकाणीं आत्मज्ञानाची पहाट होते. ज्याप्रमाणें सूर्य उगवण्याच्या अगोदर चहूंकडे अरुणोदयाची प्रभा फांकते ५२. त्याप्रमाणें योग्य अवस्थेची वाट न पाहता प्रौढ वयरूपी गांवाला न येतां ज्ञान हें त्याला बालपणींच [ सर्वज्ञता ] वरतें; ५३. पूर्वजन्मीं सिद्ध झालेल्या बुद्धीच्या साह्यानें सर्व विद्यांना त्याचे मनच प्रसवतें व त्याच्या मुखांतून सर्व शास्त्रें स्वयमेव निघूं लागतात ५४. असें जें उत्तम कुळीं जन्म तें प्राप्त होण्याकरितां स्वर्गवासी देव देखील मनांत हेतु धरून नेहमीं जप होम करीत असतात. [ म्ह० उत्कट इच्छा करतात असा अभिप्राय ] ५५. पार्था ! देवानीं स्तुतिपाठक होऊन मृत्युलोकाचें अर्थात् या मृत्युलोकांतील ज्या ज्ञानसंपन्न योगी कुलाचे वर्णन करावें असें जें उत्तम कुल तेथें तो योगभ्रष्ट पुरुष जन्म पावतो ५६.

---

१ विश्रांति घ्यावी लागते. २ सुखानें. ३ विसांवा. ४ इंद्राला. ५ मोक्ष इच्छिणारा. ६ निष्फळ न होणारे ७ अप्रतिम. ८ प्राप्त झाला. ९ स्वर्गींचे भोग. १० पश्चात्तापी. ११ फिरून. १२ विश्रांतिस्थानीं. १३ ऐश्वर्याचा. १४ पवित्र. १५ जागती ज्योत, आराध्यदैवत. १६ व्यवहार. १७ स्वधर्म. १८ संपत्ति. १९ उदीम, व्यापार. २० मुखांत. २१ योगभ्रष्ट.

स्वयंभे । निघती मुखें ॥ ५४ ॥ ऐसें जे जन्म । जयालागीं देव सकाम । स्वर्गी ठेले[२] जप होम । करिती सदा ॥ ५५ ॥ अमरीं भाट होईजे । मग मृत्युलोकातें वानिजे । ऐसें जन्म पार्था गा जे । तें तो पावे ॥ ५६ ॥

पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः । जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४ ॥

आणि मागील जे सद्‌बुद्धि । जेथ जीवित्वा जाहाली होती अवधि । मग तेचि पुढती निरवधि । नवी लाहे ॥ ५७ ॥ तेथ सदैवां आणि पायाळां । वरि दिव्यांजन होय डोळां । मग देखे जैसी अवलीळा । पाताळधनें ॥ ५८ ॥ तैसें दुर्भेद जे अभिप्राय । कां गुरुगम्यें हन ठाय । तेथ सौरसेंवीण जाय । बुद्धि तयाची ॥ ५९ ॥ बळियें इंद्रियें येती[१३] मना । मन एकवटे पवना । पवन सहजें गगना । मिळोंचि लागे ॥ ४६० ॥ ऐसें नेणों काय अपैसें । तयातेंचि कीजे अभ्यासें । समाधि घर पुसे । मानसाचें ॥ ६१ ॥ जाणिजे योगपीठीचा भैरवु । काय हा आरंभरंभेचा गौरवु । कीं वैराग्यसिद्धीचा अनुभवु । रूपा आला ॥ ६२ ॥ हा संसारु उंमाणितें माप । कां अष्टांगसामग्रीचें द्वीप । जैसें परिमळेंचि धरिजे रूप । चंदनाचें ॥ ६३ ॥ तैसा संतोषाचा काय घडिला । कीं सिद्धिभांडारींहूनि काढिला । दिसे तेणें मानें रूढला । साधकदेशे ॥ ६४ ॥

प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः । अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ४५ ॥

जे वर्षशतांचिया कोडी । जन्मसहस्रांचिया औंडी । लंघितां पातला थडी । आत्मसिद्धीची ॥ ६५ ॥ म्हणौनि साधनजातें आघवें । अनुसरे तया स्वभावें । मग औयतिये बैसे रांणिवे । विवेकाचिये ॥ ६६ ॥ पाठीं विचारितयां वेगां । तो विवेकुही ठाके मागां । मग अविचारणीय तें आंगा । घडोनि जाय ॥ ६७ ॥ तेथ मनाचें मेहुडें[३०] विरे[३१] । पवनाचें पवनपण सरे । आपणपां आपण मुरे[३२] । आकाशही ॥ ६८ ॥ प्रणवाचा माथा बुडे । येतुलेनि अनिर्वाच्यें सुख जोडे । म्हणौनि आधींचि बोलू बहुडे । तयालागीं ॥ ६९ ॥ ऐसी ब्रह्मींची स्थिती । जे सकळां गतींसी गती । तया अमूर्ताची मूर्ति । होऊनि ठाके ॥ ४७० ॥ तेणें बहुतीं जन्मीं मागिलीं । विक्षेपांचीं पाणिवळें झाडिलीं । म्हणौनि उपजत-खेंवो बुडाली । लग्नघटिका ॥ ७१ ॥ आणि तद्रूपतेसीं लग्न । लागोनि ठेलें

**अन्वयार्थ**—हि–कारण–**तेन एव पूर्वाभ्यासेन**–त्याच पूर्वजन्मीं केलेल्या अभ्यासानें–**अवशः अपि सः**–तो अवश असलेलाहि योगभ्रष्ट–**ह्रियते**–हरण केला जातो–**योगस्य जिज्ञासुः अपि**–योगांचें स्वरूप जाणण्याची इच्छा करणाराहि–**शब्दब्रह्म**–शब्दब्रह्मार्चे–वेदोक्त कर्मानुष्ठान–फलांचें–**अतिवर्तते**–उल्लंघन करून जातो ४४.

आणि मागे ज्या सद्‌बुद्धीच्या उत्कर्षांत आयुष्याचा शेवट झाला होता, त्या वेळचीच सद्‌बुद्धि त्याला पुनः नित्यनवी प्राप्त होते ५७. त्या समयीं आधींच दैववान्, त्यांत पायाळू आणखी वर डोळ्यांत दिव्यांजन घातलेला पुरुष तो जसें भूमींतील धन सहज दृष्टीनें पाहतो ५८. त्याप्रमाणें गुरुमुखांतूनच कळणारे व ज्यांत बुद्धीचा प्रवेश होणें कठीण अशा अभिप्रायाच्या ठिकाणीं त्याची बुद्धि परिश्रमावांचून प्रवेश करते ५९. बलवान् इंद्रियें हीं आपण होऊन मनाच्या आधीन होतात, मन प्राणवायूंत ऐक्य पावतें व तो प्राणवायु चिदाकाशांत मिळत असतो ४६०. असे सहजच कसें काय होते कीं, योगाभ्यासहि त्याला आपोआपच प्राप्त होतो, हें कांहीं समजत नाहीं आणि समाधीहि त्याच्या मनाचें घर विचारीत येते ६१. [ योगभ्रष्ट पुरुष म्हणजे ] जगाला आरंभ करणारी जी रंभा म्हणजे पार्वती तिचा गौरव करणारा योगपीठींचा शंकरच कीं काय! किंवा वैराग्यरूप सिद्धीचा मूर्तिमंत अनुभवच प्रगट झाला आहे कीं काय! ६२. किंवा हें संसार-मोजण्याचें मापच अथवा अष्टांगयोगसाहित्याचें बेटच होय. सुगंधानेंच ज्याप्रमाणें चंदनाचें रूप धारण करावें ६३. त्याचप्रमाणें साधकदशेंत हा योगभ्रष्ट इतका धैर्ययुक्त झालेला असतो कीं, संतोषाचा केवळ पुतळाच बनविल्यासारखा किंवा सिद्धीच्या भांडारांतून काढल्यासारखा दिसतो ६४.

**अन्वयार्थ**—तु–आणि–**प्रयत्नात् यतमानः**–अधिक यत्न करणारा–**योगी**–विद्वान्–**संशुद्धकिल्बिषः**–ज्याचें पाप संशुद्ध अत्यंत शुद्ध झालें आहे असा होऊन–**अनेकजन्मसंसिद्धः**–[ **भवति** ]–अनेक जन्मांतील थोड्या थोड्या अभ्यासानें संसिद्ध होतो–**ततः**–नंतर योगसिद्धीमुळें तो–**परां गतिं**–मोक्ष नांवाच्या श्रेष्ठ गतीस–**याति**–प्राप्त होतो ४५.

कारण, कोट्यवधि शत वर्षांनीं हजारों जन्मांचे प्रतिबंध ओलांडून तो आत्मसिद्धीच्या किनाऱ्यावर येऊन पोहोंचलेला असतो ६५. म्हणून सर्व साधनें त्याच्यामागे आपोआपच येतात आणि मग सहजच तो विचाराच्या गादीवर बसतो ६६. नंतर फलकालीं विचार करण्यामध्यें प्रबल असा विवेकहि मागें राहतो, आणि विचाराच्या कवेंत न गवसणारे असें जे ब्रह्म, तें तो स्वतःच होतो ६७. त्या ठिकाणीं मनरूपी ढग नाहींतसे होतात, प्राणवायूचें चंचलत्वहि संपतें व आकाशहि आपण आपल्याच ठिकाणीं लीन होतें ६८. ॐकाराच्या अर्धबिंदूंत प्रणव नाहींसा होतो, अशा रीतीनें त्याला अवर्णनीय सुख प्राप्त होतें, म्हणून त्याविषयीं बोलणे अगोदरच बंद होतें ६९. मग सगळ्या गतींना गति देणारी जी ब्रह्मस्थिति, त्या निराकार ब्रह्मस्थितीचे हा स्वरूपच होऊन राहतो ४७०. त्यानें मागल्या अनेक जन्मांत, विक्षेपाचा प्रतिबंध हाच कोणी पाण्यावरील केरकचरा झाडून टाकलेला असतो, म्हणून त्याची लग्नघटका त्याचा जन्म होतांच क्षणीं बुडाली ७१. आणि

१ हेतु धरणारे. २ राहणारे. ३ स्तुतिपाठक. ४ आयुष्याला. ५ शेवट. ६ लगेच. ७ दैववानाला. ८ पायाळुला. ९ सहज, लीलेनें. १० कठीण. ११ गुरुपासूनच प्राप्त होणारें. १२ भटकल्यावांचून, अचूक. १३ वश होती. १४ योगस्थानावरचा. १५ अधिदेवता [ शंकर ]. १६ मोठेपणाचा, आरंभस्तंभींचा. १७ मोजणारें. १८ अष्टांगयोगसाहित्याचें. १९ बेट. २० सिद्धीच्या खजिन्यांतून. २१ वाढला, उत्पन्न झाला. २२ साधक असून सिद्धासारखा दिसतो. २३ कोटी. २४ प्रतिबंध. २५ सर्व साधनें. २६ तयार असलेला. २७ राज्यावर. २८ विचार करण्याला जो वेग त्यानें. २९ विचार जेथें पोंचत नाहीं असे ब्रह्म. ३० मेघ. ३१ लय पावतें. ३२ लीन होतो. ३३ ॐकाराचा. ३४ बोलण्यास अशक्य. ३५ बंद होतो. ३६ निराकाराची. ३७ पाण्यातील मळ. ३८ उत्पन्न होतांच. ३९ बुद्धिरूप लग्नघटिका. ४० संयोग.

अभिन्न । जैसें लोपलें अभ्र गगन । होऊनि ठाके ॥ ७२ ॥ तैसें विश्व जेथ होये । मागौतें जेथ लया जाये । तें विद्यामानेंचि देहें । जाहला तो गा ॥ ७३ ॥

तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः । कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥४६॥

जया लाभाचिया आशा । करूनि धैर्यबाहूंचा भरंवसा । घालीत षट्कर्मांचा धारेसां । कर्मनिष्ठ ॥ ७४ ॥ कां जिये एक वस्तूलागीं । बाणोनि ज्ञानाची वज्रांगी । झुंजत प्रपंचेंशीं समरंगीं । ज्ञानिये गा ॥ ७५ ॥ अथवा निलागें निसरडा । तपोदुर्गाचा आंडकडा । झोंबती तपिये चोंडा । जयांचिया ॥ ७६ ॥ जें भजतियां भज्यें । याज्ञिकांचें याज्यें । एवं जें पूज्य । सकळां सदा ॥ ७७ ॥ तेंचि तो आपण । स्वयें जाहला निर्वाण । जें साधकांचें कारण । सिद्ध तत्त्व ॥ ७८ ॥ म्हणौनि कर्मनिष्ठा वंद्यु । तो ज्ञानियांसि वेद्यु । तापसांचा आद्यु । तपोनाथु ॥ ७९ ॥ पैं जीवपरमात्मसंगमा । जयाचें येणें जाहलें मनोधर्मा । तो शरीरीचि परी महिमा । ऐशी पावे ॥ ४८० ॥ म्हणौनि याकारणें । तूंतें मी सदा म्हणे । योगी होईं अंतःकरणें । पंडुकुमरा ॥ ८१ ॥

योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना । श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ ४७ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ध्यानयोगो [अभ्यासयोगो] नाम षष्ठोऽध्यायः॥

अगा योगी जो म्हणिजे । तो देवांचा देवो जाणिजे । आणि सुख सर्वस्व माझें । चैतन्य तो ॥ ८२ ॥ तेथ भजता भजन भजावें । हें भक्तिसाधन जें आघवें । ते मीचि जाहलों अनुभवें । अखंडित ॥ ८३ ॥ मग तया आम्हां प्रीतीचें । स्वरूप बोलीं निर्वचे । ऐसें नव्हे गा तो साचें । सुभद्रापती ॥ ८४ ॥ तया एकवटालिया प्रेमा । जरी पाडें पाहिजे उपमा । तरी मी देह तो आत्मा । हेंचि होय ॥ ८५ ॥ ऐसें भक्तचकोरचंद्रें । त्रिभुवनैकनरेंद्रें । बोलिलें गुणसमुद्रें । संजयो म्हणे ॥ ८६ ॥ तेथ आदिलापासूनि पार्था । ऐकिजे ऐसीची आस्था । दुणावली हें यदुनाथा । भावों[२१] सरलें ॥ ८७ ॥ कीं सावियेंचि मनीं संतोषला । जे बोला आरिसा जोडला । तेणें हरिखें आतां उपलवला । निरूपील ॥ ८८ ॥ तो प्रसंगु आहे पुढां । जेथ शांतु दिसेल उघडा । तो पोलाविजेल मुंडा । प्रमेय-बीजांचा ॥ ८९ ॥ जें सात्त्विकाचेनि वेंडपें । गेलें आध्यात्मिक खरपें । सहजें

तद्रूपतेशीं शुभलग्न होऊन तो ब्रह्मस्वरूपीं अभिन्नत्व पावतो. अभ्रें नाहींतशीं झालीं म्हणजे ज्याप्रमाणें तीं आकाशरूपच होऊन राहतात ७२. त्याप्रमाणें [ विक्षेपादि विघ्नें नाहींतशीं झाली म्हणून ] ज्यापासून विश्वाची उत्पत्ति होते व ज्या ठिकाणीं तें पुनः लयास जातें, तें ब्रह्मस्वरूप तो या विद्यमान देहांत असतांनाच होतो ७३.

**अन्वयार्थ -- तपस्विभ्यः**:- कृच्छ्रचांद्रायणादि तप करणाऱ्या तपस्व्याहून-**योगी**-वर सांगितल्याप्रमाणें योगाभ्यास करणारा-**अधिकः**-अधिक आहे-**ज्ञानिभ्यः अपि**-ज्ञानी पुरुषांहून-शास्त्रपांडित्यवानांहूनहि योगी-**अधिकः**-**मतः**-अधिक-श्रेष्ठ मानलेला आहे-**च**-आणि-**योगी**-योगी योगाभ्यासी-**कर्मिभ्यः**-अग्निहोत्रादिक कर्में करणारांहून-**अधिकः**-श्रेष्ठ आहे-**अर्जुन**-हे अर्जुना ! **तस्मात्**-म्हणून **तूं-योगी**-योगी-**भव**-हो ४६.

ज्या लाभाच्या आशेनें कर्मनिष्ठ पुरुष आपल्या धैर्यरूपी बाहुबलाच्या भरंवशावर षट्कर्मांच्या प्रवाहांत उडी घालतात ७४. किंवा ज्या एका वस्तूसाठीं ज्ञानी पुरुष हें ज्ञानरूपी दृढ चिलखत धारण करून समरांगणांत प्रपंचरूपी शत्रूशीं लढतात ७५. अथवा ज्याच्या प्राप्तीसाठीं तपस्वी लोक हे निराधार व निसरडें झालेल्या तपोरूप पर्वताच्या तुटलेल्या कड्यावरून प्रवास [चढण्याचा प्रयत्न] करितात ७६. जें स्वरूप भजन करणारांच्या भजनाचें अधिष्ठान आहे, जें यज्ञ करणाऱ्यांच्या यज्ञांचा विषय म्ह. यजन करावयास योग्य अशा प्रकारें सर्वांस, सर्वकाळीं पूज्य आहे ७७. आणि जें साधकांचें साध्य आहे, जें एकमेव सिद्ध तत्त्व तें निर्वाण परब्रह्म तो स्वतःच होतो ७८. म्हणून तो कर्मनिष्ठांना वंद्य व ज्ञान्यांना जाणण्यास योग्य आणि तपस्व्यांचा मूळ तपोनाथ होय ७९. हें पहा, जीव व परमात्मा यांच्या ऐक्यरूप संगमाच्या ठिकाणीं ज्याच्या मनाच्या वृत्तीचे येणे झाले तो देहधारी असूनहि त्यास असला महिमा प्राप्त होतो. ४८०. म्हणून याच कारणास्तव, अर्जुना 'तूं अंतःकरणानें योगी हो' असें तुला मी नेहमीं सांगत असतों ८१.

**अन्वयार्थ---सर्वेषां योगिनाम् अपि**-रुद्र-आदित्यादिकांचें ध्यान करणाऱ्या दुसऱ्या सर्व योग्यांमध्येंहि-**यः श्रद्धावान्**-जो श्रद्धावान्-योगी-ध्यानी-**मद्‌गतेन अन्तरात्मना**-माझ्या ठिकाणीं स्थिर केलेल्या अंतःकरणानें-**मां भजते**-मला भजतो-**सः मे युक्ततमः**-तो मला अतिशय योगी म्हणून-**मतः**-मान्य आहे ४७.

अरे ! जो योगी म्हणतात तो देवांचा देव जाणावा. माझें सर्व सुखाचें आगर आणि केवळ माझा तो आत्मा आहे असें समज ८२. त्यास भजन करणारा, भजनक्रिया व भज्यवस्तु ही 'भक्तिसाधनाची' जी त्रिपुटी ती सर्व त्याच्या अनुभवानें सदोदित मीच झालों आहे ८३. हे सुभद्रापते ! मग त्याच्या आणि माझ्या प्रीतीचें स्वरूप शब्दानें वर्णन करितां येईल असे खरोखर नाहीं. कारण, तो म्हणजे प्रत्यक्ष मीच ८४. अशा रीतीनें जें प्रेमाचें ऐक्य झालेलें असतें, त्याच्या तुलनेला योग्य उपमा पाहिजे असेल तर मी देह व तो आत्मा हीच होय ! ८५. संजय म्हणतोः-राजा, भक्तरूप चकोराचा चंद्र किंवा सर्व त्रिभुवनाचा एकमेव राजा व गुणांचा समुद्र असा जो श्रीकृष्ण परमात्मा, तो असें बोलला ८६. तेथें पार्थाला पूर्वीपासून योगाचें ऐश्वर्य ऐकावें अशी तीव्र इच्छा होतीच, ती पुनः दुप्पट झाली असें यदुनाथास मनांत कळून चुकलें ८७. आणि तें पाहून श्रीकृष्णाच्या मनांत सहजच आनंद झाला. कारण मी जें सांगतों तें प्रत्यक्ष पाहाण्याचा अर्जुनरूपी हा आरसाच प्राप्त झाला आहे. तेव्हां आतां या आनंदाच्या प्रसन्नतेमुळें ती पुढील कथा विस्तारानें सांगतील ८८. तो प्रसंग पुढें असून त्यांत 'शांतिरस' स्पष्ट दिसेल, व प्रतिपाद्यविषयरूप बीजांचा मुडा-गडा मोकळा केला जाईल ८९. कारण, ज्ञानबीज पेरण्याकरितां सत्त्वगुणांची वृष्टि होऊन, व आध्यात्मिक तापांचें गुंताडें

१ यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान व प्रतिग्रह हीं षट्कर्में. २ प्रवाहांत. ३ घालून. ४ दृढकवच. ५ युद्धभूमींत. ६ निराधार. ७ तपोरूप किल्याचा. ८ अर्धा तुटलेला कडा. ९ इच्छेनें. १० ज्या आत्म्याच्या. ११ भजन करावयास योग्य. १२ यजन करावयास योग्य. १३ शेवट, परब्रह्म. १४ जाणण्यास योग्य. १५ मूळ. १६ जीव. १७ भजन करणारा, भजन करणें व भजन करण्याचा देव ही त्रि टी. १८ त्याच्या व आमच्या प्रेमाचें रूप. १९ सांगतां येत नाहीं असे नाहीं. २० बरोबरीनें. २१ समजून चुकलें. २२ सहज. २३ हर्षानें. २४ आनंदाचे भरांत विस्तारानें सांगेल. २५ शांतिरस. २६ स्पष्ट दिसेल २७ तांदूळ इत्यादि भरून केलेला गोलाकार गडा. २८ ज्ञानरूपी बीजाचा. २९ वृष्टीनें. ३० रुक्षपणा.

निडारले वाफे । चतुरचित्ताचे ॥ ४९० ॥ वरी अवधानाचा वाफसा । लाधला सोनयाऐसा । म्हणौनि पेरावया धिंवसा । श्रीनिवृत्तीसी ॥ ९१ ॥ ज्ञानदेव म्हणे मी चोंडें । सद्गुरूंनीं केलें कोडें । माथां हात ठेविला तें फुडें । बीजचि वाइलें ॥ ९२ ॥ म्हणौनि येणें मुखें जें जें निगे । तें संतांच्या हृदयीं साचाचि लागे । हें असो सांगों श्रीरंगें । बोलिलें जें ॥ ९३ ॥ परी तें मनाच्या कानीं ऐकावें । बोल बुद्धीच्या डोळां देखावें । हे सांटोवाटीं घ्यावें । चित्ताचिया ॥ ९४ ॥ अवधानाचेनि हातें । नेयावें हृदयाआंतौतें । हे रिझवितील आयणीतें । सज्जनांचिये ॥ ९५ ॥ हे स्वहितातें निवविती । परिणामातें जीवविती । सुखाची वाहविती । लाखोली जीवां ॥ ९६ ॥ आतां अर्जुनेंसीं श्रीमुकुंदें । नागरें बोलिजेल विनोदें । तें वोंवियेवेनि प्रबंधें । सांगेन मी ॥ ४९७ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥ श्लोक ४७, ओव्या ४९७.



डिखळे विरून जाऊन चतुर श्रोत्यांच्या चित्ताचे वाफे सहज तयार झाले ४९०. त्यावर सोन्यासारखा अवधानाचा वाफसा साधल्यामुळें श्रीनिवृत्तिनाथांना तें ज्ञान-रूप बीज पेरण्याची उत्कंठा उत्पन्न झाली ९१. श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतातः–तें बीज पेरण्याकरितां सद्गुरूंनीं मोठ्या कौतुकानें मला चाडे केलें व माझ्या मस्तकावर हात जो ठेवला, तो हात ठेवला असें नव्हे, तर खरोखर चाड्यांत उघड उघड (ब्रह्म) बीजच घातलें ९२. म्हणून या माझ्या मुखांतून जें जें कांहीं निघेल, तें संतांच्या मनाला खरेंच पटेल. हें असो. आतां श्रीरंग जें कांहीं बोलले, तें मी पुढें सांगतों ९३. परंतु तें बोल मनाच्या कानानें ऐका, बुद्धीच्या डोळ्यानें बघा व चित्त देऊन त्याच्या मोबदल्यादाखल तें बोल घ्या ९४. तें शब्द लक्षपूर्वक श्रवणाच्या हातानें हृदयांत सांठवा म्हणजे तें सज्जनांच्या बुद्धीला समाधान देतील ९५. हें बोल नित्य आत्मप्रतिरूप हित करून शांति देतील, संसार संकटांतून मुक्त करतील व जीवाला पूर्ण सुखाची लाखोली वाहवितील–पूर्ण सुखरूप करतील ९६. आतां श्रीभगवान् अर्जुनाला सहज लीलेनें जें कांहीं सर्वोत्कृष्ट ज्ञान सांगतील, तें मी ओवीछंदानें तुम्हांला सांगेन ४९७.

---

१ भरून आलें, परिपक्व झालें. २ शहाण्यांच्या अंतः-करणाचें. ३ पेरण्याजोगी ऊब, पिकण्याजोगा काल. ४ धैर्य. ५ पेरणीच्या कुरीवरचें भोंकाचें लांकूड. ६ कौतुकानें. ७ पेरण्याकरितां निराळे ठेवलेलें धान्य बीं. ८ घातलें. ९ ऐकिलेले बोल बुद्धीच्या डोळ्यांनी पहावे. १० अदलाबदलीनें–चित्त देऊन त्याचा मोबदला बोल घ्यावे. ११ लक्षपूर्वक श्रवणाचा. १२ न्यावें १३ आंत. १४ रमवील. १५ चौकसबुद्धीला इच्छेला, आवडीला. १६ निववितील. १७ नाशाप्रत. १८ मुक्त करितात. १९ सर्वोत्कृष्ट, सप्रेम, सुंदर. २० कवितेनें, छंदानें.



# अध्याय संगति व सहाव्या अध्यायाचें तात्पर्य

## नाना योगविभवभांडार । उघडलें कां ।। अ. ६–११

मागील अध्यायाचें सूत्र धरून अर्थात् मागील अध्यायांत 'स्पर्शान्कृत्वा' आणि 'जितेंद्रिय मनोबुद्धिः' या २७ व २८ व्या श्लोकांत मोक्षाकरितां जे योगसाधन ध्वनित केले; ज्याचा दंश दाखविला त्या योगाचा विस्तार या अध्यायांत श्रीभगवंतांनीं केला आहे. प्रथम श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं ३८ व्या ओवीपर्यंत या सहाव्या अध्यायाची प्रशंसा, त्याचा अधिकारी व अध्याय संगति सांगितली आहे. ती अशी :—

संजय धृतराष्ट्रास म्हणतो—'राजा ! भगवंतांनीं हें ब्रह्मरसाचे पारणें अर्जुनासाठीं केले; पण त्या ब्रह्मरसपूर्ण श्रवणाचा आपणांस अनायासेंकरून लाभ मिळाला म्हणून आपले खरोखरी भाग्य आहे' असें संजय धन्यता मानून संतोष पावत आहे [ १ ते ९ ]. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. हा सहावा अध्याय म्हणजे 'गीतार्थाचें सार', 'विवेक सिंधूचें पैलतीर' आणि 'योगविभव भांडारच आहे' [ गीतेच्या प्रतिपाद्य तात्पर्यभूत विषयाचे विवरणहि येथूनच वाढीस लागते ] त्याचे साहित्य–अलंकारांनीं युक्त असें कथन करीन. तें प्रतिपादन 'मराठी भाषें' तच करणार; पण जे अमृतासहि लीलेनें जिंकील अशा रसाळ शब्दांनीं करीन. त्यामुळें श्रोत्यांच्या सर्व–इंद्रियांचे सारखेंच समाधान होईल व रसज्ञ, रसिक–श्रोत्यांना तर शब्दांचे ठिकाणीं चिंतामणिसारखें गुण दिसून येतील [ १० ते २१ ] मात्र या ग्रंथरूप मेजवानीचें 'अधिकारी' म्हणजे आत्मज्ञानाच्या आवडीनें संसार व स्वर्गसुख यांचा तुच्छ म्हणून त्याग करणारें व ज्यांचें मन सूक्ष्म वस्तुग्रहणयोग्य असेल तेच वैराग्यवान्, निष्काम जन होत [ २२ ते ३१ ]. भगवंतांनीं अरूप, अतींद्रिय, मन–बुद्धीस अगोदर, असें जें ब्रह्म अर्जुनास सांगितलें, त्याच ब्रह्माचें मी तुम्हांला श्रीगुरुनिवृत्तिनाथांच्या कृपासाध्यामुळें मराठी भाषेंत प्रतिपादन करीन [ ३२ ते ३८ ]. षड्गुणैश्वर्य संपन्न भगवन्त सांगतात. निष्काम कर्मयोग आणि सांख्ययोग हीं नांवें जरी वेगवेगळी दिसली तरी त्या दोन्ही मार्गांचे शेवटीं प्राप्यस्थान जें 'ब्रह्मस्वरूप' तें एकच आहे, जसे एकाच पुरुषास वेगवेगळ्या दोन नांवांनीं हांका मारतात किंवा दोन रस्त्यांनीं एकाच गांवास जाता येते. त्याप्रमाणें दोन्ही मार्गांचें प्राप्यस्थान एकच आहे [ ३९ ते ४२ ]. अर्जुना ! ज्यानें संकल्प नाश केला आहे, तोच खरा संन्यासी व तोच खरा निष्काम कर्मयोगी आहे. ज्याचा संकल्प पूर्णतया नाहींसा झाला. त्यासच योगाचे सारसर्वस्व जें ब्रह्म तें प्राप्त होते. असा अंतरंग संकल्पाचा संपूर्ण संन्यास नसेल तर केवळ बहिरंग, वरपंग भगवी वस्त्रें घेतली, संन्यासाश्रम घेतला म्हणजे खरा संन्यास झाला असांतला भाग नाहीं; हें मात्र खास; असें ज्यास अनुभवानें खरें ठरून पटले तोच योगी व तोच संन्यासी होय [ ४३-५३ ].

ज्याला परमार्थांतील परम, अन्तिम साध्य स्थितीस प्राप्त व्हावयाचे असेल–त्यानें निष्काम–कर्मयोगरूप पायऱ्या चढण्यास आरंभ करून, अष्टांग योगरूप यम–नियमादि पायऱ्यांनीं चढून गेल्यावर, मग शेवटीं चाल पुरी होऊन ब्रह्मात्मैक्य अवस्थेंत साध्यसाधनांतील भेद नाहींसा होतो, ऐक्य भूमिकारूप समाधी प्राप्त होतो. हीच परागति होय [ ५४ ते ६० ]. या साधनांनीं जो योगनिपुण झाला त्याचीं लक्षणें सांगतों—ज्याच्या इंद्रियरूपीं घरीं विषयांचे येणें जाणें होत नाहीं. तो आत्मबोधरूपीं खोलींत स्वस्थ निजलेला असतो. तो बाह्यदेहेंद्रियादि उपाधिद्वारां व्यवहार करीत असल्याचे दिसले तरी तो तत्त्वतः स्वदृष्ट्या क्रियाशून्य, अकर्ताच असतो. [ यांत ब्रह्मात्मैक्य साक्षात्कार आणि इंद्रियनिग्रह, वासना त्याग यांचा कार्यकारणभाव संबंध प्रतिपादिला अर्थात् वैराग्यपूर्वक द्वैतप्रतीतिरहित, देहतादात्म्यरहित–पुरुषासच दुःखसंबंधरहित जीवन्मुक्तीचें विलक्षण सुखाचा लाभ होतो, हे तत्त्व मुख्य सांगितलें तोच योगनिष्णात योगारूढ होय असें समज [ ६१ ते ६९ ]. ही योगारूढ पुरुषास लाभणारी देहतादात्म्यरहित ब्रह्मस्थिति आपल्यास मिळावी म्हणून उत्कंठापूर्णतेनें अर्जुन म्हणतो देवा ! योगनिष्ठाला ही योग्यता कोण देतो ! [ ६६ ]

यावर भगवन्त उत्तर देतात—ही स्थिति–योग्यता, कोणीहि कोणाला देत नाहीं; अद्वैतसिद्धांतानुसार दुसरें असें कांहींच नाहीं; तर मग ही योग्यता व ही स्थिति दुसरें कोण देईल? ही योग्यता स्वतः ज्याची त्यानें मिळविली पाहिजे. अविवेकरूपी अंथरुणावर प्रबळ अविद्येमुळें जीव निजतो. त्याला स्वरूपाविषयीं आवरण निर्माण होते. मग जन्ममरणरूपी वाईट स्वप्नाचा अर्थात् विक्षेपाचा अनुभव येतो. मिथ्या देहाभिमानाकडे चित्त देऊन आपणच आपला घात करून घेतो. देहतादात्म्यभ्रांतीमुळें कोशकीटकाप्रमाणें आपला नाश करून घेतो. आत्मानात्मविचारानें देहाहंकार टाकावा म्हणजे मग नित्यसिद्ध असलेलें आपलेंच स्वरूप ओळखून ब्रह्मरूप व्हावें; म्हणजे आपणच आपलें कल्याण केलें, असें सहजच होते व प्रत्येकानें आपल्या हितासाठींच ब्रह्मात्मैक्य साक्षात्कार संपादन करावा; नाहींतर 'मी' आणि 'माझें' असा नसतां, खोटा छंद अन्तकरणानें घेऊन स्वरूपतः मुक्त असूनहि बद्ध समजतो. वास्तविक विचार करून पाहिले तर जें होय, ते तो पूर्वींचाच आहे [म्हणजे अज्ञान व तत्कार्य अहं–ममरूप भ्रांतिकृत जीवत्व जाऊन जो ब्रह्मभाव प्राप्त व्हावयाचा तो तर मूळचाच स्वतः सिद्ध आहे] पण काय करावे तशी त्याची बुद्धि होत नाहीं. कांहीं केल्या 'मी ब्रह्मरूप आहे' असा बुद्धीचा निश्चयच होत नाहीं. अर्थात् स्वतःची नित्यसिद्ध ब्रह्मस्थिति कळतहि नाही व तसा दृढनिश्चयहि होत नाही!! किंबहुना!! असें पहा कीं स्वप्नांतील तरवारीच्या घावानें खरोखर कोणी मरतो काय? त्याप्रमाणें जेव्हां जीव स्वतःला आत्मस्वरूपाच्या अज्ञानामुळें "मी कर्ता आहे, मी भोक्ता आहे, मी ज्ञाता आहे, मी अज्ञानी आहे, मी संसारी आहे, असें समजतो तेव्हांहि तो ब्रह्मरूपच आहे नव्हे नव्हे नित्य उपलब्धिस्वरूप, अविकृत, अपरिच्छिन्न, ब्रह्मस्थितीस कल्पित, परिच्छिन्न उपाधिसंबंधानें खरोखर बंधन संभवेल काय? तर मुळींच नाहीं. कारण, निर्विशेष, नित्ययुक्त ब्रह्मस्वरूप व बंध व तत् सापेक्ष मोक्ष याहून अतीत आहे. संकल्प, देहाभिमान, अर्थात् अहंममतेचा विचारानें त्याग केला कीं, तो स्वतः स्वरूपानें मूळचाच परमात्मरूप आहे [६७ ते ८४]. या अद्वैत ब्रह्मस्थितींत त्या ब्रह्मवेत्त्याचे शारीराशीं तादात्म्य नसल्यामुळें, त्यास स्वतःविना अन्य कांहींच दिसत नसल्यामुळें सुखदुःखादि द्वंद्वें स्पर्शहि करीत नाहींत व त्यास आप-परभावादि निरनिराळ्या वृत्तींची कल्पनाहि नसते. कारण, पुनः मावळणार नाहीं, अशा अद्वैत दिवसानें ज्यास उजाडलें आहे. त्यास सर्वत्र ब्रह्मदृष्टिच प्राप्त झालेली असते. योगनिष्ठांस मी व हे सर्व ब्रह्मरूपच आहे. अशा बोधानें द्वेषादि विषमभावना उत्पन्नच होत नाहींत. नाम–रूपें मायिक असून एकमेवाद्वितीय ब्रह्मापरोक्षानुभूति ज्यास लाभली तोच 'समबुद्धि' होय. ['सर्वं खल्विदं ब्रह्म' या ब्रह्मात्मैक्यापरोक्षसाक्षात्काराच्या भूमिकेवरून श्रीज्ञानेश्वरमहाराज आपल्या 'एकाएकी व अपरिग्रहि' य पदाच्या भाष्यांत असा अर्थ करतात कीं] त्याच्या व्यापकानुभूतीच्या दृष्टीनें दुसरें असें कांहींच उर्वरित न राहिल्या-मुळें तो एकाकी, एकटाच राहतो. सर्व व्यापकतेमुळें सहजच म्हणजे परिग्रह करण्यास दुसरें असें यत्किंचितहि नसल्यामुळें तिन्ही लोकांत तोच अपरिग्रही होय. परिग्रहशून्य म्हणजे स्वभिन्न वस्तुच सिद्ध होत नाहीं तर मग तो काय घेणार? व कोणपासून घेणार? अशा समबुद्धींचा म्हणजे व्यापक अद्वैत–अनुभूतीचा त्यास लाभ होतो [८९ ते १०७].

उपर्युक्त सिद्धाची, योगनिष्णाताची लक्षणें ऐकून तीं लक्षणें साधकांनीं प्रयत्नपूर्वक मिळविण्यासाठीं अर्थात् तीं आपल्या आंगीं बाणण्यासाठीं आपण काय करावें, अशी उत्कंठा अर्जुनास निर्माण झाली. म्हणून त्या मार्गाचे वर्णन भगवान् सांगतात. त्याचा अनुवाद करण्यापूर्वी श्रीज्ञानेश्वरमहाराज भगवंत व अर्जुन यांच्यांतील प्रेमाचे नितान्त सुंदर व आपल्या अपूर्व भाषाशैलीनें वर्णन करतात 'अर्जुन हा भगवंताच्या सख्य भक्तीचा आश्रय होता. नितान्त प्रेमामुळेंच पुष्कळ दिवस सेवा करावी, योग्यवेळ पाहून विनंती करावी, एवढाहि प्रयास त्या भाग्यवान् अर्जुनास करावा लागला नाहीं. अर्जुनानें "मी ब्रह्म व्हावें, मलाहि ती द्वंद्वातीत साम्यावस्था लाभावी" असें म्हटले. ते ऐकून व अर्जुनास ब्रह्मत्वाचे डोहाळे लागले असून त्याच्या बुद्धीच्या पोटांत ज्ञानफल पर्यवसायि वैराग्यरूप गर्भ राहीला आहे,

असें जाणून भगवन्त म्हणतात–अर्जुना ! हा सर्वोत्कृष्ट मार्ग आहे तो ऐक. या मार्गांत प्रवृत्तिरूप वृक्षाच्या बुडालाच निवृत्तिरूप कोट्यावधि फळें दिसत आहेत. या मार्गाचे आक्रमण करून योगी, महर्षि, साधक सिद्ध अवस्थेस पोचले. श्रीशंकर तर या मार्गाचे अद्यापपर्यंत पांथिक, यात्रेकरू आहेत. या मार्गाची ओळख होऊन त्या मार्गानें वाटचाल करीत असतांना रात्र–दिवस, तहान–भूक याची आठवणहि राहात नाहीं. या मार्गाचे आक्रमण केलें असतां मोक्षरूपी फळ मिळते [ १०८ ते १६२ ].

या योगमार्गाचा अभ्यास करण्यासाठीं, निवान्त, नितान्त रम्य आणि पवित्र स्थान असण्याची जरूरी आहे. त्या ठिकाणीं पूर्वी संतांनीं वास्तव्य केलेलें असावें. म्हणजे पूर्वीच्या साधकांच्या तपानें, संतांच्या वास्तव्यानें ती जागा पवित्र झालेली असावी, असे या ' शुचि ' देशाचे वैशिष्ट्य असावें. त्या स्थळीं जर विषयासक्त पुरुष आला, तरी तो परत फिरण्यास विसरतो. जें स्थान म्हणजे नास्तिक व विषयासक्त यांसहि विरक्ति निर्माण करते. अशा एकान्त स्थळीं आसन घालून विषयवैमुख्यतापूर्वक चित्ताची एकाग्रता करून, सद्गुरूंचे मनांत स्मरण करून, अभ्यासास आरंभ करावा. एकान्त स्थल, आसन, प्रसन्न चित्त, विषयवैमुख्य हीं सर्व ध्यानांत–देवाचे ठिकाणीं चित्ताचे स्थिरीकरण करण्यास योग साधनांतील उपांगें होत; हे चांगलें लक्षांत ठेवावयास हवे.

मूळ गीताग्रंथांत ' कुंडलिनी–योगा 'चा किंवा वज्रासनद्वारां कुंडलिनी जागृत करण्याचा प्रत्यक्ष, मुखतः उल्लेख आढळत नाहीं. फक्त " प्राणाप्राणगती रुध्वा ' हा किंवा असें प्राणजयाचे उल्लेख मात्र आढळांत येतात. योगशास्त्रांत श्रीपतंजलींनीं " योगश्चित्तवृत्ति निरोधः " अशी योगाभ्यासाची फलश्रुति सांगितली आहे. चित्तवृत्तीचे पूर्ण स्थिरीकरण होणें किंवा विलीनीकरण होणें, हेच त्याचें फल प्रतिपादिलें आहे. अर्थात् प्राणजयानें मनोजय होतो. म्हणूनच प्राणजयानें प्राणाचा प्रणव करून–म्हणजे " गगनी लयो मना । पवने कींजे " असा मनोजय करावा, असें सांगण्यासाठींच श्रीज्ञानेशांनीं कुंडलिनी योगाचे व अष्टांगयोगाचें वर्णन, सहाव्या, नवव्या, बाराव्या, तेराव्या अध्यायांत असें वेळोवेळी केलें आहे. ब्रह्मात्मैक्यज्ञानास विवेक, वैराग्य यांची आवश्यकता आहे, तशी ज्ञानजनक मनस्थैर्यास ध्यानयोगाची वा कुंडलिनी–योगाचीहि आवश्यकता आहे, असें यांत ध्वनित होते. ' कुंडलिनी योग ' हा श्रीगुरुसंप्रदायलब्ध असा अनुभूतीचा असल्यामुळें त्यचे श्रीज्ञानेशांनीं खुलासेवार वर्णन केले आहे.

या मार्गाला श्रीज्ञानेशांनीं ,, पंथराज " असें म्हटलें आहे. " पिंडें पिंडाचा ग्रासु " हे नाथपंथीय आगळे, वेगळे–असें गूढ सिद्धांत–तत्त्व आहे. अर्थात् प्राणजयानें मनोजय साधला म्हणजे " शरीरेंचि परब्रह्म होये अनुभवीं तो " देहांत असूनहि देहाकारवृत्ति नसल्यामुळें देहतादात्म्यरहित ब्रह्मस्थिति लाभते. देहांत राहूनच, त्याच्याच आश्रयानें अष्टांगयोगानुष्ठानद्वारां देहांतर्गत पंचतत्त्वांची किंवा पंचभूतांची आटणी करून देहात्मत्व भ्रांति नष्ट करून ब्रह्मस्थितीस प्राप्त होतां येते म्हणून येथें श्रीज्ञानेशांनीं "पंथराज" विस्तारानें सांगितला आहे. श्लोकांत भगवंतानीं आसन कसें असावें ! एवढेच प्रतिपादिले आहे. तरीपण श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं आपल्या समोर श्रीगुरु निवृत्तिनाथ श्रोते बसले आहेत. म्हणून योगांतील स्वानुभवाच्या भूमिकेवरून " नाथ पंथीय वैशिष्ट्य ", म्हणून चित्त स्थिर करणारी क्रिया, त्यांची साधनें म्हणून मूळ बंध–वज्रासन, जालंदर आणि ओढियाणा असा त्रिबन्ध, अभ्यासानें मनोधर्मबळ कमी होते, कुंडलिनीची जागृतता, त्या योगमार्गांत साधकांस कोणकोणते अनुभव येतात. त्यानंतर–शरीराची अंगकान्ती कशी बदलते, अष्टमहासिद्धींचीं प्राप्ति झाली तरी त्यांत साधकानें अडकून, गुंतून राहू नये. कुंडलिनी प्रणवाची जन्मभूमि होय, अनुहत ध्वनि, कुंडलिनीची शोभा, पिंडेंपिंडाचा ग्रास, आकाश आकाशांत मिळते. पंचभूताचा लय, आटणी, निर्वाण–परमशांती म्हणजेच अद्वैत–ब्रह्मस्थिति, साक्षात् ब्रह्मरूपता ही त्या योग्यास शेवटीं लाभते. अर्थात् नियत चित्ताचा योगी समाधि अभ्यासानें सर्व वृत्तींची उपरामरूप, तत्त्व साक्षात्कारद्वारां, मोक्षफलपर्यवसायी, ऐक्यरूपपर्यवसायी ' मत्संस्था ' मत्स्वरूप परमानंदरूपतेस प्राप्त होतो. ब्रह्मात्मैक्य स्थितीचा लाभ होतो. या स्थितीचें वर्णन

शब्दातीत आहे. तेथें शब्दमर्यादाच संपते. जें परब्रह्मतत्त्व–मनरहित अवस्थेचें सौन्दर्य आहे. चौथ्या ज्ञानरूप 'तूर्यावस्थेचे' तारुण्य आहे व जें नित्यसिद्ध, अमर्याद आहे. जें त्रैलोक्याचे कारण, अष्टांग योगरूप वृक्षाचे फळ व आनंदाचे केवळ चैतन्य आहे. तें अनिर्वाच्य सुखच ते योगनिष्णात पुरुष अंगानें होतात याचे श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं अतिशय स्फूर्तिदायक, खुलासेवार वर्णन केले आहे [ १६२ ते ३२५ ].

योगाभ्यास हा ब्रह्मात्मैक्य स्थितीचें उत्तम, उचित साधन आहे; पण भगवंता ! त्यांत माझी योग्यता आहे कीं नाहीं ? माझ्या अंगीं जी योग्यता आहे, तेवढ्याच–योग्यतेनें मी योगाभ्यास केला तर तो निश्चित फलपर्यवसायी होईल काय ? या अर्जुनाच्या प्रश्नाचे उत्तर भगवन्त देतात. "योग्यता ही फळप्राप्तीच्या आधीन आहे. अर्थात् योग्यता, अधिकार हा 'फल–बल–कल्प्य" असतो. योग्यतेच्या अधिकाऱ्याच्या खाणी आहेत काय ? तर नाहींत. तो अधिकार प्रयत्न साध्य अर्थात् थोडी विरक्ति, थोडे यम–नियम, यांची आवश्यकता आहे, विषयासक्ति टाकून इंद्रिय संयम केला असतां, असा हळूहळू अभ्यास केला असतां प्रयत्नाचें प्रमाण कमी कमी होत जाऊन, त्यांत संवयीनें सोपेपण वाढत जाऊन सहजता लाभते व असा इंद्रिय निग्रहाचे बाबतींत सोपेपणा, सहजपणा झाला म्हणजे, योगाभ्यासांत, ध्यानांत, 'मनोनिग्रह' वा मनाची एकाग्रता होण्यास त्याची मदत होते. नियमितपणानें वागणें हे एक योगाचे अंगच आहे. विषयवासनांमुळें जे मन चंचल होते ते मन निर्वात स्थलीं ठेवलेल्या दीपाप्रमाणें 'अगदीं निश्चल' होतें ही स्थिति-चित्तास लाभली म्हणजे तोच साधक योगयुक्त झाला असे जाणावे. विषयवासनांचा त्याग करण्यांत इंद्रिय निग्रहाचें कष्ट तर खरेंच; पण हीं दुष्ट इंद्रियें. याचा उगाच बाऊ करतात. एरवीं या योगासारखे सोपे साधन कांहीं आहे काय ! पण आपल्या खऱ्या हितास जें जें चांगलें तें तें या इंद्रियांना सदाच दुःखकारक वाटते [ ३२६ ते ३६२ ] योगाभ्यासाच्या फलाचे वर्णन सांगतात योगाभ्यास पाठवामुळें चित्तवृत्तीचा निरोध करून अखंडानंदघन आत्मस्वरूपीं चिर–अवस्थान झाल्यामुळें सुखसाम्राज्याचा लाभ होतो. अपरिच्छिन्न, आत्यंतिक, नित्यनिरतिशय, केवळ बुद्धीनेंच ग्राह्य आणि इंद्रियांना जे विषय होणारे नाहीं, असें सुख तो ज्ञानी–योगी जेव्हां आपल्या आत्मस्वरूपानें स्थित असतो; त्या अवस्थेंतून, त्या तत्त्वापासून केव्हांच च्युत होत नाहीं; ब्रह्मस्थितीपासून चलित होत नाहीं, तेव्हां तो अनुभवीत असतो तोच एकमेव–परमात्मा सुखरूप आहे अशी सुखरूप–ब्रह्मस्थिति लाभल्यावर; देहतादात्म्य नसल्यामुळें प्रारब्धवशात् देहावर लोकदृष्टीनें दुःखाचे डोंगरच्या डोंगर जरी कोसळले तरी त्या भारानें त्याचें चित्त मुळींहि दडपलें जात नाहीं. तो देहतादात्म्यरहित अशा ब्रह्मस्थितीपासून परत वृत्तीवर येऊन चळत, ढळत नाहीं ! ! तेथून तो च्युत होणें अगदीं अशक्यच होय. कारण, तो अंगानें ब्रह्मरूपच झालेला असतो.

वैराग्यानें विषयवासनांचा नाश-अर्थात् संकल्पाची वारी सरली म्हणजे योग सोपा आहे. शिवाय विषयवासनांचा त्याग एकदम साध्य होत नसेल, तर त्या विषयलोलुपतेचा हळूहळू त्याग करून चित्ताची एकाग्रता, संयम करावा. उतावीळपणा करून भागणार नाहीं. कांहींएक वेळानें तें मन स्थैर्यास हळू हळू प्राप्त होईल. मन आत्मसाक्षात्कारांत आत्मरूपच होऊन जाईल. त्यामुळें द्वैत असें मुळींच न राहतां अद्वैतांतच तें नाहींसें होईल. मग त्या ऐक्य–तेजानें सर्व विश्व धवळून निघून प्रकाशित होईल. अर्थात् चित्त चैतन्यरूप झाल्याचीच परिणति अशी व्यापकानुभूतींत होईल. या अभ्यासात्मक सुलभ उपायानें एवढा मोठा लाभ होतो. योगी जेव्हां ब्रह्मरूप होतो तेव्हां समरसतेच्या मंदिरांत अखिल जगासह त्यास महासुखाची दिवाळीच झालेली असते. योगाभ्यास सोपा म्हणजे अवघडांतला सोपा आहे. कारण, आपल्या पायांनीं पाठीवर चालण्यासारखे अवघड आहे. म्हणून तुला दुसरा उपाय सांगतों; तो असा कीं 'सर्वांच्या ठिकाणीं मी अधिष्ठानरूपानें साधारण व्याप्त आहे" असा निश्चय करून सर्वत्र मलाच जाण, भज. ज्यानें ब्रह्मात्मैक्य बोधानें सर्वत्र मलाच जाणले आहे तो बोधदृष्टीनें माझ्याच बरोबरीचा होय. तो देहेंद्रियादि उपाधींत वावरत असला तरी स्वरूपावरणरहित असल्यामुळें त्यास देहतादात्म्य संभवत नाहीं. त्याची ही अलिप्तवाची

ब्रह्मस्थिति शब्दांनीं सांगण्याजोगी नाहीं. त्या तत्त्ववेत्त्यास देह आहे, त्यास लोकांत सुखी दुःखी म्हणतात; पण आमचा अनुभव मात्र असाच आहे कीं, तो परब्रह्मच आहे. त्यामुळेंच सुखदुःखादि द्वंद्वें व समविषमभाव, देहेंद्रियादि विक्षेपरूप उपाधि असूनहि, आवरण नसल्यामुळें त्यास त्याचा स्पर्शहि होत नाहीं. अर्जुना! तूं समदृष्टि ठेव. कारण, 'साम्यापलिकडे या जगांत मोठा असा दुसरा लाभ नाहीं' [ ३६४ ते ४१० ].

यावर अर्जुन देवाजवळ मनाच्या चंचलतेचे गाऱ्हाणें सांगतो कीं, देवा! ही साम्यावस्था प्राप्त होण्यास मनःस्थैर्याची नितान्त आवश्यकता आहे. [ कारण 'मन' हें पारमार्थातील हरएक साधनेस सहकारी-साधारण कारण आहे. हरएक असाधारण साधनास सुसंस्कृत मनाचे साह्य नसेल तर ते साधन सफल होत नाहीं. म्हणून मनाच्या सहकारीत्वाची आवश्यकता आहे; पण ते मन चंचल, बलवान् असल्यामुळें त्यास आवरून साम्ययोग आचरणें मला अशक्यप्राय दिसते. त्या मनास स्थिर करण्याचा जों जों प्रयत्न करावा तों तों ते अधिकच चंचलतेस प्राप्त होते. म्हणून बहुतेक हा साम्ययोग मला साध्य होणार नाहीं. या अर्जुनाच्या शंकेचे भगवान् उत्तर देतात 'अर्जुना! मन कितीहि चंचल असले तरी त्याचा निग्रह मुळींच होणार नाहीं; असें नाहीं, मनोनिग्रहाचा तुला मी उपाय सांगतों; तो म्हणजे "अभ्यास" व "वैराग्य" या उभय साधनांच्या सहाय्यानें मनोनिग्रह होऊं शकतो. वैराग्य-पूर्वक अभ्यासानें मन हळूं हळूं निग्रहास, एकाग्रतेस प्राप्त होते. अरे! मनांत जसें चंचलत्वादि अनेक दोष आहेत, तसा एक त्यांत महत्त्वपूर्ण गुणहि आहे. तो म्हणजे मनाला एकदां कां त्या परमात्मसुखाची गोडी लागली कीं, तें मन तेथेंच लांचावते म्हणून विचारानें विषयापासून वारंवार परावृत्त करण्याच्या अभ्यासानें, आणि विषयासक्ति-'त्यागरूप' वैराग्यानें आत्मसुखाची गोडी लागली तर ते मन हळूं हळूं ताब्यांत येऊन मग ते वैषयिक सुखाकडे मुळींच जाणार नाहीं व शेवटीं ही साम्यस्थितीहि लाभेल [ ४११ ते ४२९ ].

यावर पुनः अर्जुन दुसरी शंका विचारतो "देवा! एकदां साधक देवप्राप्तीसाठीं, ब्रह्मात्मैक्यरूप साम्य-स्थितीच्या प्राप्तीसाठीं प्रबळ श्रद्धेच्या बळानें या परमार्थ मार्गानें आक्रमण वाटचाल करीत निघाला असतां त्या साध-काच्या अंगीं पुरती योग्यता नसल्यामुळें या हल्ली प्राप्त असलेल्या वर्तमान देहांत देवाची-ब्रह्मात्मैक्यस्थितीची प्राप्ति झाली नाहीं व आसन्नमरणावस्था ओढवल्यामुळें देहाच्या पूर्व स्थितीवरहि येऊं शकत नाहीं, अर्थात् योगसिद्धि पूर्ण-तेस जाण्यापूर्वींच त्या साधकांस मृत्यु येऊन मधेच त्या साधकाचा आयुष्यभानु अस्तास गेला तर त्याची काय गति? ना धड प्रपंच ना धड मोक्षसिद्धि अशा स्थितींत इह-पर, प्रपंच-परमार्थ, हीं दोन्ही त्याच्या हातची जाऊन त्याचे योग साधनानुष्ठान व जीवन व्यर्थच जाईल कीं काय? असा मोठा मार्मिक जिव्हाळ्याचा प्रश्न अर्जुनानें विचारला.

त्यांचे उत्तर भगवन्त देतात-अरें अर्जुना! त्या योगभ्रष्टाची-गति मुळींच थांबत नाहीं. तसेंच त्याचें योग साधनानुष्ठान मुळींच व्यर्थ जात नाहीं. जरी त्या साधकांस या वर्तमान देहांत ब्रह्मात्मैक्यस्थिति लाभली नाहीं; तरी ती जन्मांतरीं निश्चितच प्राप्त होते. कारण, वर्तमान देहाचा आयुष्य भानु अस्तास गेल्यानंतर तो साधक अवांतर फलरूप यज्ञादि कर्में करणाऱ्या पुण्यवानांस लाभणाऱ्या स्वर्गामध्यें दीर्घकाल राहतो. तेथील दिव्य-भोग भोगीत असतां त्याचे मन त्या भोगपराधीन सुखास विटते; किंबहुना!! दिव्य भोग भोगीत असतांहि त्यास कंटाळून तो भगवंतास काकुळती येऊन आळवितो कीं, "देवा! हे विघ्न, हा प्रतिबंध मध्यें कां आला! व असा अनुताप सारखा केल्यानें कांहीं काल भोग भोगून झाल्यावर तो योगभ्रष्ट, योग-साधना अपूर्ण राहिलेला साधक पुनः मृत्युलोकांत वैभवशाली, पवित्र, नीतिसंपन्न कुलांत अथवा अध्यात्म-तत्त्ववेत्त्या योग्यांच्या ब्रह्मनिष्ठ संतांच्या कुळांत जन्म घेतो. ज्या योग्याच्या कुळांत देवहि जन्म घेण्याची इच्छा करतात. जशा दुर्लभतर उत्तम कुळांत तो साधक जन्मास येऊन या नवीन जन्मांत प्राक्जन्मीय संस्कारात्मक बुद्धीचा संयोग व जागृति होऊन मोक्षासाठीं; ब्रह्मात्मैक्य स्थिति प्राप्त्यर्थ पूर्वीपेक्षांहि अधिक प्रयत्न करतो. **अवशतेनें योगाभ्यासाकडे आकर्षिला**

जातो. शास्त्रांत–अध्यात्मज्ञानांत बुद्धीची अप्रतिहत गति होऊन–त्याच्या मनाचे घर पुसत समाधि येते व या अनेक जन्मींच्या अभ्यासानें ब्रह्मात्मैक्य तत्त्वज्ञानानें–मोक्ष, देहदातात्म्यरहित ब्रह्मस्थिति प्राप्त होते, [ यांत सर्व साधारण कोणतेहि निष्काम कर्मजन्य पुण्य, कधींहि वाया जाणार नाहीं. त्याचे योग्य ते फल या जन्मीं अगर जन्मांतरीं निश्चित मिळतेच. हा कर्मकांडांतील महान् सत्यरूप व साधकाचे पक्षीं आत्मनिर्भरतेचे आशास्थानरूप नियम आहे. यांतच पूर्वजन्म व पुनर्जन्म सिद्धांतहि अर्थतः, अपरिहार्यपणें अभिप्रेत व आक्षिप्त आहे. या सिद्धांतानें साधकांना निष्काम कर्मानुष्ठानादि परमार्थ साधनेंत प्रवृत्तिविषयीं प्रेरणा व उत्तेजन मिळते. कारण, ‘ साधक–दशे ’त साधनानुष्ठानाचेवेळीं कित्येकदां अपयशाचे प्रसंग येतात त्यामुळें साधकांत नैराश्य निर्माण होऊन साधनानुष्ठानाचा मार्ग चोखळण्यापासून साधक परावृत्त होण्याचेहि प्रसंग येतात. त्यावेळीं या भगवद्वचनाचा विचार ध्यानीं घेऊन तो साधक चिकाटी न सोडतां ‘ साधनामार्ग ’ आक्रमित राहतो; धीर धरून साधानानुष्ठानांत प्रवृत्त होतो शिवाय अनेक जन्मांनीं केलेल्या साधनानुष्ठानानेंच योगसिद्धि, तत्त्वज्ञान प्राप्त होतें. त्यासाठीं तातडी–उतावीळपणा चालत नाही, त्यासाठीं चिकाटी व धीर बाळगला पाहिजे कोणत्याहि निष्काम कर्मजन्य पुण्यानें ज्या साधनांच्या अभावीं मोक्ष होत नाहीं, त्या साधनांची जुळवाजुळव होऊन जन्मांतरी कां होईना; पण फलप्राप्ति, मोक्षप्राप्ति निश्चित होते. म्हणून श्रुतिस्मृति प्रतिपादित सिद्धांतावर आणि या ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारी पुरुषाचें वचनावर नितान्त आस्तिक्य बुद्धि ठेवून, सात्त्विक धैर्यानें साधनानुष्ठान केले पाहिजे ] तो योगी विद्यमान देहांतच ब्रह्मरूपतेस पावतो. ही साम्यस्थिति लाभावी म्हणून कर्मनिष्ठ, ज्ञानी, तपस्वी, भजनी, साधक आपापल्या परीनें, मार्गांनीं अखंड प्रयत्न करतात. जीव परमात्म्याच्या ऐक्यरूप संगमांत ज्याच्या मनोवृत्तीचें येणें झालें तो देहधारी असला तरी तो ब्रह्मरूप महीमेस प्राप्त झालेला असतो. म्हणून “ तूं अंतःकरणानें योगी हो ! ” असें मी नेहमीं तुला सांगतों. योगानुष्ठान भक्तियुक्त ध्यान–अनुष्ठानानें अनेक जन्मसंसिद्ध होऊन योगी ब्रह्मच होतो. तेथें माझा सुखसर्वस्व, तो माझा आत्मा आहे. त्या अवस्थेंत ‘ भज्य–भक्त–भजन ’ अशी भक्तिसाधनांची जी त्रिपुटी आहे, ती सर्वानुभवानें सदाच मद्रूपतेस प्राप्त होते. हाच योगाचा, भक्तीचा, आणि अपरोक्षानुभूतीचा कळस होय. हीच ज्ञानलक्षणात्मक, अद्वैतानुभूतिपूर्ण पराभक्ति, साध्यात्मक भक्ति होय. व हीच जीवन्मुक्ति होय. व हीच योगाची पूर्णता होय. अद्वैत ब्रह्मस्थितीस पावलेला योगी म्हणजेच ‘ युक्ततम् ’ होय. असा श्रीज्ञानेश्वरमहाराज या अध्याया–अंतीं–निर्वाळा देतात [ ४३० ते ४८९ ].

भगवन्त प्रेमानें बोलत असून अर्जुनासारखा श्रोता असल्यामुळें आनंदाच्या भरांत तसेंच पुढें सातव्या अध्यायात बोलत राहिलें श्रीगुरु निवृत्तिनाथांनीं मोठ्या कौतुकानें मला चाडे केले व माझ्या मस्तकावर हात ठेवून जणुं त्या चाड्यांत उघड उघड अद्वय ब्रह्मबीजच घातले अर्थात् अनुग्रह केला व श्रीकृष्णार्जुन संवादाच्या अनुवादाची योग्यता मला दिली. त्यांच्या कृपासामर्थ्यानेंच या पुढील अध्याय मीं सांगेन; पण श्रोत्यांनीं ते मनाच्या कानांनीं ऐकावे. व शब्द बुद्धीच्या डोळ्यांनीं पहावें; व ‘ शब्द ’ चित्त देऊन त्याच्या मोबदल्यांत घ्यावेत. हे शब्द, नित्यसिद्ध आत्मप्राप्ति करून देऊन जीवाला सुखाची लाखोलीं वाहवितील तो श्रीकृष्णार्जुन संवाद मी ओवीछंदयुक्त सांगेन, असें सांगून श्रीनिवृत्तिनाथांचे शिष्य श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं या अध्यायाचें भाष्य पूर्ण केले.

[ या संपूर्ण सहाव्या अध्यायांतील नकाशे क्रमांक ७ व ८ पहावेत. ]

